# लेखकाचे मनोगत

एक धर्मकृत्य या दृष्टीने हे चरित्र लिहिण्याचा निर्णय केला व त्याच भावनेने कार्यकर्त्यांच्या व वाचकांच्या हाती ते देण्यात येत आहे "भारत आम्हाला विसरला आहे, पठाणांच्या जवळ जे काही होते ते सर्व त्यांनी भारताच्या स्वातंत्र्यासाठी अर्पण केले आणि त्यामुळे ते आज पाकिस्तानच्या दुःखात खितपत पडले आहेत भारत आम्हाला मदत करू शकेल, पण तो आता आम्हाला विसरला आहे, आम्ही आता परके झालो आहोत गांधीजी असते तर असे झाले नसते" बादशाहखानांच्या व्यथित अंतःकरणातून बाहेर पडलेले हे शब्द, ते कानोकानी पोहोचल्यानंतर, भारताच्या कानी आले त्यांच्या त्या आवाहनाने हजारो देशभक्तांची व कार्यकर्त्यांची अंतःकरणे तितकीच व्यथित झाली असणार त्यांच्यासाठी आपण काय करू शकतो या विचारातून हा एक मार्ग सुचला 'भारत तुम्हाला विसरला नाही, विसरणारही नाही' ही शेकडो कार्यकर्त्यांच्या अंतःकरणात दिसून आलेली भावना व्यक्त करण्याचा हा एक मार्ग होता

## निःशस्त्र प्रतिकाराचा प्रश्न

सत्याग्रही प्रतिकारसाधनांचा आग्रहपूर्वकतेने व आत्यंतिक निष्ठेने उपयोग करणारे बादशाहखान हे एक सर्वश्रेष्ठ असे नेते आहेत गांधीयुगातील भारतीय नेत्यांमध्येही सत्याग्रही आंदोलनाचे झुंजार सेनानी या नात्याने त्यांचे स्थान फार मोठे आहे, असे असले तरी त्यांचे चरित्र भारताला पूर्ण परिचित झालेले नव्हते. फाळणीनंतरच्या अंधारात त्यांच्या सर्व कार्यावर लोखंडी पडदा पडला होता पाकिस्तानमध्ये दिलेल्या लढ्यात त्यांची उत्कट तत्त्वनिष्ठा, विलक्षण निर्भयता व जनताप्रेम यांची सर्व प्रकारची कसोटी झाली, प्रतिकूल परिस्थितीत त्यांनी सत्याग्रहाचे शस्त्र वापरात आणले, ते गंजू दिले नाही स्वातंत्र्योत्तर कालखंडात स्वकीय शासनाविरुद्ध या साधनाचा निर्धारपूर्वक उपयोग करण्यात त्यांनी या

शास्त्राचा व शस्त्राचा विस्तारच केलेला आहे. भारतात पू. विनोबाजींनी या शास्त्राचा वेगळ्या क्षेत्रात व वेगळ्या पद्धतीने विस्तार केलेला आहे. डॉ. मार्टिन ल्यूथर किंग हेही आपल्या क्षेत्रात सत्याग्रहसाधनेचा विस्तार करीत आहेत. ब्रिटिश तत्त्ववेत्ते बर्ट्रांड रसेल याचे या क्षेत्रातील कार्यही विचार करण्यास भाग पाडणारे असे झालेले आहे

बादशहाखानांच्या अठरा वर्षांच्या या अखंड लढ्याने जगापुढे व विशेषत: गांधीजींचा वारसा सांगणाऱ्या भारतापुढे नव्या समस्या व नवी आव्हाने सादर केलेली आहेत. सर्व प्रकारच्या सामाजिक अन्यायांचा वेळेवर प्रतिकार करून पीडित समाजातील लोकांना न्याय मिळवून देण्यास हे साधन समर्थ आहे, हा भरवसा व अनुभव लोकांना देणे भारताकडे निकडीचे झालेले आहे. बादशहाखानांनी या दृष्टीने सत्याग्रही परंपरेची व एका अर्थाने गांधीजींचीही थोर सेवा केलेली आहे. सत्याग्रही शास्त्राला व शस्त्राला सोनेरी छापाच्या प्रकाशन-वेष्टनात किंवा परिसंवादाच्या पिंजऱ्यात गुंडाळून ठेविले नाही, हा त्यांचा आदर्श भारताला वेगवेगळ्या क्षेत्रांत मार्गदर्शक होणारा आहे. त्यांचे ऋण आज द्विगुणित झालेले आहे.

अशा वेळी, अपेक्षेने ते भारताला हाक देत आहेत, गेली दोन वर्षे त्यांचे हे आवाहन आमच्यापुढे आहे. त्यांना आम्ही काही आश्वासन अगर उत्तर देऊ शकलो नाही ही अत्यंत विषाद वाटावा अशी घटना ठरणार आहे. सत्याग्रही विचार व आचार यांचा विस्तार जगात ठिकठिकाणी केला जात आहे त्यांच्यांत परस्पर-समन्वय व सहकार निर्माण केला जाणे फार अगत्याचे आहे, हा विचार डॉ. किंग यांच्याही विवेचनातून अलीकडे व्यक्त झालेला आहे. ही जबाबदारी पार पाडणे भारताला शक्य झाले पाहिजे हिंसा-साधनांच्या अपरिमित वाढीने दिलेल्या आव्हानाचा विचार विवेकी मानवाच्या बुद्धीला यापुढे निकडीने करावा लागणार आहे. त्या विवेकी मानवाचे प्रतिनिधी म्हणूनच गांधीजी जन्माला आले होते. ते भारतात जन्मले याचे कारण भारताची पूर्वपरंपरा व पुण्याई! त्या शास्त्राचे सक्रिय शिक्षण त्यांनी भारताला दिले हे आमचे अहोभाग्य! आणि त्यांचे एक थोर सहकारी त्या मार्गाचा अखंड वापर करीत एकाकी पडले असता, ते संकटात असता व आज सहकार्याची हाक देत असता, आम्हाला त्यांना साहाय्य पोचवण्याचा नव्हे तर उत्तरही देण्याचा मार्ग दिसत नाही ही एक दुःखद अशी बाब आहे. बादशहाखानांचे अपयश हे सत्याग्रही विचाराच्या साऱ्या पुरस्कर्त्यांचे अपयश होय सत्याग्रही मार्गाकडे अपेक्षेने पाहणाऱ्या जगाचा विश्वास दुर्बल झाल्यास त्यामुळे होणारी हानी फार मोठी ठरेल.

'जमीनदारांच्या पाठवी सामनामुळे पठाणांची सत्याग्रहावरील श्रद्धा उडून असल्याची' करुण कहाणी बादशहाखानांनी विनोबाजींपुढे मांडली आहे! 'ब्रिटिश हे त्या मानाने पुष्कळ सुसंस्कृत, लोकशाही मनोवृत्तीचे होते व त्यामुळे त्यांच्यापुढे अहिंसात्मक याचा यांनी

नऊ

प्रभाव पडू शकला, पण पाकिस्तानच्या शासकांना नीतिमूल्यांची काही कदर नाही. येथे अहिंसामार्गाचा काही उपयोग नाही ' अशा प्रकारचे पठाणांच्या मनात नि शस्त्र प्रतिकार-संबंधी आंदोलन सुरू झाले आहे त्यांच्या या आपत्कालात त्यांना सत्रामसल्त-सहाय्य पोचविण्याची भारताची जबाबदारी नाही काय ?

बादशाहखानांनी पाकिस्तानबद्दलची आपली निष्ठा नि सदिच्छ शब्दांत अनेक वेळी घोषित केलेली आहे ' आपल्या अफगाणी पख्तून-बांधवांना अंतर्गत शासनाचे पूर्ण स्वातंत्र्य द्या व त्यांच्या आत्मविश्वासाचा मार्ग मोकळा करून द्या, समर्थ झालेल्या पख्तूनचा भुजदंड हा पाकिस्तानचे सामर्थ्य वाढवील ' हे पख्तुनिस्तानचे स्वरूप त्यांनी पाकिस्तानच्या नेत्यां-पुढे व जगापुढे स्वच्छ स्वरूपात ठेवलेले आहे, पण पाकिस्तानमधील अंतर्गत नेतृत्वस्पर्धा व आंतरराष्ट्रीय कारस्थाने ही कारणे या पायी सत्प्रवृत्तीच्या या नेत्याला, त्यांच्या हजारो सहकाऱ्यांना व त्यांच्या न्याय्य मागणीला बंदिशाळेत डांबून गाडून टाकण्याचा प्रयत्न अठरा वर्षे चालला आहे आपल्या या सत्याग्रही नेत्याला भारत काही सल्ला-मसलत, सहकार्य देऊ शकतो की नाही हा सवाल भारतातील सत्याग्रही व इतर विचारवंत नेत्यांपुढे खडा आहे !

सरकारच्या जबाबदाऱ्या व अडचणी अधिक मोठ्या आहेत आंतरराष्ट्रीय नीतिनिर्बंधांची बंधने सांभाळण्याची कसरत त्यांना करावी लागते, पण ही बंधने अशी मानवी स्वातंत्र्याला व कल्याणाला पोषक अशा रीतीने पाळली जातात हे पाहण्याची जबाबदारी जगातील विचारवंतांवर व तत्त्वनिष्ठ नेत्यांवरच पडणार. भारताचे स्वातंत्र्य हे आशियाच्या खऱ्या स्वातंत्र्याची प्रभात ठरणार आहे हे गांधी-नेहरूंचे आश्वासन कोणी पूर्ण करावयाचे ? केवळ त्यांचे आश्वासन म्हणून नव्हे तर स्वहिताच्या दृष्टीनेही भारताने या प्रश्नाकडे पाहिले पाहिजे आम्ही तिबेटच्या स्वातंत्र्याचा पुरस्कार अर्धवट केला, पण गोर कसोटी न लावताच आम्ही इजिप्तच्या मैत्रीचा अमर्याद पाठपुरावा केला, चीनच्या हक्कासाठी अर्ध्या अधिक जगाविरुद्ध संयुक्त राष्ट्रसंघात आम्ही आमचा आवाज जागा ठेवला ! आणि आम्हाला आमच्या वृद्ध सहकाऱ्यासाठी, एका सत्याग्रही संत-नेत्यासाठी, आपला आवाज जगाच्या बाजारात उठवता येत नाही ? याबद्दल स्वतः जवाहरलालजींना व्यथा होत होत्या हे सांगण्याचे कारण नाही, पाकिस्तानचे व आपले नाजुक संबंध बिघडू नयेत या दुबळ्या धोरणाचे हे दुष्परिणाम आहेत, पण तरीही स्वतः पंडितजींनीच हैद्राबाद काँग्रेसमध्ये (१९५३) 'आपल्या जुन्या सहकाऱ्यांच्या छळाविरुद्ध मोकळेपणे बोलण्याची वेळ आता आली आहे ' असे बजावले. ( But now we feel that the time has come when we should express fully and frankly ) हे बोलणे पूर्णत्व केव्हा व कोणी करावयाचे ? शास्त्रीजींच्या पुढे काही योजना असाव्यात असे बादशहाखानांनाही वाटते पण शास्त्रीजींच्या

मूल्यमुळे त्या योजनांचाही अंत झाला असारा पारिस्तानच्या जनतेचे भले व्हावे याबद्दल भारताच्या अंतःकरणात पूर्ण सद्भाव आहे, त्यांनी आपला कारभार त्यांना वाटेल तसा चालवावा हीच भारताची इच्छा आहे आणि दोन्ही राष्ट्रांच्या सहकार्यातून स्वतःचा व आशियाचा उत्कर्ष साधला जावा हाच सत्य मार्ग आहे असे असले तरी तेथे अन्याय-अनाचार माजला, तेथील संत पुरुषांची, पीर फकीरांची, आमच्या जुन्या साथी सत्याग्रहींची छळणूक गांजणूक झाली, मानवी मूल्यांची पायमल्ली माडली गेली, आमच्या स्नेहभावनावर विलक्षण ताण पडू लागला तरी आम्हाला त्याविरुद्ध आवाज उठवण्याचा अधिकार नाही हे धोरण जगाच्या शांततेशी व आमच्या नैसर्गिक हक्काशी सुसंगत ठरणार नाही हे न्याय्य लोकमत योग्य तेथे व योग्य वेळी प्रभावीपणे व्यक्त केले गेले तर पाकिस्तानच्या कल्याणाचा दावा करणारे अध्यक्ष अयूबखानही या लोकमताची कदर करतील भारताने आपले हे कर्तव्य ओळखले पाहिजे

## अल्पसंख्याकांचे दुखणे

स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या वीस वर्षांत आम्ही अल्पसंख्याकांचे प्रश्न नीट सोडवू शकलेलो नाही, इतकेच नव्हे तर आजही तो एक चिंतेचा विषयच आहे केवळ अल्पसंख्याक किंवा बहुसंख्याकांच्या भावनेपुरता अगर हितापुरता तो मर्यादित नाही आशियातील लोकशाहीचे भवितव्य त्यावर अवलंबून आहे या दृष्टीने तो निकडीने व नीट रीतीने हाताळला जाणे जरूर आहे

बादशहाखानांच्या चरित्राने या क्षेत्रातही काही आदर्श आम्हाला दिलेले आहेत परस्पराच्या सहकार्यातून व विश्वासाने एकत्र काम करण्यातून हे प्रश्न सुटू शकतात, आम्ही तो प्रश्न सोडवलेला आहे ' अशा आशयाचे त्यांचे उद्गार या चरित्रात अनेक ठिकाणी आहेत, पण त्यांनी सोडवलेला हा प्रश्न किती सहजतेने नंतर उद्ध्वस्त केला गेला हेही आपण पाहिलेले आहे हा सारा बिघाड धर्माच्या नावाने किंवा जाति-पंथातील भेद-भावाच्या नावाने केला जात असल्याने, मूलतः धर्म अगर जातिभेद यांचाच तो प्रश्न आहे असे आम्ही मानीत चाललो आहोत धर्माचे अगर जातींचे नाव वापरले जाते, पण मुख्यतः सत्ताप्राप्तीचे एक साधन म्हणूनच या भावनांचा वापर केला जातो, तसेच अल्पसंख्याक म्हणजे एक मुसलमानच नाहीत किंवा केवळ भिन्नधर्मीय म्हणजे अल्पसंख्याक नव्हेत, मुसलमानाप्रमाणे शीख, बौद्ध, पारशी, ख्रिश्चन हे भिन्नभिन्नधर्मीय आहेत, तसेच हरिजन गिरिजन या अन्य सामान्य जमाती आहेत, त्यांचे प्रश्न कमी तीव्रतेचे नाहीत भाषाभेद अगर प्रांतभावना हे भेदही आज फार तीव्र झालेले आहेत हे आपण पाहतो, पण फक्त समाज अगर जाती भावना अगर वर्णद्वेष हे या मतभेदांना कारण नाहीत परस्परांच्या आचारां-

विचारांसंबंधी अनादर ही भावना पोसत असते, पण सत्ता हाती राखण्यासाठी तिचा वापर होत असतो व त्यातून ही मांडणी वाढत असतात. ही मांडणी व त्यातून निर्माण होणारे लढे टाळणे आता निकडीचे किंवा अपरिहार्य झाले आहे, म्हणून विवेकाने हे प्रश्न सोडवले पाहिजेत व तसे ते सोडवता येतातही. हिंदुमुसलमानांचे प्रश्नही ज्या प्रांतात मुसलमान अल्पसंख्य होते तेथे निर्माण झाले गेले. बहुसंख्य मुसलमान जेथे होते त्या पंजाब, बंगाल किंवा सीमाप्रांत, यासारख्या प्रांतांत आपले नेतृत्व टिकविण्यासाठी मुसलमान नेत्यांना हिंदू अल्पसंख्याकांशी तडजोडीने वागणे भागच पडत होते. त्या दृष्टीने पंजाबचे नेते सर फजली हुसेन अगर शिकंदर हयातखान व बंगालचे फजलूल हक वगैरे नेते, जातीयवादाला नंतर मुस्लिम लीगने जे स्वरूप आणले ते स्वरूप येऊ देण्यास तयार नव्हते. मुस्लिम बहुसंख्येच्या सर्व प्रांतांत १९४६ च्या निवडणुकीनंतर लीग सत्तेवर येऊ शकली नव्हती. केवळ जाळपोळीच्या साधनांनी व त्या नीट दडपून न टाकण्याच्या ब्रिटिशांच्या धोरणातून पाकिस्तान निर्माण झालेले आहे; हे त्याचे मुख्य स्वरूप विसरल्यास त्यावरील उपाय यशस्वी होणे निश्चितच कठीण होईल.

आजही अल्पसंख्याकांचा प्रश्न म्हणजे मुसलमानांचा प्रश्न या दृष्टीनेच आपण पाहतो. ते तितकेसे बरोबर नाही. पाकिस्ताननिर्मितीमुळे व पाकने नित्य चालू ठेवलेल्या वैचारिक व व्यावहारिक झगड्यामुळे हा प्रश्न चिघळत राहिलेला आहे. त्या झगड्यात धर्माचे फक्त नाव आहे. हा प्रश्न सध्या आस्थेने अभ्यासला व चर्चिला जात आहे हे योग्यच आहे; परंतु तसे करताना पूर्वीच्या चुका कायम राहिल्यास तो प्रश्न सुटणे अडचणीचेच होईल. मुसलमान-समाजाच्या आजच्या खऱ्या भावना व अपेक्षा काय आहेत याची नीट माहिती नसता जर हा विषय चर्चिला गेला तर त्यांतील धोके वाढतील. पाकिस्तान निर्माण करण्यास साहाय्यक झालेली एक पिढी अद्याप हयात आहे; त्यांचे विरळ नेतृत्वही अद्याप शिल्लक आहे; आणि त्याने नेते, पाकिस्तानचे सध्याचे धोरण व इतर प्रमुख देशांची आंतराष्ट्रीय धोरणे-वारस्याने यांच्यामुळे हा प्रश्न चिघळत राहात आहे, परंतु या सर्वांवर मात करणे समजस व भारतीय नेतृत्वाला शक्य झाले पाहिजे. ' सर्व मुसलमान समाज हा विशेष धर्मनिष्ठ किंवा धर्मवेडा आहे, त्याला आपल्या धर्मपरंपरेप्रमाणे या देशात पुन्हा इस्लामी सत्ता प्रस्थापित करण्याचीच इच्छा आहे; इस्लामचा अर्थ जुन्या कडव्या वृत्तीच्या धर्मनेत्या-कडून सांगितला जातो तोच मुसलमान समाजाला पटतो व त्याप्रमाणे ते वागण्यास सिद्ध असतात ' ही आमच्यातील काही लेखकांची विचारसरणी अनिर्बंधित व अतिव्याप्त स्वरूपाची वाटते. इतकेच नव्हे तर ती मनुष्य-स्वभावाशी सुसंगत नाही. अशा प्रचाराने हानी अधिक होण्याचे धोके आहेत. साम्राज्यवादी अगर भांडवलवादी देशांत युद्धसाधने वाढवून त्या

मृत्यूमुळे त्या योजनांचाही अंत झाला असावा. पाकिस्तानच्या जनतेचे भले साधावे याबद्दल भारताच्या अंतःकरणात पूर्ण सद्भाव आहे, त्यांनी आपला कारभार त्यांना वाटेल तसा चालवावा हीच भारताची इच्छा आहे आणि दोन्ही राष्ट्रांच्या सहकार्यातून स्वतःचा व आशियाचा उत्कर्ष साधला जावा हाच भव्य मार्ग आहे. असे असले तरी तेथे अन्याय-अनाचार माजला, तेथील संत पुरुषांची, पीर फकीरांची, आमच्या जुन्या साथी मित्रांची छळणूक गाजणूक झाली, मानवी मूल्यांची पायमल्ली मांडली गेली, आमच्या स्नेहभावनांवर विलक्षण ताण पडू लागला तरी आम्हाला त्याविरुद्ध आवाज उठविण्याचा अधिकार नाही हे धोरण जगाच्या शांततेशी व आमच्या नैसर्गिक हक्काशी सुसंगत ठरणार नाही. हे न्याय्य लोकमत योग्य तेथे व योग्य वेळी प्रभावीपणे व्यक्त केले गेले तर पाकिस्तानच्या कल्याणाचा दावा करणारे अध्यक्ष अयूबखानही या लोकमताची कदर करतील. भारताने आपले हे कर्तव्य ओळखले पाहिजे.

## अल्पसंख्यांकाचे दुखणे

स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या वीस वर्षांत आम्ही अल्पसंख्यांकाचे प्रश्न नीट सोडवू शकलेलो नाही, इतकेच नव्हे तर आजही तो एक चिंतेचा विषयच आहे. केवळ अल्पसंख्यांक किंवा बहुसंख्यांकांच्या भावनेपुरता अगर हितापुरता तो मर्यादित नाही. आशियातील लोकशाहीचे भवितव्य त्यावर अवलंबून आहे. या दृष्टीने तो निकडीने व नीट रीतीने हाताळला जाणे जरूर आहे.

बादशाहखानाच्या चरित्राने या क्षेत्रातही काही आदर्श आम्हाला दिलेले आहेत. ' परस्परांच्या सहकार्यातून व विश्वासाने एकत्र काम करण्यातून हे प्रश्न सुटू शकतात, आम्ही तो प्रश्न सोडवलेला आहे. ' अशा आशयाचे त्यांचे उद्गार या चरित्रात अनेक ठिकाणी आहेत, पण त्यांनी सोडवलेला हा प्रश्न किती सहजतेने नंतर उद्ध्वस्त केला गेला हेही आपण पाहिलेले आहे. हा सारा विघाड धर्मांच्या नावाने किंवा जाति-पंथांतील भेद भावांच्या नावाने केला जात असल्याने, मूलतः धर्म अगर जातिभेद याचाच तो प्रश्न आहे असे आम्ही मानीत चाललो आहोत. धर्मांचे अगर जातींचे नाव वापरले जाते, पण मुख्यतः सत्ताप्राप्तीचे एक साधन म्हणूनच या भावनांचा वापर केला जातो, तसेच अल्पसंख्यांक म्हणजे एक मुसलमानच नाहीत किंवा केवळ भिन्नधर्मीय म्हणजे अल्पसंख्यांक नव्हेत. मुसलमानांप्रमाणे शीख, बौद्ध, पारशी, ख्रिश्चन हे भिन्नभिन्नधर्मीय आहेत, तसेच हरिजन गिरिजन या अन्य स्तरीय जमाती आहेत. त्यांचे प्रश्न कमी तीव्रतेचे नाहीत. भाषाभेद अगर प्रांतभावना हे भेदही आज कमी तीव्र झालेले आहेत हे आपण पाहतो, पण फक्त स्वभाषा अगर जाती भावना अगर वर्णद्वेष हे या मतभेदांना कारण नाहीत. परस्परांच्या आचारां

विचारांमधवी अनादर ही भावना पोसन असने, पण सदा हाती राज्यशासाठी तिचा वापर होत असनो व त्यातून ही मांडणे वाढत असतान ही मांडणे व त्यातून निर्माण होणारे स्ढे यातले आता निकडीचे किंवा अपरिहार्य झाले आहे, म्हणून विवेकाने हे प्रश्न सोडवले पाहिजेत व तसे ते सोडवता येतातही हिंदुमुसलमानांचे प्रश्नही ज्या प्रांतात मुसलमान अल्पसंख्य होते तेथे निकराला गेले बहुसंख्य मुसलमान जेथे होते त्या पंजाब, बंगाल किंवा सीमाप्रांत, यासारख्या प्रांतांत आपले नेतृत्व टिकविण्यासाठी मुसलमान नेत्यांना हिंदू अल्पसंख्यांकांशी तडजोडीने वागणे भागच पडत होते त्या दृष्टीने पंजाबचे नेते सर फजली हुसेन अगर शिकंदर हयातखान व बंगालचे फजलूल हक वगैरे नेते, जातीयवादाला नंतर मुस्लिम लीगने जे स्वरूप आणले ते स्वरूप येऊ देण्यास तयार नव्हते मुस्लिम बहुसंख्येच्या सर्व प्रांतांत १९४६ च्या निवडणुकीनंतर लीग सत्तेवर येऊ शकली नव्हती केवळ जाळपोळीच्या साधनांनी व त्या नीट दडपून न टाकण्याच्या ब्रिटिशांच्या धोरणातून पाकिस्तान निर्माण झालेले आहे, हे त्याचे मुख्य स्वरूप विसरल्यास त्यावरील उपाय यशस्वी होणे नितकेच कठीण होईल

आजही अल्पसंख्यांकांचा प्रश्न म्हणजे मुसलमानांचा प्रश्न या दृष्टीनेच आपण पाहतो ते तितकेसे बरोबर नाही पाकिस्ताननिर्मितीमुळे व पाकने नित्य चालू ठेवलेल्या वैचारिक व व्यावहारिक झगड्यामुळे हा प्रश्न चिघळत राहिलेला आहे त्या झगड्यात धर्माचे फक्त नाव आहे हा प्रश्न सध्या आस्थेने अभ्यासला व चर्चिला जात आहे हे योग्यच आहे परंतु तसे करताना पूर्वीच्या दृष्टी कायम राहिल्यास तो प्रश्न सुटणे अडचणीचेच होईल मुसलमान समाजाच्या आजच्या खऱ्या भावना व अपेक्षा काय आहेत याची नीट माहिती नसता जर हा विषय चर्चिला गेला तर त्यातील धोके वाढतील पाकिस्तान निर्माण करण्यास साहाय्यक झालेली एक पिढी अजून हयात आहे, त्याचे विफल नेतृत्वही अजून शिल्लक आहे, आणि जुने नेते, पाकिस्तानचे सध्याचे धोरण व इतर प्रमुख देशांची आंतरराष्ट्रीय धोरणे वगैरे कारणांमुळे हा प्रश्न चिघळत राहात आहे, परंतु या सर्वांवर मात करणे समजस व भारतीय नेतृत्वाला शक्य झाले पाहिजे 'सर्व मुसलमान समाज हा विशेष धर्मनिष्ठ किंवा धर्मवेडा आहे, त्याला आपल्या धर्मपरंपरेप्रमाणे या देशात पुन्हा इस्लामी सत्ता प्रस्थापित करण्याचीच इच्छा आहे, इस्लामचा अर्थ जुन्या कर्मठ वृत्तीच्या धर्मनेत्यांकडून सांगितला जातो तोच मुसलमान समाजाला पटतो व त्याप्रमाणे ते वागण्यास सिद्ध असतात' ही आमच्यातील काही लेखकांची विचारसरणी अतिरंजित व अतिव्याप्त स्वरूपाची वाटते इतकेच नव्हे तर ती मनुष्य-स्वभावाशी सुसंगत नाही अशा प्रचाराने हानी अधिक होण्याचे धोके आहेत साम्राज्यवादी अगर भांडवलवादी देशांत युद्धसाधने वाढवून त्या

न्यायावर जगणारे काही उद्योगपती व त्यांना साथ देणारे राजकीय नेते असतात; यावरून तेथील सर्वसामान्य जनता युद्धप्रिय आहे असा निष्कर्ष काढणे बरोबर नव्हे. अमेरिकेने व्हिएटनाम युद्ध वर्षानुवर्षे चालवले असले तरी ते अमेरिकन जनतेला प्रिय आहे असे मानणे किंवा चीनचे आजचे आक्रमक धोरण हे तेथील जनतेचे आहे असे धरून चालणे स्वाभाविक दिसले तरी ते बरोबर ठरणार नाही. ज्यांना हे प्रश्न सोडवावयाचे आहेत त्यांना यापेक्षा अधिक खोल गेले पाहिजे; इतकेच नव्हे तर तशा दुःखद द्वेषभावना जेथे असतील त्या दूर करण्याच्या दृष्टीने हा प्रश्न हाताळला गेला पाहिजे.

पुष्कळ मुसलमान पुढारी 'या देशात पुन्हा इस्लामी सत्ता प्रस्थापित करावी, हा देश ' दार उल हरब ' म्हणजे इस्लामी धर्माचे युद्धस्थान आहे किंवा ' दार उल सुलह ' म्हणजे इस्लामच्या प्रभुत्वाबद्दलची तात्पुरती तडजोड केलेला असा देश आहे, असे मानतात ' हे निष्कर्ष बरोबर नाहीत. काही वेड्यापिसाटांच्या डोक्यांत तसे विचार असतातही; पण ते त्या समाजाचे प्रतिनिधी नव्हेत. मुसलमान समाजातील बहुपत्नीकत्वाचे स्वातंत्र्य किंवा कुटुंबनियोजनासारखे प्रश्न सोडवण्यास ते विरोध करतात; हे सर्व राजकीय युक्तांचे प्रश्न आहेत व ते निग्रहाने सोडवले जाऊ शकतील. त्यासाठी योग्य ते व पुरेसे प्रयत्न झालेले नाहीत असेच विचारांती पटेल. अस्पृश्यतानिवारण हाच वैदिकधर्माला कलंक आहे व मंदिरप्रवेशामुळे भूकंप होऊ लागले असे प्रांजलपणाने मानणारे अंधश्रद्ध हिंदूमध्येही आहेत. हिंदुसमाजात समाजसुधारक व शास्त्रीय दृष्टिकोण स्वीकारणारे नेते लवकर उदयास आले. तोच मार्ग इस्लामनेही स्वीकारला पाहिजे. त्या नवविचाराचे नेतृत्व मुसलमानांमध्ये निर्माण होण्यास आमचे धोरण पोषक झाले पाहिजे. त्याच्या उलट खोट्या धर्मभावना टिकवून लोकप्रियता संभाळणाऱ्यांचे नेतृत्व आपापल्या पक्षासाठी वापरण्याचे पाप येथील सर्व राजकीय पक्ष करीत आहेत; हाच आमच्या लोकशाहीला मोठा धोका आहे. समान नागरिकत्वावर आधारलेल्या, सर्वांची समानता प्रांजलपणे स्वीकारणारा व कोणाचीही उच्चनीचता न जुमानणारा असा विचार निर्भयपणे शिकवणे हाच लोकशाहीचा आधार आहे. तो प्रचार करणे म्हणजे कोण्या धर्मात हस्तक्षेप करणे नव्हे आणि तो हस्तक्षेप असेल तर तोही करणे हा लोकशाहीचा अधिकार आहे व तशी गरज आज आहे. या दृष्टीने आमच्या कार्याची दिशा असली पाहिजे व त्यासाठी लोकमताशी नव्हे तर लोकभावनांशी आमचा नीट संपर्क राहिला पाहिजे.

इस्लामच्या जन्मापासून स्वतः हजरत पैगंबर यांनी केलेल्या युद्धाखेरीज अन्य फार थोडी युद्धे ही धर्मयुद्धे म्हणजे स्वसंरक्षणार्थ झालेली युद्धे आहेत. इस्लामला धर्मप्रचारार्थ आक्रमक युद्ध मान्य नाही. इस्लाम म्हणजेच शांती; सर्व सृष्टीबद्दलचे प्रेम होय;

हा उपदेश बादशहाखानांनी पठाणांना पटवण्याचा प्रयत्न केला इस्लामच्या आक्रमक युद्धसंघर्षांतूनच इस्लामच्या एका खिलाफतीचे अनंत तुकडे होत गेले त्यातून अरब, तुर्क, पठाण, मोगल ही राज्ये व साम्राज्ये झाली हा इस्लामच्या अंतर्गत युद्धाचा इतिहास आहे तो त्या धर्माचा इतिहास नव्हे, ही सत्ता स्पर्धा सुरू झाल्यावर अधिक पसा व साधने असणाऱ्या साम्राज्यवाद्यांनीच अरबांना तुर्कांविरुद्ध, पठाणांना आपसांत, इतकेच नव्हे तर मक्केच्या शरीफला इस्लामी धर्मसुधारक म्हणून बाहेर पडलेल्या वहाबी राजाविरुद्ध झुंजविले आणि या साऱ्या लढायामधे इस्लामी समाजनेने मुल्ला-मालवी हे कोणा ना कोणा धर्मवान्यी सत्तेच्याच मागे होते तुर्कांच्या विजयाविरुद्ध कावाया करणाऱ्या मुल्ला-मोलवींचा नि पान इस्लामपशांना करावा लागला अमानुल्लाच्या विरुद्ध कारस्थान या मुल्ला-मालवींनाच केली, आणि पाकिस्तानमधील लोकशाही भ्रष्ट व नष्ट करणारे हे धर्मनेतेच आहेत अवघ्या पाच वर्षांत पाकिस्तान निर्माण करणारी मुस्लिमलीग यांनीच निर्माल्यवत केली लियाकतअलीखान व डा खानसाहेब यांसारख्या नेत्यांचे खून झाले, कायदेआझम जीनासाहेब यानी पाकिस्तानी राज्यघटना सेक्यूलरच राहील अशी घोषणा करताच त्यांच्या विरुद्ध दगडफेकीची निदर्शने केली गेली, हे करणारे व करवणारे कोण? खोल्या व टोपी धर्मप्रसारात होणाऱ्या आत्मनाशाचा नमुना पाठोपाठ पाकिस्तानमध्येच इतक्या भयावह रीतीने चितारून ठेवलेला आहे की त्याकडे विचारी मनुष्य दुर्लक्ष करणार नाही खुद्द अय्यूब अयूबखान यांनी हाती सत्ता घेताना स्वार्थी पुढाऱ्यांनी देशाचा सत्यानाश कसा केला व त्यामुळे राज्यघटना रद्द कशी झाली याचे वर्णन केलेले आहे ( १९५८ ) हे स्वार्थी पुढारी म्हणजेच धर्माच्या नावाने चळवळी करणारे मुस्लिम नेते होत त्यांनीच लाहोरची ( १९५२ ) अहमदियापंथाविरुद्ध म्हणजे मुसलमानांतील एका सुशिक्षित संपन्न व सत्ताधीश वर्गाविरुद्ध अत्याचारी चळवळ केली अहमदिया पंथाला तलवारीच्या बळावर आता धर्मप्रचार करणे ( जिहाद-बसैफ ) अमान्य आहे अहमदिया पंथाविरुद्ध झालेले भीषण अत्याचार ही पाकिस्तानची धर्मनिष्ठा मानावयाची का? हेच डाव पेच भारतात झुगवर्दी यांनीही केले होते पण ते सारे सत्तेसाठी केलेले डावपेच असतात व ते भयावह रीतीने करणाऱ्यांच्या अंगावरच उलटतात हा अनुभव पाकिस्तानला आलेला आहे आजही निराश झालेले धार्मिक नेते अ अयूबखानांची सत्ता उडवण्यासाठी तेच डावपेच खेळत आहेत तथे त्यांना आता यश येईल असे दिसत नाही मग हिंदुस्थानात तरी भीती का बाळगावी? धर्मवेड्यांचे यश त्यांच्या सांप्रदायिक संधिसाधूमध्ये असते व ते संधिसाधू सर्व धर्मानुयायांत व राजकीय पक्षांत असतात, त्यांचा प्रतिकार योग्य मार्गाने केला पाहिजे

अकरा

बादशाहखानांना हा प्रश्न सोडवताना तेथील अल्पसंख्याकांचा म्हणजे हिंदु-शीख याचा उपद्रव झाला नाही असे नव्हे. तेथील हिंदु-शीख हे मुस्लिम सचिसाधू नेत्यांबरोबर ब्रिटिश पोलिटिकल खात्याच्या हातातच खेळलेले आहेत. बादशहखान व काँग्रेस याना तुरुगात डाबून टाकण्याच्या धोरणाचा पुरस्कार या हिंदू जमीनदार नेत्यानी नेहमी केला होता. तरीही त्याच हिंदु-शीख नेत्यांना डॉ. खानसाहेबांच्या मंत्रिमंडळात भरपूर प्रतिनिधित्व दिले गेले होते. त्या हार्दिक सहकार्यातून व विशेषत खुदाईखिदमतगारांनी केलेल्या निष्ठेच्या सेवेतून तेथे अल्पसंख्याकांचा प्रश्न सुटला होता. अर्थात तेथील प्रश्नाचे स्वरूप व आजच्या भारतीय मुसलमानांच्या प्रश्नाचे स्वरूप पुष्कळ भिन्न आहे हे खरे.

मुख्यतः आज येथील मुसलमानांच्या भावना व अपेक्षा यांसबंधी आमच्या समजुती ज्या आहेत त्या नीट तपासल्या पाहिजेत. शुद्ध नागरिक भावनाचा पुरस्कार मुसलमान जनतेने करणे त्याच्या हिताचे कसे आहे हे पटवण्यासाठी योग्य तो प्रचार व तशी समाजसेवा केली पाहिजे मुसलमानामधील पुरोगामी तत्त्वनिष्ठ व राष्ट्रनिष्ठ नेतृत्वाशी सहकार्य केले पाहिजे, त्याच्यावर राज्यकारभारातून कोठे अन्याय किंवा दुर्लक्ष होत असल्यास ते दूर करण्यास साहाय्यक झाले पाहिजे. ढोंगी व संधिसाधू मुस्लिम नेत्याना सर्व राजकीय पक्षांनी दूर ठेवले पाहिजे. या मार्गांनी व दीर्घ प्रयत्नांनी हा प्रश्न निश्चित सुटू शकतो हाच विश्वास या चरित्राने दिलेला आहे. स्वातंत्र्योत्तर कालात भारत 'सेक्यूलर' राज्यपद्धतीच्या मार्गावर झपाट्याने प्रगती करीत आहे याचे प्रतीक सध्याचे राष्ट्रपती डॉ. झाकिर हुसेनसाहेब हे आहेत पाकिस्तान-शिवाय इतर कोणत्याही इस्लामी देशांत धर्माधिष्ठित राज्यघटना नाही ही वस्तुस्थिती भारतीय मुसलमानांच्या पुढे आहेच. राजकारणात धर्म घुसडल्याचे भीषण पर्यवसानही या चरित्राने आपल्यापुढे ठेवलेले आहे. त्यापासून बोध घेण्याची दृष्टी या चरित्र-वाचनाने लाभेल या अपेक्षेने ते वाचकांच्या हाती दिलेले आहे.

## सहाय्यकाचे आभार

हे चरित्र पूर्ण करण्याच्या कामी अनेक परिचित अपरिचित मित्राचे, कार्यकर्त्यांचे साहाय्य झालेले आहे स्वत बादशाहखानांची भेट व त्यांच्या सान्निध्यात मिळालेली स्फूर्ती व माहिती ही अमोल स्वरूपाची आहे. त्याची भेट घ्यावी हा सल्ला देण्यापासून तो ती भेट घडवून आणण्यासाठी सर्व प्रकारचे सहकार्य व साहाय्य श्री कमलनयन बजाज यांनी दिले, त्याचा माझा विशेषसा परिचय नसता केवळ कार्य निष्ठेने त्यांनी हे सहकार्य दिले, मुख्यतः त्याचमुळे मी ही भेट घेऊ शकलो व त्यामुळेच चरित्रलेखनाचा निर्णय होऊ शकला. माझ्या कार्तृत्मेटीम, खासदार श्री. उपाध्यायजी–जवाहरलालजींचे भूतपूर्व चिटणीस, डा. श्री.

टमाराकर दीक्षित, डॉ. एन्. एस्. धर यांचेही साहाय्य झाले आहे. बादशहाखानांच्या बहुतेक इंग्रजी व हिंदी चरित्रांचा उपयोग या माहितीसंबंधी केलेला आहे. विशेषतः डॉ. महंमद यूनुस, श्री. प्यारेलाल व श्री. कुमारी यांच्या माहितीचा भरपूर उपयोग केलेला आहे, पण बादशहाखानांच्या-कडून मिळालेल्या सवलतीवरून त्यांचे दिल्लीतील एक कार्यकर्ते श्री. नाग यांनी कष्टपूर्वक केलेले सहाय्य अमोल स्वरूपाचे आहे. श्री प्यारेलाल यांनीही अनेक प्रकारे साहाय्य केलेले आहे. पेशावरचे एक वृद्ध मानिराम कार्यकर्ते व 'फ्रॉन्टियर मेल' (डेहराडून) या साप्ताहिकाचे संपादक श्री. अमीरचंद बम्बवाल यांनी सीमाप्रदेशातील गांधीपूर्वकालातील राजकीय जागृतीची पार्श्वभूमी विस्ताराने चर्चिली, इतकेच नव्हे तर त्यासाठी स्वतःच्या वृत्तपत्राचे जुने अंक व इतर साहित्यही पुरविले. ज्या सरकारी दप्तरात मी काम करीत असतो तेथील कागदपत्रांतील माहितीचा स्वाभाविकच उपयोग झालेला आहे. माझे सहकारी श्री. म. न. फाटक यांचे साहाय्यही झालेले आहे.

'मुंबई क्रॉनिकल' 'मीडेम', 'फ्रॉन्टियर मेल', 'दैनिक लोकशक्ति', 'चित्रमय जगत्', 'स्वराज्य साप्ताहिक' या साधनांचा उपयोग केलेला आहे.

शेवटी जोडलेल्या उताऱ्यांपैकी डॉ. गंगासिंग कम्बोज यांचे १९३० मधील पेशावरच्या गोळीबारासंबंधीचे पत्र हे नवीन माहिती देणारे असे आहे. वार्धक्य व रुग्णावस्थेत असता यांनी हे पत्र लिहिलेले आहे. त्यांच्या पत्राचे मोल म्हणणे कठीण आहे. बादशहाखान-मदालसाबहेन हे पत्र श्री. कमलनयन बजाज यांनी दिले व पू. विनोबाजी-बादशहाखान यांच्या पत्रव्यवहाराच्या अधिकृत नकला श्री. दत्तोबा दास्ताने-महाराष्ट्रसर्वोदय सर्वसेवा संघ-यांनी पाठविल्या.

हस्तलिखित तयार होत असता व ते तयार-झाल्यावर आचार्य भागवत, श्री. मामासाहेब देवगिरीकर, श्री. सेतुमाधवराव पगडी, श्री. धनंजय कीर, श्री. पी. बी. उर्फ आप्पासाहेब कुलकर्णी, श्री. दा. न. शिखरे, श्री. श्रीपाद केळकर, प्रा. ग. प्र. प्रधान, श्रीमती कुसुम नागपोलकर यांनी उपयुक्त सूचना केल्या. या मित्रांनी हस्तलिखित भागशः वाचला अगर ऐकिलेला आहे. त्यामुळे चरित्रात इतरत्र दोष अगर चुका राहिल्या असल्यास त्या लेखकाच्याच आहेत, आणि असे दोष बरेच राहिले आहेत याची जाणीव लेखकास आहे. इस्लामी धर्मरचने-विषयीचे व इतर उर्दू वगैरे शब्द लिहिताना दोष राहिले असण्याचा संभव आहे. हे दोष टाळण्याचे शक्य ते प्रयत्न केले आहेत. त्या त्या भाषेचा व पर्यायांचा परिचय नसल्याने असे दोष राहू शकतात. त्याबद्दल कोणी गैरसमज करून घेऊ नये अशी विनंती आहे. पुश्तू उताऱ्यांची लिप्यंतर भाषांतरे, शब्दोच्चार वगैरे दुरुस्त करण्याचे कामी सेंट्रल पख्तून जिर्गा-ए हिंदच्या महाराष्ट्रशाखेचे अध्यक्ष मौ. अब्दुल रज्जाक खान यांनी केलेले साहाय्यही

फार मोलाचे असे झालेले आहे  लेखे पुरवण्याच्या कामीही श्री नाग व उर्दूसाहित्यिक श्री रामशरण नगीना, काबूल येथील यू नो चे शिक्षणतज्ज्ञ श्री आठल्ये, आकाशवाणीचा प्रकाशनविभाग, श्री मामासाहेब देवगिरीकर व श्री प्यारेलाल यांचे साहाय्य झाले आहे या सर्वांचा मी अत्यत ऋणी आहे  सूची तयार करण्याचे कामी प्रा चि वें ल जोशी व माझे नातू चि श्रीप्रकाश जोशी, चि शिरीष कुळकर्णी व चि विजय जोशी याचे श्रम हेच महत्त्वाचे आहेत

ग्रथलेखनाचा विचार चालू असता नीलकठ प्रकाशनाचे श्री दामुअण्णा रानडे याचा सल्ला विचारला असता प्रकाशनाची जबाबदारी घेण्याचे आश्वासन त्यानी दिले  यामुळे लेखनाचा माझा निर्णय निश्चित होण्यास मदत झाली  त्यांनी हे आश्वासन दिले इतकेच नव्हे तर माझ्या लिहिण्याचा प्रारभही नसता काबूलला जाण्याचा विचार ठरताच व त्यांना सुचविताच त्यानी शक्यते सहकार्य दिले  ग्रथप्रकाशकाचे कोणास काय अनुभव येतात हे मला माहीत नाही, परतु श्री रानडे याच्या सहकार्याचा हा अनुभव माझा उत्साह वाढवण्यास साहाय्यक झाला  माझ्याकडून लेखनकार्य वेळेवर पुरे झाले  नसताही वेळोवेळी श्रम घेऊन त्यानी परिश्रमपूर्वक हे प्रकाशन साकार केले आहे  कल्पना मुद्रणालयाच्या सचालकांना आस्थेने हे काम पूर्ण करण्यासाठी केलेले साहाय्य मोठे आहे

दि २ जानेवारी १९६८ — हरिभाऊ जोशी

४७९ शनिवार पेठ, पुणे २

व मॅजेस्टिक हॉटेल, मुबई १

फार मोलाचे असे झालेले आहे फोगे मुरादाबाद्च्या वास्तीत श्री अ नाग न उर्दूसाहित्यिक श्री रामशरण नगीना, काबूल येथील यू नो चे शिक्षणतज्ज्ञ श्री आठल्ये, आकाशवाणीचा प्रकाशनविभाग, श्री मामासाहेब देवगिरीकर व श्री प्यारेलाल यांचे साहाय्य झाले आहे या सर्वांचा मी अत्यत ऋणी आहे सूची तयार करण्याचे कामी प्रा चि वें ल जोशी व माझे नातू चि श्रीप्रकाश जोशी, चि शिरीष कुळकर्णी व चि विजय जोशी यांचे श्रम हेच महत्त्वाचे आहेत

प्रथलेखनाचा विचार चालू असता नीलकठ प्रकाशनाचे श्री दामुअण्णा रानडे यांचा सल्ला विचारला असता प्रकाशनाची जबाबदारी घेण्याचे आश्वासन त्यांनी दिले यामुळे लेखनाचा माझा निर्णय निश्चित होण्यास मदत झाली त्यांनी हे आश्वासन दिले इतकेच नव्हे तर माझ्या लिहिण्याचा प्रारभही नसता काबूलला जाण्याचा विचार ठरताच व त्यांना सुचविताच त्यांनी शक्यते सहकार्य दिले प्रथप्रकाशकाचे कोणास काय अनुभव येतात हे मला माहीत नाही, परतु श्री रानडे यांच्या सहकार्याचा हा अनुभव माझा उत्साह वाढवण्यास साहाय्यक झाला माझ्याकडून लेखनकार्य वेळेवर पुरे झाले नसताही वेळोवेळी श्रम घेऊन त्यांनी परिश्रमपूर्वक हे प्रकाशन साकार केले आहे कल्पना मुद्रणालयाच्या सचालकानी आस्थेने हे काम पूर्ण करण्यासाठी केलेले साहाय्य मोठे आहे

दि २ जानेवारी १९६८ हरिभाऊ जोशी

४७९ शनिवार पेठ, पुणे २

व मॅजेस्टिक हॉटेल, मुबई १

# अनुक्रमणिका


लेखकाचे मनोगत

१ विषयप्रवेश १

२ जीवनप्रवाह ६

३ ग्रामीण शिक्षणाचे प्रवर्तक १७

४ दु:खाने व्यापलेले वैवाहिक जीवन २१

५ राज्य प्रतिकाराच्या मध्यान्ह २५

६ सत्याग्रहाच्या मार्गावर ३१

७ मक्केच्या जागतिक धर्मपरिषदेत ४६

८ 'खुदाचे सेवक '— सत्याग्रहींची उभारणी ५०

९ सत्याग्रही सैनिकांची प्रचीती ५७

१० गांधी-आयर्विन तडजोडीचे फसवे स्वरूप ७०

११ पेशावर काँग्रेसमधील मतभेद ७४

१२ १९३२ मधील दडपशाही ७७

१३ जमनालालजींच्या ' हुजऱ्या 'त ८२

१४ ख्रिस्ती समाजापुढील भाषण
व शिक्षा ( १९३४ ) ८९

१५ तडीपार दिवसांची दैनंदिनी (१९३६ ३७) १०२

१६ राजकीय सुधारणांतर्गत अंतर्गत
दुहीची पेरणी १९३७ ३९ १०९

१७ स्वातीला सावरमतीची भ ११८

| | | |
|---|---|---|
| १८ | युद्धकालीन अहिंसायुद्धाचा आदर्श ( १९३९-४० ) | १२३ |
| १९ | १९४२ च्या लढाईची पगणी आवणी | १३७ |
| २० | राजकीय भूकंपाचा प्रारंभ | १५० |
| २१ | अग्नि-परीक्षा ( १९४६ ४७ ) | १६८ |
| २२ | अग्निप्रवेश ( १९४७ ) | १७४ |
| २३ | अग्निशयन ( १९४८ ) | १९० |
| २४ | अग्निशयन ( लंडन ते काबूल-१९६४ ) | २२४ |
| २५ | अग्निशयन (त्यांच्या सान्निध्यातील आठ दिवस) छायाचित्रे | २३१ |
| २६ | संबंधित उतारे ( परिशिष्ट ) | २५८ |
| | ( १ ) लाहोर हायकोर्टपुढील कैफियत ( १९५६ ) | |
| | ( २ ) पख्तूनिस्तान हे वेदांचे उगमस्थान आहे | |
| | ( ३ ) विनोबा–बादशहाखान–पत्रे | |
| | ( ४ ) डॉ गंगासिंग कंबोज–पत्र | |
| | ( ५ ) बादशहाखान–मदालसाबहन–पत्र | |
| | ( ६ ) बादशहाखान यांचे पख्तून दिनाचे भाषण ( १९६७ ) | |
| | ( ७ ) पख्तून–उतारा | |
| | संदर्भ ग्रंथ | २९३ |
| २७ | सूचि | २९७ |



भाई रानडे,

आपका प्रेम और
मुहब्बतका पैगाम मिला
खाली किताब छपनेसे
काम नहीं चलेगा।

फकत
अब्दुल गफ्फार

(हस्ताक्षरात आलेला संदेश)

I am, naturally, more concerned about the present and the future  I hope the book will help the Marathi readers to understand my mind, plans and movements. I am the same simple Khudai Khidmatgar as I was 37 years back and look with the same respect and affection to all  I wish you success in your work and thank you for remembering the Pathan sufferings and sacrifices

*Kabul, Sept  3, 1967.*

( लेखकास आलेल्या एका पत्रातील उतारा )

बेटा शिरीष,

तुम्हारा पैगाम मिला,
हिन्दोस्तान हमें भूल गया,
लेकिन तुम भूल न जाओ,

फकत
अब्दुल गफ्फार

( भारतातील युवकांस आलेला संदेश )

प्यारी आनदीबाई,

आपकी बहनोंकी पैग़ाम मिली।
हम ग़रीबोंको लोक भूल गये।
आप भूलना नहीं।

फ़क़त
अब्दुल ग़फ़्फ़ार

( सौ. आनदीबाई जोशी यांना आलेले पत्र )

# १

## विषय विशेष

सरहद्द गांधी या नावाने भारतात विख्यात असलेले खान अब्दुल गफारखान हे बादशाह खान या नावाने पठाण मुलखात प्रसिद्ध आहेत बादशाहखान ही पठाणांनी त्यांना दिलेली पदवी आहे बादशाहखानांचे मोठेपण मापणे सोपे नाही

भारताच्या स्वातंत्र्याच्या लढ्यातील त्यांचे स्थान अमर स्वरूपाचे आहे अहिंसेच्या लढ्यातील ते एक असामान्य असे सैनिक आहेत परंतु त्यांचे सार्वजनिक जीवन १९११ पासून म्हणजे गांधीजी भारतात परत येण्यापूर्वी सुरू झालेले आहे अहिंसामार्गानेच दुर्बल व दलित मानवाचा उद्धार होऊ शकेल या सिद्धान्तावर गांधीजींप्रमाणे त्यांचाही नितान्त श्रद्धा आहे

पठाण म्हणताच क्रूर, साहसी व हिंसाचारात तरबेज अशा माणसाचे चित्र डोळ्यांपुढे उभे राहते आपल्या हातापायांइतके स्वतःच्या बंदुकीवर प्रेम करणारा व त्या बंदुकीच्या बळावर आपले स्वातंत्र्य सांभाळणारा असा हा पठाण आहे आपल्याला त्यांचा खरा परिचय बादशाहखानांनी प्रथम करून दिला

वायव्य सीमा प्रान्त व त्यापलीकडील अर्धवट स्वतंत्र असलेला डोंगराळ पठाणमुलूख पाकिस्तान, या दोन्ही विभागांतील सुमारे ५० लाख पठाणांचे बादशाहखान हे आराध्य दैवत बनलेले आहे अफगाण लोक देखील बादशाहखानांना विशेष मानतात

वायव्य सीमा प्रान्तातील पठाण सुमारे १०० वर्षे ब्रिटिश हिंदुस्थानचे नागरिक म्हणून नांदले असले तरी त्यांची शस्त्रावरील श्रद्धा कधीच कमी झालेली नव्हती वायव्य सीमेपलीकडील पाकिस्तानातील लोकांवर कोणीच शासक शासन चालवू शकलेले नाहीत ब्रिटिशांसारख्या

१

# विषय विशेष

सरहद्द गांधी या नावाने भारतात विख्यात असलेले खान अब्दुल गफारखान हे बादशाह खान या नावाने पठाण मुलखात प्रसिद्ध आहेत बादशाहखान ही पठाणांनी त्यांना दिलेली पदवी आहे बादशाहखानांचे मोठेपण मापणे सोपे नाही

भारताच्या स्वातंत्र्याच्या लढ्यातील त्यांचे स्थान अमर स्वरूपाचे आहे अहिंसेच्या लढ्यातील ते एक असामान्य असे सैनिक आहेत परंतु त्यांचे सार्वजनिक जीवन १९११ पासून म्हणजे गांधीजी भारतात परत येण्यापूर्वी सुरू झालेले आहे अहिंसामार्गानेच दुबळे व दलित मानवाचा उद्धार होऊ शकेल या सिद्धान्तावर गांधीजींप्रमाणे त्यांचीही नितान्त श्रद्धा आहे

पठाण म्हणताच क्रूर सान्सी व हिंसाचारात तरबेज अशा माणसाचे चित्र डोळ्यांपुढे उभे राहते आपल्या हातापायांइतके स्वत:च्या बंदुकीवर प्रेम करणारा व त्या बंदुकीच्या बळावर आपले स्वातंत्र्य सांभाळणारा असा हा पठाण आहे आपल्याला त्यांचा खरा परिचय बादशाहखानांनी प्रथम करून दिला

वायव्य सीमा प्रान्त व त्यापलीकडील अर्थात स्वतंत्र असलेला डोंगराळ पठाणमुलूख यागिस्तान या दोन्ही विभागातील सुमारे ५० लाख पठाणांचे बादशाहखान हे आराध्य दैवत बनलेले आहे अफगाण लोक हेही बादशाहखानांना विशेष मानतात

वायव्य सीमा प्रान्तातील पठाण सुमारे १०० वर्षे ब्रिटिश हिंदुस्थानचे नागरिक म्हणून नांदले असले तरी त्यांची धर्मावरील श्रद्धा कधीच कमी झालेली नव्हती वायव्य सीमेपलीकडील यागिस्तानातील लोकांवर कोणीच शासक शासन चालवू शकलेले नाहीत ब्रिटिशांसारख्या

साम्राज्यसत्ताधीशांनाही या पठाणांना केव्हाही नमविता आले नाही. ३०-४० कोटी लोक-संख्येच्या भारतासारख्या संस्कृतिसंपन्न व विशाल देशावर इंग्रजांना निर्वेधपणे सत्ता चालविता आली परंतु मूठभर यागिस्तानी पठाणांवर त्यांना स्वामित्व लादता आले नाही या कडव्या लढवय्या पठाणांना नमविणे–दमविणे हेच एक काम ब्रिटिश सैन्यातील मोठमोठ्या अधि-काऱ्यांकडे सोपविलेले असे तरुण ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यांना तयार करण्यासाठी राखून ठेवलेले यागिस्तान हे एक 'मृगया स्थान' होते असा उल्लेख किलेर परक्या लष्करी अधिकाऱ्यांनी लज्जेने केलेला आहे.

शंभर वर्षेपर्यंत ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यांना समस्या होऊन राहिलेला हा प्रश्न हाच बादशाहखानांच्या थोर कार्याचा व मोठेपणाचा निकष आहे.

पठाण हा क्रूर, शस्त्रप्रिय, लुटारू येवढेच त्याच्याबद्दल आम्ही ऐकत होतो, परंतु तो खरोखर अत्यंत स्वातन्त्र्यप्रिय आहे. आपल्या मुलखावर तो पठाणाव्यतिरिक्त कोणाचेही स्वामित्व होऊ देणार नाही स्वतःच्या पुश्तू भाषेवरील त्याचे प्रेम तसेच नितान्त स्वरूपाचे आहे त्याचे साहित्य सुंदर आहे व ते रसिक आहेत हे त्याचे गुणविशेष आम्हाला अपरिचित होते

पठाणाचे काही स्वभावदोषही तितकेच मोठे आहेत त्यांच्या अनेक जाती-जमाती आहेत. या जमातीं (टोळ्या) मधील अंतर्गत हाडवैर हे पिढ्यान् पिढ्या चालू असते 'बदला' म्हणजे जुन्या भांडणाचा सूड घेतल्यावाचून पितृऋणातून मुक्ती नाही या भावनेने तो आयुष्यभर भारलेला असतो यामुळे त्यांच्या या जमातींमध्ये कायमच्या कत्तली–भांडणे चालू रहतात. या टोळ्यांच्या एकमेकांमधील लढायाही नेहमी चालू असतात ते अंतर्गत भांडणामुळे कायमचे दुःखीच राहिलेले आहेत.

त्यांच्या या अंतर्गत कलहाचा फायदा घेऊनच स्वतःच्या सामर्थ्याने यशस्वी होऊ न शकलेल्या इंग्रजांनी त्यांना अर्धवट गुलामगिरीत डांबून टाकले होते त्याची अंतर्गत दुही हीच त्यांच्या पिढ्यान् पिढ्या नाशाचे व दैन्याचे कारण होते

शस्त्रनिष्ठ व हिंसक कृत्यांत अत्यंत वाकबगार पठाणाला अहिंसाव्रताचा अनुयायी बनवणे हा एक चमत्कार होता उघड्या छातीवर बंदुकीच्या गोळ्या सोसण्यासाठी ईर्षेने पुढे धावणारे हजारो अहिंसानिष्ठ सैनिक त्यांच्यात निर्माण झाले काचेच्या फुटक्या तुकड्यांसारखे परस्परां पासून फुटून वागणाऱ्या जमातींना एका झेंड्याखाली एका ध्येयासाठी—अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी—बादशाहखानांनी एकत्रित केले ज्या भारत भूमीला ते दार-उल-हरब (ज्या राज्यात मुसलमानांना राहता येत नाही असे शत्रुराज्य) इतकी परकी मानीत होते, त्या भारतभूमीच्या स्वातंत्र्याच्या लढ्यामधील त्यांना अग्रदूत बनविले शेकडो पठाणांनी भारतीय स्वातंत्र्यासाठी बलिदान दिले हजारो लोकांनी बंदिवास भोगला, हजारो स्त्री पुरुषांनी

अनन्वित प्रकारे दळ सोसले—या पठाणांच्या वीरवृत्ति नि शस्त्र प्रतिकाराचे तेज पत्न गधवाली पठ्ठ्यांच्या तुकडीने आफळ्ळी शस्त्रे खाली ठेवली व साऱ्या साम्राज्यसत्तेला मोठा हादरा दिला ! अशा या पठाणांच्या नव जागृतीचे व त्यांच्यामधील अहिंसानिष्ठेचे बादशाखान हे जनक आहेत. भारतीय स्वातंत्र्यलढ्यातील त्यांची ही सेवा अमर स्वरूपाची आहे.

पठाणांमध्ये शीख, हिंदू आदी अल्पसंख्यांकांच्या सर्वधर्मांच्या शेजारधर्माची जी जाणीव निर्माण झाली तीही अशीच असामान्य स्वरूपाची आहे. भिन्नधर्म व भिन्न जाती-जमातींमध्यामधील हार्दिक सहकार्य व स्नेहभाव हाच लोकशाहीचा आधार आहे हे या देशाच्या नेत्यांनी नीट ओळखले होते. काँग्रेसच्या जन्मापासून या ऐक्यभावनेवर राष्ट्रीय नेत्यांनी भर दिलेला आहे. १८८७ च्या तिसऱ्या राष्ट्रीय सभेच्या बर्हिर्भागापासूनच राष्ट्रस्त्यांनी हे ऐक्य टिकवण्याचे प्रत्यक्ष प्रयत्न सुरू केले. त्या काळचे राष्ट्रीय सभेचे सर्वधर्मीय नेते ह्यूम (इंग्रज), बॅनर्जी (बंगाली ख्रिश्चन), तय्यबजी (मुसलमान), दादाभाई (पारशी) इत्यादींनी विचारान ते हाणून पाडण्याचे प्रयत्न आरंभले. याच राष्ट्रीय ऐक्याचा पाया घालावा म्हणून लोकमान्य टिळक व बॅ. जिना यांनी १९१६ मध्ये लखनौ करार घडवून आणला. "हिंदू व मुसलमान हे भारताचे दोन डोळे आहेत, एका डोळ्याने काम केले नाही तर ते अर्धे आंधळेपणच ठरेल" या इकबाल कवीच्या काव्यपंक्तीचा उल्लेख करून गांधीजींनी आपल्या राजकीय प्रचाराचा प्रारंभ (१९१६) केला. त्या राष्ट्रीय ऐक्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या झालेल्या, स्वातंत्र्याच्या जन्मकाळी गांधीजींनाच पहाव्या लागल्या. "आपल्या जीवनकार्याचा शेवट अशा रीतीने होत आहे, आता दीर्घकाळ जगण्याची इच्छाही राहिली नाही" अशा आशयाचे उद्गार त्यांना काढावे लागले.

हे जातीय ऐक्य बादशाखान यांनी आपल्या प्रान्तात घडवून आणले होते. मुस्लीम बहुसंख्येच्या बहुतेक प्रदेशात व मुख्यत: पंजाबच्या सीमेवर सर्वत्र जाळपोळ व कत्तली सुरू झाल्यावरही ९० टक्के पठाण वस्ती असलेल्या वायव्य सीमाप्रदेशात हिंदू-शीखांच्या मुली—माता खुदाई खिदमतगार भाईंच्या छत्राखाली राहू—नांदू शकल्या. हे अपूर्व यश फक्त बादशाहखान यांनाच लाभू शकले. जे दमदार व सशस्त्र पठाण इंग्रजांच्या शस्त्रबळापुढे बेजार होत असत त्याच नि:शस्त्र पठाणांपुढे इंग्रजांचे शस्त्र बराच काळ अप्रभावी झाले—हाच तो चमत्कार. स्वत: बादशाहखान अहिंसेकडे कसे वळले, व त्यांनी हजारो पठाणांना कसे अहिंसानिष्ठ बनविले हा जगातील विचारवंतांना स्तिमित करणारा असा प्रश्न झाला.

बादशाखानांची खुदाई खिदमतगार ही संघटना हे या लोकजागृतीचे मोठे साधन होते. त्यांचे स्वतःचे सत्-चारित्र्य हे त्यांचे सामर्थ्य, इस्लाम धर्माबद्दल त्यांची नितांत व डोळस निष्ठा हा त्यांच्या जीवनाचा आधार. 'दरिद्री-दुर्बलांना सारखे मानणे व त्यांची

साम्राज्यसत्ताधीशांनाही या पठाणांना केव्हाही नमविता आले नाही २० ४० कोटी लोक-संख्येच्या भारतासारख्या सस्कृतिसपन्न व विशाल देशावर इग्रजाना निर्वेधपणे सत्ता चालविता आली परतु मूठभर यागिस्तानी पठाणांवर त्यांना स्वामित्व लादता आले नाही या कडव्या लढवय्या पठाणांना नमविणे–दमविणे हेच एक काम ब्रिटिश सन्यातील मोठमोठ्या अधिकाऱ्यांकडे सोपविलेले असे तरुण ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्याना तयार करण्यासाठी राखून ठेवलेले यागिस्तान हे एक ' मृगया-स्थान ' होते असा उल्लेख त्रिलेक परवया लष्कर अधिकाऱ्यानी लज्जेने केलेला आहे

शभर वर्षेपर्यंत ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्याना समस्या होऊन राहिलेला हा प्रश्न हाच बादशाहखानांच्या थोर कार्याचा व मोठेपणाचा निकष आहे

पठाण हा क्रूर, शस्त्रप्रिय, लुटारू येवढेच त्याच्याबद्दल आम्ही ऐकत होतो, परतु तो खरोखर अत्यत स्वातत्र्यप्रिय आहे आपल्या मुलुखावर तो पठाणाव्यतिरिक्त कोणाचेही स्वामित्व होऊ देणार नाही स्वत च्या पुश्तू भाषेवरील त्याचे प्रेम तसेच नितान्त स्वरूपाचे आहे त्याचे साहित्य सुदर आहे व ते रसिक आहेत हे त्याचे गुणविशेष आम्हाला अपरिचित होते

पठाणाचे काही स्वभावदोषही तितकेच मोठे आहेत त्यांच्या अनेक जाती-जमाती आहेत या जमातीं ( येल्या ) मधील अतर्गत हाडवैर हे पिढ्यान् पिढ्या चालू असते 'बदला' म्हणजे जुन्या भाडणाचा सूड घेतल्यावाचून पितृऋणातून मुक्ती नाही या भावनेने तो आयुष्यभर भारलेला असतो यामुळे त्यांच्या या जमातींमध्ये कायमच्या कुरबुरी–भांडणे चालू राहतात या येल्यांच्या एकमेकांमधील लढायाही नेहमी चालू असतात ते अतर्गत भांडणामुळे कायमचे दु खीच राहिलेले आहेत

त्यांच्या या अतर्गत कलहाचा फायदा घेऊनच स्वत च्या सामर्थ्याने यशस्वी होऊ न शकलेल्या इग्रजांनी त्यांना अर्धवट गुलामगिरीत डांबून टाकले होते त्याची अतर्गत दुही हीच त्यांच्या पिढ्यान् पिढ्या नाशाचे व दैन्याचे कारण होते

शस्त्रनिष्ठ व हिंसक कृत्यांत अत्यत वाकबगार पठाणाला अहिंसाव्रताचा अनुयायी बनवणे हा एक चमत्कार होता उघड्या छातावर बदुकींच्या गोळ्या सोसण्यासाठी इर्षेने पुढे धावणारे हजारो अहिंसानिष्ठ सनिक त्यांच्यात निर्माण झाले काचेच्या फुटक्या तुकड्यांसारखे परस्परां पासून फुटून वागणाऱ्या जमातींना एका झेंड्याखाली एका ध्येयासाठी—अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी—बादशाहखानांनी एकत्रित केले ज्या भारत-भूमीला ते दार-उल-हर्ब ( ज्या राज्यात मुसलमानांना राहता येत नाही असे शत्रुराज्य ) इतकी परकी मानीत होते, त्या भारतभूमीच्या स्वातत्र्याच्या लढ्यामधील त्याना अग्रभूत मनविले शेकडो पठाणांनी भारतीय स्वातंत्र्यासाठी बलिदान दिले हजारो लोकांनी बदिवास भोगला, हजारो स्त्री पुरुषांनी

अनन्वित प्रकारचे छळ सोसले—या पठाणांच्या बलिदानित नि शस्त्र प्रतिकाराचे तेज पाहून गढवाली पलटणीच्या तुकडीने आपली शस्त्रे खाली ठेवली व साऱ्या साम्राज्यसत्तेला मोठा हादरा दिला ! अशा या पठाणांच्या नव जागृतीचे व त्यांच्यामधील अहिंसानिष्ठेचे बादशाखान हे जनक आहेत भारतीय स्वातन्त्र्यलढ्यातील त्यांची ही सेवा असा स्वरूपाची आहे

पठाणांमध्ये शीख, हिंदू आदी अल्पसंख्याकांच्या सर्वधर्मांच्या लोकधर्मांची जी जागृति निर्माण झाली तीही अशीच असामान्य स्वरूपाची आहे भिन्नधर्मीय व भिन्न जातीं जमातीं यांच्यामधील हार्दिक सहकार्य व स्नेहभाव हाच लोकशाहीचा आधार आहे हे या देशाच्या नेत्यांनी नीट ओळखले होते काँग्रेसच्या जन्मापासून या ऐक्यभावनेवर राष्ट्रीय नेत्यांनी भर दिलेला आहे, १८८७ च्या तिसऱ्या राष्ट्रीय सभेच्या बऱ्याचपासूनच राजकर्त्यांनी हे ऐक्य विघडवण्याचे प्रच्छन्न प्रयत्न सुरू केले त्या वेळचे राष्ट्रीय सभेचे सर्वधर्मीय नेते ह्यूम (इंग्रज), बॅनर्जी ( बंगाली ब्रिश्चन ), तय्यबजी (मुसलमान), दादाभाई (पारशी) इत्यादींनी चिकाटीने ते हाणून पाडण्याचे प्रयत्न आरंभले याच राष्ट्रीय ऐक्याचा पाया घालावा म्हणून लोकमान्य टिळक व बॅ जिना यांनी १९१६ मध्ये लखनौ करार घडवून आणला "हिंदू व मुसलमान हे भारताचे दोन डोळे आहेत, एका डोळ्याने काम केले नाही तर ते अर्धे आंधळेपणच ठरेल " या इशाऱ्याच्या वचनाच्या पायावरच उल्लेख करून गांधीजींनी आपल्या राजकीय प्रचाराचा प्रारंभ ( १९१६ ) केला त्या राष्ट्रीय ऐक्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या झालेल्या, स्वातन्त्र्याच्या जन्मवेळी गांधीजींनाच पहाव्या लागल्या "आपल्या जीवनकार्याचा शेवट अशा रीतीने होत आहे, आता दीर्घकाळ जगण्याची इच्छाही राहिली नाही " अशा आशयाचे उद्‌गार त्यांना काढावे लागले

हे जातीय ऐक्य बादशाहखान यांनी आपल्या प्रांतात घडवून आणले होते मुस्लिम बहुसंख्येच्या बहुतेक प्रदेशात व मुख्यत पंजाबच्या सीमेवर सर्वत्र जाळपोळ व कत्तली सुरू झाल्यानंतरही ९० टक्के पठाण वस्ती असलेल्या वायव्य सीमाप्रदेशात हिंदू-शीखांच्या मुली—माता खुदाई खिदमतगार भाईंच्या छत्राखाली राहू—नांदू शकल्या हे अपूर्व यश फक्त बादशाहखान यांनाच लाभू शकले, जे दमदार व सशस्त्र पठाण इंग्रजांच्या शस्त्रबळापुढे बेजार होत असत त्याच नि शस्त्र पठाणापुढे इंग्रजांचे शस्त्र कसे काय अप्रभावी झाले —हाच तो चमत्कार खान बादशाहखान अहिंसेकडे कसे वळले, व त्यांनी हजारो पठाणांना कसे अहिंसानिष्ठ बनविले हा जगातील विचारवंतांना स्तंभित करणारा असा प्रश्न झाला

बादशाहखानांची खुदाई खिदमतगार ही संघटना हे या लोकजागृतीचे मोठे साधन होते त्यांचे स्वतःचे सत्-चारित्र्य हे त्यांचे सामर्थ्य, इस्लाम धर्माविषयी त्यांची नितांत व डोळस निष्ठा हा त्यांच्या जीवनाचा आधार, ' दलित-दुर्बलांना सारखे मानणे व त्यांची

सेवा निरपेक्ष बुद्धीने करणे हीच खुदाची सेवा,— हीच इस्लाम धर्माची आज्ञा ही त्यांची दृष्टी, हे जीवनविशेष हा त्यांच्या यशाचा पाया

अशा थोर श्रद्धेचा व कर्तृत्वाचा मुस्लिम नेता व त्याचे लाखो सख्येचे खुदाई खिदमतगार स्वयसेवक याचा नि पात करण्याचे दुष्ट कार्य ब्रिटिश सत्तेने १७ वष केले व तेच अघोरी कर्म इस्लामच्या सरक्षणासाठी जन्म पावलेल्या पाकिस्तानमध्ये १७ वर्षे अविरतपणे चालू राहिले, यापेक्षा दैवदुर्विलासाचे चित्र कोणते असणार? परधर्मी इग्रज सत्ताधाऱ्यापेक्षा स्वधर्मी सत्तापिपासू व स्वार्थी इस्लामियांनी त्यांचा छळ अधिक करावा व तो त्याच्या साऱ्या धर्मबांधवांनी उघड्या डोळ्यांनी पाहावा याच्यापेक्षा लाजिरवाणे दृश्य कोणते असणार?

पण स्वबाधव—स्वधर्मीय यांनी केलेल्या या छळालाही त्याच अहिंसानिष्ठेने बादशहाखान व त्यांचे सैनिक यांनी गेली १७ वर्षे तोंड दिले आहे "पाकिस्तानच्याच भल्यासाठी, पाकच्या सरक्षणासाठी पठाणाना त्यांच्या इच्छेप्रमाणे व इच्छतीने जगू द्या" असे बादशाह खानानी पाक पार्लमेंटमधील पहिल्याच भाषणात आवर्जून सांगितले पाकचा राज्यकारभार हा पूर्वीच्या ब्रिटिश कारभारापेक्षा अन्यायाचा व नवाबी उधळपट्टीचा चालू असल्याचे त्यांनी बजावले साऱ्या पाकिस्तानमध्ये आपली खुदाई खिदमतगार-सघटना फैलावण्याचे त्यांनी जाहीर करताच खानबधू व दहा हजारावर कार्यकर्ते यांना तुरुगात डाबून टाकले १९४८ ते १९६५ या सतरा वर्षांच्या स्वातंत्र्याच्या काळापकी सुमारे पधरा वर्षे त्याना केवळ बदिशालेत नव्हे तर निरनिराळ्या शारीरिक व मानसिक छळात–कलहात खितपत टाकले आश्चर्य किंवा रक्त वाग्णारी गोष्ट अशी की, आपल्या वाणीने किंवा लेखणीने ज्यांनी १९४५ पर्यंत खानबधूंचे आरुढ यशोगान गायिले, "इस्लाम धोक्यात आहे अशा घोषणा देणाऱ्या जातीय पुढाऱ्यांपासून जपून रहा" असा इशारा ज्यानी आपल्या बाधवांना पूर्वी दिला त्या कय्यूमखानानीच स्वतत्र वायव्य सीमाप्रान्ताचे पहिले मुख्य मत्री बनून खान-बधूंच्या शिरावरील सुरुवात केली सत्तेची किमया किंवा बुद्धी इतकी प्रतारणा करू शकते!

आता बादशाहखानांची ७७ वर्षे पूर्ण झाली आहेत या जीवनकालखडातील एक-तृतीयांश म्हणजे सुमारे पचवीस वर्षे तुरुगात गलेली आहेत त्यांतील १२ १३ वर्षे इग्रजांच्या बदिशालेत तर सुमारे १८ वर्षे पाकिस्तानच्या—अपमान, उपमर्द आदी छळाला तोंड देण्यात गेली आहत

इतक्या छळानतरही आयुष्यभर साभाळलेल्या त्यांच्या निष्ठा तिळमानही ढळलेल्या नाहीत किंवा ज्यांनी त्याचा हा छळ केला त्यांच्यासबधी द्वेष अगर कटुता त्यांनी आपल्या अन्तःकरणात तेवत ठेवलेली नाही आपल्या अडाणी पण स्वातत्र्यप्रिय अधश्रद्ध व दरिद्री पठाणांना स्वातत्र्य व सौख्य मिळवून देण्यासाठी ते आजही सिद्ध आहेत त्यांची अहिंसि-

वरील श्रद्धा आजही तितकीच अटळ आहे "अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी अखंड जागरूक राहण्यानेच स्वातंत्र्य टिकू शकते" हा राज्यशास्त्रज्ञांचा सिद्धान्त बादशहाखान आपल्या जीवनाने सिद्ध करीत आहेत त्यांच्यासारख्या मानवतेच्या उपासकाला इतक्या हालअपेष्टांत जीवन घालवावे लागावे हा जगातील विचारवंतांना खंत वाटावी असा विषय आहे त्यांचे चरित्र व चारित्र्य हा जसा भारतीय स्वातंत्र्याच्या आन्दोलनाच्या इतिहासाचा एक स्फूर्तिप्रद भाग आहे त्याचप्रमाणे ते इस्लामच्या थोर परंपरेचे उज्ज्वल दर्शन घडविणारे असे आहे



सेवा निरपेक्ष बुद्धीने करणे हीच खुदाची सेवा,— हीच इस्लाम धर्माची आज्ञा ही त्यांची दृष्टी, हे जीवनविशेष हा त्यांच्या यशाचा पाया

अशा धीर श्रद्धेचा व कर्तृत्वाचा मुस्लिम नेता व त्याचे लाखो सख्येचे खुदाई खिदमतगार स्वयंसेवक यांचा नि पात करण्याचे दुष्ट कार्य ब्रिटिश सत्तेने १७ वर्षे केले व तेच अघोरी कर्म इस्लामच्या सरक्षणासाठी जन्म पावलेल्या पाकिस्तानमध्ये १७ वर्षे अविरतपणे चालू राहिले, यापेक्षा दैवदुर्विलासाचे चित्र कोणते असणार? परधर्मी इंग्रज सत्ताधाऱ्यापेक्षा स्वधर्मी सत्तापिपासू व स्वार्थी इस्लामियांनी त्यांचा छळ अधिक करावा व तो त्यांच्या साऱ्या धर्मबांधवांनी उघड्या डोळ्यांनी पाहावा यापेक्षा लाजिरवाणे दृश्य कोणते असणार?

पण स्वबांधव—स्वधर्मीय यांनी केलेल्या या छळालाही त्याच अहिंसानिष्ठने बादशाहखान व त्यांचे सैनिक यांनी गेली १७ वर्षे तोंड दिले आहे "पाकिस्तानच्याच भल्यासाठी, पाकच्या सरक्षणासाठी पठाणाना त्यांच्या इच्छेप्रमाणे व इज्जतीने जगू द्या" असे बादशाह खानांनी पाक पार्लमेंटमधील पहिल्याच भाषणात आवर्जून सांगितले पाकचा राज्यकारभार हा पूर्वीच्या ब्रिटिश कारभारापेक्षा अन्यायाचा व नवाबी उधळपट्टीचा चालू असल्याचे त्यांनी बजावले साऱ्या पाकिस्तानमध्ये आपली खुदाई खिदमतगार-सघटना फैलावण्याचे त्यांनी जाहीर करताच खानबधू व दहा हजारांवर कार्यकर्ते यांना तुरुगात डांबून टाकले १९४८ ते १९६५ या सतरा वर्षांच्या स्वातंत्र्याच्या काळापैकी सुमारे पधरा वर्षे त्यांना केवळ बदि शाळेत नव्हे तर निरनिराळ्या शारीरिक व मानसिक छळात-क्लेशांत खितपत टाकले आश्चर्य किंवा खत वाटणारी गोष्ट अशी की, आपल्या वाणीने किंवा लेखणीने ज्यानी १९४५ पर्यंत खानबधूचे आरुढ यशोगान गायिले, "इस्लाम धोक्यात आहे अशा घोषणा देणाऱ्या जातीय पुढाऱ्यापासून जपून राहा" असा इशारा ज्यानी आपल्या बांधवांना पूर्वी दिला त्या चव्यूमुख्यानीच स्वतत्र वायव्य सीमाप्रान्ताचे पहिले मुख्य मंत्री बनून खान-बधूच्या शिकारीला सुरुवात केली सत्तेची विमधा किंवा धुंदी इतकी प्रतारणा करू शकते!

आता बादशाहखानाची ७७ वर्षे पूर्ण झाली आहेत या जीवनकालखडातील एक-तृतीयांश म्हणजे सुमारे पचवीस वर्षे तुरुगात गेलेली आहेत त्यांतील १२ १३ वर्षे इग्रजांच्या बदिशाळेत तर सुमारे १६ वर्षे पाकिस्तानच्या—अपमान, उपमर्द आदी छळाला तोंड देण्यात गेलेली आहेत

इतक्या छळानतरही आयुष्यभर सांभाळलेल्या त्यांच्या निष्ठा तिळमात्रही ढळलेल्या नाहीत, किंवा ज्यांनी त्यांचा हा छळ केला त्यांच्यासबधी द्वेष अगर कटुता त्यांनी आपल्या अन्तःकरणात तेवत ठेवलेली नाही आपल्या अडाणी पण स्वातंत्र्यप्रिय अधश्रद्ध व दरिद्री पठाणांना स्वातंत्र्य व सौख्य मिळवून देण्यासाठी ते आजही सिद्ध आहेत त्यांची अहिंसे-

वरील श्रद्धा आजही निश्चित अटळ आहे. "अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी अखंड जागरूक राहण्यानेच स्वातंत्र्य टिकू शकते" हा राज्यशास्त्रज्ञांचा सिद्धान्त बादशाहखान आपल्या जीवनाने सिद्ध करीत आहेत. त्यांच्यासारख्या मानवतेच्या उपासकाला इतक्या हालअपेष्टांत जीवन घालवावे लागते हा जगातील विचारवंतांना खंत वाटावी असा विषय आहे. त्यांचे चरित्र व चारित्र्य हा जसा भारतीय स्वातंत्र्याच्या आन्दोलनाच्या इतिहासाचा एक स्फूर्तिप्रद भाग आहे त्याचप्रमाणे ते इस्लामच्या थोर परंपरेचे वेगळे दर्शन घडविणारे असे आहे.



# २

# जीवनप्रवाह

बादशाहखान, फक्रे अफगान, सरहद गांधी इत्यादी नामाभिधानांनी भारताला सुपरिचित असलेले अब्दुल गफ्फारखान यांची जन्मतारीख त्यांना स्वतःलाही ठाऊक नव्हती असे त्यांचे पहिले चरित्रकार महादेवभाई देसाई* यांनी म्हटले आहे. " माझा जन्म 'जेठ' महिन्यात झाला येवढे मला ठाऊक आहे. " असे उत्तर खानसाहेबांनी महादेवभाईंना दिले होते. 'जेठ महिना' म्हणून महादेवभाईंनी विस्मयाने विचारले; पण त्या उत्तराबरोबरच पठाणांच्या वायव्य सीमाप्रान्ताचे मूळ भारतीय स्वरूप महादेवभाईंच्या डोळ्यांपुढे उभे राहिले असणार. वायव्य सीमाप्रदेश हे भारतीय संस्कृतीचे चार हजार वर्षांपूर्वीचे केन्द्र होते. कनिष्काचा स्तूप खानसाहेबांच्या जन्मस्थानापासून २०–२५ मैलांच्या अंतरावर असेल. बुद्धकालीन मूर्तींच्या मोडक्या अवशेषांची खेळणी खानसाहेबांनी बालपणी वापरलीही असतील. या सीमा प्रान्तात व त्याच्या उत्तरेकडील शेकडो मैलांच्या आसमंतात बुद्ध संस्कृतीचे अवशेष विपुल असे उपलब्ध झालेले आहेत. वेदांचे जन्मस्थान, बौद्धांचे धर्मकेन्द्र व कनिष्क-गुप्तांचा सत्ताविस्तार असा या देशात खानसाहेबांचे पूर्वज जन्मले व वाढले होते

गफ्फारखानांचा जन्म १८९० मध्ये झाला. १८९० चा ज्येष्ठ महिना १९ मे ते १७ जूनच्या दरम्यान येतो. अर्थात बादशाहखानांनीच दिलेल्या माहितीत किंचित-

---

[* टू सर्व्हंट्स ऑफ गॉड—ले. महादेवभाई हरिभाई देसाई. गांधीजींचे एकनिष्ठ [illegible] व हरिजनचे संपादक—जन्म. १ जानेवारी १८९२, मृत्यू १५ ऑगस्ट १९४२—मराठी रूपांतर-[illegible] ]

जानेवारी हे महिने मागितले आहेत मर्दवमाईना दिलेली माहिती ३५ वर्षांपूर्वी त्यांनी स्वतःच दिलेली होती, तर १९४२ मध्ये प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या चरित्रात ( ग्रॅंटिअर स्पीकस—के मस्मद यूनुस ) जन्ममास जानेवारी दिला आहे या चरित्रास स्वतः बादशाह खान यांनी पुरस्कार लिहिलेला आहे प्रस्तुत लेखकाशी झालेल्या चर्चेत त्यांनी डिसेंबर जानेवारी महिन्यांचा काल हाच उल्लेखिला आहे. त्यामुळे १८९० चा डिसेंबर अगर १८९१ चा जानेवारी यामध्ये त्यांचा जन्मकाळ मानावा लागेल

याग्स्तिानमधील दीर-बाजोर या स्वतंत्र विभागातील मोहमद* ही एक जमात असून गफारखानांचे घराणे तिकडून पेशावर इलाख्यात आले आहे १८४८ मध्ये शीख राज्याचा पंजाब प्रान्त बनविला गेला, पण हा सीमाप्रदेश लष्करी स्वरूपाच्या सत्तेत ठेवण्याच्या दृष्टीने १९०१ पासून तो कमिशनरच्या ताब्यातील अलग प्रान्त करण्यात आला

पेशावरनजीकच्या उतमझाई खेड्यातले हे खान घराणे या खानांची बरीच जमीनदारी आहे आजही त्यातील काही शेतीवाडी बादशाहखानांचे चिरंजीव वगैरे असतात

सारे पठाण हे लढाऊ परंपरेचेच असतात तरवारीसाठी लढण्याची परंपरा या घराण्याकडे आलेली दिसते बादशाहखानांचे पणजोबा ओबदुल्लाखान हेही सत्वशील व लढाऊ वृत्तीचे इंग्रजी सरकारविरुद्ध म्हणजे पठाणी टोळ्यांच्या स्वातंत्र्यासाठी ते लढले व त्यात फाशी दिले गेले त्यांच्या जमातीचे ते पुढारी होते ते सामर्थ्यवान होते तसेच समजस व चाणाक्षही होते, पणजोबांप्रमाणेच आजोबा सैफुल्लाखान हेही लढवय्ये होते त्यांचीही सारी हयात इंग्रजां विरुद्ध लढण्यात गेली वायव्यसीमा प्रदेशापलीकडील याग्स्तिानच्या क्षेत्रात राज्यविस्तार करण्याचा ब्रिटिशांचा प्रयत्न अनेक वेळा झाला १८५७ नंतरही तसे काही प्रयत्न झाले यासंबंधीची ब्रिटिश नीती सतत बदलत राहिलेली होती सैफुल्लाखानांच्या काळात बुनेर भागावर ताबा घेण्याचा इंग्रजांनी प्रयत्न केला, १८५७ नंतर इंग्रजांचा दबदबा वाढला होता त्यामुळे बरेच खान इंग्रजांना साहाय्य करण्यास तयार झाले होते त्यांचा मोबदलाही त्यांना मोठमोठ्या जमीनदाऱ्यांच्या किंवा जहागिरीच्या रूपाने मिळाला, पण सैफुल्लाखानांनी बुनेरच्या रक्षणार्थ इंग्रजांविरुद्ध लढत दिली जेथे जेथे पठाणांवर इंग्रजांनी स्वारी केली

---

[ * ' मोहमद ' जमात ही ऋग्वेदातील मधुमत वंशाचीच होय "मधुमत म्हणजेच काबूल नदीच्या उत्तरेकडे राहणारे मोहमद होत, हे स्पष्ट आहे" (अफगाणिस्तान गॅझेटियर) " मधुमत हे लोकवाचक नाम या दृष्टीने महाभारतात (भीष्मपर्व १० ५३ ) त्याचा उल्लेख आहे पाणिनीने देशवाचक गांधार विभागातील एक प्रदेश ( ४=१३३ ) असा त्याचा उल्लेख केला आहे ('India as known to Panini,' p 455 )]

तेथे तेथे सैदुल्लाखान पठाणांच्या मदतीस आले स्वातन्त्र्यरक्षणाचा व इंग्रज विरोधाचा हा वारसा आजोबांकडून गफारखानांकडे आला असे दिसते

त्यांचे वालीद—पिताजी—बहिरामखान यांचा स्वभाव याहून वेगळा होता ते वृत्तीनेच शान्त गंभीर व निरंतर ईश्वरचिंतनात गढलेले असत ते विशेष धर्मनिष्ठ असले तरी त्यांना अर्वाचीन जगाची कल्पना आलेली होती शिक्षणाचे महत्त्व त्यांना कळलेले होते त्यामुळे मुल्ला मौलवींच्या दडपणाला दाद न देता त्यांनी आपल्या चिरंजीवांना शिक्षणासाठी पाद्र्यांच्या इंग्रजी शाळेत पाठवले होते स्वत ते सदाचारी असल्यामुळे त्यांच्याकडे गावाचे पुढारीपणही असे त्यांच्यावर लोकांचा पूर्ण भरवसा असे आपल्याजवळचा पैसा-अडका गरीब लोक त्यांच्याजवळ निर्धास्तपणे ठेवीत कोणास कधी चिठ्ठी-पावती घावी लागत नसे सार्‍यांना त्यांचा आश्रय लाभे व आधार वाटे

वडिलांची धर्मनिष्ठा व सेवाभाव हा बादशाहखानाकडे आला, पण त्यांच्यावर खरे संस्कार त्यांच्या आईचे झाले निर्मळ उत्कट प्रेम हेच तिच्याकडून मिळालेल्या शिक्षणाचे माध्यम असणार, सर्व गोरगरिबांवर सारखेपणाने प्रेम करणे हाच त्या साध्वीचा धर्म होता जुन्या पद्धतीप्रमाणे श्रीमंतांच्या वाड्याभोवती गोरगरीब नेहमी घोगळत राहात त्यांना जवळ बोलावून रोज रोटी-भाजी त्यांची आई देत असे तसेच स्वत वडील या गरिबांच्या पक्षती वादीत असत समाजाबद्दलचे हे प्रेम हीच त्यांची खरी वडिलार्जित संपदा होती "धार्मिक प्रवृत्तीचा वारसा आईकडून व अहिंसेसंबंधीची ओढ ही वडिलांकडून मिळाली" असे स्वत गफारखान सांगतात आई-वडिलांचे ईश्वरचिंतन, उपासतापास, रोजे पाळणे व गरीबांना अन्नदान देणे हे कार्यक्रम कधी टळत नसत स्वाभाविकच त्यांच्याबद्दल गावात आदरभाव नांदत होता इतकेच नव्हे तर बाहेरून येणारे बडे बडे इंग्रज अधिकारीही बहिरामखानांना 'ओल्ड अंकल' 'बडे चाच्या' असे आदराने संबोधीत अशा धर्मनिष्ठ सेवापरायण व प्रतिष्ठित घराण्यात गफारखान यांचा जन्म झाला

गफारच्या बालपणचे काही वर्णन आता कोणी सांगू शकेल हे संभवत नाही त्यांची सारी चरित्रे ही प्रबोधनपर व तत्वप्रचारार्थ लिहिली गेलेली आहेत त्यांत चरित्रविषयक भाग फार थोडा आहे स्वत त्यांनी जेलमध्ये आत्मचरित्र लिहिलेले आहे ते कधी काळी प्रकाशात आले तरी त्यात चरित्रविषयाचा भाग क्वचित असणार! आजही त्या दृष्टीने काही प्रश्न त्यांना केले तरी फार थोडी माहिती त्यातून निघते व्यक्तिविषयक माहिती सांगण्याचे ते टाळतात नाही म्हणण्यापुरते 'आपल्यास अभ्यासात कधीच गोडी लागली नाही व फारसे काही समजतही नसे' येवढी माहिती सांगताना ते थोडे खुलले होते, पण ते तितकेसे खरेही नसावे कारण त्यांचा गणित ( भूमिती ) हा विषय आवडीचा होता व त्या विषयात त्यांना

गुणही चांगले मिळत असत

त्यांचे बालपण म्हणजे सुमारे १० वर्षांपर्यंतचा काळ उतमझाईसच गेला घरी विपुल गोधन, घरची शेतीवाडी, दारी टांगवद घोडी असे त्यांच्या खानदानीचे वर्णन करता येईल गफारखान स्वभावाने गरीब व अबोल असेच लहानपणी होते असे त्यांच्या वर्णनावरून दिसते ‘ आम्ही खोड्या पुष्कळ करीत होतो, पण वडील कधी रागाने विशेष बोलले नाहीत, किंवा शिक्षा सोसावी लागली असे झाले नाही ’ असे ते एकदा म्हणाले ‘ आईचा लाडका फार व घरातील नोकरचाकरांनी कडे-खांद्यावर घेऊन व चालू लागल्यावर बोयाला धरून गावात कोठेही फिरवत ठेवावे ’ असे चालावयाचे पण ही बाल्यावस्था मागे पडताच त्यांना घोड्यावर बसण्याचा व पोहण्याचा छंद फारच लागला होता त्यांच्या गावालगतच स्वाती नदी आहे जणू उतमझाई गावाचे दर्शन घेण्यासाठीच या स्वाती ( सुवास्तू ) नदीने त्या गावाजवळ थोडे वळण घेतले आहे, पण श्रीमंतीमुळे स्वातीच्याला बघने येनात गावाशेजारी मसग प्रवाहाचे डोह असूनही तिकडे खानांना कोणी जाऊ देत नसत गरिबांना तशा अडचणी नसतात शिवाय घरी पिण्याचे पाणी साठविण्यास भांडी नसल्यामुळे जेथे पाणी असेल तेथे गुरां प्रमाणेच मुलांनाही घाटात जावे लागते, पाणी पिता पिता ती मुले तेथे मुक्तपणे खेळू बागडू शकतात अशा मुलांच्या संगतीत गफारही केव्हा केव्हा नदीकडे दडी मारू लागले खोल पाण्यात उतरण्यासाठी पोहण्यास यावे लागते हे ठाऊक नसल्यामुळे एकदा त्यांच्यावर प्रसंग गुदरला होता त्यातून ते बचावले गेले, पण या छोट्याशा अपघातामुळे त्यांनी स्वातीवर राग धरला असावा, तो अद्यापही न विसरले नसावेत असे वाटते कारण स्वातीपेक्षा गौरी ( पजकोर ) नदी ही चांगली असे पक्षपाताचे वर्णन ते करतात गौरीचे पाणी फार पाचक रोचक आहे, तसे स्वातीचे नाही अशी नाके ते आजही मुरडतात लहानपणी स्वातीने त्यांना चारदोन वेळा दगा दिला होता त्याचा राग त्यांच्या या पक्षपातामागे नसेल असे नाही “ उतमझाईच्या ‘ स्वाती ’ मध्ये गौरीही मिळालेली आहेच ” असे मी म्हणताच, “ स्वातीने गौरीचे गुण नष्ट केलेत संगमापूर्वीची गौरी ही फार गोड आहे ” अशी माहिती त्यांनी सांगितली

गावाशेजारीच असलेल्या डोहात गफार खूप पोहले-डुबले आहेत पुढे ते तरबेज तरणे झाले आणि बुडणाऱ्यांना वाचवण्यास धावण्याच्या त्यांच्या प्रवृत्तीमुळे एकदा ते स्वतःच सपशेल प्राणास मुकत होते ज्याला वाचवावयाचे त्याने त्यांच्या गळ्याला मिठी मारल्याने दोघेही सिंधूत मिळण्याच्या मार्गास लागले होते, पण लोकांनी कसेबसे उड्या घालून त्यांना काठावर आणले पोहण्याप्रमाणे घोड्यावर बसण्यातही ते लहानपणी प्रवीण झाले होते खेड्यातील श्रीमंत मुलांना स्वाभाविक लाभणारे हे वळण असे

गफारखान हे श्रीमंतांचे चिरंजीव असले तरी गावातील गोरगरीबांच्या मुलांना एकत्र बसण्या-उठण्यास किंवा खेळण्यास अडचण नसे. मुलगे-मुली एकत्र खेळत व त्यांत आपण खूप रमत असू असेही ते म्हणाले. १०–११ वर्षांचा, पुऱ्या उंचीचा, गोरापान, देखणा पण लहानपणापासूनच चेहऱ्यावर सौजन्याचे व सात्त्विकतेचे लेणे घेऊन आलेला हा खान त्यावेळी साऱ्या मुलांत कसा दिसत असेल याची कल्पना करता येईल.

गफारखानाचा दहा वर्षांपर्यंतचा काळ स्वातीच्या काठी स्वत:च्या शेतीवाडीवर व आईच्या मांडीवर खेळण्यात गेला. त्यातून त्यांना मिळालेले संस्कार हेच त्यांचे खरे संस्कार. आईवडिलांकडून अ-शब्द मात्राने जे संस्कार लाभले तेच त्यांचे शिक्षण होते. अन्यथा तेथे महत्त्वाचे असे शिक्षण होऊ शकले नाही. जुन्या परंपरेचे शिक्षण मौलवींकडून मशिदीत–दर्ग्यात दिले जाई; पण या धर्मशिक्षणाकडे पठाणांचा स्वाभाविकच ओढा कमी. वायव्य सीमाप्रान्त प्रथम ५० वर्षे पंजाबमध्ये होता. तेथे पठाणांबद्दल इंग्रजांना व पंजाब्यांना सहानुभूती नव्हती. त्यामुळे त्यांच्या शिक्षणाकडे कोणी कधी पाहिले नाही. परंतु मायेबद्दल कोणाला आस्था नाही. ज्या मुल्ला–मौलवींच्या हाती सारी सूत्रे त्यांना नवशिक्षणाची शिसारी.

सबक्दे मदसेनाई ।

पगंदे पैसेनाई ।

जघतके बे यजाप । नई दो झग के बाई घमेचाही ।

( जे शाळेत शिकण्यास जातात ते पैशासाठी. शाळेत जाणाऱ्यांना स्वर्गात जागा नाही, आणि नरकातही त्यांच्या वाट्याला कष्टाचेच जीवन येते. )

मुल्लांची अशा प्रकारची कडवी अधप्रवृत्ती. असे असले तरी खानांचे पिताजी नवशिक्षणाचे महत्त्व जाणणारे होते, ते मुल्लांच्या आधळेपणाची कदर ठेवीत नसत. पण गावात अन्य काही व्यवस्था नसल्यामुळे गफारना जुन्या दावणीतच काही काळ ठेवणे भाग होते. त्याप्रमाणे ते मुल्लाकडे जाऊन मशिदीत कुराणाचे पाठान्तर करीत. जुन्या वैदिक परंपरेतील वेदपठणाप्रमाणे मशिदीत कुराणाची आयते पाठ म्हणवून घेत. अरबी लिपी किंवा भाषा कोणाला विशेष येत नसे. तेव्हा एक चोकपट्टीपलीकडे अन्य शिक्षण काही नसेच.

गफारचा कुराणपठणाचा प्रारंभ फार लवकर म्हणजे पाचव्या-सहाव्या वर्षीच झाला. त्यांना शिकवणाऱ्या मुल्लालाच मुळी कुराण नीट येत नव्हते. उलट घरच्या संस्कारांमुळे गफारलाच ते अधिक पाठ होते. त्यामुळे गुरु शिष्यांचे झगडे होण्याचे प्रसंग निर्माण होत, आणि अडाणी गुरू भेटला म्हणजे शिष्याची व दंड्याची गाठभेट होण्याची पाळी येते. तसे थोडेसे झाले. मार-पीट करण्यापलीकडे त्या गुरुजीला काही करता येत नसे. त्यामुळेच गफारखानांनी स्वत:च स्वतंत्रपणे कुराणाचा अभ्यास पुरा केला त्या वेळी माता पित्यांना किती आनंद

झाला होता ते सांगताना गफारखानांच्या चेहऱ्यावरती त्या आनंदाच्या छटा उमटत होत्या कुराणअध्ययनसमाप्तीच्या निमित्ताने गावात सर्वत्र पेढे वाटण्यात आले त्या पेढ्यांबरोबरच त्यांच्या अध्ययनाचे श्रेय कुराण न येणाऱ्या मुलाने आपल्याकडेच घेतले असणार हे उघड आहे

सर्वसामान्यतया पठाणांचा कल व्यावहारिक शिक्षणाकडेच असतो ते अधिक व्यवहारी असतात, पण त्यांच्यावर अंधश्रद्धेचे शिक्षण लादले जाते परिणामत पठाणांनी असले धर्मशिक्षण मनापासून कधी स्वीकारले नाही व इतर नवशिक्षण त्यांना मिळाले नाही, यामुळे या तेजस्वी जमातींचे फार नुकसान झाले त्यांच्यातील अंतर्गत दुही ही त्यांच्या धर्मगुरूंनी वाढविली कर्तृत्वाला वाव न मिळाल्यामुळे एकमेकांच्या कत्तली करणे येवढेच काम शिल्लक राहिले मुल्लांचा विरोध व राज्यकर्त्यांचे सहेतुक औदासीन्य, त्याचप्रमाणे विशिष्ट जातींनी शिक्षण घेण्याच्या शेजारच्या हिंदू परंपरेमुळेही पठाण शिक्षणाला मुकले असतील असेही उद्गार गफारखानांनी काढले इस्लामच्या आगमनापूर्वी पठाण बुद्ध व त्यापूर्वी आर्य होते या पूर्वपरंपरेत विशिष्ट वर्गांकडे शिकण्याची मक्तेदारी होती त्याही परंपरेची बाधा पठाणांना झालेली असावी असे ते म्हणाले

मुल्ला-मौलवींची जनाणी पठाणांवर किती जबर पकड असते याचा अनुभव आजही पाकिस्तानमधील जमातींमध्ये येतो. जमाती-जमातींमधील भांडणे हे मुल्ला निर्माण करतात अफगाणिस्तानमधील अनेक राज्यक्रान्त्या व अनेक राज्यकर्त्यांच्या हत्या या धर्मगुरूंच्या प्रेरणेने झालेल्या आहेत अमानुल्लासारख्या पराक्रमी व पुरोगामी अमीराचा काटा काढण्या साठी इंग्रजांनी हीच धर्मशक्ती वापरली होती अशा या धर्मसत्तेच्या पकडीतून सुटणे कठीण असते पण स्वत धर्मनिष्ठ व सदाचारसंपन्न असणारे लोक असल्या परंपरागत धर्म-मार्तंडांना धाब्यावर बसवू शकतात त्याप्रमाणे बहिरामखानांनी केले त्यांच्या विरुद्ध मुल्लांनी चुळबूळ केली, पण त्यांना प्रत्यक्ष विरोध करण्याचे सामर्थ्य कुराणाशीही नीट परिचय नसलेल्यांच्या मध्ये कसे असणार ? बहिरामखानांचे ज्येष्ठ चिरंजीव हे पेशावरच्या मिशनस्कूलमध्ये पूर्वीच दाखल झालेले होते हस्तनगर* विभागातून शहरी शिक्षणासाठी बाहेर जाणारे खान-साहेब हे पहिले विद्यार्थी होते पेशावरच्या या मिशनस्कूलचे मुख्याध्यापक कॅनान विग्रॅम नावाचे धर्मोपदेशक होते त्यांच्या चारित्र्याचा लौकिक मोठ्या चिरंजीवांच्याकडून बहिराम खानांनी ऐकलेला होता त्यामुळे धाकट्या चिरंजीवांची रवानगीही पेशावरलाच केली गफ्फ

* हस्तनगर हा अष्टनगर शब्दाचा अपभ्रंश आहे उतमझाई, उमरझाई, परांग, बात्रग, चारसद्दा वगैरे आठ वाड्या हे पुराणकालातील अष्टनगर असावे त्यातील चारसद्दा ही नगरी पुष्कलावती या नावाने प्राचीन काळात राजधानी होती

गफारखान हे श्रीमंताचे चिरंजीव असले तरी गावातील गोरगरीबांच्या मुलांना एकत्र समरस उठण्यास किंवा खेळण्यास अडचण नसे मुलगे मुली एकत्र खेळत व त्यांत आपण खूप रमत असू असेही ते म्हणाले १०-११ वर्षांचा, पुन्या उंचीचा, गोरापान, देखणा पण ल्हानपणापासूनच चेहऱ्यावर सोजन्याचे व सात्विकतेचे लेणे घेऊन आलेला हा खान त्यावेळी साऱ्या मुलांत कसा दिसत असेल याची कल्पना करता येईल

गफारखानाचा दहा वर्षांपर्यंतचा काळ स्वातीच्या काठी स्वतःच्या शेतीवाडीवर व आईच्या मांडीवर खेळण्यात गेला त्यातून त्यांना मिळालेले संस्कार हेच त्यांचे खरे संस्कार आईवडिलांकडून अ-शब्द मात्राने जे संस्कार लाभले तेच त्यांचे शिक्षण होते अन्यथा तेथे महत्त्वाचे असे शिक्षण होऊ शकले नाही जुन्या परंपरेचे शिक्षण मौलवींकडून मशिदीत-दर्ग्यात दिले जाई, पण या धर्मशिक्षणाकडे पठाणांचा स्वाभाविकच ओढा कमी वायव्य सीमाप्रान्त प्रथम ५० वर्षे पंजाबमध्ये होता तेथे पठाणांबद्दल इंग्रजांना व पंजाब्यांना सहानुभूता नव्हती त्यामुळे त्यांच्या शिक्षणाकडे कोणी कधी पाहिले नाही परन्तु भाषेबद्दल कोणाला आस्था नाही त्या मुल्ला-मोलवींच्या हाती सारी सूत्रे त्यांना नवशिक्षणाची शिसारी

सबक़दे मद्रमेराई ।

पादे पसेवाई ।

जन्नतके बे यजाय । नई दो झग़ के बाई घसेवादी ।

( जे शाळेत शिकण्यास जातात ते पशासाठी शाळेत जाणाऱ्यांना स्वर्गात जागा नाही, आणि नरकातही त्यांच्या वाट्याला कदाचिच जीवन येते )

मुल्लांची अशा प्रकारची वाईट अवप्रवृत्ती असे असले तरी खानांचे पिताजी नव शिक्षणाचे महत्त्व जाणणारे होते, ते मुल्लांच्या आंधळेपणाची कदर ठेवीत नसत पण गावात अन्य काही व्यवस्था नसल्यामुळे गफारना जुन्या दावणीतच काही काळ ठेवणे भाग होते त्याप्रमाणे ते मुल्लाकडे जाऊन मशिदीत कुराणाचे पाठान्तर करीत जुन्या वदिक परंपरेतील वदपठणाप्रमाणे मशिदीत कुराणाची आयते पाठ म्हणून घेत अरबी लिपी किंवा भाषा कोणाला विशेष येत नसे तेव्हा एक घोकंपट्टीपलीकडे अन्य शिक्षण काही नसेच

गफारचा कुराणपठणाचा प्रारंभ फार लवकर म्हणजे पाचव्या-सहाव्या वर्षीच झाला त्यांना शिकवणाऱ्या मुल्लालाच मुळी कुराण नीट येत नव्हते उलट घरच्या संस्कारांमुळे गफारलाच ते अधिक पाठ होते त्यामुळे गुरु-शिष्यांचे झगडे होण्याचे प्रसंग निर्माण होत आणि अडाणी गुरू भेटला म्हणजे शिष्याची व दप्तराची गाठभेट होण्याची पाळी येते तसे थोडेसे झाले मार-पीट करण्यापलीकडे त्या गुरुजीला काही करता येत नसे त्यामुळेच गफार खानांनी स्वतःच स्वतन्त्रपणे कुराणाचा अभ्यास पुरा केला त्या वेळी माता पित्यांना किती आनंद

भाग होता ते सांगताना गफारखानांच्या चेहऱ्यावरील त्या आनंदाच्या छटा उमगत होत्या कुराणअध्ययनसमाप्तीच्या निमित्ताने गावात सर्वत्र पेढे वाटण्यात आले त्या पेढ्यांबरोबरच त्यांच्या अध्ययनाचे श्रेय कुराण न येणाऱ्या मुल्लाने आपल्याकडेच घेतले असणार हे उघड आहे

सर्वसामान्यतया पठाणांचा कल व्यावहारिक शिक्षणाकडेच असतो ते अधिक व्यवहारी असतात, पण त्यांच्यावर अंधश्रद्धेचे शिक्षण लादले जाते परिणामत पठाणांनी असले धर्मशिक्षण मनापासून कधी स्वीकारले नाही व इतर नवशिक्षण त्यांना मिळाले नाही, यामुळे या तेजस्वी जमातीचे फार नुकसान झाले त्यांच्यातील अंतर्गत दुही ही त्यांच्या धर्मगुरूंनी वाढविली कर्तृत्वाला वाव न मिळाल्यामुळे एकमेकांच्या कत्तली करणे येवढेच काम शिल्लक राहिले मुल्लांचा विरोध व राज्यकर्त्यांचे सहेतुक औदासीन्य, त्याचप्रमाणे विशिष्ट जातींनी शिक्षण घेण्याच्या शेजारच्या हिंदू परंपरेमुळेही पठाण शिक्षणाला मुकले असावेत असेही उद्गार गफारखानांनी काढले इस्लामच्या आगमनापूर्वी पठाण बुद्ध व त्यापूर्वी आर्य होते या पूर्वपरंपरेत विशिष्ट वर्गाकडे शिकण्याची मक्तेदारी होती त्याही परंपरेची बाधा पठाणांना झालेली असावी असे ते म्हणाले

मुल्ला-मौलवींची जरब पठाणांवर किती जबर पक्कड असते याचा अनुभव आजही यागिस्तानमधील जमातींमध्ये येतो. जमाती-जमातींमधील भांडणे हे मुल्ला निर्माण करतात अफगाणिस्तानमधील अनेक राज्यकर्त्यांच्या व अनेक राज्यकर्त्यांच्या हत्या या धर्मगुरूंच्या प्रेरणेने झालेल्या आहेत अमानुल्लासारख्या पराक्रमी व पुरोगामी अमीराचा काटा काढण्यासाठी इंग्रजांनी हीच धर्मशक्ती वापरली होती अशा या धर्मसत्तेच्या पकडीतून सुटणे कठीण असते पण स्वत धर्मनिष्ठ व सदाचारसंपन्न असणारे लोक असल्या परंपरागत धर्म-मार्तंडांना धाब्यावर बसवू शकतात त्याप्रमाणे बहिरामखानांनी केले त्याच्या विरुद्ध मुल्लांनी चुळबूळ केली, पण त्यांना प्रत्यक्ष विरोध करण्याचे सामर्थ्य कुराणाशीही नीट परिचय नसलेल्याच्या मध्ये कसे असणार ? बहिरामखानांचे ज्येष्ठ चिरंजीव हे पेशावरच्या मिशनस्कूलमध्ये पूर्वीच दाखल झालेले होते हस्तनगर* विभागातून शहरी शिक्षणासाठी बाहेर जाणारे खान साहेब हे पहिले विद्यार्थी होते पेशावरच्या या मिशनस्कूलचे मुख्याध्यापक कॅनान विग्रम नावाचे धर्मोपदेशक होते त्यांच्या चारित्र्याचा तात्विक मोठ्या चिरंजीवाच्याकडून बहिराम खानांनी ऐकलेला होता त्यामुळे धाकट्या चिरंजीवांचा रवानगीही पेशावरलाच केली गली

---

* हस्तनगर हा अष्टनगर शब्दाचा अपभ्रंश आहे उतमझाई, उमरझाई, प्रांग, चारंग, चारसद्दा वगैरे आठ वाड्या हे पुराणकालातील अष्टनगर असावे त्यातील चारसद्दा ही नगरी पुष्कलावती या नावाने पाणिनी काळात राजधानी होती

१९०१-२ च्या सुमारास गफार पेशावरला गेले त्यांच्या स्वत च्या बोलण्यात वयाच्या आठव्या वर्षी आपण पेशावरला गेलो असे आले

बादशहाखानांचे भव्य चारित्र्य हे बऱ्याच अंशाने फादर विग्रम यांच्या थोर सत्संगाचे ऋण आहे असे स्वत बादशहाखान मानतात मिशनऱ्यांच्या शिक्षणप्रसाराचे व सेवा-भावाचे ऋण त्यांच्या शब्दाशब्दांतून अद्यापही व्यक्त होत असते आपल्याला शिक्षणाकडे व समाजसेवेकडे वळण्याची बुद्धी विग्रम गुरुजींमुळे झाली असे ते मोठ्या कृतज्ञ-भावनेने सांगतात अनेक जाहीर व्याख्यानांतून त्यांनी ख्रिश्चन गुरूंचे हे ऋण सांगितलेले आहे इस्लामी धर्मशिक्षणातून असे सेवेचे शिक्षण कधी मिळालेले नाही, किंवा त्यातून कधी समाजसेवकही निर्माण झालेले नाहीत असेही ते म्हणतात पेशावरच्या एडवर्ड्स् कॉलेजच्या प्रांगणातील एक वेगळा बंगला खानबंधूंसाठी दिला गेला होता तेथे वडील बंधू खानसाहेब राहात होते गफार तेथे गेले ते स्वत चा थोडा लवाजमा घेऊन गेले चरानी चचा हा त्यांचा आवडता नोकर त्यांच्याबरोबर होता त्या दोघांना एकमेकांच्याशिवाय करमत नसे चरानी चाचाला आपल्या छोट्या खानाबद्दल नितान्त प्रेम वाटे आपले छोटे खान हे कोणी तरी महान पुरुष आहेत, ‘ते मोठे अमलदार होणार आहेत, लष्करी कपडे घातल्यावर ते कसे दिसतील, कसे डौलाने चालतील, काय त्यांची मिजास वाटेल’ अशी स्वप्ने चरानी चाचा गफारच्या लहानपणापासून पहात असे पेशावरमधल्या [illegible] मोठे बंधू असले तरी चरानी चाचा हा गफारला अधिक जिव्हाळ्याचा होता आणि चरानी यांची तशी सारी देखभाल आईच्या प्रमाणे करीत असे

पेशावरमधील त्यांच्या शिक्षणाचा आरंभ म्युनिसिपल बोर्ड स्कूलमध्ये झाला तेथील शिक्षण संपताच मिशन हायस्कूलमध्ये त्यांना प्रवेश मिळाला त्यांचे शिक्षण कोठेही झाले तरी त्यांच्यावर मुख्य देखरेख विग्रमसाहेबांची असे

पेशावर येथील शिक्षणकाळात ते सामुदायिक खेळांत विशेष रस घेत नसत, असे उल्लेख चरित्रलेखकांनी केले आहेत गफारच्या स्वभावात जो स्वाभाविक मर्यादशीलपणा किंवा थोडासा अबोलपणा आहे तो या काळात निर्माण झाला असेल प्रेमळ आईबापांपासून दूर गेलेली हळव्या मनाची मुले केव्हा केव्हा कायमच कोमेजल्यासारखी होतात गफारखान कोमल मनाचे व थोडे अबोल वृत्तीचे असे आहेत १६-१७ मध्ये वडील बंधू खानसाहेब पुढील शिक्षणासाठी मुंबईस गेल्यानंतर त्यांचा हा एकाकीपणा अधिकच वाढला

वयाच्या १६-१७ च्या सुमारास गफारखानांनी वरिष्ठ सैनिकी शिक्षणात दाखल होण्यासाठी प्रयत्न केला चरानी चाचासारख्या त्यांच्या घरच्या नोकरचाकरांनी त्यांच्या मनात हे आकर्षण निर्माण केले होते सैन्यात शिरून लेफ्टनंट अधिकारी होण्याचा

लोकांच्या एतबाज पोषाखाकडे व त्यांच्या कवायतीकडे बोट दाखवून आपल्या गणारक्षानांनी तसेच बनावे असे त्यांना वाटे. शेवटी कमिशन मिळण्यासाठी अर्जही केला. त्यांच्या खानदानी कपोमुळे त्यांना प्रवेश मिळणेही सुलभ झाले. वरिष्ठांनी त्यांची निवड केली; परंतु विधिघटना वेगळी होती. आपल्याच जमातीवर गोळ्या घालण्यात तरबेज होण्याऐवजी गोळ्या घालणाऱ्या लोकांच्यापुढे उघडी छाती करून उभे राहण्याचे धैर्य देणाऱ्या अहिंसायुद्धाचे सेनानी बनण्याचे त्यांच्या ललाटी लिहिलेले होते. पेशावर येथेच सैनादलात नोकरी करणाऱ्या गोरा शिपायाच्या मेजीवर ते गेले असता त्या नोकराविषयी कनिष्ठ पण गोरा अधिकारी त्या शिपायाची अवहेलना करीत असल्याचे गफारने पाहिले. त्या गोऱ्या नोकराचे उर्मटपणाचे वर्तन पाहून सैनेतील नोकरी म्हणजे काय याचा कयास त्यांनी बांधला आणि त्याच दिवशी स्वाभिमानास धक्का देणारी अशली नोकरी स्वीकारायची नाही असे त्यांनी ठरविले.

गफारखान मॅट्रिकचा अभ्यास करीत असताच पेशावर सोडून एकदम कॅबेलपूरला जाण्याचे त्यांनी ठरविले. कॅबेलपूरचे वातावरण अधिक शान्त व अभ्यासाला सोयीचे असे समजून ते तिकडे गेले होते. मॅट्रिकच्या परीक्षेला त्यांना बसायचे होते. याच वेळी शालेय विषया-व्यतिरिक्त अरबी भाषा वगैरेंच्या अभ्यासाकडेही त्यांचे लक्ष लागले होते; पण कॅबेलपूरलाही ते लौकरच कंटाळले. तेथे त्यांना उन्हाळ्याचा त्रासही बराच झाला व ते आजारी पडले. त्यांच्या शरीराप्रमाणेच विचारशक्तीची वाढ या काळात झपाट्याने होत चाललेली असणार ! मुख्यतः बंधूंच्या प्रयाणानंतर त्यांचे मानसिक अस्वास्थ्य वाढले असावे. मानसिक व वैचारिक अस्वस्थतेचा हा त्यांचा काळ होता.

अरबीच्या अध्ययनासाठी कादियनचे मौलवी नुरुद्दीनसाहेब यांची त्या वेळी विशेष ख्याती होती. त्यामुळे गफारने आपल्या प्रान्ताबाहेर कादियनला जाण्याचे ठरविले. एका मित्राला बरोबर घेऊन ते कादियनला पोचलेही; परंतु तेथेही त्यांचे मानसिक अस्वास्थ्य आड आले. त्यांना काही आंतरिक मार्गदर्शन होत असावे असाही त्याचा अर्थ होऊ शकेल. कादियनला पोचल्यावर व तेथील पाठशाळेत परवानगी वगैरे मिळण्यापूर्वी एका रात्री त्यांना स्वप्न पडले. 'चालता चालता एका विहिरीच्या काठाजवळ आपण पोचलो, आणि विहिरीत पडणार इतक्यात एका वृद्ध गृहस्थाने रोखले व धोक्याचा इशारा दिला.' असे ते स्वप्न होते. जागे होताच त्यांनी स्वप्नाचा अर्थ लावला व तडक ते कादियनहून बाहेर पडले. मौलवी नुरुद्दीन यांचे शिष्यत्व किंवा त्यांचेद्वारे अरबी भाषेचे अध्ययन हेही त्यांना मिळावयाचे नव्हते. अरबीच्या पुढील अभ्यासाची त्यांची शाळा बंदीशाळेतच ठरलेली होती.

कॅबेलपूर-कादियनहून ते बाहेर पडले ते का व कोणत्या हेतूने याचा नीट उलगडा होत नाही. त्यांना मिळणाऱ्या शिक्षणावर ते संतुष्ट नव्हते हे उघड आहे. त्यांचा स्वाभिमान पूर्ण

१९०१–२ च्या सुमारास गफार पेशावरला गेले. त्यांच्या स्वतःच्या बोलण्यात वयाच्या आठव्या वर्षी आपण पेशावरला गेलो असे आलें.

बादशहाखानांचे भव्य चारित्र्य हे बऱ्याच अंशाने फादर विग्रम यांच्या थोर संस्काराचे ऋण आहे असे स्वतः बादशहाखान मानतात. मिशनऱ्यांच्या शिक्षणप्रसाराचे व सेवाभावाचे ऋण त्यांच्या शब्दाशब्दातून अद्यापही व्यक्त होत असते. आपल्याला शिक्षणकार्याकडे व समाजसेवेकडे वळण्याची बुद्धी विग्रम गुरुजींमुळे झाली असे ते मोठ्या कृतज्ञभावनेने सांगतात. अनेक जाहीर व्याख्यानांतून त्यांनी ख्रिश्चन गुरूंचे हे ऋण सांगितलेले आहे. इस्लामी धर्मशिक्षणातून असे सेवेचे शिक्षण कधी मिळालेले नाही, किंवा त्यातून कधी समाजसेवकही निर्माण झालेले नाहीत असेही ते म्हणतात. पेशावरच्या एडवर्ड्स् कॉलेजच्या प्रांगणातील एक छोटासा बंगला खानबंधूंच्यासाठी दिला गेला होता. तेथे वडील बंधू खानसाहेब राहात होते. गफार तेथे गेले ते स्वतःचा थोडा लवाजमा घेऊन गेले. बरानी चचा हा त्यांचा आवडता नोकर त्यांच्याबरोबर होता. त्या दोघांना एकमेकांच्यावाचून करमत नसे. बरानी काकाला आपल्या छोट्या खानाबद्दल नितान्त प्रेम वाटे. आपले छोटे खान हे कोणी तरी महान पुरुष आहेत; 'ते मोठे अमलदार होणार आहेत; लष्करी कपडे घातल्यावर ते कसे दिसतील; कसे डौलाने चालतील; काय त्यांची मिजास वाढेल' अशी स्वप्नं बरानी काका गफारच्या लहानपणापासून पहात असे. पेशावरसारख्या परक्या शहरात मोठे बंधू असले तरी बरानी काका हा गफारला अधिक जिव्हाळ्याचा होता आणि बरानी यांची तशी सारी देखभाल आईच्या प्रेमाने करीत असे.

पेशावरमधील त्यांच्या शिक्षणाचा आरंभ म्युनिसिपल बोर्ड स्कूलमध्ये झाला. तेथील शिक्षण संपताच मिशन हायस्कूलमध्ये त्यांना प्रवेश मिळाला. त्यांचे शिक्षण कोठेही झाले तरी त्यांच्यावर मुख्य देखरेख विग्रमसाहेबांची असे.

पेशावर येथील शिक्षणकाळात ते सामुदायिक खेळात विशेष रस घेत नसत, असे उल्लेख काही लेखकांनी केले आहेत. गफारच्या स्वभावात जो स्वाभाविक मर्यादशीलपणा किंवा थोडासा अबोलपणा आहे तो या काळात निर्माण झाला असेल. प्रेमळ आईवापापासून दूर गेलेली हळव्या मनाची मुले केव्हा केव्हा कायमच कोमेजल्यासारखी होतात. गफारखान कोमल मनाचे व थोडे अबोल वृत्तीचे असे आहेत. १६-१७ मध्ये वडील बंधू खानसाहेब पुढील शिक्षणासाठी मुंबईस गेल्यानंतर त्यांचा हा एकाकीपणा अधिकच वाढला.

वयाच्या १६-१७ च्या सुमारास गफारखानांनी वरिष्ठ सैनिकी शिक्षणात प्रवेश मिळवण्यासाठी प्रयत्न केला. बरानी चचासारख्या त्यांच्या घरच्या नोकरचाकरांनी त्यांच्या मनात हे आकर्षण निर्माण केले होते. सैन्यात शिरून मोठमोठे अधिकारी झालेल्या

लोकांच्या एव्हाज पेशावरकडे व त्यांच्या वकालतीकडे बोट दाखवून आपल्या गफारखानांनी तसेच बनावे असे त्यांना वाटे शेवटी कमिशन मिळण्यासाठी अर्जही केला त्यांच्या खानदानी परंपरेमुळे त्यांना प्रवेश मिळणेही सुलभ झाले वरिष्ठांनी त्यांची निवड केली, परंतु विधिघटना वेगळी होती आपल्याच जमातीवर गोळ्या घालण्यात तरबेज होण्याऐवजी गोळ्या घालणाऱ्या लोकांच्यापुढे उघडी छाती करून उभे राहण्याचे धैर्य देणाऱ्या अहिंसायुद्धाचे सेनानी बनण्याचे त्यांच्या कपाळी लिहिलेले होते पेशावर येथेच सेनादलात नोकरी करणाऱ्या कोणा मित्राच्या मेसमध्ये ते गेले असता त्या नोकरीत कनिष्ठ पण गोरा अधिकारी त्या मित्राची अवहेलना करीत असल्याचे गफारने पाहिले. त्या गोऱ्या नोकराचे उर्मटपणाचे वर्तन पाहून सेनेतील नोकरी म्हणजे काय याचा कयास त्यांनी बांधला आणि त्याच दिवशी स्वाभिमानास धक्का देणारी असली नोकरी करावयाची नाही असे त्यांनी ठरविले

गफारखान मॅट्रिकचा अभ्यास करीत असताच पेशावर सोडून एकदम कॅम्बेलपूरला जाण्याचे त्यांनी ठरविले कॅम्बेलपूरचे वातावरण अधिक शान्त व अभ्यासाला सोयीचे असे समजून ते तिकडे गेले होते मॅट्रिकच्या परीक्षेला त्यांना बसायचे होते याच वेळी शालेय विषया व्यतिरिक्त अरबी भाषा वगैरेंच्या अभ्यासाकडेही त्यांचे लक्ष लागले होते, पण कॅम्बेलपूरलाही ते लौकरच कंटाळले तेथे त्यांना उन्हाळ्याचा त्रासही बराच झाला व ते आजारी पडले त्यांच्या शरीराप्रमाणेच विचारशक्तीची वाढ या काळात झपाट्याने होत चाललेली असणार ! मुख्यत बहुधा प्रयाणानंतर त्यांचे मानसिक अस्वास्थ्य वाढले असावे मानसिक व बौद्धिक अस्वस्थतेचा हा त्यांचा काळ होता

अरबीच्या अध्ययनासाठी कादियनचे मौलवी नुरुद्दीनसाहेब यांची त्या वेळी विशेष ख्याती होती त्यामुळे गफारने आपल्या मनाप्रमाणे कादियनला जाण्याचे ठरविले एका मित्राला बरोबर घेऊन ते कादियनला पोचलेही परंतु तेथेही त्यांचे मानसिक अस्वास्थ्य आड आले त्यांना काही आंतरिक मार्गदर्शन होत असावे असाही त्याचा अर्थ होऊ शकेल कादियनला पोचल्यावर व तेथील पाठशाळेत परवानगी वगैरे मिळण्यापूर्वी एका रात्री त्यांना स्वप्न पडले 'चालता चालता एका विहिरीच्या काठाजवळ आपण पोचलो, आणि विहिरीत पडणार इतक्यात एका वृद्ध गृहस्थाने रोखले व धोक्याचा इशारा दिला ' असे ते स्वप्न होते जागे होताच त्यांनी स्वप्नाचा अर्थ लावला व तडक ते कादियनहून बाहेर पडले मौलवी नुरुद्दीन यांचे शिष्यत्व किंवा त्यांचेद्वारे अरबी भाषेचे अध्ययन हेही त्यांना मिळावयाचे नव्हते अरबीच्या पुढील अभ्यासाची त्यांची शाळा कदाचित् टळलेली होती

कॅम्बेलपूर–कादियनहून ते बाहेर पडले ते का व कोणत्या हेतूने याचा नीट उलगडा होत नाही त्यांना मिळणाऱ्या शिक्षणावर ते संतुष्ट नव्हते हे उघड आहे त्यांचा स्वाभिमान पूर्ण

आघात झाला होता हेही हाती आलेली आकर्षक नोकरी त्यांनी टाकून दिली यावरून स्पष्ट होते. या वेळी त्यांचे वय १७–१८ वर्षांचे असावे. राजकीय विचारांचे वारे त्यांना स्पर्श करू लागले होते. अशा स्थितीत ते अलिगडला आले. त्या वेळी अलिगडचे छात्रालय भरलेले होते. त्यामुळे गफार खानावळीत राहू लागले. तेथेही अभ्यासापेक्षा वृत्तपत्रांच्या वाचनाचा नाद त्यांना लागला. मौ. जफरअलीखान यांच्या 'जमींदार' पत्राचा प्रभाव त्या वेळी तरुण मुसलमान विद्यार्थ्यांवर विलक्षण पडलेला होता. १९०० ते १९०८ या काळात महाराष्ट्रात 'केसरी, काळ, भाला, राष्ट्रमत, हिंदु पंच' या पत्रांनी जे लोकजागृतीचे काम केले तेच कार्य 'जमींदार', 'अल् हिलाल', 'हमदर्द' या पत्रांनी १९०६ ते १९१४ या काळात उत्तरेकडील मुस्लिम समाजात जागृती करण्याच्या क्षेत्रात केले. अलिगडचे त्या वेळचे विद्यार्थी मोठ्या विचारक्षोभात सापडलेले होते! गफारसारख्या संवेदनाशील मनाच्या विद्यार्थ्यांच्या मनाची स्थिती त्या काळात काय झाली असेल याची कल्पना करणे कठीण नाही, पण अलिगड येथेही त्यांना फार काळ टिकू देण्याची भवितव्यतेची इच्छा नव्हती. गफार एखाद्या तृषार्त पक्ष्याप्रमाणे विद्यार्जनासाठी या गावापासून त्या गावाकडे, या गुरूकडून त्या गुरूकडे धाव घेत, तर त्यांचे दैव त्यांना दुसरीकडे खेचून नेत होते. त्यांना जे शिक्षण—ज्ञान पाहिजे होते ते त्या त्या शाळेतून मिळत नव्हते. त्यामुळेही त्यांचे मन अस्थिर, अस्वस्थ होत राहिले असावे. या ओढाताणीला 'विधिघटना' याशिवाय काय नाव देता येईल? अलिगड येथेही दीड वर्ष पुरे होण्यापूर्वीच पिताजींची त्यांना तार आली. त्यांच्या मनात वडील चिरंजीव इंग्लंडमध्ये आहेत तोवरच धाकट्या भाईंनाही तिकडे पाठवून द्यावे असे आले. पण त्यांच्या योजनेच्या बाबतीत, 'पिताजींच्या मनात आले पण माताजींच्या मनात' तसे नव्हते व घडले भलतेच! 'गफारखानांनी लष्करी नोकरी नाकारली हे योग्यच झाले' असे लिहून वडील बंधूंनी गफारला लंडनला बोलावले. त्याप्रमाणे बहिरामखानांनी गफारला अलिगडहून परत बोलाविले होते.

वडिलांच्या आदेशाप्रमाणे गफारने अलिगडला रामराम ठोकला व ते उतमंझाईला पोचले. मुलाला परदेशी पाठवावे—नाही—या चर्चेत कुटुंबीयांचा पुन्हा थोडा काळ गेला. मातोश्रींच्या तीव्र भावनांचा विरोध थोडा झालाच. पण बहिरामखानांच्या निर्धारापुढे मातोश्रींचे काही चालण्यासारखे नव्हते. उलट या प्रेमळ आईच्या आसवांच्या पुराने समुद्राचा रस्ता अडविला आणि स्वतः गफारचे [illegible] काही वेळी 'दश मन्यान् चिंतयेत्' या उक्तीची प्रचीती आली. गफारने वास्तुशास्त्राचा अभ्यास करावा असा विचार बहिरामखानांनी व्यक्त केला होता. त्या दृष्टीने तरुण गफारच्या परदेशगमनाची सर्व तयारी झाली, पी. ॲण्ड ओ. कंपनीच्या जहाजाचे तिकिट काढले गेले होते. निघण्याच्या

वत्स चिरंजीव नमस्कार करून आईचे आशीर्वाद घेण्यासाठी तिच्यापुढे उभे राहिले तसा स्वाभाविकच तिच्या अश्रूंचा बांध फुटला "एवढा भाऊ तिकडे जाऊन इथ्थं (तिथं) शिकत राहिला आहेस! तूही इतक्या दूर गेल्यावर मला येथे कोण? तिकडे गेल्यास मुले परत येत नाहीत" असे सवाल करून आई हुदके देऊ लागली आणि आईची ही व्यथा पाहून गफार पेचात पडले "आपल्या देशातील अज्ञान घालविले पाहिजे, इसनी अन्यायाला तोंड देण्यासाठी शहाणे झाले पाहिजे' वगैरे त्यांनी सांगून पाहिले, पण स्वत त्यांनाच आईचे दु ख पाहवले नाही त्यांच्यातील थोर मातृप्रेम जागृत झाले त्यांनाच परदेशाला जाण्याचा निर्णय रद्द केला ते त्यांचे इंग्लंडदर्शन पचावन्न वर्षांनंतर म्हणजे १९६४ मध्ये स्वधर्मीयांच्या छळाने रोगजर्जर झाल्यावर औषधोपचारासाठ म्हणून घडावयाचे होते! आईचे प्रेम सर्वांनाच असते, पण त्यापेक्षा शिक्षणासाठी परदेशात जाण्याचे प्रेम अधिक प्रभावी ठरते आईच्या व्यथित मन स्थितीचे चित्र पाहून आपल्या सारा भविष्य काल बदलून टाकण्यास तात्काळ तयार होणारे विद्यार्थी फार क्वचितच आढळतील मध्य चारित्र्य घडविणारी ही तेजस्वी बीजे असतात कोमल मनोवृत्तीचे तरुण गफारखान मिशन गुरुजींच्या शाळेतून बाहेर पडल्यापासून अशा रीतीने पॅवेल्यूर ट्रादिन अलिगडमार्गे उतनझाईच्या स्वाती नदीच्या काठाला पुन्हा लागले तर्थील रम्य टेकड्यांशी व हत्तापाण्याशीच घरी काल खेळत राहण्याचा योग होता, आणि खरेखर पण शाळेच्या शिक्षणातून मनाचा विकास कितीसा होऊ शकतो? डोंगर-पठारवरून मुक्तपणाने वाहणारे ओढे आणि नद्या, यांत रममाण होणारे पशुपक्षी, समृद्ध गोधनाचे कळप निर्मळ मनाची मळ्यातून चालणारी ग्रामीण जनता आणि कुटुंबजीवनातून लाभणारे वात्सल्य यांमधून केवळ संस्कारच लाभतात असे नाही, तर त्यांतून सयमी, स्नेहशील, त्यागी असे जीवन साकार होऊ शकते याचे गफारखान हे ठसठशीत उदाहरण आहे इंग्लंडचा प्रवास रद्द होण्याचे तात्कालिक कारण जरी आईची व्यथा झाली असली तरी त्या सुमारास घरात एक-दोन मृत्यू घडले व त्याचा परिणाम सर्वांच्याच मनावर झालेला होता हेही कारण असेल परंतु परिणामत विशीच्या सीमेवर पोचलेले तरुण गफार स्वत च्या शिक्षणाच्या सा या वाटा बंद पडल्याने आपल्या घराकडे येऊन पडले पण त्यांचे चित्त केवळ आई च्या प्रेमात रमिणा गाईच्या दुधाने न्हाऊन राहण्याइतके लहान राहिले नव्हते

स्वत चे शिक्षण अशा रीतीने अर्धवट अवस्थेत सोडावे लागले असले तरी या दोन तीन वर्षांच्या काळात बादशाहखानांना नवशिक्षणाचे महत्त्व उमगले होते वडिलांची शिक्षणविषयक आस्था व मिशनसमाईवांची लोकांना शिक्षण व धर्मसंस्कार देण्याची तळमळ यांचा प्रभाव त्यांच्या मनावर पडला होता आपल्या सभोवारची ग्रामीण जनता कोणत्या

पठाण अज्ञानात आहे व त्याचे परिणाम किती भीषण होतात हे ते नित्य पाहात होते केवळ परदेशगमनालाच नव्हे तर एकूण सर्वच अर्वाचीन शिक्षणाला मोलवींचा विरोध होता त्यामुळे सरकारी शाळा निघाल्या तरी तिकडे मुले पाठवण्याला ते विरोध करीत आणि मशिदीत मिळणाऱ्या तोकड्या धर्मसंस्कारान लोकांचे–विशेषत पठाणांचे–समाधान होत नसे त्याचा पोट भरण्यास मदत करणाऱ्या व्यवहारी शिक्षणाकडे ओढा असतो, आणि अगदी त्याच बाबीला त्याच्या धर्मगुरूंचा विरोध असे. जुन्या पद्धतीच्या धार्मिक शिक्षणाने आजच्या जगाचे व आपल्या समाज स्थितीचे काही ज्ञान होत नाही, व त्यामुळे निरनिराळ्या पठाण जमातांमध्ये पिढ्यानू पिढ्या भांडणे, लढाया चालू आहेत, त्यामुळे आपला समाज रसातळाला गेला आहे याची तीव्र जाणीव गफारखानांना या वेळी झालेली होती मिशनऱ्यांसारखे पाद्री आपल्या घरचे खाऊन हजारो मैल येऊन लोकांना ज्ञान देतात, त्यामुळे आपल्यास केवळ शहाणपणाच नव्हे तर माणुसकीची कल्पना आली आणि ही जाणीव आपण आपल्या समाजापर्यंत पोचवली पाहिजे हा निर्णय बादशहाखानांनी इंग्लंडला जाण्याचे रहित होताच घतला

# ३

# ग्रामीण शिक्षणाचे संवर्धक

बादशाहखानांनी शाळा काढण्याचे ठरविले ते या समाजसेवेच्या दृष्टीने. सुदैवाने त्यांना शिक्षकांचा संचही चांगला मिळाला. वायव्य सरहद्द प्रांत हा पूर्वीपासून जिहादी मुसलमान परंपरेचे एक केन्द्र झालेला होता. शहीद सय्यद अहमद यांचा शेवट बालाकोटच्या निकराच्या लढाईत झाला (१८३०). त्या वेळेपासून तो शेख महमूद हसन (शेख उल् हिंद) यांनी १९१४ मध्ये केलेल्या सशस्त्र प्रतिकाराच्या लढ्यापर्यंत ही परंपरा अखंडपणे सितना, नखीर-गजदार आदी ठिकाणी चालू राहिली होती. त्या परंपरेचे भारतातील केन्द्र देवबंद (जिल्हा सहारनपूर--युक्त प्रदेश)-येथील शिक्षणसंस्था १८६३ मध्ये स्थापन झाली होती. मुसलमानांच्या या सशस्त्र धर्मनिष्ठ संघटनेची फार थोडी माहिती उपलब्ध आहे. इस्लामी साम्राज्याच्या प्रयत्नाचा (पॅनइस्लामिझम्) तो एक भाग, असा समज असल्याने व तसा प्रचार साम्राज्यवादी लेखकांनी केल्याने या प्रयत्नांची योग्य ती नोंद घेतली गेली नसावी. या प्रयत्नांचा योग्य तो परिचय भारताला होणे जरूर आहे. गफारखान यांचे प्रारंभीचे समाजसेवेचे प्रयत्न हे या देवबंद परंपरेशी संलग्न असल्याने याविषयी येथे उल्लेख केलेला आहे.

गफारखान हे या देवबंदच्या सशस्त्र जिहादी परंपरेत एकेकाळी असले तरी ते केवळ देशभक्त नाहीत, ते व्यापक धर्मनिष्ठेने भारलेले, लोकशाहीवादी व स्वातंत्र्यनिष्ठ आहेत. त्यांची ईश्वरनिष्ठा अनन्यसाधारण स्वरूपाची आहे. हेही नीट लक्षात न घेतल्यास त्यांचे चरित्र व त्यांच्या समाजसेवेची प्रेरणा व प्रकार, त्यांचा गांधीवादावरील दृढ विश्वास आदी वैशिष्ट्ये कळणार नाहीत, यथार्थाने ती समजणार नाहीत. आपली जन्मभूमी (पठाण प्रदेश), आपले समाजबांधव व आपली भाषा यांच्याबद्दल त्यांच्या अंतःकरणात गाढ प्रेम आहे.

पठाणांमधील अज्ञान व त्यांच्यामधील अतर्गत कलहामुळे होणारा नाश यावद्दल खानाचे अत करण शब्दश तिळतिळ तुटत असते ही पार्श्वभूमी लक्षात घेऊन त्याच्या चरित्राकडे पाहिले पाहिजे

बादशाहखानानी आपले सार्वजनिक आयुष्य शिक्षणप्रसाराच्या कार्यातूनच आरभले त्यांचे आधीचे मार्गदर्शक तुरगझाईचे हाजीसाहेब होत, असा बहुतेक चरित्रकारांनी उल्लेख केलेला आहे, ते अशत खरे आहे त्यांचे बहुतेक सहकारी शिक्षक देवबद येथेच तयार झालेले होते त्यामध्ये मौ ताजमहमदसाहेब हे सुपरवायझर म्हणून प्रमुख म्हणून काम पहात होते इतर शिक्षकामध्ये फजले महमूद मक्फी, फजले रबी, अब्दुल अजीज हे होते स्वत गफारखानही शिक्षकाचे काम करीत असत उतमझाई येथेच ही पहिली राष्ट्रीय धार्मिक स्वरूपाची शाळा १९११ चे सुमारास सुरू झाली ही शाळा मध्यवर्ती असून वर्ष-दीड वर्षाच्या काळात आसपासच्या गावातून तिच्या शाखा सुरू झाल्या त्या भागातील बहुजनसमाजातील जागृतीचा तो काळ होता

या शाळांच्या स्थापनेशी किंवा सघटनेशी तुरगझाईच्या हाजीसाहेबांचा विशेष सबध पोचत नाही ते आयुष्यभर सशस्त्र बडाचे पुरस्कर्ते व सचालकच राहिले, परतु नवीन शिक्षण-सस्थांना कट्टया मुल्लाचा विरोध होता त्याला काटशह म्हणून या तरुण मडळींनी धार्मिक क्षेत्रातही वजनदार असलेल्या या हाजीसाहेबांना आपले प्रमुख नेमले होते हाजीसाहेबांनाही देवबदवाले तरुण जवळ आल्याने पाहिजेच असणार या स्वरूपाचा त्यांचा सपर्क व सबध होता

या राष्ट्रीय शाळा म्हणजे शालेय शिक्षणापेक्षा लोकजागृतीचे केन्द्र या दृष्टीने त्यांचे अधिक महत्त्व होते सरकारही त्याच दृष्टीने शाळांच्याबद्दल साशक होते इजिप्त, तुर्कस्तान, इराण या इस्लामी देशांतील राष्ट्रीय जागृतीची झळ इतर अन्य व इस्लामी देशांना लागू नये याबद्दल ब्रिटिश राज्यकर्ते त्या वेळी जागरूक होते

उतमझाईच्या राष्ट्रीय शाळेत अल् हिलाल, अलबलाग, मदिना, जमींदार, कॉम्रेड ही वृत्तपत्रे येत असत व ती अधाशीपणाने वाचली जात या वृत्तपत्रांनी त्या वेळच्या तरुण पिढीचा राजकीय पिंड तयार केला त्या लेखक-नेत्यांमध्ये मौ हसरत मोहानी, मौ आझाद, मौ महमद अली, व झफरउल्लाखाँ हे होते ही वृत्तपत्रे कोणाच्या नावावर येतात व ती कोण वाचतात यावर पोलिसांची नजर असे, आणि स्वाभाविकच या सार्‍या शाळा सरकारी वक्रदृष्टीखाली रुपरुप भरडल्या जावयाच्या होत्या

गफारखानांनी अशा रीतीने राष्ट्रीय शिक्षणाची सघटना झपाट्याने उभारली व तिचा विस्तारही अवघ्या २-३ वर्षांत भराभर वाढला वर उल्लेखिल्याप्रमाणे त्यांच्या सहकाऱ्यांमध्ये

विविध प्रवृत्तीचे तरुण कार्यकर्ते मिळालेले होते सरहद गांधी खानांच्या मनावर खरी पकड विश्राम गुरुजींच्या सेवाभावाची व कारुण्याची होती तर त्यांनी ज्यांना सत्येचे प्रमुख घनविलेले होते ते हाजीसाहेब वजनदार धर्मनेते होते, पण त्यापेक्षा ते 'जिहाद' पथाचे स्टवण्ये होते गफारखानांच्या अंत करणात परकीय सत्तेबद्दलचा विरोध कमी होता असे नव्हे, पण आपल्या समाजदोषामुळे आपण कोणा ना कोणाचे ताबेदार होतो, किंवा एकमेकांच्या कत्तली करण्यात गुंततो, हे आपले समाजदोषांचे दुखणे दूर केल्यावाचून आपण खरा उत्कर्ष होणार नाही या उदासमतवादी विचारांची त्यांच्यावर अधिक पकड होती

१९१४ मध्ये पहिल्या महायुद्धाची हवा सुरू होताच या शाळेचे अध्यक्ष हाजीसाहेब आपल्या धर्माच्या रस्त्याला लागले स्वतंत्र पठाण मुलखात जाऊन त्यांनी पठाणांचे हल्ले पेशावरवर चढविण्याचा प्रारंभ केला त्यांच्या या लढ्यांची काहीच विशेष माहिती मिळत नाही परंतु कौन्सिल कमिटी व इतर काही सरकारी अहवाल यांमध्ये हाजीसाहेबांनी सीमाप्रान्तावर हल्ले चढवल्याचा उल्लेख आहे

या हाजीसाहेबांचे " Who was a Thorn in the British administration in the first quarter of this Country अमे वर्णन जेम्स स्पेन याने केलेले असून [ 'The Pathan border land '—pages 95, 165-66 ] १९३० एप्रिलमध्ये पेशावर मागावून सत्याग्रही चळवळ सुरू होताच हाजीसाहेबांच्या ४ हजार लोकांनी मे महिन्यात पेशावरवर चढाई केली, तसेच ४ हजार गदाखेल व खिजरखेल पठाण येथील मागाने उतरले " वगैरे सशस्त्र उठावणीची माहिती दिली आहे गफारखानांची सत्याग्रहाची चळवळ व ही सशस्त्र पठाणांची चढाई यांचे सूत होते असा बहुतेक इंग्रज लेखकांचा समज आहे गफारखान व हाजीसाहेब तुरंगझाई यांचे एके वळी निकट सहकार्य होते हेही खरे, पण खुदाई खिदमतगार संघटना १९२९ मध्ये स्थापन करते वेळी गफारखानांनी पूर्वानुभवानंतर जे अहिंसेचे धोरण स्वीकारले ते निर्भेळ स्वरूपाचे व खऱ्या निष्ठेतून आलेले असे होते या सशस्त्र चढायांत अब्दुल गफूरखान या नावाचेही एक लढवय्ये आहेत, पण ते गफारखान नव्हेत त्यामुळेही गैरसमज झाला असेल

१९१४-१५ मध्ये या शिक्षकांना एकाएकी एक असे पकडले त्यामध्ये गफार- खान होते असे दिसत नाही कारण त्यांची पहिली शिक्षा रौलेट कायदा-चळवळीच्या वेळी झाली आहे ( एप्रिल १९१९ ) सर्वच शिक्षकांना खटले न भरता तुरुंगात डांबून टाकले व काही शिक्षकांनी सोडून दिले असेही झाले असेल फ्रंटियर रेग्युलेशन ॲक्ट या कायद्याखाली चौकशी न करता फाशीपर्यंतची कोणतीही सजा देता येत असे तेव्हा या शिक्षकांना सोडून काढण्यात व तेही महायुद्ध सुरू झाल्यावर कसली अडचण येणार ?

१९१४-१५ मध्ये या शाळा बंद पडल्यामुळे मोठ्या झालेल्या गफ्फारखानांना देश-सेवेचा दारी उद्योग शोधणे भाग होते. याच वेळी देवबंदचे नेते व कुलगुरू शेख महमूद हसन यांच्याकडून त्यांना भेटीसाठी पाचारण आले; त्यांच्या भेटीनंतर गफ्फारखान सशस्त्र क्रांतिकारकांच्या लढ्यात प्रविष्ट झाले असेन. राष्ट्रीय शाळांना मिळणारे कुठले लाभल्याने गफ्फारखान देवबंदच्या दरवाज्याकडे ओढले गेले ही वस्तुस्थिती लक्षात ठेवणे अगत्य आहे.

४

# दुःखाने व्यापलेले वैवाहिक जीवन

१९१२ मध्येच म्हणजे राष्ट्रीय शाळांच्या कार्यांत गफारखान गुंतले त्याच वेळी व वयाच्या २२ व्या वर्षी त्यांची शादी झाली. उतमंझाईजवळच असलेल्या रज्जरगावचे हाजी महंमद-खान हे त्यांचे श्वशुर, गफारखानांच्या पत्नीचे नाव मेहेरखान. हाजीमहंमदखान हे सरकार दरबारी वजन असणारे असे होते. त्यामुळे या कुटुंबीयांचे संबंध विशेषसे वाढू शकले नसावेत. शिवाय वयाच्या विसाव्या वर्षापासूनच कोणत्या ना कोणत्या रूपाने गफारखान त्यांच्या समाजास अप्रिय वाटणाऱ्या समाजसुधारणेच्या कामात भाग घेऊ लागले होते, त्यामुळे ते संबंधित कुटुंबीयांपासून अलग पडलेले असणार.

विवाहापूर्वीपासूनच गफारखान हे देशभक्तीत रमलेले असल्यामुळे त्यांना कौटुंबिक जीवनात रस घेण्यास केव्हाच विशेष सवड झाली नाही. पहिल्या मुलाच्या जन्माच्या वेळी ते आपल्या राष्ट्रीय शाळेच्याच उद्योगात असल्याने उतमंझाईच्या आसमंतात असण्याचा संभव, पण १९१५ नंतर त्यांची राज्यकर्त्यांशी झगडा सुरू झाली ती नंतरच्या ५० वर्षांत केव्हाच संपली नाही. या झगड्यात केव्हा तुरुंगात, तर केव्हा तुरुंगाच्या मार्गांवरील लढायांत असे त्यांचे स्वतःचे जीवन आकार घेत व इतरांना प्रकाश देत राहिले. हे त्यांचे जीवन इतरांना प्रकाश देत राहिले हे खरेच, पण ते नंदादीपाप्रमाणे शान्त प्रकाश देणारे असे झाले नाही. वीज कडाडत रहावी व दऱ्याखोऱ्यातील पांथस्थांना प्रकाशाबरोबर हादरे देत देत तिने स्वतःचा प्रवास करावा असे ते झाले आहे. यामुळे त्यांचे हे वैवाहिक जीवन म्हणजे वणव्यातील सहलीसारखे झाले आहे. १९१२ ते १५ हा काळ जरी या मर्दीविरुद्ध झगड्यात गेला असला तरी तोच थोडा स्वास्थ्याचा झाला असणार!

गफारखान तसे कुटुंबवत्सल, मुलाबाळांवर जिव्हाळ्याने प्रेम करणारे व त्यांच्यात रमणारे असे आहेत, पण कर्तव्यजागृतीची भावना व राजकार्यांची ददेली यांचा संघर्ष सुरू झाल्या नंतर या साऱ्या भावना करपून जातात गफारखानांच्या जीवनात तेच घडले १९१५–१७ या कालातच वैचारिक संघर्षांतून त्यांचा जीवनप्रवाह वाहात गेलेला आहे लोकशिक्षण, लोकजागृती व समाजसुधारणा या विधायक सेवेकडे त्यांचा आत्मा ओढ घेत होता आणि चारी बाजूनी त्यांचा रस्ता अडविला जात होता

विवाहानंतर पहिल्याच वर्षात १९१२ मध्ये गफारखान व मेहेरखन यांना मुलगा झाला तोच गनी होय त्याचा दुसरा मुलगा वली याचा जन्म १९१५ मध्ये झाला त्यानंतर ते भक्त्या जमातीच्या योजनांप्रमाणे उघड किंवा गुप्त कार्यांच्या संघटनेत गुरफटून राहिले याच कालात म्हणजे १९१७–१८ मध्ये भारतात फैलावलेल्या 'इन्फ्लुएन्झा'च्या साथीने राजकीय जागृतीप्रमाणेच चोरट्या पावलांनी या प्रांतात प्रवेश केला, उतमंझाईलाही त्याची लागण झाली गफारखानाशिवाय बहुतेकांनी घरी बिछाने पकडले होते साऱ्या घराचे इस्पितळ बनले होते व गफारखान नर्सचे काम करीत होते मेहेरखन यांचा आजार थोडा मागे पडतो तोच गनीच्या तापाने जोर केला आई-वडिलांनी मुलाची शुश्रूषा केली बरेच दिवस लोटले तरी ताप हटेना व मुलाची क्षीणता पराकोटीची वाढली तेव्हा आईचा धीर खचला तिचे उपास-तापास प्रार्थना सुरू होत्याच त्याच वेळी तिने अल्लाची करुणावाणीने प्रार्थना केली, "यह बच्चा बचाओ, हमारी जान ले जाओ" या मुलाचे प्राण, देवा वाचव, माझे प्राण घेऊन जा!" ही प्रार्थना आईने व्याकुळतेने आरंभिली, आणि खरोखरच गनीचे प्राण वाचले व आईने स्वर्गाची वाट धरली! बाबराने आपला दुबळा पुत्र हुमायून याला वाचविण्यासाठी अशीच मृत्यूची प्रार्थना केली होती असे म्हणतात मेहेरखनने आपल्या पुत्राला वाचविण्यासाठी हे बलिदान देऊन आपल्या पतीच्यापुढे त्यागाचे एक उदात्त चित्र ठेवले त्याचेही काही कठोर परिणाम गफारखानांच्या मनावर झाले असतील त्यांच्या घरी प्रेमळ आई-वडील होतेच, इतर कुटुंब-परिवारही मोठा त्यामुळे गफारखानांना स्वतःच्या मुलांची चिंता अशी नव्हती, पण पत्नीचा जो थोडा पाश होता तोही कमी झाल्याने ते आपल्या समाजकार्यास अधिक मोकळे झाले

पुढे वर्षभरात रौलेट कायद्याचे वादळ भारतात निर्माण झाले व काळाने शांती पेटत आली त्याप्रमाणे साऱ्या देशभर भडका उडाला महात्माजींचा अहिंसात्मक प्रतिकार आकार घेऊ लागला त्या वेळी बादशाहखानांनी प्रथम बंदीशाळेची यात्रा केली इतकेच नव्हे तर सरकारी धोरणाच्या निषधापेक्षा पुत्रप्रेमाच्या जिव्हाळ्याने बहिरामखानांनी तोच रस्ता पत्करला या पाठोपाठ खिलाफतीची चळवळ व त्यातूनच हिजरतचे (धर्मासाठी देशत्याग

करणे ) यशस्वी झाले या कार्यात ते आघाडीला राहिले त्यामुळे कारी तरी निमित्ताने राज्यकर्त्यांना त्यांना दूर करणे जरूर वाटले असणार व त्याप्रमाणे १९२१ मध्ये त्यांना साडे-तीन वर्ष तुरुंगात डांबून ठसले

त्यांच्या वैवाहिक व कुटुंबजीवनाबद्दल फार मोजकी माहिती मिळते सोयीच्या दृष्टीने तो परिचय येथेच दिलेला आहे

१९२० मध्ये देशत्यागाच्या वादळी काळातच गफारखानांचा दुसरा विवाह झाला विवाह होताच ते सुमारे वर्षभर हिजरत यात्रेस गेले परत आल्यावर थोडा काळ पुन्हा शिक्षण-कार्यास लागले त्यामुळे त्यांचा दुसरा बंदिवास झाला साडेतीन वर्षांच्या बंदिवासातून बाहेर पडल्यावर १९२६ मध्ये ते हाज यात्रेच्या निमित्ताने अरब देशाचा परिचय करून घेण्यास बाहेर पडले या यात्राप्रवासात त्यांच्या दुसऱ्या पत्नीने परलोकाचा रस्ता पकडला या सहा वर्षांच्या वैवाहिक जीवनाच्या कालापैकी साडेतीन वर्षे बंदिशाळेत व सुमारे एक वर्ष अफगाण-यात्रेत गेले अशा प्रकारच्या वैवाहिक जीवनाला वर्णण्यातील सहल म्हणावयाचे नाही तर काय म्हणावे ? दुसऱ्या पत्नीपासून त्यांना मेहरताज ही कन्या व लाली हा पुत्र अशी दोन अपत्ये झाली

पहिल्या पत्नीचा मृत्यू मुलाला वाचविण्यासाठी झाला, तर दुसऱ्या पत्नीचा देहान्त राबीया येथे, यात्रेच्या वाटेत उंच पायऱ्यांवरून पडून झाला या दोन्ही पत्नींच्या मृत्यूने त्यांना मोठे आघात झाले, परंतु त्या वेळी ते कर्मयोग पुरुषाला शोभेल अशा धैर्याने व संयमाने राहिले कार्य सोडले नाही त्या वेळी त्यांचे वय ३६ वर्षांचे होते त्यानंतर त्यांच्यावर अनेक दडपणे आणली गेली, पण त्यांनी पुन्हा विवाह करण्यास नकार दिला

त्यांच्या दुसऱ्या लग्नापूर्वीचा एक मौजेचा–आता मौजेचा म्हणण्यास हरकत नाही–किस्सा सांगण्यासारखा आहे लग्न ठरल्यानंतर एक दिवस गफारखान आपल्या एका मित्राला घेऊन लग्नासाठी कपडा वगैरे काही वस्तू खरेदी करण्यासाठी पेशावरकडे गेले पण रस्त्यात सरदरनाव येथे त्यांना पोलिसाने अटक केली व त्याचे इन्स्पेक्टर शार्ट यांचे पुढे पेशावरला नेऊन उभे केले बाजारपेठेतील दुकानात पोचण्याऐवजी ते कोतवालीत पोचले, येवढाच फरक हा शॉर्ट नावाचा–शार्ट टेपर्ड–अधिकारी त्या वेळच्या अनेक कार्यकर्त्यांना बाधलेला आहे घडी कडाक्याची पडलेली गफारखान व त्यांचे मित्र यांना रस्त्यात उभे ठेवून पोलिस शॉर्टकडे गेला होता खूप वेळ गेल्यावर गफारखानांना त्यांच्यापुढे उभे केले शॉर्ट अयत उर्मट होता व राजकीय कार्यकर्त्यांना अकल शिकविण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती गफारखानांनी काही उत्तरे दिली तेव्हा "इतक्या हळू बोलायला काय झाले ? आवाज निघतो की नाही नीट " वगैरे मुक्ताफळे त्याने गाळली, ते थोडे मोठ्याने बोलू लागताच " इतक्या मोठ्याने कशाला बोलतोस ? " असा दुसरा तडाखा दिला व खाली नेऊन उभे ठेवण्यास सांगितले

येणारे औदार्य अगर व्यापकता होती असे दिसत नाही किंवा त्यांच्या क्रान्तिनिष्ठेला राष्ट्रीय तेची बैठक होती असेही दिसत नाही 'Flame' (फ्लेम) नावाचे एक पत्र ते चालवीत होते (जे एस्. ब्राइट-फ्रॉंटिअर अँड इट्स् गांधी) पण "ती फ्लेम होती, तीत पक्त राष्ट्रीयता नव्हती." असा उल्लेख ब्राइट यांनी केलेला आहे. आणि गफारखानही हाजी-साहेबांना आपले नेते अगर मार्गदर्शक असे मानीत नाहीत. उलट महमूदसाहेब देवबंदी हे देशप्रेमाने भारलेले, धर्मनिष्ठ, आचारसंपन्न व जाडे विद्वान होते असे त्यांचे वर्णन बादशाह खानच आदरभावाने धरतात

१९१४-१५ मध्ये महमूदसाहेब यांच्या भेटीस देवबंदकडे जाण्यापूर्वी आम्हा येथील मुस्लीम लीगच्या वार्षिक बैठकीस गफारखान गेले होते तेथून परत येताना ते दिल्लीस मौलाना फजलुर रहमान यांच्याकडे राहिले होते त्या वेळीच त्यांचा ओबेदुल्लाखान सिंधी यांचा संपर्क आला, व ओबेदुल्लांच्या द्वारे देवबंदी महमूदसाहेब यांचा दुवा जुळला, देवबंदहून गफारखान परत पेशावरकडे गेले व लागलीच पुढील कार्यक्रमासाठी सिद्ध झाले. ही सारी नोंद माहिती अनेक ठिकाणच्या उल्लेखांतून मिळते

आझाद शाळा सुरू असतानाच बादशहाखान स्वतंत्र पठाण मुलखात काही काल फिरत राहिले होते. त्या भागात कार्य असावे, इतर कार्यकर्त्यांनाही साहाय्य करावे वगैरे हेतूने त्यांनी ही पाहणी केली असे ओझरते उल्लेख काही चरित्रकारांनी केलेले आहेत तसेच या प्रयत्नांतून त्यांना नीट वाट न दिसल्याने त्यांनी ईश्वराची करुणा भाकली, रोजे-उपास केले आणि पुन परत स्वग्रामी येऊन शिक्षणकार्यातच रमण्याचे ठरविले, असा वृत्तान्त या चरित्रकारानी दिलेला आहे पण वस्तुत बादशहाखानांचा हा सारा प्रवास, हे सारे प्रयत्न सशस्त्र लढ्याच्या कार्यासाठी सोयीचे कार्यक्षेत्र व केन्द्र शोधण्यासाठी होते

वायव्य सीमा प्रदेशात शहीद सय्यद अहमद यांनी १८३० च्या सुमारास सुरू केलेल्या जिहादी परंपरेचे काही कार्यकर्ते अद्याप टिकाव धरून काल कठीत होते त्यांची वाताहत वशी झाली होती व त्यांच्यामध्येच ग्रसपोलीस खात्याचे हस्तकही निर्वेधपणे कसे नांदत होते याची माहिती गफारखानांना होती बुनेरच्या स्वतंत्र विभागात जुने केन्द्र असल्याने त्याच्या अगदी उलट दिशेला बाजोरच्या स्वतंत्र विभागाकडे आपले नवे केन्द्र करावे असे या नव्या जिहादींनी ठरविले स्वत गफारखान या काटेरी प्रवासाचे बहारदार वर्णन करतात त्या प्रयत्नांची त्यांनाही आता गमत वाटते

आपल्या क्रान्तिकेंद्राची ही जागा शोधण्यासाठी निघताना त्यांनी त्यांच्या शाळेतील सहकारी शिक्षक फजले महमूदसाहेब यांना बरोबर घेतले होते नव्या केन्द्राची जागा शोधण्याचे जबाबदारीचे कार्य या दोन तरुणांकडे सोपविले होते यावरून त्यांच्या योग्यतेची

कष्टाने कसेबसे पोहत बादशहाखान व फजले महमूद हे रेल्वेलाईने तख्ताबाई स्टेशनावरून मलाकंडला लागले व दर्गाईला उतरले पुढचे मलाकंद वाटेने त्यांना जावयाचे होते दर्गाईला उतरल्यावर त्यांनी घोड्याची टमटम (टांगा) घेतली, परंतु त्या वाटेवर एजन्सी सरकारचे पहारेकरी होते पुढे चौकी आल्यावर फजल महमूद व दुसरे वाटाडे हे टमटमतून खाली उतरले व पहारेकऱ्यांशी बोलत राहिले बादशहाखानांनी स्वत मोठमोठी मळकीमोठी चादर गुंडाळून घेतली बुरख्याचा उपयोग केला त्या बुरख्यातून ते चौकीवरून शिपायांमधून चालावेत अर्धा वेळ होती टांगेवाल्याने चलाखी करून घोडी दामटली पोलिसांनी औदासिन्य राखले त्याने टमटमकडे पाहिले न पाहिले असे केले व जाऊ दिले अशा रीतीने या पहिल्या सरकारी पहाऱ्यांच्या कचाट्यातून ते पार पडले त्यानंतर डोंगर भागातून पुढे जावयाचे होते रात्रीच्या अंधाराच्या मदतीने ते आपला प्रवास करीत होते केल माग टाकल्यावर मराठी अप्रसिद्ध चकदरा (चकदार) पुलावरून फर्नीकडे जावयाचे होते त्यापूर्वी टमटम सोडून दिली बागडार्गे पायी गेला थोड्या अंतरावर असलेल्या फजले महमूद यांच्या स्थानी पोचवायचे होते "चकदऱ्याचे पहारे चुकवून आम्ही चालू लागलो त्या दिवसाचा सारा प्रवास पायीच करावयाचा होता भूक लागलेली होती व थकवा खूप आला होता सारा दिवस चालून सायंकाळी गावाजवळच्या नदीपाशी पोचलो थंडी कडाक्याची पडलेली तशात ती नदी ओलांडावयाची होती पण साऱ्या संकटांना तोंड देत देत त्या गावी रात्री पोचलो व भोजन केल्यावर प्रवासातील पहिली स्वस्थपणाची झोप घेतली " खानसाहेबांनी त्यापूर्वीच रजा घेतली असल्याने त्यांना स्वत ला झोपेने केव्हा गाठले ते त्यांनाही समजले नाही सशस्त्र प्रतिकाराच्या संघटनाकार्यातील पहिल्या प्रवासाचे हे वर्णन त्यांनीच केलेले आहे

फजल महमूद यांच्या गावी त्यांना त्यांचे नेते मौ ओबेदुल्ला हे येऊन भेटावयाचे होते त्यांची गफारखानांनी काही दिवस तेथे वाट पाहिली, ते न आल्याने फजले महमूद यांना मागे ठेवून स्वत बादशहाखान पुढील वाट काढण्याच्या उद्योगास लागले पूर्वेकडील बाजार बाजरा या भागातून चमरकंदजीच्या अड्ड्याच्या मुक्कामाकडे ते पोचले मुद्दा पारसवारी झाले होते, पण त्यांचे वास्तव्य शेखसाहेब तेथे होते त्यांचा खलबतखाना त्या पहाडात होता सदर खलबतखान्याची जागा व लंगरखाना (भोजनशाळा) ही त्यांनी पाहिली ही जागा टेकड्यांत भरण्यासारखी म्हणजे कोणाच्याही दृष्टीच्या टप्प्यात न येणारी अशी होती शेखसाहेब तेथे एकटेच राहत होते मधाची पोवळी पाडून ते त्यावर स्वत चा योगक्षेम चालवीत असत त्या जागेची पाहणी करून पुढे कोटकी (Kotki) चा रस्ता पकडला कोटकीचे खानबंधू जिमारखान व अकबरखान हे इंग्रजांशी लढा देत आलेले होते या खानबंधूंच्या

या भागात हाजीसाहेबांनी आपले ठाण मांडले व ठाणे उभारले. पण त्या भागातील जुने मुल्ला-मौल्वी असल्या भानगडींमुळे त्यांचे स्वत:चे स्वास्थ्य बिघडू नये म्हणून हाजीसाहेबां-मागे लोकांनी जाऊ नये असा प्रचार करण्याच्या उद्योगास लागले होते. हे धर्मप्रचारक बव्हंशी इंग्रजांचे हस्तक असत. हाजीसाहेबांनी उभारलेल्या इमारती, बोट वगैरेकडे बोट दाखवून " हाजींना हा धर्मप्रचार कशासाठी करावयाचा आहे या येथे मालमत्ता उभारावयाची आहे " असा प्रचार मौल्वी करू लागले. यामुळे तेथे अंतर्गत भांडणेही सुरू झाली. पठाणाची शस्त्र-क्रिया अंतर्गत भांडणातच अधिक तेजीने चालत असे. त्यामुळे मानसिक दृष्ट्या खरा धैर्यवान किंवा तत्त्वनिष्ठ बनण्यास पठाणास वेळ लागतो, परंतु तो मृत्यूशी खेळ खेळण्यास सतत तयार असतो. त्याला मार्ग दाखवल्यास तो मृत्यूला शान्तपणे कवटाळण्यासही तयार होतो. हाजीसाहेबांना जिहाद – होली वॉर – करावयाची होती. त्यांच्यानंतर त्यांचे चिरंजीव बादशाह-गुलखान हेही होते. या पिता-पुत्रांना स्थानिक मौल्वींनी दिलेल्या त्रासामुळे ते चिंतातुर झालेले होते. आपल्या जिहादचा प्रारंभ या स्वकीय शत्रूंचा निकाल लावून करावा असा विचार हाजीसाहेबांचा होता. परंतु अशा झगड्याने आपल्या कार्याचा नाश होईल; तो मार्ग रोखला पाहिजे असा सल्ला गफारखानांनी हाजीसाहेबांना दिला. विशेषत: बुनेरवाले मौल्वी हे धोकेबाज – विश्वासघातकी आहेत असेही त्यांनी हाजीसाहेबांना सांगितले. परंतु हाजीसाहेबांना त्यांचा सल्ला पटला नाही. त्यांनी त्यांचे कार्य चालू ठेवले. गफारखान त्या प्रयत्नांचे भवितव्य ओळखून परत घरच्या वाटेला लागले. थोड्या दिवसांत हाजीसाहेब प्रत्यक्ष लढाई करण्याच्या मार्गास लागताच बुनेरी मौल्वींनी त्यांना पकडून इंग्रजांच्या स्वाधीन करण्याचे कारस्थान रचले. याचा सुगावा हाजींना वेळेवर लागल्याने हाजीसाहेबांनीही तेथून पलायन केले. त्यांच्या जिहाद प्रयत्नाचा हा असा शेवट झाला. हे दोन्ही प्रयत्न ( १ ) झगई केन्द्र निर्माण करण्याचा, व ( २ ) हाजीसाहेबांचे समवेत जिहाद उभारण्याचा, गफारखानांनी पाहिले. आपले निष्ठावान कार्यकर्ते त्या मार्गाला लागल्याने ते अडचणीत पडून त्यांची व कार्याची कशी हानी झाली हेही त्यांनी अनुभवले.

हाजीसाहेबांच्या जिहादी प्रयत्नांचा शेवट राज्यकर्त्यांना प्रतिकार करण्यापेक्षा अतरथ लढ्यात झाला व त्या निमित्ताने राज्यकर्त्यांनी त्या विभागात जोराची दडपशाही सुरू केली. त्यातच आझाद शाळांची व शिक्षकांची शेवटची आहुती पडली; जे थोडे विधायक कार्य प्रारंभिले गेले होते ते तात्पुरते तरी बंद पडले. या विवादात गफारखान उतमझाईच्या बंद शाळांपासून बोध घेण्याचा प्रयत्न करीत होते. ज्या प्रयत्नातून बहुजनसमाजाची जागृती होत नाही व त्याची प्रतिकारशक्ती वाढत नाही ते मार्ग अंतिम कल्याणाच्या दृष्टीने हितकारक असत नाहीत हाच निष्कर्ष त्यांनी त्या वेळी काढला.

६

# सत्याग्रहाच्या मार्गावर

१९१४ ते १९१७ हा काळ गफारखानांनी सशस्त्र प्रतिकाराच्या देशसेवेमध्ये घालविला होता त्या मार्गाने जाण्यातील स्वाभाविक मर्यादा त्यांच्या ध्यानात आल्या होत्या विशेषत केवळ राज्यकर्त्यांच्या मुळेच नव्हे तर स्वकीयांमधील क्षुद्र दृष्टीमुळे निर्माण होणारे धोके व त्यामुळे कार्यकर्त्यांच्या मनामध्ये निरंतर वावरणारी भीती याबद्दल त्यांना फार दुःख वाटे या भीतीने कार्यकर्त्यांच्या पारदर्श वृत्तीचा नाश होतो या अनुभवामुळे कायमचे निर्भय व उघड मार्गाची वाटच पाहात होते अशा वेळी रौलेट कायद्याविरुद्ध भारतात गांधीजींनी जे आन्दोलन उभारले त्याचे वारे पेशावर भागातही झपाट्याने पोचले व पसरले

वायव्य सरहद्द प्रान्त हा राजकीयदृष्ट्या अगदी मागासलेला व रानटी लोकांचा, ही भारतात असलेली समज बहुतांशी चुकीची होती ती आपल्या राज्यकारभाराच्या सोयीसाठी राज्यकर्त्यांनी करून दिलेली होती, पण या डोंगराळ पठाणांनी आपली स्वातन्त्र्यकल्पना कधीच सोडलेली नाही स्वातन्त्र्यभावनेबद्दल निष्ठा ही एक सुसंस्कृततेची श्रेष्ठ पायरी आहे हे यांचे स्वातन्त्र्ययुद्ध इंग्रजांविरुद्धच चालवले होते असे नव्हे पश्चिमकडून अफगाणांनी केलेले आक्रमण असो किंवा पूर्वेकडून मोगल-शीखांनी केलेले स्वातन्त्र्यहरण असो, त्याविरुद्ध पठाण सतत लढत राहिलेले आहेत त्यांचे हे प्रतिकारयुद्ध शतकानुशतकेच चालू आहे

इंग्रजी अमलाखालील लोकजागृतीच्या बाबतीतसुद्धा ते भारतातील इतर पुढारलेल्या प्रदेशापेक्षा फारसे मागे नव्हते किंबहुना एक पंजाब सोडल्यास सारा उत्तर भारत शैक्षणिक व राजकीय विचारात फार उशीरा जागृत झालेला आहे आणि वायव्य सीमा प्रदेशाचा इतिहास म्हणजे पंजाबचाच इतिहास होय ही सीमाप्रदेशनिर्मिती हादेखील साम्राज्यवादी

ब्रिटिशांच्या कुटिल राजनीतीचेच पर्यवसान होते मराठ्यांप्रमाणे शीखांना स्वत:च्या राज्याची विस्मृती केव्हाच झालेली नव्हती पंजाबमधील वैचारिक व राजकीय जागृतीपासून पठाणांना अलग ठेवण्याच्या हेतूने स्वतंत्र पठाणी प्रदेशाशी सलग अशा बहुसंख्य मुस्लिम लोकसंख्येच्या या सीमा प्रदेशात लष्करी स्वरूपाचा कारभार जारी करावा म्हणून १९०१ मध्ये पंजाबची फाळणी केली व हे पाच जिल्हे अलग केले गेले त्यामुळे १९०१ च्या पूर्वीची पठाणांमधील लोकजागृती म्हणजे पंजाबमधील जागृतीच होय असे असले तरी पश्चिम पंजाबचा भाग व सीमाप्रांताचे हे पाच जिल्हे यामध्ये मुस्लिम लोकसंख्या फार मोठी असल्याने तेथील हिंदु-मुसलमानांमध्ये एकराष्ट्रीयत्वाची भावना निर्माण होणे हे महत्त्वाचे होते, व त्या दृष्टीनेही हा इतिहास उद्बोधक आहे

या विशिष्ट परिस्थितीमुळेच पंजाबमध्ये आर्यसमाजाचा प्रभाव व विस्तार इतर प्रांतापेक्षा अधिक झाला पंजाबातील खाजगी शिक्षणसंस्था बहुशः आर्यसमाजाने प्रारंभिलेल्या आहेत १८९० मध्ये लाहोरच्या दयानंद शिक्षणसंस्थेची शाखा पेशावरला सुरू झाली या शिक्षणसंस्थेनेच सीमाप्रांतात राजकीय विचारांचे बीजारोपण केले पेशावरच्या या शिक्षणसंस्थेच्या विद्यार्थ्यांतूनच विसाव्या शतकाच्या प्रारंभी तयार झालेली पिढी क्रांतिकारक भावनेने कार्याला लागलेली होती राजकीय विचारापासून समाजाला अलग ठेवण्यासाठी राज्यकर्ते दडपशाही करीत व त्याच्या प्रतिकारार्थ, वृत्तपत्रे व वक्ते प्रचार करून शिक्षा भोगीत या आघात प्रत्याघातातून भारतातील लोकजागृती व राष्ट्रवाद विकसित होत गेला आहे तोच प्रकार पेशावरच्या शिक्षणसंस्थेचा झाला इतर ठिकाणांप्रमाणे प्रथम पांढरपेशा म्हणजेच तेथील हिंदुसमाजात शिक्षणप्रसार झाला त्या भागातील वाढत्या इस्लामी धर्मप्रचाराचा प्रतिकार करणे हाही आर्यसमाजाच्या कार्याचा एक प्रधान भाग होता, असे असले तरी ही धर्मभावना राजकीय विचारांना त्या वेळी मागे टाकू शकली नाही हाती सत्ता येण्याचा समय आल्यावर जातीय झगडे सुरू झाले व तेही सत्ता देण्याची टाळाटाळ करता यावी यासाठी राज्यकर्त्यांनी वाढविले

गफारखानांनी सार्वजनिक जीवनात १९१२ च्या सुमारास प्रवेश केला तोही ग्रामीण विभागात शिक्षण सुरू करण्यासाठीच हेही लक्षात ठेवण्यासारखे आहे १९०५ मध्ये पेशावरला 'फ्रंटियर ॲडव्होकेट' हे श्री अमीरचंद बम्बाल यांचे वृत्तपत्र सुरू होऊन १९१० मध्ये प्रेस ॲक्टच्या दडपशाहीला बळी पडलेले होते अमीरचंदांचे ज्येष्ठ साथी-सहकारी व रामचंद्र भारद्वाज हे गदर पक्षाच्या प्रमुख नेत्यांपैकी व हरदयाळांच्या जागी नेमले गेलेले क्रांतिकारक, तेही पेशावरच्या या दयानंद शाळेचेच विद्यार्थी १९१४-१५ मध्ये गदर प्रकरणात पेशावरला खटले झाले व त्यात अनेक तरुणांना मरणाच्या तुरुंगात

दीर्घकाळ देशद्रोह भोगावा लागला नवान्या गांधीयुगाच्या आरंभीही (एप्रिल १९१९) पेशावरच्या अनेक हिंदु-मुस्लिम तरुणांनी सत्याग्रहाच्या लढ्यात धडाडीने पुढाकार घेतला होता त्यांचे नेतृत्व डॉ चारुचंद्र घोष, श्री बक्षाल, अब्दुल जलील नदवी, मिलापसिंग आझाद, अमलाखान यांनी आदी तरुणांकडे होते सहा एप्रिलला अनपेक्षितपणे पेशावरला प्रचंड सभा झाली व कडक हरताळही पडला या अनपेक्षित जिद्दीला अद्भुत जागृतीच्या दर्शनाने कमिशनर सर हॅमिल्टन ग्रँट व लष्करी अधिकारी भडकले त्यांनी तत्काळ अनेक तरुणांवर खटले भरून त्यांना प्रांताबाहेर हद्दपार केले एवढे करून सरकार थांबले नाही जेथे जेथे हे नवजागृतीचे वारे पोचले व सभा झाल्या त्या त्या गावांवर सामुदायिक दंड बसवला गेला हा दंड खेड्यात शेतसारा व पाणीपट्टी या प्रमाणात बसवला गेला पेशावर शहरावर हा दंड साडेचार लाख रु बसवला होता या भागातील गांधीयुगापूर्वीच्या लोकजागृतीचे हे ओझरते स्वरूप आहे त्यामध्ये अनेक हिंदु-मुसलमान तरुणांनी एकजुटीने काय केलेले आहे व वदिशाळेतील जीवन एकत्र घालवले आहे त्यांतील काही वृद्ध हिंदु मुसलमान मित्रांचे संबंध आजही स्नेहाचे व व सलोख्याचे आहेत असे त्यांच्यापकी एक प्रमुख श्री बक्षाल यांनीच सांगितले

खानसाहेबांचे गांधीयुगातील कार्य याच वेळी सुरू झाले असहकार युगाचे वारे उतमझाईस पोचण्यास वेळ लागला नाही गफारखानांच्या स्वातंत्र्यप्रेमाच्या उग्र उद्गारांचा अल्पसा परिचय वाचकांना झालेला आहे त्या प्रयत्नांतील खाचखळगे व धोकेच नव्हे तर त्या भागाच्या मर्यादा बादशहाखानांनी तत्काळ ओळखल्या होत्या

एप्रिल १९१९ मध्ये उतमझाईसही सभा झाल्या तथेही ७० मुसलमान व ४० हिंदू असे ११० कार्यकर्ते पकडले ३० हजार रु सामुदायिक दंड बसविला व त्या जागी एक लाख रु वसूल केले तरीही कार्यकर्ते तुरुंगातच होते परंतु कमिशनर रूसकेपलने सर्वांना मुक्त केले तो पठाणांना नीट ओळखून होता व सरळही होता कार्यकर्त्यांना दिलेली ही शिक्षा नाममात्र दिली होती असे दिसते सहा एप्रिल ते चोवीस एप्रिल या अवघ्या अठरा दिवसांच्या काळात पेशावरसारख्या लष्करी साम्राज्याच्या जिल्ह्यात शान्ततेच्या चळवळीचे रान शब्दश वणव्यासारखे पेटत गेले किंवा शान्त उपमा द्यावयाची तर फुटलेल्या धरणाच्या पाणलोटासारखे पसरत गेले बादशहा खानांचे भूमिगत कार्य बहुधा अज्ञात स्वरूपाचेच होते पण ते स्वत लवकरच सर्व परिचित झाले पेशावरच्या सभा बंडखोरांना ते हजर राहू लागले परप्रान्तांतील मोठमोठ्या मुस्लिम नेत्यांशी मात्र त्यांचा संपर्क पूर्वीच झालेला होता

या तरुण कार्यकर्त्यांपैकी रामचंद्र सूदन (सूद ?) यांना तुरुंगात इतके मारले की त्यांच्या जिवाला धोका पोचणार हे ओळखून अधिकाऱ्यांनी त्यांचा दंड वसूल

प्रारंभी या मोहाजरीन चळवळीला इमजांनी बगच विरोध केला. पण पुढे हे धोरण बदलून त्यांना उत्तेजन देण्यात आले. या स्वातंत्र्यभक्त यात्रिकांमध्ये काही गुप्त सरकारी हस्तकही घुसडून दिले. या यात्रिकांचे वाटेत व काबूलला पोचल्यावर हाल झाले हेही खरे. पण अमानुल्लांनी त्यांचे स्वागत केले, व त्यांना साहाय्यही केले. तेथे हे यात्रिक स्थायी होण्याचा विचार करू लागले, तेव्हा अमानुल्लांनी त्यांना " स्वतंत्र वसाहत करा व त्या केन्द्रातून इमजांविरुद्ध लढा द्या " असा सल्ला दिला होता. " तुम्ही येथे प्रॉपर्टी-शेतीवाडी करण्यासाठी आलात, का केव्हा तरी जिहाद करण्याचे तुमचे उद्दिष्ट आहे ? " असा सवालही अमानुल्लांनी केला होता. या मुक्कामात बादशाहखानाची व अमीरांची भेटही झाली. अमानुल्लाना पुश्तू भाषा येत नव्हती. राज्यात पुश्तू भाषेचे शिक्षण दिले जात नव्हते. त्या मुद्दयावर बादशाहखानांनी त्यांना छेडले; " स्वदेशास जाऊन तेथे लोकांची संघटना करणे हेच उचित कर्तव्य " असा सल्ला अमीरांनी दिला व तो बादशाहखानांनाही पटला. " इमजांनी भारतावर त्यांची भाषा लादण्याचे किती भयाण परिणाम झाले आहेत; लोकांच्या भाषेत सारे व्यवहार चालले पाहिजेत " या बादशाहखानांच्या बोलण्याचा अमानुल्लांच्या मनावर प्रभाव पडला असेही दिसते. कारण त्यांनी स्वतः पुश्तूचा पुढे अभ्यास केला. त्या भाषेची वर्तमानपत्रे काढली. तेथील मुक्कामात बादशाहखानांनी हबीबिया विद्यालयास भेट दिली. तेथील विद्यार्थ्यांना ' तुमची भाषा कोणती ? ' असा प्रश्न केला, तेव्हा ' अफगाणी ' असे उत्तर मुलांनी दिले. पुश्तू भाषा ही बहुजनाची भाषा आहे व तिला योग्य स्थान मिळाले पाहिजे हा प्रचार त्यांनी त्या भेटीत केला. ' हिजरत ' वरून परत फिरल्यावर बादशाहखानांनी बाजौरच्या स्वतंत्र विभागात काही काळ मुक्काम ठेवला होता. तेथे राहून शिक्षणसंस्था काढण्याचा त्यांचा विचार होता. त्याप्रमाणे दीर मधील खालो येथे शाळाही सुरू केली. हा त्याचा काल पुन्हा अंतर्मुख होऊन विचारमंथन करण्यात गेला. खालो येथील ही शाळाही फार दिवस चालू शकली नाही. कारण मालकंडच्या ब्रिटिश एजंटने दीरच्या नबाबावर दडपण आणून शाळा बंद करवली. ही शाळा बंद पडल्यानंतर लोकपरिस्थितीची पाहणी करण्यासाठी त्यांनी बाजौर-दीर भागात पुन्हा संचार केला. त्या भागात दिवस घालवण्यामागे त्यांचा हेतू आपल्या ग्रामस्थांच्यावर हिजरतवर जाऊन परत येण्याचा परिणाम काय होईल हे शोधणे हाही एक होता. त्याप्रमाणे त्यांनी आपले एक सहकारी महमद अब्बासखां यांना पुढे उतमझाईस पाठवले. मोहाजरीनांनी परत यावे याबद्दल लोकांत नाराजी असल्याचे त्यांच्या कानी गेले होते. पण बरेच हिजरती लोक परत मागे आल्याने लोकांनी फारशी कुरबूर केली नसावी असे दिसते. या चळवळीने पठाणांचा आर्थिक व शारीरिक नाश फार झाला असा शेरा बादशाहखानांनी त्याच वेळी मारला होता. प्रतिकाराच्या प्रत्येक चळवळीत साहाय्यक व्हावयाचे त्या

पख्तुनांच्या पराक्रमाचे निर्भयपणे मोजमाप करायाचे, अपराधाची खंत बाळगावयाची नाही, व पुन्हा निरनिराळ्या स्वरूपाच्या शिक्षणकार्याला लागायाचे हा बादशहाखानांचा उपक्रम गांधीजींच्या सत्याग्रही पद्धतीतील लढे व त्यांच्या तयारीसाठी विधायक काम, या स्वरूपाचाच होता. हिजरतनंतर या अनुभवाने व बाजार-दीर विभागाच्या पार्श्वभूमीवर त्यांचे १९२० हे वर्ष उलटले.

१९२१ च्या प्रारंभी बादशहाखानांनी पुन्हा आपल्या शिक्षणसंस्थांची कवाडे सुरू करण्याचे ठरवले. पण या खेपेला केवळ शाळकरी मुलांच्या शिक्षणावर संतुष्ट न राहता सामाजिक सुधारणा व त्याचा प्रचार याकडेही लक्ष देण्याचे ठरवले. १९१७ ते १९२० या काळातील भूमिगत कार्याचा व रौलट बिल्स विरुद्ध प्रतिकाराच्या सत्याग्रहाचा थोडाबहुत अनुभव त्यांनी घेतला होता. त्या अनुभवावरून त्यांनी स्वतःचे स्वतंत्र असे सिद्धान्त बनविले, व त्याप्रमाणे पुढील धोरण आखले. या सिद्धान्तांपैकी पहिला व महत्त्वाचा म्हणजे राज्यकर्त्यांविरुद्ध जी चळवळ करावयाची ती उघड असली पाहिजे. पडके राजकारण आम्हाला नको आहे. व लोकांनी तसे निर्भयतेने सामोरे जाण्यास तयार झाले पाहिजे. या नव्या धोरणाची त्यांनी आपल्या कार्यकर्त्यांशी चर्चा करून 'अंजुमने इस्लाह अल-अफगान' ही संस्था स्थापन केली.

बादशहाखानांच्या या सर्व सत्कार्याचे उद्दिष्ट ग्रामीण जनतेचे सत्कार्य हे होते. हा प्रकारही लक्षात घेणे जरूर आहे. भारतातील व त्याचप्रमाणे वायव्य सीमा प्रदेशातील पुनर्जागृतीचे माध्यम पत्र परिपत्रक – मध्यम वर्ग होता. जागृतीचा लोंढा समाजाच्या शेवटच्या थरापर्यंत पोचल्याशिवाय परकीयांची मुळे उखडून निघणार नाहीत. हे काम जनतेला निर्भय केल्यानेच होणार आहे. हे गांधीजींनी निर्माण केलेल्या प्रचंड जागृतीवरून व खान भरावरूनही बादशहाखानांनी पुरेपूर हेरले होते.

या दृष्टीने उतमझाई व समीकारची खेडी यांच्यासाठी १९२१ मध्ये 'आझाद शाळा' सुरू केल्या. पूर्वीच्या विद्यार्थ्यांपैकी आता काही प्रौढ झाले होते व ते शिक्षक म्हणून त्यांना मिळाले. पण सर्वत्र पैसा नाही. कमी पगारावर काम करणारे लागी कार्यकर्ते नाहीत, अशा अवस्थेत नव्या शाळांचा प्रारंभ झाला होता. स्वतः बादशहाखानांनी शिक्षकाचे काम करीत असत. पण त्यांचा अधिक वेळ बाहेरच्या सत्कार्यातकडे जात असे. या वेळी त्यांच्या बरोबर साथी म्हणून पुढे त्या प्रान्ताच्या पहिल्या मंत्रिमंडळात प्रसिद्धी पावलेले काही अनाउल्ला हे लाभले होते. काजीसाहेब जसे बुद्धिवान तसेच निःस्पृह व सत्याचे उपासक होते. त्यांच्याप्रमाणे मियाँ अहमदशाह हाजी अब्दुल गफूर खाँ (चरस चुरुन भाऊ), अब्दुल अकबरखान, मन्सद अब्बासखान, ताज महमद खान आदी तरुण सहाय्यक

एकत्र जमले होते. त्यांच्या प्रयत्नांमुळे शिक्षणसंस्थांचे जाळेही थोड्याच दिवसांत वाढले होते. पण त्याचमुळे सरकारला त्या कामावर तत्काळ झडप घालणे जरूर वाटले असणार, आणि त्याप्रमाणे एक वर्ष पुरे होण्यापूर्वीच या सर्व्या शिक्षणसंस्थांना पुन्हा कुलूप लागले. पुन पुन्हा संस्था उभारणे व त्यांच्यावर सरकारने बडगा फिरवणे हा जणू शिवाशिवीचा खेळ चालला होता. शिक्षणाखेरीज लोकजागृतीच्या कामाकडे बादशहाखान लक्ष देत व त्यामुळे त्यांच्या प्रयत्नांची फळे समाजात पसरता कामा नये म्हणून सरकारची सारी धडपड होती.

या खेपेस शिक्षण व समाजसुधारणा यांच्यासारखेच लोकांनी व्यापारउदीम व इतर उद्योगधंदे यांमध्ये पडावे अशाही त्यांनी प्रयत्न केला. पठाणांचा प्रश्न मूलतः आर्थिक स्वरूपाचा आहे, त्यांना शेतीची जमीन थोडी आहे, इतर उद्योगधंदे नाहीत, पाण्याचा सर्वत्र दुष्काळ, अशा परिस्थितीत डोंगराच्या खिंडी-कपारीतून वस्ती करून राहणाऱ्यांना शेजाऱ्यांच्या चोऱ्यामाऱ्या करणे हाच व्यवसाय राहतो. पण गाववस्ती करून राहणाऱ्या पठाणांच्या मध्येही काही व्यवसाय न करण्याचे संस्कार आहेत. त्यामध्येही सावकारी करणे धर्मबाह्य, तसेच व्यापारधंदा करणेही त्यांना अमान्य. यामुळे सर्व्या पठाणवस्तीत सावकारी व व्यापार करणारे फक्त हिंदू आहेत व ते पिढ्यान् पिढ्या तेथे सुखाने नांदत आले आहेत.

पठाणांचे हे विचार बदलावेत व त्यांच्या आर्थिक स्थितीत सुधारणा व्हावी म्हणून बादशहाखानांनी उतमझाई येथे लोकी व्यापारी पेढी काढली, एक दुकानही चालवले. या त्यांच्या प्रयत्नामुळे हिंदू व्यापाऱ्यांच्यामध्ये गैरसमज पसरविण्याचाही कित्येकांनी प्रयत्न केला. परंतु हे सर्वच प्रयत्न वर्षभरात संपुष्टात यायचे होते.

१९२० अखेरी म्हणजे हिजरत करून परत येताच बादशहाखान अलिगड येथे खिलाफत जलशाचे वेळी उपस्थित होते असे दिसते. पण ते बैठकीस हजर राहिले नव्हते. तेथे जमलेल्या इतर पठाणप्रमुखांशी मात्र आपल्याकडील संघटनेच्या दृष्टीने त्यांनी विचार केला होता. खिलाफत चळवळीकडे पाहण्याची त्यांची विशिष्ट दृष्टी होती. केवळ धर्माचे नाव घेऊन समोरच्या आपल्या समाजाच्या दुःखाकडे दुर्लक्ष करण्याचे धोरण त्यांच्या स्वभावाला पटत नाही. आपल्या घरचे प्रश्न सोडून जगातील प्रश्नांच्या मागे लागण्याची सवय हिंदी लोकांना आहे, तसे न करता आपल्या प्रश्नाकडे त्यांनी नीट लक्ष दिले असते तर स्वातंत्र्य जवळ आले असते असे ते म्हणत. त्याचमुळे पेशावर भागात खिलाफत शाखा असली तरी त्यात ते विशेष भाग घेत नव्हते. १९२१ मध्ये लाहोरच्या खिलाफत बैठकीस ते हजर राहिले. पण तेथील प्रमुख मुसलमान नेत्यांची भाषणे त्यांना पसंत पडली नाहीत. लाहोर मुक्कामात त्यांनी आपल्या शाळांसाठी दोन शिक्षक मात्र मिळविले. विधायक कामाची ओढ त्यांना विशेष लागली होती. लाहोरहून परत आल्यावर मात्र पेशावर खिलाफत

किती दिवस तुरुंगात होते याचा नीट उलगडा होत नाही रौलेट ॲक्ट (१९१९) चळवळीचे वेळी ६ महिने व या वेळी (१९२१) ३ वर्षे, पहिल्या खेपेच्या बंदिवासाची नीट माहिती उपलब्ध नाही

स्वत बादशाहखान यांनीच आपले जेलचे अनुभव, जेल सुधारणा घडवून आणण्याच्या दृष्टीने आपले 'पख्तून' पत्र (१९२८) सुरू केल्यानंतर त्यात प्रसिद्ध केले आहेत

१९२१ च्या डिसेंबरमध्ये ही शिक्षा झाली ते प्रथम मियानवाली येथील तुरुंगात होते, असे दिसते (यूनुस) पण त्यांच्याबरोबर तुरुंगात असलेले पंजाबचे जुने पुढारी लाला दुनीचंद यांनी लिहिलेल्या आठवणींमध्ये (मॅव्हेरिअर मेल, नेहरू-अंक, डेहराडून १९६१) डेरागाझीखान जेलमध्ये आपण एकत्र काढले असे म्हटले आहे स्वत बादशाहखान यांच्या लेखनात आलेले वर्णन हे डेरागाझीखानच्या जेलमधील असले पाहिजे, परंतु रात्रंदिवस हातापायांत जाड बेड्या व गळ्यात लोखंडी कडे अशा स्थितीत त्यांना त्यांच्या छोट्या चिरंजिवांनी पाहिल्यामुळे त्याला रडू कोसळल्याचे वर्णन आहे लाला दुनीचंदाच्या वर्णनात हा भाग नाही त्या अर्थी मियानवाली येथे प्रथम असलेल्या २-३ महिन्यांच्या कालातील ते वर्णन असले पाहिजे अलग एकाकी कैदेची शिक्षा, रोजचे १५२० शेरांचे दळण वगैरे वर्णन त्यांच्या लेखातही आहे या सर्व शारीरक्लेशाविरुद्ध त्यांनी कधी तक्रार केली नाही इतकेच नव्हे तर ज्या अधिकाऱ्यांना त्यांच्या या क्लेशाबद्दल दु ख वाटे त्यांची ते समजूत काढण्याचा प्रयत्न करीत सर्व शिस्तीचे नियम ते कसोशीने पाळीत तसेच जेलच्या काळ्या कारभाराविरुद्ध ते रास्त तो प्रचार करीत त्यामुळे अशा कैद्याची इकडून तिकडे बदली करीत ठेवणे येवढेच जेलच्या अधिकाऱ्यांच्या हाती राहते त्याप्रमाणे मियानवाली, डेरागाझीखान व गुजरात या जेलांमध्ये त्यांना फिरविले गेले

"१९२२ पासून ते पावणीच्या कालापर्यंत जेलमध्ये व जेलबाहेर बादशाहखानांचा आपला सतत संबंध राहिला, त्यांच्यासंबंधीचा आदर व श्रद्धा सतत वाढतच गेली" असे दुनीचंदांनी म्हटले आहे जेलमध्ये कोणत्याही मोहाला बळी न पडता किंवा कमलीच सवलत न घेता त्यांनी दिवस काढले उलट अनेक गुन्हेगार बंदिवानांना, त्याचप्रमाणे लाचखाऊ अधिकाऱ्यांना व गरीब नोकरांना त्यांनी सन्मार्गाला लावले बाहेरच्या जीवनाइतकेच बंदीशाळेतील जीवन आदर्श स्वरूपाचे ठेवणाऱ्या थोरेदच पुरुषांपरी ते आहेत या बंदिवासाच्या काळात त्यांनी जेलचे नियम कधीच मोडले नाहीत किंवा स्वत साठी काही सवड सवलत मागितली नाही "ज्याला तत्त्व सांभाळावयाचे आहे त्याने केव्हाच तडजोड करता कामा नये लहान लहान बाबतीत तडजोड करू लागलो म्हणजे त्याचा शेवट स्वाभिमान गमावण्यात होतो" लहान लहान सवलती मिळविण्यासाठी राजकीय बंदीही करे लाचारी पत्करीत,

पोलिसांकडून पैशाचे बळावर कशी कामे करून घेतात, याचे अनुभव अनेक राजबंद्यांना असतात, पण पोलिसांनी कोणत्याच हेतूने भ्रष्ट होऊ नये याबद्दल ते त्यांना उपदेश करीत अधिकाऱ्यांच्या लाचखोरीविरुद्धही त्यांनी मोहीम उघडली होती त्यांच्या उपदेशामुळे व तेवढ्या पगारात पोट भरता येत नाही म्हणून जेलमधील एका पोलिसाने नोकरी सोडली या साऱ्या प्रकारामुळे बादशाहखान जेल-अधिकाऱ्यांनाही उपद्रवाचे झाले होते त्यांच्या काही राजकीय सहकाऱ्यांसही त्यांची ही शिस्त नको होती शेवटी त्या जेलमधून त्यांना गुजरात ( पंजाब ) जिल्ह्याच्या जेलमध्ये पाठविण्यात आले

गुजरात जेलमध्ये बदलून आल्यानंतर तेथे त्यांचा पंजाबमधील इतर राजकीय कैद्यांशी संपर्क आला येथे त्यांनी गीता, ग्रंथसाहेब या दोन्ही ग्रंथांचा अभ्यास करण्याचे ठरविले परस्परांच्या धर्मग्रंथांची व धर्मभावनांची नीट कल्पना असेल तर स्नेहभाव वाढण्यास त्याची मदत होते या जाणिवेने हिंदू, मुसलमान व शीख बंदींनी गीता कुराण, ग्रंथसाहेब व बायबल यांचे वाचन परस्परांच्या साहाय्याने करावे असे बादशाह खान यांच्या सूचनेवरून ठरविले गेले धर्मग्रंथांच्या अभ्यासाचा हा कार्यक्रम काही दिवस चालला परंतु अभ्यासकांच्या अभावी तो लवकरच बंद करावा लागला स्वत त्यांनी या धर्मग्रंथांचा अभ्यास चालू ठेवला स्वत त्या अन्यधर्मीय मित्रांच्या प्रेमासाठी तरी प्रत्येकाने एवढे केलेच पाहिजे असे ते मानीत ‘पुन्हा पुन्हा वाचूनही गीता मला तेव्हा कळू शकली नाही मी अपरिपक्व होतो पण पुढे सन १९३० मध्ये अंदमानहून परत आलेले पं जगतराम यांनी मला ती नीट समजावली’ असे ते म्हणत स्वत त्यांनी इतर बंदी-बांधवांना इस्लाम धर्माची थोर तत्त्वे नीट समजावून सांगितली काही मुसलमान बंद्यांनाही ती माहिती नवीन होती त्यांच्या या व्यापक दृष्टिकोणामुळे खरोखरच कार्यकर्ते अधिक जवळ आणण्यास मदत झाली ते म्हणत ‘ धर्मनिष्ठा जर मानवाच्या आचारातून व्यक्त झाली नाही तर ती निष्ठा कसली ? माणसांची डोकी मोजून किंवा मतांच्या संख्येवरून धर्माचे सामर्थ्य मी मोजीत नाही इस्लाम म्हणजे कार्य श्रद्धा व प्रेम होय ( अमल यकीन-मुहब्बत ) एकाच परमेश्वरावर श्रद्धा ठेवून सत्कर्मे करण्याने मुक्ती लाभू शकते असे कुराण शरीफमध्ये स्पष्टपणे म्हटलेले आहे ’ ते म्हणतात, ‘प्रत्येक धर्मात त्या धर्माच्या अनुयायांना भरपूर स्फूर्ती किंवा मुक्ती देण्याचे सामर्थ्य आहे याची बरोबर जाणीव नसल्याने ही भांडणे होतात सर्व लोकांच्या व सर्व देशांच्यासाठी परमेश्वर आपले प्रेषित धाडीत असतो व ते त्या त्या देशांत धर्मनेते असतात ( प्रॉफेट्स् ) ते सगळे अधिकारी पुरुष असतात ( अल्-इन्किताब ) असे पवित्र कुराणात स्पष्ट म्हटले आहे याही पुढे जाऊन मी असेही म्हणतो की, सर्व धर्मांची मूलभूत तत्त्वे एकच आहेत तपशिलात फरक असतो त्या प्रदेशात जो धर्म

उदयास येतो तेथील परिस्थितीचा त्यावर प्रभाव पडलेला असतो यामुळे हे फरक पडतात या शिक्षेच्या काळात गीतेचे अध्ययन आपल्याकडून नीट रीतीने होऊ शकले नाही, "तो विषय आपल्या डोक्यावरून जात असे," असे ते म्हणत प्रधसाहेब व बायकल याचा ? त्यानी आस्थेने अभ्यास केला फक्त तेथे इदअनस्ता मिळू शकले नाही किंवा त्याची माहिती देणारेही कोणी न मिळाल्यामुळे तो विषय पाहिला गेला नाही

अखंड लोकसेवा हा बादशाहखानांचा स्थायीभाव निर्भयता ही त्याची शक्ती आहे दुःखी-दलित लोकांच्याबद्दलचे प्रेम त्याना कधी स्वस्थ राहू देत नाही यामुळे कोणताही संकट त्याना त्याच्या धर्मापासून म्हणजेच लोकसेवेपासून रोखू शकली नाहीत. तीन वर्षांच्या दीर्घ बंदिवासानंतर १९२४ मध्ये सुटताच त्यांनी पुन्हा आपले कार्य दुहेरी जोमाने आरंभले या बंदिवासाच्या काळात त्यांचा झालेला छळ, त्यांनी आनंदाने तोंड देऊन त्याही काळात जेल मध्ये केलेली देशसेवा ही पठाणांच्या कानापर्यंत व तेथून त्यांच्या हृदयापर्यंत पोचली अगदी अपरिहार्य होते त्यामुळे सुटकेच्या वेळी लोकप्रेमाच्या लाटेला भरती आली असली तर आश्चर्य कसले ? ते सुटून येताच उतमझाईस एक प्रचंड जिरगा (परिषद) जमला या जिरग्यात जवळ सर्व विचारांचे प्रमुख पठाण हजर होते त्याच प्रमाणे बादशाहखानाच्या आतापर्यंतच्या समाजसेवेमुळे आकर्षित झालेले तरुण कार्यकर्ते हजारोंच्या संख्येने जमले होते या महासभेत अत्यंत प्रेमाने त्यांचा गौरव करण्यात आला व त्या वेळी त्यांना "फक्र-अफगान" (अफगाणांचे भूषण) हा किताब देण्यात आला पहिल्या शिक्षेनंतर पठाणांनी त्यांना 'बादशाहखान' केले तर या शिक्षेनंतर त्यांनी नवी 'उपाधी' लावून पुढाल उपाधींचा प्रारंभ केला त्यांचे सारे जीवन केवळ उपाधिमय नव्हे तर उच्चतम गौरवास्पद यांनी व्यापलेले व अनेक मोल मूल्यांच्या जतनाने भरलेले असेच राहिले आहे

आपले वतन-वाडी-व्यापार सोडून पंजाबात रावळपिंडीस येऊन राहिले, व तेथे त्यांना एक वर्ष काढावे लागले हिंदी व्यापारी हेच त्या भागाचे सावकार, त्यामुळे सावकार व कुळे यामध्ये होणाऱ्या तंट्याचेही थोडे स्वरूप त्यात होते स्वत त्याच वेळी गांधींजीही तेथील पाहणी करण्यास जावयाचे होते, पण त्यांना सरकारने प्रतिबंध केला त्यामुळे मालवीयजी, कृपलानी, शिवप्रसाद गुप्ता आदी नेते यांनी रावळपिंडीस जाऊन तेथील निर्वासिताची परिस्थिती पाहिली, मालवीयजींनी तर रातोरात कोहाटला भेट दिली, तेव्हा तेथील मुसल मानानी त्यांचे स्वागत केले गांधींच्या उपोषणानंतर सीमाप्रान्तात सर्वत्र ऐक्यदिन साजरा झाला, पण त्याचमुळे राज्यकर्ते अधिक अस्वस्थ झाले

काँग्रेसमधील अंतर्गत मतभेद कसे मिटवावेत या चर्चेत व चिंतेत असता कोहाटच्या अत्याचारानी गांधीजींना व्यथित केले, व त्यातच त्यांनी आपला २१ दिवसांचा उपवास जाहीर केला (१८ सप्टेंबर) या सर्व परिस्थितीत बादशाहखानाच्या विधायक वृत्तीप्रमाणे ते जनतेमध्ये सतत फिरून खोट्या धर्मसमजुतींवर आघात करीत होते हिंदू-मुसलमानाची भांडणे ही या खोट्या धर्मसमजुतीमुळे होतात व जनता भडकवली जाते त्यासाठी समाज-मनावर संस्कार करण्याच्या उद्योगाम ते लागले होते त्यांना सुमारे वर्ष-दीड वर्ष (१९२४ २५) आपल्या प्रदेशात शब्दश गाव ते गाव अशी पदयात्रा केली धर्माच्या नावाखाली अशी भांडणे व असले अत्याचार घडणे हा आपल्या धर्माला कलंक आहे, राजकीय दृष्ट्या त्यात कोणते धोके आहेत हे ते आपल्या साध्या व स्पर्शदायी भाषेत सांगत असत आणि वझिरि-स्तानव्यतिरिक्त इतर पठाणमुलखात या दंग्याची लाट विशेषशी पसरली नाही याचे बहुतेक श्रेय त्यांच्या प्रभावी प्रचारालाच होते वझिरिस्तानातील ज्या हिंदू रहिवासी कायमचे स्थलांतर करून निघून गेले होते त्यानाही ग्रामस्थ पठाणप्रमुखांनी मनधरणी करून परत बोलावून नेले जातीय सलोखा व अहिंसातत्त्वाने कार्य करण्याची जरूरी या दोन बाबींवर या दोन वर्षांच्या प्रचारात त्यांनी भर दिला होता

राज्यकर्त्यांच्या या फोडाफोडीच्या धोरणास अनुकूलच पुढारी कसे सामान्यत होतात हेही लोकांपुढे त्या वेळी येऊ लागले होते स्वत तुर्की नेत्यांनी खिलाफत सपवली, त्याविरुद्ध तुर्कांना सल्ला देणाऱ्या भारतीय मुसलमान नेत्यांना तुर्कांनी चांगली चपराक दिली होती ज्या इंग्रजांनी तुर्की सत्ता हद्दपार नष्ट केली, त्या इंग्रजांचे हस्तक म्हणून त्यांनी जन्म घालवला त्यांनी आपल्यास सल्ला देऊ नये असे आगाखान व अमीरअली या बड्या मुसलमान नेत्यांना तुर्की वृत्तपत्रांनी बजावले होते आगाखान तुर्कस्तानात आल्यास त्यांना पकडण्याची आज्ञाही तुर्क सरकारने देऊन ठेवली होती तसेच ज्या इब्न सौदने मक्का-मदिनेतील दर्गे साफ करून टाकले त्या सौदला मदत देणाऱ्या मुस्लिम नेत्यांचीही त्याने चांगली गमाजा केली

होती. अशा रीतीने भारतातील खिलाफतवाले मुसलमान नेते किंवा सर सय्यद अहमद-ध पंथे ब्रिटिश सत्तेचे पोशिंदे पुढारी या दोहोंचीही जगातील स्वतंत्र राष्ट्रातील इस्लामी नेत्यांनी अशी समजना केलेली होती. इंग्रजी सत्तेच्या डावपेचांना बळी पडून त्यांचे साम्राज्य जगात भारतस्थांस मदत करणारे म्हणून इजिप्तचे नेते हिंदी मुसलमान नेत्यांची निर्भर्त्सना करीत असत.

कोहाटच्या दंग्याच्या निमित्ताने अलिबंधू महात्मा गांधींच्यापासून अलग झाले. कोहाट दंगलीचा जो वृत्तान्त हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांच्या एकमताने जो आला तोच गांधीजींनी स्वीकारला, पण शौकतअलींनी त्यावर मतभेद व्यक्त केला. येथून अलीबंधू गांधीजींपासून अलग होत गेले व त्याचा शेवट देशात जातीय तेढ माजविण्यात झाला. भारतातील हे जातीय वातावरण पाहूनच इतर अन्य राष्ट्रांची परिस्थिती पाहण्यासाठी बादशहाखान १९२६ मध्ये हाजयात्रेला गेले.



पण इब्न सौदने परिषदेच्या आदल्या दिवशी इतर राष्ट्रांच्या प्रतिनिधींशी विचारविनिमय करून सार्‍या अर्थाचे राजेपण आपल्याकडे घेऊन तसे जाहीर करून टाकले त्यामध्ये ही धर्मक्षेत्रे ( मक्का मदिना ) आलीच तेथील राजसत्तेचा प्रश्न असा उडवून लावल्याने हिन्दी प्रतिनिधी निराश झाले "असे राजेपण घोषित करणे हेही इस्लामी धर्मतत्त्वाविरुद्ध आहे" वगैरे मुद्दे उपस्थित करण्याचा प्रयत्न हिन्दी प्रतिनिधींनी केला असे दिसते परंतु परिषदेपुढे तो विषय येऊ शकला नाही असे दिसते

बादशहाखान त्या परिषदेत प्रेक्षक म्हणून उपस्थित होते "हेजाजची सत्ता व व्यवस्था निवडून दिलेल्या खलिफाकडे सोपविली तर या धर्मस्थानांचे रक्षण भारतीय प्रतिनिधी करणार आहेत का?" असा रोखठोक सवाल सादने भारतीयांना विचारला होता असे बादशाहखानांचे स्मरण आहे

जागतिक परिषदेच्या ५९ प्रतिनिधींमध्ये भारताचे १२ प्रतिनिधी हजर होते उपाध्यक्षामध्ये मा नदवींची निवड झाली होती त्यांची कीर्ती व विद्वत्ता इस्लामी जगात मान्यता पावलेली होती इब्न सादने या धर्मक्षेत्रांच्या सरक्षणार्थ सर्व इस्लामी देशावर प्रत्येकी ३०० पौंडांचा खर्च लादला तो मान्य करून हिन्दी नेते परतले होते

या यात्रेच्या निमित्ताने बादशाहखानांनी मक्केत जमलेल्या निरनिराळ्या देशांच्या प्रतिनिधींच्या गाठी-भेटी घेतल्या भारतीय परिस्थितीबद्दलची चर्चा केली त्या वेळी भारतीय मुस्लिम नेत्यांबद्दल स्वतंत्र इस्लामी राष्ट्रांच्या नेत्यांमध्ये किती आदर किंवा अनादर आहे हे त्यांना दिसून आले या परिषदेनंतर बादशहाखान, तेथून यांनी जद्दा, मदिना, इजिप्त, पॅलेस्टाइन, नेज्द, सिरिया, बसरा, इराण, कराची या मार्गाने व या देशांतून प्रवास केला हिंदी मुस्लिम मानांबद्दल इजिप्तमध्ये, निदान तेथील स्वातंत्र्यनिष्ठ लोकांत भारतीय मुसलमानांबद्दल काय भावना त्या वेळी होत्या याचा अनुभव त्यांना कसेस आला कैरो, अलेक्झांड्रिया ही स्थळे त्यांना पाहावयाची होती पण बंदरात पाऊल ठेवताच तेथील अधिकारी त्यांच्यावर कडाडला, "तुम जलील कोम हे, तुम्हें पेर रखना न देता, तुम गुलाम होकर तुम्हारे हाथोंसे जजीर बना देते और दूसरोंको गुलाम बनाते"–( तुम्ही पतित हीन दर्जाला पोचलेले लोक आहात स्वत गुलाम आहात आणि इतरांना गुलाम करणार्‍या शृंखला आपल्या हाताने तयार करून देत असता, तुम्हांला इथे पायही ठेवू दिला नसता ) कैरोच्या बंदरात त्यांची झालेली ही विटंबना ऐकून त्यांना काय वाटले असेल ही कल्पना करता येईल, आणि ही विम्बना सार्‍या भारतीय मुसलमानांची होती, त्यांची वैयक्तिक नव्हती यामुळे त्यांना विशेष दु ख झाले असणार! त्यामुळे कैरो-अलेक्झांड्रिया न पाहता त्यांना परत यावे लागले या दु खापेक्षा आपल्या देशातील यादी नेत्यांच्या धोरणामुळे सार्‍या भारतीय मुसलमानांची इतकी बदनामी झालेली आहे हे

पाहून त्यांना विशेष दुःख झाले. " आपण स्वतंत्र होण्याने अनेक गुलाम देशांना स्वातंत्र्य लाभेल, आमच्या नेत्यांना पण तुर्कांच्या विरुद्ध नाही तर आफ्रिका, चीन, मध्य आशिया, इराण, अफगाणिस्तान, ब्रह्मदेश, इन्डोनेशिया अशा किती तरी देशांत त्या वापरल्या गेल्या आहेत. आम्ही पण स्वतःच गुलाम न राहता इतरांना गुलामगिरीत ठेवण्यास सहाय्यक होत असतो " हे सूत्र बहुतेक इस्लाम देशांत त्यांना ऐकविले गेले त्यापासून योग्य तो धडा त्यांनी घेतला असणारच ! त्यांना स्वातंत्र्यप्रेमाचे बाळकडू होतेच, इजिप्त-तुर्कांच्या राष्ट्रवादाचे हे दर्शन मात्र त्यांना नवीन होते.



# ८

## ‘ खुदाचे सेवक ’ — संघटनेची उभारणी

१९२४ मधील सुटकेनंतरची ही दोन वर्षे वायव्यसीमा प्रान्त, स्वतंत्र पठाण मुलूख व स्वतंत्र आदिवासी राष्ट्रे यांमधील परिस्थितीचा अभ्यास करण्यात बादशहाखान यांनी घालविली सुमारे एक तपाच्या समाजसेवेमुळे व राजकीय तपश्चर्येमुळे त्यांच्याकडे नेतेपद धावत येत होते त्यांच्या प्रान्तात किंवा पठाण मुलखात अन्य नेते नव्हते असे थोडेच होते? पण सीमाप्रान्तात प्रभाव होता तो राज्यकर्त्यांच्या हस्तकांचा निरंकुशाच्या साम्राज्यशकटाला जुंपलेले असे हे नेते होते पैसा व प्रतिष्ठा यांच्या शिव्या त्यांच्या पायांखाली भरपूर होत्या त्याविरुद्ध बादशहाखानांना केवळ लोकसेवेच्या बळावर नवे नेतृत्व व नवी शक्ती निर्माण करावयाची होती इजिप्त-तुर्कस्तानात प्रवास करून येताच त्यांनी पुन्हा संघटनाकार्याला जोराने प्रारंभ केला

‘ पख्तून जिर्गा ’ किंवा ‘ तरुण अफगाण ’ ही नवी संघटना त्यांनी उभारली या संघटनेचेच प्रचारसाधन म्हणून “ पख्तून ” मासिक सुरू केले प्रचलित राजकीय कार्यपद्धतीची ओळख त्यांना झाली होती याचेच हे निदर्शक आहे पख्तून जिर्ग्यामध्ये त्यांच्याच शिक्षणसंस्थेतून तयार झालेला तरुणवर्ग त्यांना सामील झाला होता ‘ पख्तून ’ मासिकामधील लेखन ते स्वतःच बहुधा करीत परंतु लोकजागृतीत चेतना भरणारे काव्य, साहित्य व नाट्य हे विषयही त्यात भरपूर येऊ लागले त्यांची निर्मिती करणारा नवा साहित्यिकांचा वर्गही त्यांच्या कार्यकर्त्यांमध्ये जमा झाला होता त्यांच्या प्रचारामध्ये नाटके व स्फूर्तिदायक पवाडे यांचा भरपूर वापर त्यांनी करून घेतलेला आहे

या दोन वर्षांत या प्रचाराने त्यांनी आपला सीमाप्रान्त व त्यालगतचा मुलूख घुमवून

भरला. केवळ धर्मप्रचाराची दृष्टी त्यांच्या कार्यात केव्हाच नव्हती. शिक्षण व समाजसुधारणेवर त्यांचा पूर्वी भर होता. आता त्या जागी राष्ट्रवादी विचाराची शिकवण त्यांनी सुरू केली. पूर्वी इस्लामी धर्मसत्तेच्या रक्षणाचे उद्दिष्ट मुसलमानांच्यापुढे होते, तर साम्राज्यवादी लांडग्यांच्या तावडीतून आपले देश कसे सोडवावयाचे किंवा कसे वाचवावयाचे हा राष्ट्रवादी विचार अशी नगतात फैलावत चालला होता. या विचारांचा प्रभाव बादशाहखानांवरही झाला. इजिप्त, तुर्कस्तान, अफगाणिस्तान व इराण या चारी देशांत झगलूल पाशा, इब्न साद व रेझाशाह यांचे नव राष्ट्रवाद नव्याने निर्माण झाले होते. साम्राज्यवादी युरोपीय सत्ताधिशांच्या मगरमिठीतून यांना स्वदेशाला वाचवायचे होते. कमाल पाशाने खिलाफतीचाच निकाल केला. आंधळ्या धर्मवेडाचा फायदा घेऊन राजकीय कारस्थाने पिकविण्याचे मूळच कापून टाकले. अशा कारस्थानांमुळेच तरुण अफगाण राजा अमानुल्ला देशोधडीला लागला होता. ही सर्व राजकीय विचारांची वावटळ बादशाहखान यांनी पठाणांच्या दऱ्याखोऱ्यांतून उठविली. जातीजमातीमधील क्षुद्र मत्सर व भानगडी मोडणे यांवर त्यांनी पहिला हल्ला चढविला. जुन्या खानदानी जिर्गांचे जागी नवतरुणांच्या नव्या संघटना उभ्या केल्या. हीच पठाण मुलखातील पहिली क्रान्ती होती. मुल्ला मौलवींचा प्रभाव व टोळीप्रमुखांची जरब यागिस्तानभर होती. ती अगदी ढिली झालेली नव्हती. परंतु राष्ट्रवादी नव विचारांच्या वाऱ्यामुळे जसा वायव्य सीमा प्रदेश हा सुगंधित झाला होता त्याचप्रमाणे त्या विचारांचा फैलाव इतर पठाण मुलखातही पडू लागला. या दृष्टीने ही खरोखर विचारक्रान्ती होऊ लागली होती. बादशाहखानांच्या त्यागी सेवाशाली व तपस्वी जीवनाचा हा प्रभाव होता. त्यांच्या या उज्ज्वल धर्मनिष्ठ जीवनापुढे आंधळे व दुराग्रही नेतृत्व कोसळून पडत चालले होते. हा धोका टोळीवाल्यांच्या मुल्लामौलवीपेक्षा ब्रिटिशांना अधिक जाणवला.

'पख्तून जिर्गा' व 'पख्तून' मासिक यांच्या बळावर बादशाहखानांनी दोन वर्षांत आपल्या प्रान्तात व सभोवारच्या पठाण मुलखात खूप जागृती घडवून आणली. या नव विचारांचा अमल नीट शिस्तीने ठिकठिकाणी केला जावा, यासाठी स्वतःची शिस्तबद्ध स्वयंसेना निर्माण करणे त्यांना जरूर वाटले. त्या विचारातूनच १९२९ मध्ये खुदाई खिदमतगार ही पठाणांचा संपूर्ण कायापालट करणारी संघटना निर्माण झाली. संघटनेतील सैनिकांनी अहिंसानिष्ठेचे अपूर्व दर्शन भारताला व त्याहीपेक्षा ब्रिटिश राज्यकर्त्यांना घडविले व यामुळे १९३० च्या स्वातन्त्र्यआन्दोलनाने भारतात एका गांधींऐवजी दोन गांधी नांदत व वावरत असल्याचे जगाच्या निदर्शनास आले !

'खुदाई खिदमतगार' ही संघटना हा बादशाहखानांच्या विचार विकासातील व कार्य

नितळगनील एक महत्त्वाचा टप्पा आहे. सामाजिक चळवळी व लोकजागृती याचा बराच पडा त्यांनी गाळलेला होता. त्यांच्याजवळ तरुण कार्यकर्त्यांचा सचही चांगला जमला होता. त्यामुळे त्या कार्यकर्त्यांना योग्य अशी शिस्त लावण्यासाठी ही स्वयंसेवक-शाखा निघाली. संघटनेच्या या नावातच त्यांची ध्येयनिष्ठा सुस्पष्ट रीतीने समाविष्ट झालेली आहे. ते ईश्वराचे-अल्लाचे सेवक आहेत आणि खुदाची सेवाही त्याच्या सृष्टीच्या सेवेतूनच करावयास पाहिजे, ही त्यांची शिकवणही त्यांच्या कार्यकर्त्यांच्या अंत करणापर्यंत पोचली होती. त्यामुळे अवघ्या दोन वर्षांत त्यांनी आपल्या श्रद्धेचे व पराक्रमाचे प्रदर्शन पेशावर येथे प्रचीतीस आणून दिले.

या संघटनेचे नियम व तिचे उद्दिष्ट पाहिले म्हणजे हे पठाण-गांधी, गुजरातच्या गांधींप्रमाणेच स्वतंत्रपणे वाढत आलेले आहेत, हे लक्षात आल्यावाचून राहात नाही. त्यांच्या प्रतिज्ञेत पुढील निर्बंध आहेत—

( १ ) मी गंभीरपणे व सत्यनिष्ठेने माझे नाव दाखल करीत आहे.

( २ ) मातृभूमीच्या कार्यासाठी माझ्या सुखसोई व प्राण यांचा त्याग मी करीन.

( ३ ) अंतर्गत ( टोळीवाजीचे ) झगडे, हेवेदावे व भांडखोरपणा आदींपासून मी अलिप्त राहीन; कोठे जुलूम-अन्याय झाल्यास अन्याय करणाऱ्याच्या विरुद्ध व ज्याच्यावर अन्याय होईल त्याच्या बाजूस मी खडा राहीन.

( ४ ) दुसऱ्या कोणत्याही पक्षात मी दाखल होणार नाही; माझ्या संघटनेने परकीय सत्तेविरुद्ध लढा सुरू केल्यास माफी मागणार नाही.

( ५ ) मी अहिंसेच्या मार्गानेच नेहमी जाईन.

( ६ ) सर्व मानवजातीची सेवा समान भावनेने करीन, माझ्या देशासाठी व धर्मासाठी स्वातंत्र्य मिळविण्याचे माझे उद्दिष्ट राहील.

( ७ ) परमेश्वराला राजी राखण्याचे, त्याला संतोष देण्यासाठी माझे सर्व प्रयत्न राहतील. तसे करताना वैयक्तिक स्वार्थ, हेतू किंवा मेदभाव यांचा विचार करणार नाही.

ही संघटना पवित्र वर्षाच्या चळवळीनंतर बादशहाखानांनी निर्माण केलेली आहे, तसेच गांधीजींचा प्रत्यक्ष संबंध येण्यापूर्वीचे त्यांचे हे धोरण आहे, हे लक्षात ठेवले पाहिजे. अर्थात या वेळपर्यंत ( १९२९ ) ते तीन वेळा तुरुंगात जाऊन आलेले आहेत, व एका काँग्रेस बैठकीसही ते हजर राहिले होते ( १९२५, कानपूर ). परंतु गांधीजींच्या राज्यामधील तत्त्वज्ञान त्या वेळी पेशावरची सरहद्दी तोडून तिकडे पोचलेले नव्हते तरी शासन लढ्यात आपण शस्त्रधारीच्या राज्यकर्त्यांपुढे टिकू शकणार नाही व तत्त्वनिष्ठेपुढे सत्ताधाऱ्यांचे शस्त्र बोथट होऊ शकेल हे त्यांनी पुरेपूर ओळखले होते. आपल्या शस्त्रत्यागाच्या धोरणामधील पार्श्वभूमी देताना ते एके ठिकाणी म्हणतात—

“आपल्या प्रान्तात कामाला लागलो त्या वेळी आमचे लोक आपापसांत एकमेकांचे निर्दयपणे खून करतात याची पुष्कळ उदाहरणे मी पाहिली त्याचा परिणाम माझ्यावर झाला हे असेच चालले तर आपला सर्वनाश होईल, अशी भीतीही वाटली त्यांना या हिंसामार्गापासून परावृत्त करून वेगळा मार्ग दाखविणे कर्तव्य आहे असे वाटले हा दुसरा मार्ग म्हणजे सत्याचा, शान्ततेचा व इतरांच्या जीविताबद्दल कदर राखण्याचा होय आमच्या लोकांचा-पठाणांचा-इतिहास मी वाचलेला होता व आमच्या पूर्वजांबद्दल मला अभिमानही वाटतो, पण त्याबरोबरच त्यांच्या दोषांचीही मला जाणीव होती पठाण एकमेकांच्यावर प्रेम करण्यास शिकले तर कोणतीही सत्ता त्यांना चिरडू शकणार नाही ”

बादशाहखानांना अहिंसेचे दर्शन अशा रीतीने झालेले होते पठाणांना त्यावाचून नीट जगताच येणार नाही आपसांतील लढ्यातच त्यांचे सर्व रक्त वाहत असते, हे त्यांच्या विचारक्रान्तीचे मूळ होते महात्माजींचे तत्त्वज्ञान, त्यांची ही निष्ठा जागृत व खंबीर करण्यास व त्या गरजेचे दर्शन घडविण्यास खास उपयोगी पडलेले आहे पुढे गांधीजींशी संपर्क आल्यावर त्यांनी ते ऋण अनेक ठिकाणी व्यक्त केले खुदाई खिदमतगारांची प्रतिज्ञा जशी अर्थपूर्ण व त्यांचे उद्दिष्ट व मार्ग स्पष्ट करणारी आहे त्याप्रमाणे त्यांचे ध्वजगीत किंवा समूहगीतही स्पष्ट व अर्थबोधक असे आहे

—१—

आम्ही खुदाचे सैनिक आहोत
संपत्तीची किंवा मृत्यूची आम्हाला कदर नाही
आम्ही आणि आमचे नेते, आम्ही पुढे चालतो आहोत
मृत्यूला भेटण्याची आमची तयारी आहे

—२—

खुदाचे नाव घेऊन आम्ही पाऊल टाकीत आहोत
आणि त्याच्याच धर्मासाठी आम्ही बलिदान करीत आहोत.
त्याच्याच नावाने आम्ही सेवा करीत आहोत
त्याचेच आम्ही बंदे आहोत

—३—

खुदाच आमचा बादशाह
तोच सर्वश्रेष्ठ आहे !

आम्ही आमच्या धन्याची सेवा करतो ।
त्याचेच आम्ही चाकर आहोत ।

—४—

आमच्या देशाची सेवा ।
आमच्या श्वसनातूनही आम्ही तेच करतो।
त्या थोर देशसेवेसाठी ।
मृत्यू आला तर महद्भाग्य ।

—५—

आमचे लोक आणि त्यांचे कार्य
त्यावर आमचे प्रेम आहे व तेच आम्ही करतो ।
आझादी आमचे ध्येय आहे ।
आमची मान त्याची किंमत आहे ।

—६—

आमच्या देशावर आमचे प्रेम आहे ।
आमच्या अंतरात त्याच्याबद्दल आदर आहे ।
निर्धाराने त्याचे रक्षण करू ।
खुदाची सेवा त्यानेच होणार ।

—७—

बंदूक व तोफ यांची डर कोणाला ?
सैनिक येवोत किंवा घोडदळ येवो ।
आमचे कार्य आणि कर्तव्य ।
यामध्ये कोणीच आडवे येऊ शकणार नाही ।

स्वात नदीच्या शांत शीतल वेदगंगेवरची प्रचंड लाटांचा खळखळाट व्हावा व समो-वारच्या पहाडांना तडे उठावेत असा निर्धार या शब्दांत प्रगटविला गेला, हे सारे काव्य बादशाहखानांच्या समोवार जमलेल्या तरुण पठाणांचे होते. त्यांची अंतःकरणे पोलादी निश्चयाने व धगधगत्या तेजाने भारलेली होती. त्याचा नमुना त्यांच्या समर-गीतांत दिसून येतो. त्यांच्या त्या बँड-पाइपवर जेव्हा हे स्फूर्तीचे गीत हजारो सैनिक शिस्तीने मार्च करीत असत तेव्हा त्या वेळी ब्रिटिश सेनाधिकाऱ्यांना हेवा वाटला अगदी आश्चर्य वाटले ! स्वाभाविकच त्यांच्याविषयी दडपशाही धोरणाने पावले टाकीत आले व त्यावरून ब्रिटिश सरकारची आपुर्मर्यादाही झपाट्याने घसरत चालली.

पठाण हा स्वभावतःच रसिक आहे, कविहृदयी आहे, व तत्काळ भावनावश होणारा आहे. शब्दाशब्दातून राष्ट्रप्रेमाचे सिंचन करणारा खुदाईखान हा त्यांचा स्फूर्तिदाता होता. बादशाहखानांनी आपल्या प्रचारतनात या काव्यगुणांचा भरपूर उपयोग करून घेतला हे तरुण नवी नवी नाटके करून दाखवीत त्यामुळे नवविचारांच्या प्रचाराबरोबर स्वाभिमान जागृतीही त्वरेने होई. खुदाई खिदमतगारांची संख्या १९२९ मध्ये पुरी पाचशेही नसेल. सरकारी दडपशाहीच्या पुण्याईने व निर्भय बलिदानामुळे १९३१-३२ मध्ये ती एक लाखावर गेली होती आणि या संघटनेसाठी पोटून बाहेरून पैसा-अन्य कसली मदत आली नाही, ती न घेण्याची व स्वावलंबाने व गरीबीचे जीवन घालविण्याची त्यांची निष्ठा होती. उलट आपल्या संख्याबळावर ते आणा दोन आणे वर्गणी करून मोठमोठी शिबिरे, सभा, बैठका घडवून आणीत. अल्प काळात या संघटनेने स्वतःचे सामर्थ्य निर्माण केले व त्याच-प्रमाणे जनतेचा विश्वासही संपादन केला. शब्दांच्या प्रवचनाऐवजी आपल्या जीवनातून व नियाच्या आचारातून बादशाहखानांनी या हजारो तरुणांचे जीवन निर्माण व साकार केले होते. त्यामुळे ते स्वतःच त्यांचे एकमेवाद्वितीय असे दैवत बनले होते.

दडपशाहीमुळे लोकजागृतीचे काम कसे पोसावते याचा अनुभव सर्वत्रच येतो. अहिंसात्मक चळवळीने तो भरपूर आला आहे. अहिंसेने जनतेला निर्भय केले ही त्यातील मोठी शक्ती होती. जालियनवालाबागेतील पाशवी अत्याचाराने सारा देश हादरून निघाला. त्याहीपेक्षा मोठा फायदा म्हणजे स्वतः गांधीजींचा साम्राज्यसत्तेकडे पाहण्याचा दृष्टिकोण संपूर्णतया बदलला. अमृतसर काँग्रेस (डिसेंबर १९१९) मध्ये साम्राज्यसत्तेला सहकार्य द्यावे म्हणून आवर्जून विनविणारे महात्माजी अवघ्या सहा महिन्यांत त्या साम्राज्यशाहीला सैतानी असे संबोधून तिच्या तत्काळ नाशाच्या तयारीला लागले. ही किमया डायरशाहीचीच ठरली असे मानणे अवास्तव नाही. लोकभावना स्वार्थी राज्यकर्त्यांना नीट ओळखताच येत नाही, ते दडपशाहीच्या शस्त्रावर अधिक विश्वास ठेवतात व त्याचा परिणाम उलटाच होतो.

बादशाहखान यांना सरहद्द गांधी करणारी जालियनवाला-बाग म्हणजे पेशावरचे २३ एप्रिल १९३० चे हत्याकाण्ड होय. वस्तुतः तेथील त्या दिवसांच्या घटनांशी बादशाह खानांचा तितकासा संबंध नव्हता, पण वायव्य सीमा प्रदेशातील नवजागृतीचे जनक ते असल्याने व पेशावर गोळीबारानंतरच्या दडपशाहीत साऱ्या खुदाई खिदमतगारांना भरडून टाकण्याची शिकस्त झाली असल्याने या यशाचे श्रेय त्यांच्याच पदरात पडणे योग्य आहे.

२३ एप्रिलच्या घटाणी जालियनवाला-बागेची स्मृती पुसून टाकण्याचा प्रयत्न सरकारने भरपूर केला. तेथे झालेल्या रक्ताचे भीषण दर्शन जगाला होऊ नये म्हणून पेशावरची तटबंदी चिरेबंदी करून टाकली. पण खुनाची घाण झाकली जात नाही, त्यामुळे व

विशेषत नि शस्त्र जनतेचे शान्ततेचे वर्तन पाहून गढवाली पलटणीच्या दोन तुकड्यातील सैनिकांनी वरिष्ठांचे हुकूम अमान्य केले, लोकांवर गोळ्या झाडण्याऐवजी स्वत गोळ्या खाण्याची हिम्मत दर्शवली, या अपूर्व घटनेमुळे ब्रिटिश सेनाधिकाऱ्याना हादरा बसला! या वार्ता ऐकून जगातील वार्ताहर त्या पुण्यक्षेत्राची पाहणी करण्यास धावले, आणि त्याच्या सरकारी डावपेचावर मात करून त्याही परिस्थितीत काँग्रेस चौकशी मडळाचे काम पचे करणाऱ्या पटेल-समितीच्या अहवालाने हे बलिदान अमर करून ठेवले! नेत्यांचे ह राष्ट्रीय ऋण इतिहासाच्या अभ्यासकांना जाणवल्यावाचून राहात नाही

१

# सत्याग्रही संस्कृतीची प्रचीती

२३ एप्रिलच्या हत्याकांडाचा साग्रसंगीत पुढीलप्रमाणे आहे—१९२९ च्या लाहोर काँग्रेसच्या बैठकीस शेकडो पठाण हजर राहिले होते रावी तीरावर उठलेल्या जयघोषांचे निनाद स्वाती-काबूल नद्यांच्या काठांनी उठत गेले खुदाई खिदमतगार हे प्रत्यक्ष काँग्रेस-छत्राखाली पेशावर हत्याकांडानंतर आले हे खरे असले तरी साम्राज्यसत्तेला आव्हान देणारी गांधीजींच्या चढाऊ राजकारणातील रग स्वाभिमानी पठाणांना हर्षात डुलवीत चालली होती ते काँग्रेसमध्ये नसले तरी त्यांची मने काँग्रेसमय झाली होती त्यामुळे दांडी मोर्चा सुरू होताच पठाणांच्या पगडी मुलखातही चळवळीचे वारे नव्हे तर वादळ उठू लागले होते खुद्द पेशावरमध्ये दहादहा वर्षे काँग्रेसचे कार्य करणारे व गांधीजींच्या अग्निमार्ग प्रतिकाराकडे ओढले गेलेले कार्यकर्ते होते डॉ घोष, अमीरचंद बम्बाल, अल्लाबक्षखान सांजरी, अब्दुल जलील नदवी, मिल्खासिंग आझाद आदी त्यांमध्ये प्रमुख होते या काँग्रेस संघटनेने व खुदाई खिदमतगार स्वयंसेवकांनी लाहोर काँग्रेसचा स्वातंत्र्याचा ठराव खेडोपाडी नेऊन पोचवला तेथल्या सरकारी अधिकाऱ्यांना हे सर्व दिसत होते त्यामुळे त्यांनी ठिकठिकाणच्या कार्यकर्त्यांची धरपकड सुरू केली या दडपशाहीच्या प्रतिकारार्थ स्थानिक कार्यकर्त्यांनी दारू-दुकानापुढे निरोधन चळवळ आरंभली हा प्रारंभ दिनांक ५ एप्रिलला झाला, पण दारूमक्तेदारांनी थोडी मुदत मागितल्याने काँग्रेस-कार्यकर्त्यांनी ५ एप्रिलऐवजी २२ एप्रिल ठरवून दिली त्याप्रमाणे पद्धतशीरपणे ही चळवळ चालू होती

दिनांक २२ लाच अखिल भारतीय काँग्रेस समितीने लाहोर बैठकीच्या वेळी नेमलेली चौकशीसमिती पेशावरकडे निघाली वायव्य सीमाप्रांतात चालू असलेल्या दडपशाहीची

पाहणी करण्यासाठी ही समिति [ डॉ सय्यद महमद, लाला दुनीचंद व मो पाबुरी ] नेमली होती सदर समिती अटक येथेच अडवली गेली त्यांना प्रतिबंध करून परत पाठविले त्या वार्तेमुळे पेशावर व इतर प्रमुख ठिकाणी निषेध व्यक्त करण्यासाठी सभा, मिरवणुका निघाल्या त्यावेळी पेशावरला नऊ प्रमुख नेत्यांना पकडले दिनांक २३ च्या धरपकडीविरुद्ध पुन्हा सभा मिरवणुकी सुरू झाल्या ज्या दोन नेत्यांना, पोलिसांना पकडावयाचे होते ते आपण होऊन पोलिसांच्या स्वाधीन झाले त्यानंतरच्या प्रत्यक्ष अत्याचाराचे साधत व साधार वृत्त विठ्ठलभाई पटेल-अहवालात आहे विठ्ठलभाई पटेल व पं रणधीर पंडित ( विजया लक्ष्मींचे यजमान ) यांनी ही चौकशी पुरी करून व विनासद हा अहवाल प्रसिद्ध करून या समितीने किती मोठी देशसेवा केली आहे, हे सदर अहवाल वाचण्यानेच ध्यानी येते याशिवाय अनेक ल्हान मोठी चोपडी स्थानिक कार्यकर्त्यांनी प्रसिद्ध केली आहेत या चळवळीतील एक नेते मिलापसिंग आझाद यांनी लिहिलेल्या एका लेखात ( Dawn of Gandhian Era in the N W F P ) पुढील वर्णन आहे —

" ३१ मार्चच्या सुमारास पेशावरमधून हद्दपार असलेले अमीरचंद बम्बवाल २।३ दिवस आधी, एके रात्री चोरून पेशावरला आले दिनांक ६ एप्रिलचा हरताळ पाळावा अशी भारतीय पुढाऱ्यांची विनंती त्यांनी निवेदन केली, पण त्या परिस्थितीत हे सर्व अशक्य वाटले कोणतेच स्वातंत्र्य नागरिकांना नव्हते, पण २।३ दिवसांत सगळीकडे भित्तिपत्रके चिटकविली गेली होती "

" तारीख ६ एप्रिलला हकीम महमद अस्लमखान सांजरी हे सकाळी आले व अत्यंत दुःखाने, ' काही करता येणार नाही का ? ' असे म्हणाले आम्ही उभयता आमची दुकाने बंद करून डॉ घोष यांच्या दवाखान्यात गेलो हकीम नदवी बरोबर होते नंतर चौघे शहरभर हिंडत राहिलो आश्चर्य हे की सध्याकाळपर्यंत सर्वत्र कडक हरताळ पाळला गेला ! व कधी न झालेली अशी प्रचंड जाहीर सभा शाहीबागेत डॉ दत्त यांच्या अध्यक्षतेखाली झाली नंतर रोजच्या रोज अशा सभा मिरवणुका निघू लागल्या व त्यांचा विस्तार शहराची हद्द ओलांडून खेड्यापाड्यांत पोचला "

खुदाई खिदमतगार ही संघटना मुख्यत खेड्यापाड्यांत वाढत होती त्यांच्यातील दहशतीच्या गप्पांनी व अहिंसेच्या शिस्तीने दोन वर्षांत त्यांची मानसिक तयारी करून आली होती त्यामुळे वाऱ्याबरोबर चालत्या गवताचे डोंगर पेटत जावेत तसे हे शान्ततेच्या चळवळीचे रान पेटत गेले

२३ एप्रिलला दारूदुकानांवर पिकेटिंग सुरू झाले ते योजनापूर्वक शिस्तीने व शान्ततेने चालू झाले मिस्टर गिब आपल्या रिपोर्टात म्हणतात, " त्या आठवणी अपूर्व ( १९६१ )

मारत्या अन करून विनक्षण फतुरा व काव्याकाव्य निर्माण करतात सत्याग्रहींचा चढमान-पणे धरपकड सुरू झाली इकडे लोकांच्या शान्ततापूर्ण जमावावर वदुका चालवण्यात आल्या तोपही डागण्यात येऊन लोकांचा शब्दश चेंदामेंदा करण्यात आला थोड्याच वेळात सवा समितीच्या स्वयसेवकांनी कॅप्टन-दक्षपुढ तीन मृतांची प्रेते आणून टाकली जमावाचा क्षोभ भयंकर वाढत होता पण त्या परिस्थितीत कॅप्टन-दस्तात्रय फडकणारा राष्ट्रध्वज अधिकाऱ्यांना अधिक बुज्जीत होता दमणच्या व्हरांड्यात बक्षाल दिसले त्यांना पाहून ' झेंडा खाली उतरा ' असा हुकूम पोलिस अधिकाऱ्यांनी सोडला ते न जुमानता बक्षाल खाली निघून गेले, पण असिस्टंट कमिशनर कॉब यांनी झेंडा उतरून त्याच्या स्वाधीन करण्याची आज्ञा केली ११ व्या शाख पलटणीचे कर्नल गॉडन यांनी तशीच आज्ञा बक्षाल यांना केली, पण बक्षाल यांनी न ऐकल्याने त्यांना टोमे लगावण्यास सुरुवात केली स्वत कर्नल गॉर्डन यांना त्यांना खाली पाडल्यावर लाथा मारण्यास सुरुवात केली, पण डॉ खाव यांना ते थांबवले

येवढ्यात गोऱ्या सनिकांनी राष्ट्रध्वज उतरून खाली फेकला व डॉ गार्डन याने तो पायाखाली चुराडून टाकला हजारो लोकांच्या जमावापुढे हा सारा नगा नाच सुरू होता स्वत बक्षाल हे जुने क्रान्तिकारक व शरीराने पुरे धिप्पाड आहेत आजही ८० वर्ष ओलांडल्यानंतर त्यांचे शरीर एकदोन गॉर्डनना खेळवू शकेल अशा ताकदीचे आहे पण शस्त्रबळापुढे तेथे फक्त शान्तताच लोकांचे धर्य टिकवू शकली त्याप्रमाणे रिस-सारबानी बाजाराजवळ हजारोंच्या जमावावर गोळ्या झाडल्या जात असता स्त्री पुरुष आपली जागा न सोडता आपली प्रेते पत्करून बसले होते ते वर्णन पटेल-अहवालात आहे विशेषत सरदार भगतसिंग आपली पत्नी व मुले यांना टांग्यातून घेऊन चालले असता टांग्यातील बाई व त्यांचे लहान मूल यांच्यावर गोळ्या झाडल्या गल्या व त्यांची प्रेते लोकांनी ताब्यात घेऊ नयेत म्हणून त्यांच्यावर पुन गोळीबार केला असले हे अमानुष नव्हे तर इतिहासातील कोणत्याही अत्याचारांना लाजवणारे प्रसंग तथे घडले त्यांची तुलना पडित नेहरूनी १८५७ मधील काही अत्याचारांशी केली आहे आणि इतका भोग ज्या पठाणानी दिला त्यांनी त्याविरुद्ध काही गवगवाही केला नाही हे ऐकून पत्रिकांच्या डोळ्यातून पाणी वाहू लागले या अत्याचारांची कहाणी मान्तिनी ' धम इंडिया'मध्ये दिली आहे ( A pilgrimage for peace ) त्यावरून या शूर वीरांची निष्ठा स्पष्ट होते मुले, स्त्री-पुरुष यांच्या पुढील रांगांमधील लोक घायाळ होऊन पडल्यानंतर मागील लोक आपली छाती उघडी करून पुढे सरसावले कित्येकांच्या शरीरांवर २०-२० गोळ्यांच्या जखमा झाल्याचे आढळून आले आणि इतक्या हलकल्लोळातही त्या लोकांनी आपली जागा सोडली नाही एका तरुण शीख मुलाने पुढे होऊन गोळी घालण्याचे आव्हान एका

सेनिकाला केले, आणि त्या शिपायानेही तात्काळ गोळी घातली ! तो मुलगा जागच्या जागी मरून पडला एक वृद्ध बाई आपली नात्यागोत्याची माणसं जखमी झालेली पाहून पुढे झाली तिच्यावर गोळ्या झाडण्यात आल्या ती जखमी होऊन पडली एकाच्या खांद्यावर चार पाच वर्षांचे मूल होते त्याला ही फत्तल पाहवली नाही तो त्वाने पुढे झाला व ' घाला पाहू मला गोळी ! ' असे म्हणाला त्या पावर गोळी घातली व तो जखमी होऊन पडला असे एकामागून एक लोक गोळीबाराच्या पुढे चालत गेले पुढे पडलेली प्रेते हाताने मागे केली जात व तेथे नवे लोक पुढे होत ' गांधीजींच्याकडे पाठवलेली ही माहिती एका जबाबदार पंजाबी मुसलमान नेत्याने पाठविली होती

पण स्वत एका लष्करी अधिकाऱ्याने ' इंडियन डेली मेल ' या ब्रिटिश वृत्तपत्रात प्रौढीने प्रसिद्ध केलेल्या वृत्तान्तात या सेनिकांचा उन्माद किती पराकोटीला गेला होता हे स्पष्ट होते तो अहवाल खोटा अगर अवास्तव मानण्याचे काही कारण नाही तो म्हणतो

" वृत्तपत्रात प्रसिद्ध झाले आहे त्यापेक्षा किती तरी पट अधिक वेळ हा गोळीबार चालू होता हे मी सांगू शकतो त्या मूर्खांना आम्ही चांगला धडा दिला आहे तो ते आता कधी विसरू शकणार नाहीत आमचे लोक ( गोरे सैनिक ) पुगारी व चळवळे लोकांना निवडून काढून त्यांना गोळ्या घालीत होते पोलिस त्यांना हे लोक दाखवीत होते बंदुकींच्या धोक्याशिवाय परी किंवा वार करण्याचीही बात नव्हती अखंड चाललेल्या गोळीबाराचा तो प्रकार होता '

या पाशवी स्वाभिमानावर भाष्य करण्याचे कारण नाही गोळीबाराचे प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष समर्थन करणाऱ्यांना ते परस्पर उत्तर आहे जनता पूर्णपणे शान्ततेने वागत होती सरकारी पुराव्यात म्हटल्याप्रमाणे चौकीजवळ कोणालाही नव्हत्या हानी पुरावा काही सरकारी अधिकाऱ्यांच्या साक्षीतून ( सरकारी चाकरी ) पटेल कमिशनने नोंदलेला आहे

पठाणांनी तत्काळ मरावयास जाऊन आपल्या बंदुकीस हात घालणारा पठाण अशा रीतीने अत्याचारापुढे आहुती देण्यास तयार झाला हे अद्भुत दृश्य दाखवणारी ही स्मिरणीय घटना पेठ आहे ! पेशावरच्या या जालियनवालाबागने दुसऱ्या पठाण गांधींची कीर्ती जगभर केली आणि ही बांधीव अहिंसानिष्ठा एकदा नाही दहा वेळा त्यांनी प्रजातीला आणून दिली ही निष्ठा भारतात अन्य कोठेही फसलेल्या उतरलेली नव्हती व नाही या भीषण हत्याकांडानंतर ता २४ ते २८ हे तीन-चार दिवस पेशावरची सर्व सत्ता तेथील अधिकाऱ्यांनी जनतेच्या हाती सोडली होती पोलिस घाबरून निघून गेले होते, अशी आवई उठवली होती तथे इमानी सत्ता चार दिवस नव्हती हे सत्य होते परंतु त्याची कारण वगळी होती, या पाशवी अत्याचारांना शोभणारे असेच ते धोरण होते ते म्हणजे पर्लमेंटच्या स्वतंत्र डोंगराळ जमातींच्या टोळ्यांना पेशावरवर आक्रमण करण्याची संधी राज्यकर्त्यांनी दिली होती पण ह

आश्चर्यही बादशाहखानांच्या मेंनमुळेच निष्प्रभ ठरले. येथीळ वाऱ्यामधील काही गोरे गोऱ्या शिपायांसारखे पेपथी किंवा बाह भुक्लेले असणार! त्यांनी पेशावरला लुटालुटीसाठी हल्ले चढवले; परंतु त्यापूर्वीच खुदाई खिदमतगारांच्या चौक्या-पहारे तेथे हजर झाले होते. त्यांच्यामुळे या दोळधाडींचा विशेष प्रभाव पडला नाही. त्यातून हिंदु-मुसलमान ही भांडणे निर्माण करण्याचा दुसरा दुष्ट हेतूही शासकांचा होता, परंतु हिंदू कुटुंबांतील स्त्रिया व मुले यांचे संरक्षण केवळ खुदाई खिदमतगारांनीच नव्हे तर इतर पठाणांनीही आपल्या बहिणी-मातांप्रमाणे केले. बादशाहखानांच्या निर्धारपूर्ण कार्याचा हा प्रभाव होता. पेशावरमधील किंवा इतर शहरांतील राजकीय जागृती काँग्रेस-संघटनेच्या द्वारे, काँग्रेस-नेत्यांनी केलेली होती. पण त्या काँग्रेस कार्यकर्त्यांमध्ये व विशेषतः जनतेत व खेड्यापाड्यांमध्ये व त्याचप्रमाणे आसपासच्या स्वतंत्र टोळीवाल्यांच्या जगामध्ये जी माणुसकी जागृत झाली होती, निर्भर तत्त्वनिष्ठेचा जो उदय होऊ लागला होता, तो बादशाहखानांच्या अखंड सेवेचा प्रभाव होता. शस्त्राचा वापर करून पाहिल्यानंतर नि:शस्त्र मार्गाकडे वळलेल्या खुदाई खिदमतगारांच्या सेवेचा तो प्रभाव होता. या पेशावर दंगलीच्या निमित्ताने व नंतर १९३२ मध्ये सीमाप्रदेशात दहशत बसविण्यासाठी "लष्कर, रणगाडे, विमाने यांचा मुक्तपणे वापर केला होता. जून महिन्यात ५०० टन बॉंब पठाणांच्या वस्तीवर फेकले होते."

१९३० मध्ये डॉ. खानसाहेब प्रथम पकडले गेले नव्हते. त्यांनी त्या वेळच्या खुदाई खिदमतगारांमधील चळवळीचे वर्णन केले आहे. ता. २४ ला पेशावरचे अत्याचार व बादशाहखानांची अटक यामुळे उतमझाई येथे गडबड होईल असे वाटून ते तातडीने तिकडे गेले. तेथे घोडदळ पोचले होते. डॉ. खानसाहेबांनी लोकांच्याकडे बंदुका होत्या त्या मागून घेतल्या. सभेत हजारो लोक जमले होते. स्त्रिया व मुलेही जमली होती. "तेथे काही दंगा-जास्त घडल्यास ते त्यांना सहन करणे शक्य नसेल त्यांनी सभास्थान सोडून जावे" अशी विनंती त्यांनी केली, परंतु सभेतून कोणी हालले नाही. स्त्रियांनीही आपली जागा सोडली नाही. (गांधी-गौरवग्रंथ, ऑक्टोबर-१९४४)

हे सर्व काँग्रेस जन किंवा त्यांचे पक्षपाती यांचे पुरावे आहेत असे कोणी म्हणेल, पण सर फजली हुसेन यांनी पठाणांच्या या अहिंसानिष्ठेबद्दल व तेथील राज्यकारभाराच्या निष्ठुरतेबद्दल दिलेला निर्वाळा हा कोणाला अमान्य करता येणार नाही. ते त्या वेळी (१९३०-३५) व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळाचे सभासद होते. त्यांच्या रोजनिशीतील उतारे अनेक महत्त्वाच्या घटनांवर प्रकाश पाडणारे आहेत. ते म्हणतात :

"वायव्य सरहद्द प्रान्ताचा या वेळचा कारभार अत्यंत अप्रिय होता. लोक जिकिरीला आलेले होते. सुशिक्षित तरुणांना आपल्या कर्तृत्वास कोठेही वाव मिळत नाही याचा

त्यांना विषाद वाटत होता इतर प्रान्तांतील राजकीय अधिकार आपल्या प्रान्तास उपभोगता येत नाहीत याबद्दल त्यांच्यामध्ये असमाधान होते राज्यकारभारात ते वैतागलेले होते (Disgusted)".

"स्थानिक अधिकारी दाखवतात त्याप्रमाणे ही चळवळ (खुदाई खिदमतगार) शान्ति भारकांची वगैरे नाही ती जबाबदार नेत्यांनी उभारलेली आहे, तिच विचारी उदार पक्षाचे -मॉडरेट-आहेत"

"खुदाई खिदमतगार ५०-५० हजारांच्या सभा शान्ततेने पार पाडतात ता २४ एप्रिलला लष्कर काढून घेतले (पेशावरमधून) आणि तेथे तत्काल शान्तता प्रस्थापित झाली ता ४ मे ला पुन्हा लष्कर आले व पुन्हा अस्वस्थता निर्माण झाली धर पकड सुरू झाली" (Fazali Husain by Azim Husain)

फझली हुसेन हे पंजाबचे एक जबाबदार वृत्तीचे प्रमुख नेते होते ते सरकारच्या विश्वासातले असले तरी स्वतंत्र बाण्याचे होते त्यांनी पंजाबच्या राजकारणात मुस्लिम लीगला प्रवेश करू दिला नव्हता ते अवेळी पैगंबरवासी झाले नसते तर भारतातील जातीय चळवळीला जे वळण लागले ते लागू शकले नसते, असे त्यांच्या चरित्राच्या प्रस्तावनेत श्री राजगोपालाचार्य यांनी म्हटले आहे

सीमाप्रान्तास लष्करी कायदा लागू करण्याविरुद्ध मत देताना त्यांनी "आपल्यापुढे आलेली (सरकारी) माहिती असमाधानकारक व संशय वाटणारी अशी आहे वस्तुस्थिती कळेपर्यंत हुकूम काढणे बरोबर होणार नाही केवळ दडपशाहीच्या बळावर फार वेळ शान्तता राखता येणार नाही" (फझली हुसेन डायरी, ता २६, २७, २९ मे १९३०)

२४ एप्रिलच्या पेशावर अत्याचारात बळी पडलेल्या व पीडित झालेल्या लोकांना साहाय्य करण्यासाठी प मालवीयजींनी परवानगी मागितली होती ती सरकारने नाकारली होती त्यासंबंधी फझलीसाहेब म्हणतात, "मृतांच्याबद्दल नुकसानभरपाई देण्याची जबाबदारी सरकारने घेतलेली नाही अशा स्थितीत इतरांना-मालवीयांना-प्रतिबंध करणे योग्य ठरणार नाही."

फझलीसाहेबांच्या इतर उल्लेखांवरून सीमाप्रान्तातील दडपशाहीच्या कारभारावर थोडा प्रकाश पडतो लष्करी कायद्याला विरोध करताना ते म्हणतात—

"बाहेरील प्रान्तांतील लोकांची येजा होण्यास प्रतिबंध आहे तेथून एकमेकांकडे जाण्या-येण्याच्या हालचालींवरही निर्बंध आहेत. तेथून बाहेर जाणाऱ्या बातम्यांवर नियंत्रणे आहेत मग मार्शल लॉची काय जरूर?" (डायरी—१७ डिसें १९३०)

"शत्रूच्या प्रदेशातील लोकवस्तीवर बाँब टाकण्यापूर्वी जसे इशारे दिले जातात ती प्रथा

आपण का पाळली नाही ?" असा प्रश्न त्यांनी उपस्थित केला होता यावरून १९३०-३१ मध्ये चॅंबरचाही वापर केला हे स्पष्ट होते जालियनवाल्याबागेतील अत्याचारानंतर पेशावरच्या या किस्साख्वानी-बाजार अत्याचाराचा जगभर गवगवा झाला त्यावर प्रकाश टाकणारे वरील पुरावे विस्ताराने येथे दिले आहेत

२४ एप्रिलपासून बादशहाखान व त्यांचे शेकडो खुदाईखिदमतगार यांची धरपकड केली गेली व त्यांना ठिकठिकाणच्या तुरुंगात फेकून देण्यात आले स्वतः खानसाहेब प्रवासादरम्यान असता सिमल्याजवळच्या आडरस्त्याच्या छावणीच्या गाडीत त्यांचा खटला 'रेग्युलेशन थ्री' या कायद्याखाली चालवला त्यांना तेथे फार वेळ न ठेवता पंजाबातील गुजरात जेलमध्ये पाठवण्यात आले सीमाप्रान्ताच्या १९३० च्या शान्ततामय चळवळीचे पर्व येथे सुरू झाले खुदाई खिदमतगारांचा आता कोठे थोडा परिचय शासकांना झाला होता ते अद्याप हजारांच्या संख्येत्या आत होते, परंतु त्यांच्या कवायती, राष्ट्रप्रेमाची गाणी, व समाजसेवा यांमुळे जनतेच्या अन्तःकरणात त्यांनी स्थान मिळविले होते मळके कपडे दिसू नयेत म्हणून स्वस्त किंवा फुकट मिळणाऱ्या गडद लाल किंवा विटकरीच्या भुकटीने ते रंगवीत त्यामुळे रशियातील लाल क्रान्तीचा शिक्का मारून त्यांच्याविरुद्ध लोकमत करता यावे म्हणून इंग्रजांनी त्यांना 'रेड शर्ट' नाव दिले होते परंतु त्यांच्या हाती ते काहीही ठेवीत नसत १९३० मधील अहिंसात्मक जागृतीचे वर्णन करताना जवाहरलालजी म्हणतात, 'भारतातील अतिशय सस्मरणीय घडामोडींमध्ये अब्दुल गफारखानांनी पठाणांसारख्या लढाऊ लोकांना राजकीय लढ्यातील शान्ततेच्या मार्गावर आणले यासारखी विस्मयाची दुसरी गोष्ट नाही त्यांनी भोगलेले क्लेश भयानक आहेत पण असे असले तरी पठाणांनी शिस्त व संयम विलक्षण पाळला त्यामुळे सरकारी अधिकारी अगर अन्य कोणावरही हात उगारला गेला नाही अत्याचार घडले नाहीत. साँग्रिस प्रान्त खान अब्दुल गफारखानांच्या नेतृत्वाखाली सर्वस्वी काँग्रेसच्या बाजूला येऊन खडा झाला (डिस्कव्हरी- )

बादशहाखानांना शिक्षा झाली व त्यांना जेलकडे नेणाऱ्या पोलिस गार्डपुढे काही कार्यकर्ते आडवे पडले व गाडी अडविण्याचा प्रयत्न केला, परंतु बादशहाखानांनी सांगताच ते दूर झाले पुढाऱ्यांना पकडल्यानंतर जनतेमध्ये काही क्षोभ होणे स्वाभाविक आहे परंतु सीमाप्रान्ताच्या अधिकाऱ्यांनी स्वतः जे अत्याचार केले (२४ एप्रिल) त्या अत्याचाराची क्षम्यता किंवा अपरिहार्यता पटवण्यासाठी खुदाई खिदमतगारांच्यावर आरोप करण्यास सुरुवात केली होती, परंतु त्यांनी खरोखर प्रत्यक्ष काही अत्याचार नव्हे तर आगळीकही केलेली नसल्याने शासकांना काही पुरावे देता आले नाहीत पेशावर

धोरणाचा प्रचार अखंड चालू ठेवला होता. त्यामुळे गांधी-आयर्विन-कराराच्या वेळी बादशाह-खान व खुदाई खिदमतगार यांना त्या करारात घालण्यात खूप अडथळे आले.

आपण व आपली संघटना ही काँग्रेसकडे कशी लोटली गेली, मुस्लिम लीगने पंजाबच्या वरील आपत्तीचे वेळी त्यांना आपले दार कसे बंद केले व फक्त काँग्रेसनेच मदतीचा हात दिल्याने आपण अपरिहार्यतेने काँग्रेसमध्ये कसे गेलो याची माहिती स्वतः बादशाहखान यांनीच अनेक वेळा कथन केली आहे: "बाहेरच्या अत्याचारी व गोंधळाच्या परिस्थितीने व्यथित झालेले एकदोन सहकारी येथे ( गुजरात जेल ) येऊन भेटले. त्यांनी सांगितलेली माहिती ऐकून मलाही फार दुःख झाले. आम्ही आमच्यामध्ये विचार करून भेटीस आलेल्या मित्रांना सांगितले की, त्यांनी लाहोर, दिल्ली, सिमल्यास जाऊन मुस्लिम-लीग व इतर मुस्लिम संस्थांच्या नेत्यांच्या भेटी घ्याव्यात. त्यांना आम्ही आमचे भाऊ मानत होतो व अशा भयाण संकटकाली ते आम्हाला साहाय्य करतील अशी आशा होती, पण तसे घडले नाही." काही दिवसांनी आमचे हे कार्यकर्ते परत येऊन आम्हाला जेलमध्ये भेटले. त्यांनी सांगितले, "मुस्लिम लीगच्या नेत्यांना इंग्रजांविरुद्ध झगडे करावयाचे नाहीत. तुम्ही इंग्रजांविरुद्ध लढत आहात, म्हणून ते आम्हाला मदत करण्यास तयार नाहीत." बादशाह-खानांनी मुसलमानांच्याकडेच प्रथम मदतीकरिता आपले कार्यकर्ते पाठवले, म्हणूनही त्यांच्या धोरणासंबंधी गैरसमज करून घेणारे का। लोक तेथील काँग्रेस-जनामध्येही होते. बादशाह-खानाच्या अडचणी या टीकाकारांच्या लक्षात येणे सोपे नाही. अत्यंत धर्मवेड्या व जातिनिष्ठ अशा स्वजनांकडून त्यांना कार्य करून घ्यावयाचे होते. स्वतः त्यांच्यावर हिंदूंचे प्रच्छन्न मित्र, इस्लाम धर्माला मान न देणारे वगैरे टीका केली जात असे. आपल्या अनुयायांचा व समाजाचा गैरसमज वाढू न देता त्यांना आपली संघटना सामर्थ्यवान करावयाची होती. लो. टिळक व महात्म्यांच्या ज्या धोरणास्तव सनातनी लोकांना सांभाळीत असत,- साधारणतः तशा धोरणाने बादशाहखान प्रारंभीच्या या काळात पावले टाकीत असणार. मात्र त्यांनी केव्हाही प्रतिगामी विचारांचा पाठपुरावा केलेला नाही.

बादशाहखानांनी आपल्या कार्यकर्त्यांच्या मागे अधिक प्रभावी संघटनेचे अगर नेत्यांचे पाठबळ मिळावे म्हणून काँग्रेसशी अगर शक्य तर मुस्लिम लीगशी संलग्न होण्याचा प्रयत्न केला की त्यामागे अन्य काही कारण होते याविषयी भिन्न भिन्न प्रवाद आहेत. सीमाप्रान्तात दडपशाहीची परिसीमा झाल्यानंतर खुदाई-खिदमतगारांचे काही कार्यकर्ते सर फझली हुसेन यांना जाऊन भेटले. सर फझली हुसेन हे त्या वेळी व्हाइसरॉयांच्या कार्यकारी मंडळाचे सभासद होते. मुसलमान समाजामध्ये त्यांच्या नेतृत्वाबद्दल फार मोठा आदर होता. सर फझली हुसेन यांनीच काँग्रेसकडे जाण्याचा सल्ला दिला, असा एक वृत्तान्त आहे, तर हिंदुस्थान सरकारने

संपर्क साधण्यात आला. काश्मीर इतर घटक राज्याप्रमाणेच असताना त्या राज्याला काही काल काही विशिष्ट अव्यक्त वेगळेपण भोगू दिले होते. तशाचमार्गाने काही अशी सीमा-प्रदेश सॅमिनसरहद्देची स्थिती होती.

गांधी-आयर्विन-करार हा केवळ सत्याग्रही चळवळीच्या दडपणामुळे घडला असे कोणी मानलेले नाही. त्या चळवळीचा प्रभाव राज्यकर्त्यांना पूर्णपणे जाणवला होता हेही तितकेच खरे. त्याशिवाय इतके पाशवी अत्याचार करण्यास राज्यकर्ते तयार झाले नव्हते. इंग्लिश कापडावरील बहिष्कारामुळे मँचेस्टरलाही फार हिंसा होत आहे असा ओरडाही करण्यात येऊ लागला होता. त्या काळातील ६० टक्के आयातीवर परिणाम झाला होता. यावरून बहिष्कार चळवळीचा परिणाम इंग्लंडमधील भांडवलवाल्या वर्गावर किती झाला असेल व स्वदेशीच्या स्वावलंबनाला गांधीजी इतके महत्त्व का देत होते हे लक्षात येईल. गांधी-आयर्विन-तडजोड मुख्यत त्या वेळी लंडनमध्ये गोलमेज परिषदेचे जे नाटक चालू होते त्याची पूर्तता करण्या-साठी होती. ती परिषद काँग्रेसच्या हजेरीशिवाय निरर्थक आहे हे मत तेथे हजर राहणारे सप्रू-शास्त्री-जयकर यांच्यासारखे नेतेच मांडत होते. त्यामुळे व स्वभावत धार्मिक प्रवृत्तीचे असलेले आयर्विन त्या वेळी सत्ताप्रमुख असल्याने तडजोड घडून येऊ शकली. या तडजोडीत जे अनेक अडथळे होते त्यांमध्ये लष्करी सत्ता वापरण्यास चटावलेले पेशावरचे अधिकारी व पोलिटिकल खाते हे होते. बादशहाखान व त्याचे लाल वर्दीवाले खुदाई खिदमतगार हे कम्युनिझमचे अग्रदूत आहेत, पॅन इस्लामिझमचे ते प्रवर्तक आहेत– वगैरे डांगोरा तेथील अधिकारी हिरीरीने पिटीत आले होते. १९३० मध्ये तर सत्याग्रही चळवळीच्यावेळी या अधिकाऱ्यांना पूर्ण मुभा दिली गेली होती ते स्वातंत्र्य गमावून पुन्हा त्याच लाल वर्दीवाल्यांशी गोडीने बरोबरीच्या माणसासारखे बोलावे लागणे हा अपमानास्पद प्रसंग सीमाप्रान्तीय अधिकाऱ्यांवर होता. त्यामुळे त्यांनी निकराने बादशहाखानांच्या सुटकेला विरोध केला. पण गांधीजींनीही सीमाप्रश्न न सुटल्यास तडजोड होणे व टिकणे कठीण जाईल हे स्पष्ट केले. या अडचणीच्या प्रसंगी सर फझली हुसेन यांचा समजसपणाचा सल्ला आयर्विन यांना मिळाला व तो उपयोगी पडला असे दिसते. १९३१ जानेवारी-फेब्रुवारीच्या आपल्या डायरीमध्ये ते म्हणतात, " खुदाई खिदमतगार चळवळ दहशतवादाची नाही किंवा अफगाण अगर रशियाप्रेरितही नाही. हे अधिकाऱ्यांचे आरोप निराधार आहेत. ती चळवळ चालवणाऱ्यांमध्ये अनेक जमीनदार धनिक आहेत, ते मवाळ धोरणांचेच आहेत. पॅन इस्लामिझम् किंवा खिलाफत या चळवळी आता मेलेल्या आहेत." ( सर फझली हुसेन, पा. १९७ ) हे उद्गार बादशहाखानांना सोडण्याच्या सुमाराचे आहेत. त्यांच्या सल्ल्याचा ही तडजोड घडवून आणण्यास उपयोग झाला असला पाहिजे. फ्रँटियर प्रान्ताचे पर्यवेक्षेही

सर फजली हुसेन यांना भेटल्याचा उल्लेख आहे.

या तडजोडीनुसार त्यांची सुटका झाली व मोटारने ते लाहोरला व तेथून पेशावरला दि. ११ मार्चला पोचले. त्यांची मिरवणूक त्यांच्या त्यागाला व यशाला साजेशी निघाली. पेशावरमध्ये अशी मिरवणूक कधी निघालेली नव्हती. आसपासच्या खेड्यांतून येणाऱ्या लोकांच्या रांगा लागलेल्या होत्या. शहरभर आनंदोत्सवाला भरते आलेले होते. रस्त्यावर शेकडो कमानी-तोरणे उभारलेली होती. 'बादशाहखान', 'खुदाई-खिदमतगार' व 'आझादी' – यांच्या जयजयकारात मिरवणूक मुंगीच्या गतीने चालली होती. त्यांच्यावर उधळल्या जाणाऱ्या गुलाबपुष्पांचा खच रस्त्यावर पडलेला होता, तर त्याच्या सुगंधामुळे सरकारी कचेऱ्यांमधील अधिकाऱ्यांचे अंतःकरण खचत चालले होते. बादशाहखानांना अशा मिरवणुकी व त्यांच्या पाठोपाठ वार चालत असणाऱ्या परडॉटच्या चिलखती मोटारी यांचा चांगलाच परिचय झालेला होता. त्यामुळे या सर्वांच्या वातावरणातून ते फक्त जनतेचे प्रेम ओळखीत व स्वीकारीत होते. आपल्या नम्र सलामाने ते त्या प्रेमाचे उत्तर देत होते.

# १०

# गांधी-आयर्विन तडजोडीचे फसवे स्वरूप

मुत्सद्दी फळीतून आणलेल्या रूपात सर्व बाबी जशा घडल्याने उत्पन्न्या जानात त्याप्रमाणे गोलमेज परिषदेमध्ये गांधीजींना नेण्यासाठी आयर्विन व त्यांचे पाठीराखे सारखे प्रयत्न करीत होते, तर त्या तडजोडीमुळे असंतुष्ट असलेले गांधीजींचे सहकारी आपला असंतोष या ना त्या रूपाने व्यक्त करीत होते. जवाहरलाल, वल्लभभाई यांना ही तडजोड पसंत नव्हतीच तशीच ती यानंतरूनही नापसंत होती. सुभाषचंद्र अत्यंत रुष्ट तर त्यांची नौजवान संघटना सुरा घेऊन सिद्ध होती. या सर्व वादळात कर्तव्यबुद्धीने व परिस्थिती ओळखून ती तडजोड काँग्रेस अधिवेशनात पास करून घेण्याचे अग्निदिव्य गांधीजींना करायचे होते आणि कराचीत याच वेळी जेलसक्तीत बाजूस सारून टांगलेल्या वळच्या पूर्व रात्री भगतसिंग-राजगुरु-दत्त यांना फाशी दिले गेले (२४ मार्च). गांधीजींची अपेक्षा होती या तरुणांची फाशी टळेल. दिल्लीतील शांतिप्रथीची बोलणी संपवून ते कराचीच्या वाटेला लागले होते. कराचीस स्टेशनवर पोचतात तो केवळ काळ्या निशाणांनीच नव्हे तर नौजवानांच्या हुल्लडीने त्यांचे स्वागत झाले. सर्व देश दुःखमग्न व शोकाकुल झालेला होता. कराचीच्या काँग्रेसनगरातील हे वातावरण विलक्षण व्यथा भावनांनी कुंद झालेले होते.

अध्यक्ष सरदार वल्लभभाई त्यांच्या पाठोपाठ बादशाहखान व त्यांचे ५२ लालडगल बँड पाईप वाजवीत राष्ट्रसभेच्या उघड्या मंडपात आले. तेव्हा केवळ नावाने परिचित असलेल्या या पठाण प्रतिनिधींचे उत्स्फूर्त स्वागत प्रचंड टाळ्यांच्या गजराने करण्यात आले. श्रोत्यांच्या डोळ्यांपुढून पेशावरच्या गोळीबाराचे, गढवाली पलटणीच्या बहादूर सैनिकांचे व ३१ मेला टांग्यातून जात असलेल्या गंगासिंगांची दोन लहान अर्भके गोळ्या लागून पडल्या

नतर तेरडो लोर धनीतर गोळ्या घेण्याम धडाधड पुढे झाले होते, त्या बातम्याचे चित्रपट चालले असणार ! अग्निनिष्ठेचे व अपूर्व धैर्याचे प्रतिनिधी म्हणून या पगाण देशभक्तांचे दर्शन कॅबिनेटजनाना प्रथम होत होते त्यांच्याबरोबर २०० पठाण कार्यकर्तेही आले होते या भेटीत बादशाहखानांचे भाषण झाले गांधी-आयर्विन तडजोडीचा उगर पाठ झाला असताच, पण भगतसिंगाचे वडील किशनसिंग व बादशाहखान या उभयतांची उपस्थिती व त्यांनी गांधीजींच्या नेतृत्वाला दिलेला हार्दिक पाठिंबा, यांचे वजनही त्यात कमी नव्हते, बादशाहखानांचे हे इंग्रजी भाषण त्यांनी त्यानंतर गांधींजवळच जी नितांत निष्ठा समाळली तिचे द्योतक आहे " भारत व भारतीय यांचा परिचय व त्यांची मर्मी गांधीजींच्या मुळे आम्हाला झाली आहे " असे अर्थपूर्ण वाक्य त्या भाषणात आहे

कराचीहून बादशाहखान मुंबईस दोन दिवसांसाठी आले गांधीयुगीन चळवळीच्या धकाधकीत मुंबई ही राजकीय हालचालीचे केंद्र झालेली होती दे म नरिमन हे त्या वेळी मुंबईचे लोकप्रिय नेते होते दि ५ एप्रिलला तेथे झालेल्या राष्ट्रीय मुसलमानांच्या परिषदेस हजर राहण्यासाठी एक कार्यक्रम या भेटीत होता त्यांची ही मुंबईची भेट बगदादपच्या बाग्यागत त्यांनी कुर्ला भागात केलेल्या पदयात्रेमुळे मुंबईकरांच्या पुष्कळ दिवस स्मरणात राहिली होती आझाद मैदानावर त्यांचा जाहीर सत्कार व भाषण झाले या सत्कारच्या वेळी पाशी गेलेल्या राजगुरूंची आई स्व माई राजगुरू व अपत्यभावनने त्यांना चिकटून लाहोरहून त्यांच्याबरोबर आलेल्या भगतसिंगांचा ज्येष्ठ भाई कुलतारसिंग याचाही गौरव या सभेत करण्यात आला माई राजगुरू व कुलतार यांना व्यासपीठावर पाहताच समोरच्या बसलेल्या स्त्रियांपैकी कित्येकांना दु खाचे हुदके आवरणे कठीण झाले येथील भाषणांत, अहिंसेने पठाणांचे सामर्थ्य कमी वाढले याचे बादशाहखानांनी विवेचन केले तसेच आपण केवळ शिस्तीचे सैनिक आहोत, असे त्यांनी या जाहीर सभेत सांगितले सभेत मागपुढे दखलदरूली व चेंगराचेंगरी पार झाली बादशाहखानांनी पार्श्वांच्या सत्काराने बटवगील व बाद्याम भेट दिली

कराची-मुंबईहून आपल्या प्रांतात परत पोचताच बादशाहखानांनी सीमाप्रदेशात खुल्या चावदान दारे वाहण्यास प्रारंभ केला गांधी-आयर्विन तडजोड त्यांना पसंत नव्हती परंतु मिळालेली हा संधी जनतेत प्रचार करण्यासाठी त्यांनी पुरेपूर वापरली त्यांच्याविरुद्ध प्रति गामी मुसलमानांनी चालवलेल्या प्रचाराला उत्तर देण्यासाठीही ही संधी चांगली होता

कराची काँग्रेसला जाण्यापूर्वीच बादशाहखानांनी खुदाई खिदमतगार सदस्यत्व तरुणांनी दाखल व्हावे अशी विनंती केली ही स्वयंसेवकांची संख्या एक लाख करण्याची इच्छा त्यांनी त्या वेळी व्यक्त केली अहिंसा व शिस्त यांच्या निष्ठेवर ते सतत भर देत, सरकारी जन्माने

बेजार झालेली जनता त्यांचे नेतृत्व आनंदाने व आदराने स्वीकारण्यास उत्सुक होती. या तीन चार महिन्यांत त्यांनी शांती सेनेत पाचशांची भरती. ते स्वतः दिवसेंदिवस अधिक आक्रमक होत चालले होते. देशात कोठेही गेले तरी बहुधा पायी प्रवास करीत. ही पदयात्रा म्हणजे शिस्तीची-बोलती सभाच असे. त्यांनी आफ्रिदी व इतर स्वतंत्र मुलखातील जमातींनाही या अहिंसायुद्धात सामील होण्याची विनंती केली. त्यामुळे तर अधिकाऱ्यांचे धाबे दणाणले होते. गांधी-आयर्विन तडजोडही अधिकाऱ्यांना पठाणांच्या भारत-आक्रमणासारखेच संकट वाटले. त्यांनी आपली दडपशाहीची शस्त्रे म्यान केलेली नव्हतीच! त्यांचा भरपूर वापर सुरू केला. निरोधन ( पिकेटिंग ) करण्याचा जनतेचा हक्क या तडजोडीप्रमाणे मान्य ठेवण्यात आला होता. त्याला धरून बादशहाखानांनी पेशावर येथे पिकेटिंग सुरू केले. त्यामुळे त्या पेशावरसमर्थक राजकीय व सार्वजनिक हालचाल आपण बिघडून टाकली होती असे अधिकाऱ्यांना वाटत होते. त्या अधिकाऱ्यांना तेथे पुन्हा चढाऊ चळवळ सुरू झालेल्या पाहून धक्काच बसला. २४ एप्रिल व ३१ मे १९३० चे पेशावरचे अत्याचार हे पिढ्यान् पिढ्या दहशत बसवण्यास पुरे आहेत असे त्या अधिकाऱ्यांना वाटत होते, पण निर्भयता व त्याग यांमध्ये पठाण मागे हटणारा नव्हता आणि मृत्यूस तयार असणाऱ्याला अहिंसामार्गाचे महत्त्व सहज पटण्यासारखे आहे. त्यामुळे एक वर्षापूर्वी ज्या रस्त्यावर आपल्या रक्ताच्या चिळकांड्या उडालेल्या होत्या त्या रस्त्याने पुन्हा खुदाई खिदमतगार व काँग्रेस स्वयंसेवक शिस्तीच्या रांगा करून फिरू लागले. पेशावरातील नवचैतन्य पुन्हा फुलले, दारू-पिकेटिंग करण्यासाठी एका वेळी ९०० स्वयंसेवक नोंदले गेले व एकाच वेळी तीनशे लोक ठिकठिकाणी निरोधन करीत राहिले. स्वाभाविकच लोकांचे धैर्य वाढले. अधिकारी तितकेच बेचैन होत गेले. याचा परिणाम काय होईल हेही बादशहाखान जाणून होते. गुजरातमध्ये बारडोलीच्या शेतकऱ्यांच्या जमिनी परत मिळण्यात, इतर अत्याचारांची चौकशी करणे वगैरे प्रयत्नात सरदार गर्क होते, तर सीमा प्रांतात बादशहाखान लोकांच्या दुःखाला वाचा फोडीत व पिकेटिंगसारख्या सरक्षक चळवळीला चालना देत होते. हे सर्व तडजोडीच्या अटींना धरूनच होते. या रस्सीखेचीत राउंड टेबलचा गळा घोटला जाऊ नये म्हणून शास्त्री-सप्रू श्वास हातात धरून धावपळ करीत होते. गांधीजी व लॉर्ड आयर्विन हे करारांच्या सन्मानाने वागत, तर हा करार हे एक ब्रिटिश सत्तेला लांच्छन असे मानणारा भारतातील चर्चिलचा अनुयायी—सत्ताधारी नोकरवर्ग आपली पिस्तुले शोधीत राहिला होता. अशा वातावरणात गांधीजींची गोलमेजी बोट सप्टेंबरमध्ये चालू लागली होती. काँग्रेसच्या गैरहजेरीची उणीव दूर करणे एवढा लाभ गांधी-आयर्विन तडजोडीने साधला. आमचे अंतर्गत मतभेद किती तीव्र आहेत हे दृश्य तेथे उघडे केले गेले. निवडलेले प्रतिनिधी

११

# पेशावर काँग्रेसमधील मतभेद

राउंड टेबल बैठकीस जाण्यापूर्वीच्या मुंबईतील अ. भा. काँग्रेस समितीच्या बैठकीत सीमा-प्रांताच्या काँग्रेस समितीचा प्रश्न चर्चिला गेला होता. खुदाई खिदमतगार संस्था काँग्रेसमध्ये समाविष्ट करणे व अफगाण-जिरगा या नावाने तेथील काँग्रेसचे कार्य चालवले जाणे, या निर्णयाला पेशावरच्या काँग्रेस नेत्यांचा विरोध होता. हा विरोध तीन-चार महिने शिजत होता. यात वैयक्तिक हेव्यादाव्यापेक्षा तो दृष्टिभेदाचा प्रश्न होता. शहरी लोकांच्या हातून तो कारभार उतमझाईंच्या खेडवळ पठाणांकडे जावयाचा होता. हीही एक मेख त्यात होतीच, पण स्वतः बादशहाखानांच्या काही कार्यकर्त्यांना खुदाई खिदमतगारांचे, समाजसेवकांच्या संघटनेचे स्वरूप तसेच टिकावे, असे वाटत होते. त्यासाठी त्यांनी निर्भयतेने बादशहाखानानाही विरोध करण्याचे धैर्य दाखवले. यामुळे हा प्रश्न शेवटी ऑल इंडिया काँग्रेस समितीने नेमलेल्या उपसमितीपुढे आला. या उपसमितीत डॉ. अन्सारी, महादेव देसाई ही मंडळी होती. स्वतः गांधीजीही लक्ष घालीत होते. अपेक्षेप्रमाणे बादशहाखानांच्या बाजूचा निर्णय झाला. सरहद्द काँग्रेस जिर्गा या नावाने तेथील प्रदेश काँग्रेस समितीचे दप्तर उतमझाईंस हालविले गेले. काँग्रेस व खुदाई खिदमतगार या दोन्ही संस्थांचे संचलन बादशहाखानांकडे सोपविण्यात आले. जो प्रत्यक्ष काम करतो त्याच्याकडेच नेतृत्व जाणे अपरिहार्यच असते, ते हिताचेही असते. बादशहाखानांच्या नेतृत्वाला कोणाचा विरोध नव्हताच, त्यामागे थोडी शहरी विरुद्ध ग्रामीण अशी भावना होती. त्याचप्रमाणे सारा काँग्रेस मध्येची व नाव मात्र जिर्गा, हे काही काँग्रेसनेत्यांनाही पसंत नव्हते. खान सरदार वल्लभभाई यांना हे मान्य नव्हते असे ऐकिवात होते. बादशहाखानांच्या धोरणा

विरोध करणारे पेशावरचे नेते आगालाल बादशाह, हकीम अब्दुल जलील, बॅरिस्टर अहमदशाह, जिल्होदेवी ही मंडळीही बादशाहखानांच्या नेतृत्वाचे विरोधक नव्हते, पण ह्या परिस्थितीत क्रम क्रमाने मोर्चाचे ध्यान यासाठी, प्रादेशिक जिर्गा हे नाव घेण्यात पुष्कळ विरोध टळला होता. बादशाहखानांचे धोरण विरोधकांच्या गळी उतरत नव्हते. पण गांधीजींना ते कळले होते म्हणून शब्दाला चिकटण्यापेक्षा कार्यसिद्धीकडे लक्ष देण्याच्या धोरणाला ते पाठिंबा देत. त्याचप्रमाणे येथेही घडले. 'पण काँग्रेसचे नाव टाळण्यात बादशाहखानांचा हेतू वेगळाच होता व त्याचे सर्व लक्ष अफगाणिस्तानाकडे होते' असे मानणारे जातीय दृष्टीचे पुढारी पेशावर शहरातच व ते तसे आजही असतील. त्यांमध्ये हिंदू व मुसलमान दोघेही होते.

काँग्रेस संघटनेचे प्रत्यक्ष नेतृत्व घेण्याने बादशाहखानांचे काँग्रेसमधील कर्माधिकार जास्त असे थोडेच होते? एप्रिल १९३१ पासून ते कामात दंग झालेच होते. त्या सर्व महिन्यांत त्यांनी अधिकाऱ्यांना घाम फोडला होता. खेड्यापाड्यांतील अधिकारी कार्यकर्त्यांवर हात टाकू लागले होते. जून महिन्यात काही भागात जमावबंदी जारी करण्यात आली होती. तडजोडीच्या धोरणाशी सरकारचे हे वर्तन सर्वस्वी प्रतिकूल होते. परंतु अधिकारी बादशाहखानांकडे अहवाल वरिष्ठांना देत. स्वातंत्र्य तरुणांनी केलेल्या एका नाटकात एका गोऱ्या उन्मत्त अधिकाऱ्याची बरीच टवाळी केलेली होती. पण चार्ल्स डेप्युटी कमिशनरच्या मुलाला त्यात अपमान वाटला होते. या जागेपा खाली त्या नाटकात काम केलेल्या कार्यकर्त्यांना तुरुंगात डांबविण्यात आले. अशा चिडखोरपणामुळे लोकांत राज्यकर्त्यांबद्दलचा अनादर वाढत गेला व लाल डगलेवाल्यांची संख्या रोज पुढून चालली. खेड्यापाड्यांतील गरिबांचे दैन्य हा बादशाहखानांच्या हृदयवेदनेचा नित्याचा विषय आहे. प्रवासात त्यांना त्यांच्या भीषण दारिद्र्याचे दर्शन होई. स्वाभाविकच 'अनुकूलते प्रमाणेच सारा द्या' असा मंत्र ते देत. हा सल्ला कायद्याला धरून होता, पण हा करबंदीचा बेकायदा प्रचार आहे अशा तक्रारी अधिकाऱ्यांनी सुरू केल्या होत्या. सप्टेंबर ते डिसेंबर हे चार महिन्यांचा काळ गांधीजी लंडन येथे होते. त्या काळात गांधीआयर्विन तडजोड गाडून टाकण्याची ही अधिकाऱ्यांची धडपड इकडे शिजत होतीच. सप्टेंबरमध्ये होअर यांच्या काही अर्थबोधक उद्गारांवरून ही तडजोड लवकरच संपुष्टात येईल असे सूचक संदेश महादेवभाईंनी सरदार पटेल यांना लंडनहून पाठवलेले होते. जवाहरलाल, सरदार व बादशाहखान हे सरकारचे डाव ओळखून व तसेच आपल्या हक्काची पायमल्ली होता कामा नये याबद्दल अखंड जागरूक होते. सरहद्द प्रांतात शेतकऱ्यांचे सामान्य हजारोंच्या सभांतून होत होते. बार्डोलीला पुन्हा लढ्याची तयारी सुरू आहे असा पोलिस रिपोर्ट रोज खालीवर धाडले जात. बादशाहखानांचे कार्यक्रम उघड व अखंड चालू होतेच आणि ज्या लॉर्ड आयर्विनच्या धोरणी व समंजसपणामुळे ही तडजोड झाली व टिकली त्या आयर्विनच्या जागी लॉर्ड

विलिंग्डनसारखा साम्राज्यवादी शासक आला ' गांधींसारख्या धूर्ताशी बोलणी करण्याच्या भानगडीत पडता कामा नये त्याला दोन हात दूर ठेवावे ' या मताचे विलिंग्डन याचे धोरण साठवलेले आहे गांधीजी विलायतेहून मुंबईस परत पोचण्यापूर्वीच देशातील तुरुंग भरपूर करून ठेवण्याचे काम प्रांतातील अधिकारी करीत होते त्या संधीचा फायदा घेऊन सीमा प्रांतातील सरकारी हस्तक पुढारी, बादशहाखानाच्या विरुद्ध प्रचाराला लागले होते या प्रचारात खानबहादुर-रायबहादुर हेच प्रमुख होते मुसलमानापेक्षा हिंदू हे त्यात अधिक पुढाकार घेत होते, कारण सरकारी पाठिंब्यावरच आपण तेथे निभाव धरू शकू अशा खोट्या समजुतीत ते ब्रिटिश अमदानीत वाढले होते आणि सरकार याच परावलंबनाचा फायदा घेऊन अधिकारी त्यांचे लाड लावून देत असत "या प्रांतात आपण किंवा बादशहाखान यापैकी एक कोणी तरी नांदू शकेल" असा तगादा कनिंगहॅमच्या कमिशनरनी आयर्विन यांच्यामागे लावला होता

येणाऱ्या वादळी हवेचा वास बादशहाखानांना येत होताच नोव्हेंबर महिन्यात त्यांनी पेशावर येथे स्वयंसेवकांच्या शिक्षणासाठी प्रचंड शिबिराची योजना केली होती एखाद्या लष्करी छावणीचे व्यापक व शिस्तीचे स्वरूप त्या छावणीला होते या सर्व वातावरणाला तोंड कसे द्यावयाचे याचा विचार करण्यासाठी कमिशनरने दि २२ डिसेंबरला पेशावरला एक दरबार भरविला व त्याला खानबंधूनाही निमंत्रण दिले होते पण निव्वळ दडपशाही चालू ठेवण्याच्या धोरणाचा पुरस्कार करणाऱ्या लांगुलचालकांच्या हो-यांची भाऊगर्दी जेथे होणार तेथे कशाला जावे म्हणून खानबंधू तेथे हजर राहिले नाहीत

त्याच सुमारास फ्रंटियर-प्रांतिक जिर्गाची-प्रदेश काँग्रेस समितीची बैठक २० डिसेंबरला पेशावरला झाली या बैठकीत ब्रिटिश पंतप्रधानाच्या घोषणेवर ती असमाधानकारक असल्याचा शिक्का मारला गेला तसेच गांधी-आयर्विन तडजोड हा फार्स ठरत आहे त्याचे विडंबन सीमा प्रदेशात नित्य चाललेले आहे तेव्हा हा करार संपला अशा रीतीने काँग्रेसचे कार्यक्रम चालविण्याचा अधिकार बादशहाखानांना देण्यात आला त्या कामगिरीवर जाण्यासाठी व गांधीजींना भेटण्यासाठी निघण्याचे त्यांनी ठरविले होते त्याचप्रमाणे डॉक्टर खानसाहेबांना व जवाहरलालजी यांनी प्रयागला खिलाफत घालविण्यासाठी निमंत्रण दिले होते पण पेशावरच्या लष्करी हुकूमशहांनी या सर्वांच नेत्यांनी खिलाफत उल्लंघने करावी असे ठरविले होते या दडपशाही धोरणाची जबाबदारी केवळ सीमाप्रांताचे कमिशनर किंवा संयुक्त प्रांताचे गव्हर्नर यांच्यावर किंवा व्हाइसरॉयवरही टाकणे योग्य नव्हे ते धोरण साम्राज्यवादी चर्चिल-नेतृत्वाचे होते व तेच देशाची फाळणी होईपर्यंत चालू होते येथे सत्तेवर कोणी असले तरी त्यांची सूत्रे साम्राज्याचा पाया खंबीर राखू पाहणार ब्रिटिश नेते व इंग्लंडातील व्यापारी यांच्याच हातात असत



१२

# १९३२ मधील दडपशाही

गांधीजी राउंड टेबल परिषदेचे सूप वाजवून मुंबईस डिसेंबरअखेर पोहोचले. त्यापूर्वी जवाहरलाल व बादशाहखान यांना पकडले होते. बादशाहखान गांधीजींना बार्डोलीस मे महिन्यात भेटले त्या वेळी 'सरकार तुम्हाला पकडणार अशा बातम्या आहेत,' असे गांधीजी बोलले होते. बादशाहखान यांचे सारे कुटुंबच यावेळी पकडा-पकडीत गोवले होते. त्यापूर्वी २४ डिसेंबरला नवा वटहुकूम सीमा प्रांताला लागू केला. त्या कायद्याअन्वये त्यांना व त्यांच्या बरोबर शेकडो कार्यकर्त्यांना एकदम पकडण्यात आले. डॉ. खानसाहेब या वेळेपर्यंत प्रत्यक्ष राजकारणात नव्हते. चळवळींतील जखमी लोकांना उपचार करण्यासाठी ते धावून जात. तशी त्यांची राहणी-मैत्री इंग्रज अधिकाऱ्यांशीच अधिक असे; पण हे दडपशाही धोरण पाहून त्यांनी आपली नोकरी सोडून दिली होती. त्यांनाही त्यांच्या इंग्रज मित्रांनीच आता राजकारणाची दीक्षा देण्याचे ठरविले होते. सरकारी दरबाराला खानबंधूंना आमंत्रण होते, तेव्हा ते जबाबदार नागरिक ठरले होते; पण त्यांनी निमंत्रण नाकारताच ते बागी-बंडखोर, राजद्रोही ठरले. २४ डिसेंबरला सर्वांना उतमंझाईला पकडले. डॉ. खानसाहेबांचे ज्येष्ठ पुत्र 'सादुल्लाखान' हे नुकतेच परदेशचे शिक्षण पुरे करून आले होते व बॅरिस्टर जिनांच्या सेक्रेटरीचे काम पाहत होते. त्यांचे दुसरे चिरंजीव ओबेदुल्लाखान या सर्वांना पकडले. बादशाहखानांना पकडणार हे उघड होते. त्यांच्या दोन बहिणी व भावजय—डॉ. खानसाहेबांची पहिली पत्नी—यांना पकडले नाही; पण उपद्रव दिला. इतर पाहुणे, संबंधी असे अनेक लोक एकत्र पकडले गेले. डॉ. खानसाहेब आणि बादशाहखान व दोन सुपुत्र हे एकाच जागी पकडले. त्यांना एका स्वतंत्र गाडीत घातले व नैनिताल (संयुक्त प्रांत,) हजारीबाग, (बिहार,) काशी

व लुधियाना (पंजाब) अशा वेगवेगळ्या ठिकाणी ठेवले आणि पुन्हा जेलमधील छळाचे व बाहेर अत्याचाराचे थैमान सुरू झाले. पेशावरला धरपकड सुरू करण्यापूर्वी इमज गेनेच्या सहा तुकड्या चारी बाजूस आणून ठेवल्या होत्या. तरीही दि. २६ ला कोहाट येथे व दि २९ ला पेशावरला थोडीशी दंगल झाली या दंगलीत मुसलमान दोघांचाच भाग होता, आणि त्यानंतर पेशावरी गोरे नागरिकांचा लालडगीवाल्यांची शिकार करण्यास मोकळे झाले. १९३० च्या जिन्गानी भाजाराजवळील भीषण गोळीबाराची वार्ता ऐकून जगातून अनेक वृत्तपत्रकार पेशावरकडे धावले होते त्यांपैकी एका अमेरिकन पत्रकाराने (Gunning the read shirts) लालडगीवाल्यांना गोळ्या घालण्याचा खेळ हा एक गोऱ्या-सोजिऱ्यांचा करमणुकीचा व खेळाचा प्रकार झालेला आहे, असे वर्णन केलेले होते. या खेळास रमण्यास गोरेमाजिरे पुन्हा तयार झाले होते. तुरुंगातील वागणुकीबद्दल बऱ्याच तक्रारी झाल्यावर डॉ. खानसाहेब यांना ज्ञानीबाग येथे बादशहाखानांचे सांगाती म्हणून आणून ठेवले ओबेदुल्लाखान (डॉ. खानसाहेबांचे दुसरे पुत्र) यांनी तुरुंगातील अयोग्य वागणुकीबद्दल पहिल्या अडतीस दिवस व दुसऱ्या वेळेस ७८ दिवस उपवास करून वडीलांतील अनशेंदी करायला सुरू लावला होता, पण सत्ताधीशांचे दडप काळेकपिल व बेगडी पडू न देणारे होते ओबे दुल्लांच्या ७८ दिवसांच्या उपवासाच्या वार्ता ऐकताना त्यांच्या आयुष्याची चिंता जशी इतरांना वाटत होती तितकीच चिंता डॉ. खानसाहेब व बादशहाखान यांना त्यामुळे होणाऱ्या हेळसांडबद्दल जनतेला वाटत होती, पण पठाणांच्या ताठर नीतीला साजेसे वर्तन खानबंधूचे होते दोघांनीही सरकारकडे काही पत्रव्यवहार अगर विनंतीअर्ज केले नाहीत किंवा ओबेदुल्लाच्या प्रकृतिमानाबद्दल कधी काही चौकशी केली नाही सरकार आपण होउन काही मानवी पुरविण्याइतक्या माणुसकीच्या मर्यादेत राहिलेले नव्हतेच! आता ओबेदुल्ला जगणे असंभवनीय असे वाटल्यावर त्यांच्या वडील व चुलत्यांनी त्यांच्या शरीराची विल्हेवाट कशी करावी याबद्दल तेवढे सरकारला कळविले, पण त्यापूर्वीच ओबेदुल्लांच्या मागण्या मान्य होऊन त्यांनी उपवास सोडला होता जेलमधील छळाचे प्रकार सीमा प्रांतात सर्वांत अधिक व असानुषतेचे झाले पेशावर जेलमध्ये दि २९ जानेवारीला दोन गोऱ्या पलटणींचे लोक राजकैदी केद्यांचे विभागात घुसले व तेथे दोन तास मारपीट केली तेथील नेत्यांमध्ये गुलाम मुहमद लोंदखोंद, सालार नवाजखान, प्रतिजाखान, अब्दुल गफूरखान, पीरशाहिन शाह आदि प्रमुख होते पहिल्या दिवशीच, अमीर मुहम्मदखान पीर मदारशाह, गुलाम मुहमद लोंदखोंद वगैरे सर्व लोकांना तीस-तीस फटक्यांची सजा दिली होती तीन महिनेपर्यंत त्यांच्या शरीरावरील घाव मावळले नव्हते उतमझाई येथील अत्याचार असेच मानवतेला कलंक लावणारे होते सर्व गावाला सशस्त्र मेनिकांनी घेरा घालून लोकांना मारपीट केली बादशहाखान, गांधीजी यांना शिव्या

देणे, त्याची निंदा करण्यास लोकांना सांगणे, घाणेरडे शब्द न उच्चारल्यास बंदुकीच्या दस्त्याने ठोसे लगावणे, नग्न करून मलद्वारात काठ्या खोचणे, थंड पाण्याच्या डबक्यात लोटून देणे असे अमानुषपणाचे प्रकार शस्त्रधाऱ्यांनी मिळून असहाय्य जनतेवर केले. काँग्रेस कमिट्यांच्या इमारती व कार्यकर्त्यांची घरे पेटवून जाळणे, अशा एक ना दोन हजारो प्रकारांनी लोकांचा अंत पाहिला. पण खुदाई खिदमतगारांनी बादशाहखानांच्या फकिरांचा तत्त्व धरून चालत या सर्व पाशवी अत्याचारांना कमालीच्या शांततेने त्यांनी तोंड दिले.

या सहनशीलतेत भ्याडपणा नव्हता. गांधीजींना पाहिजे असलेली वीराची अहिंसा येथे प्रत्ययास आली. अन्यथा पठाण हा अपमान सहन करून जगू शकत नाही. कोणी चार कर्त्यांचा इतरांनी दंड भरला किंवा मृत्युशय्येवरील आईबापास भेटण्यासाठी पेरोलवर सुटका करवली अशा कोणी प्रसंगी त्या कार्यकर्त्यांनी आत्महत्या केल्या. त्यांना तो अपमान सहन होत नाही अशी उदाहरणे या काळात घडली. अशा स्वाभिमानी कार्यकर्त्यांनी इतके अमानुष छळ निमूटपणे सहन केले ते केवळ नव्या तत्त्वज्ञानाची—अहिंसेची—त्यांनी शपथ घेतली होती म्हणून. बादशाहखानांना वचन दिले होते त्या वचनाला ते जागले. हाच सारा चमत्कार होता.

सरकारी चळवळी व त्याग ध्येयवादी तरुणांनी करावा व त्याचा फायदा उचलण्याचा बोजा सरकारी हस्तक व होयबा यांचेवर पडावा हा सर्वत्र अनुभव आहे. १९३० व १९३२ च्या गोलमेज परिषदेत सीमा प्रांताच्या राजकीय दर्जाचा प्रश्न धसास लावला गेला व हा प्रांत गव्हर्नरचा केला गेला व त्यास माँटफर्ड सुधारणा लागू करण्यात आल्या. त्यानुसार तेथे लोकनियुक्त मंत्री नेमले गेले. त्या काळातील बडे जमीनदार साहबजादा सर अब्दुल कय्यूम यांचेकडे सरकारधार्जिण्या मुसलमानांचे नेतृत्व होते. त्यांना मुसलमानात फारसे प्रिय होणे जमणारे नव्हते. तरी हा त्यांच्या ताबेदारवृत्तीचा सन्मान सरकार देत असत. ब्रिटिश लोकशाही पद्धत या प्रांतात यशस्वी करून दाखविण्याची ही जबाबदारी त्यांच्यावर होती. त्यामुळे १९३२–३३ च्या मध्यामध्ये चळवळीचा जोर ओसरल्यावर काँग्रेस व खुदाई-खिदमतगार संघटनेवरील बंधने ढिली करण्यासंबंधी काही सूचना त्यांच्या तर्फे कायदेमंडळात आणल्या गेल्या. पण आश्चर्याची व लाजिरवाणी गोष्ट ही की पोलिटिकल खात्याच्या समजावणीनुसार विधिमंडळातील हिंदू प्रतिनिधींनी याला विरोध केला. खानबंधूवर खटले न भरता राजबंदी म्हणून तुरुंगात टाकले गेले होते. त्यांच्यावर कोणताच गुन्हा शाबीत करता आला नव्हता. त्यांनी शांततेच्या मार्गाने देशाची किती मोठी सेवा केली होती हे जगजाहीर होते. तसेच खुद्द पेशावर शहर पोलीस आणि लष्कर यांनी गुंडांच्या लुटीसाठी खाली करून दिले असता खुदाई खिदमतगारांनीच हिंदू

जिना व मुस्लीम लीगला मान्यता केलेले होते. शेवटी, इंग्लिस्तान येथील हिंदू-मुसलमान दंगलीच्या वेळीही या राष्ट्र वडीलांनीच त्यांना मान्य केले होते हे त्यांना माहीत होते. त्या हिंदू आमदारांनी सावरकर व लालकंठीवाल्यांची संघटना यांच्यावरील वचन दिली परस्परविरुद्ध मते धारीत व त्यामुळे " शांतता व स्वास्थ्याला धोका पोहचेल " या सरकारी धोरणाचा पुरस्कार करणे, यापेक्षा हास्यास्पद काय असू शकेल? या घटनेवर प्रकाश पाडणारा जवाहरलालजींच्या स्वराज्य किस्सा या वेळी ध्यानात आल्यावाचून राहत नाही. सीमाप्रांतातील घनिष्ठ आमदार पोलिटिकल खात्याच्या दडपणाला बळी पडत असतील, पण त्या धोरणाचा महासभेच एक शिरोमणीही पुरस्कार व प्रचार करीत राहिले ते पाहून जवाहरलालजींना अत्यंत विषाद वाटला. ते म्हणतात, " हिंदू किंवा मुस्लिम, कोणाच जातिधर्मांचा मी कधी पक्षपात मानलेला नाही. पण एका घटनेमुळे हिंदूसमाज बद्दल माझ्या मनात पडचम्पणा निर्माण झाला आहे. हिंदुमहासभेच्या एका शिरोमणींनी सरकारी नोकरीवरील नियमणे मागे न घेण्याच्या सरकारी धोरणाला पाठिंबा दिला आहे. त्याबद्दल सरकारनी पाठ थोपटली आहे. जातीय दृष्टी इतक्या अनिष्टाला जाऊ शकते असे मला वाटले नव्हते. महासभेचे प्रमुख नसे तरी या धोरणाचा इन्कार करतील असे वाटले होते. पण तसे कोणी एकानेही अजून केले नाही. " या घटनेचा नेहरूंच्या मनावर इतका परिणाम झाला होता की त्या अस्वस्थ मन:स्थितीत त्यांचा डोळा लागला. दुपारची झोप, त्यात त्यांना स्वप्न पडले. " अब्दुल गफारखानावर चारी बाजूंनी हल्ले चढविले जात होते व त्यांच्या संरक्षणार्थ मी लढत होतो. मी जागा झालो तो अगदी थकून गेलो. मन अगदी विषण्ण झालेले होते. माझी उशी माझ्या आसवांनी भिजलेली होती ... आतापर्यंत भावनाचा इतका पगडा माझ्यावर कधी पडत नसे ... " नेहरूंच्या या उद्गारांवरून हिंदुमहासभेच्या आत्मघातकी व लाजिरवाण्या धोरणाचा परिणाम त्यांच्या मनावर किती झाला होता हे उघड आहे, पण नेहरू स्वप्नाधीन असतानाच गफारखानांच्या साठी प्रत्यक्ष धावले—लढले. आठ वर्षे त्यांच्याकडेच सर्वश्रेष्ठ सत्तास्थान असूनसुद्धा, ते त्यांच्यासाठी काहीही करू शकले नाहीत. पंडितजींच्या या स्वप्नाने त्यांच्यावर टीका करून टाकली आहे. अन्यायाने व कधी केव्हा अत्याचाराच्या दहशतीने राज्यसत्ता टिकवू पाहणाऱ्या परकीय राज्यकर्त्यांचे हिंदुअल्पसंख्याकही कसे मस्तक होतात हे पाहिल्यानंतर तोच डाव मुस्लिम धनिक अगर संधिसाधू नेते हिंदू बहुसंख्येच्या प्रांतात खेळले असल्यास आश्चर्य का वाटावे? यांत धर्माचा अगर जातीकल्याणाचा कोठेच संबंध असत नाही. तो संधिसाधू नेतृत्वाचा प्रकार असतो. खास प्रांतातील जनतेचे हिंदू व मुसलमान प्रतिनिधी एकाच जेलमध्ये त्या वेळी खितपत पडलेले होते. हातात हात घालून बंदुकीच्या गोळ्या खात होते आणि मुस्लिम

बहुसंख्येच्या देशसेवकांवर गोळ्या घालण्याचा हुकूम मोडणारी फलटणही हिंदूंची होती हेही लक्षात घेण्यासारखे आहे, पण हा सारा विवेक सत्ता व स्वार्थ यांनी आंधळे बनलेल्या लोकांना असत नाही ते धर्माच्या व जमातीच्या नावाखाली असले डाव खेळत राहतात व त्याला यश येईपर्यंत प्रामाणिकपणे बळी पडतात व साऱ्या समाजाची त्यात आहुतीच पडते

# १३

# जमनालालजींच्या हृदयात

कारा गमन । कारा मुक्ति
गुलामगिरिची । जीवनव्याप्ति ॥
चलाव लाठी । चलाव गोळी ।
नको गुलामी । मौत ही भली ॥

बादशहाखानांसारख्या कर्मयोगी पुरुषांची जीवनव्याप्ती तुरुंगाच्या परिघातच असे आणि हे त्यांच्या बाबतीत या क्षणापर्यंत सत्य ठरले आहे. प्रगतिप व सुधारलेला म्हणून समजल्या जाणाऱ्या मानवसमाजाला हा केवढा कलंक आहे? दि. २४ डिसेंबर १९३१ ला त्यांना पकडून हजारीबाग (बिहार) तुरुंगात नेऊन टाकले. त्यांची ही शिक्षा स्थानबद्धतेची व बिनमुदतीची होती. त्यांच्या मुक्ततेची मागणी सर्वच पक्षीयांनी-मुस्लिम लीगनेही-केली होती. गांधीजींनी पंतप्रधान मॅक्डोनाल्ड यांनी दिलेल्या जातीय निवाड्याविरुद्ध येरवडा तुरुंगात प्राणांतिक उपोषण केले त्यातून, हरिजनचळवळ निर्माण झाली व सत्याग्रहाचा कार्यक्रम तहकूब केला होता. काँग्रेसच्या नेत्यांमध्येही त्यामुळे फाटाफूट व मतभेद सुरू झाले होते. गांधीजींनी तुरुंगातूनच हरिजन चळवळीवर सर्व शक्ती केंद्रित केल्याबद्दल नेहरू-सुभाषचंद्रच नव्हेत तर वल्लभभाई-राजेंद्रबाबू यांच्यासारख्या निकटवर्तीयांमध्येही असमाधान होते. काँग्रेसचे अधिवेशन मुंबईस होण्याचे ठरले होते. अशा परिस्थितीत खानबंधूंना २७ ऑगस्ट १९३४ ला मुक्त करण्यात आले आणि त्याच दिवशी सीमाप्रांत, पंजाब, युक्त प्रदेश वगैरे प्रांतात त्यांनी " प्रवेश करू नये, वास्तव्य करू नये किंवा भाषण करू नये " अशा आशयाचे हुकूम त्या त्या प्रांताच्या तर्फे त्यांच्यावर बजावण्यात आले. त्यामुळे सर्व बाजूंनी

सोडल्यानंतर "वन्ड विदाउट ए व्हिसा" या प्रकरणात यंगहस्बंडने स्वतःबद्दल म्हटल्या-प्रमाणे बादशहाखानांची स्थिती झालेली होती. कोणत्या प्रांतात जाता येईल याविषयी त्यांना नीट कल्पना येणे कठीण होते. कारण जिकडे जाण्यास निघाले तिकडील प्रांताचे प्रवेशप्रति-बंधाचे हुकूम निघावयाचे. पण मुंबई प्रांताने "अशा प्रकारचा प्रतिबंधक हुकूम काढण्याचे आपल्यास प्रयोजन दिसत नाही" अशा आशयाचे उत्तर दिले होते. यामागेही काही हेतू असेल. गांधीजींनी स्वतः स. हरिजनचळवळीमध्ये गुंतवून घेतलेले होतेच, तेव्हा त्यांच्या प्रांतातच बादशहाखानांना वावरू देणे शहाणपणाचे, असा दूरवरचा विचार दिल्लीकरांनी केला नसेल असे मानण्याचे कारण नाही. त्यांच्यावरील प्रवेशबंदीचे हे हुकूम गांधीजी व त्यांचे वर्ध्यातील यजमान व पाचवे पुत्र मानले गेलेले सेठ जमनालाल बजाज यांना कळली होतीच. त्यांनी बादशहाखानांना तातडीने तारेने वर्ध्यास येण्यास विनंती केली.

हजारीबाग तुरुंगातून सुटल्यापासून पुन्हा डिसेंबर ७ ला त्यांना पकडले, तोपर्यंतच्या तीन महिने दहा दिवसांच्या काळाची माहिती स्वतः बादशहाखानांनीच आपल्या "पख्तून" मासिकात नंतर प्रसिद्ध केली आहे. "हजारीबाग जेलमधून आम्ही बंधू सुटलो तेव्हा ती एक विचित्र प्रकारची सुटका होती. पण जेलमधून सोडले गेले होतो. आमच्या प्रांतात किंवा पंजाबात प्रवेश करण्यास प्रतिबंध केला गेला होता. आमच्या मुक्ततेबद्दल देशाच्या कोना-कोपऱ्यातून अभिनंदनाची पत्रे येऊ लागली. आम्ही हजारीबाग सोडण्यापूर्वी सेठ जमनालाल बजाज यांची तार पोहोचली, त्यामध्ये आपण आपल्या प्रांतात जाऊ शकत नाही, म्हणून वर्ध्यास यावे, येथेच रहावे." गांधीजीही तेथेच होते, शिवाय या आमंत्रणाशिवाय देशातील अन्य कोणा हिंदू अगर मुसलमानांतर्फे बोलावणे मिळालेले नव्हते. म्हणून त्यांनी वर्ध्यास जाण्याचे ठरवले, पण इतक्यात मा. अब्दुल्बारी आले व त्यांच्या आग्रहामुळे पाटण्यास प्रथम गेलो. पाटणा स्टेशनवर आमचे जुने जेलसाथी राजेंद्रबाबू व इतर महानुभाव आलेले होते. तेथे रात्री एक मोठी जाहीर सभा झाली. सकाळी कमानाला गेलो, तेथे मजूरांच्या एका सभेत भाग घेतला. नंतर शांतिनिकेतनला पोहोचलो. तेथे रविराज टागोर व महाविद्यालयातील प्राध्यापक यांच्या गाठीभेटी घेतल्या. महाविद्यालय व त्यातील विद्यार्थी पाहिले. रात्र अब्दुल गनीकडे घालविली. सकाळी पाटण्याकडे रवाना झालो. तेथून प्रयाण व पुढे वर्ध्यास पोचलो. गांधीजींना भेटलो. थोड्या दिवसांनी अ. भा. काँग्रेस कार्यकारिणीची बैठक झाली. त्या वेळी मौ. आझादांनी सांगितले की सर्वच बंगालच्या मुसलमानांची व विशेषतः कलकत्त्यातील पेशावरी व्यापाऱ्यांची मी तिकडे यावे अशी इच्छा आहे. मी या निमंत्रणाचा स्वीकार केला, परंतु बापूंना ते मान्य नव्हते. सरकार पुन्हा पकडील असे त्यांना तेव्हाच वाटले होते, परंतु मौलानांच्या आग्रहामुळे त्यांनी संमती दिली. आम्ही कलकत्त्याला निघालो

१३

# जमनालालजींच्या दुजऱ्यात

कारा गमन । कारा मुक्ति
गुलामगिरिची । जीवनव्यासि ॥
चलाव लाठी । चलाव गोली ।
नको गुलामी । मात ही मली ॥

बादशाहखानासारख्या कर्मयोगी पुरुषांची जीवनव्यासी तुरुगाच्या परिघातच असे आणि हे त्याच्या बाबतीत या क्षणापर्यंत सत्य ठरले आहे प्रागतिक व सुधारलेला म्हणून समजल्या जाणाऱ्या मानवसमाजाला हा केवढा कलंक आहे ? दि २४ डिसेंबर १९३१ ला त्याना पकडून हजारीबाग (बिहार) तुरुगात नेऊन टाकले त्याची ही शिक्षा स्थानबद्धतेची व बिनमुदतीची होती त्यांच्या मुक्ततेची मागणी सर्वच पक्षीयानी–मुस्लिम लीगनेही–केली होती गांधीजींनी पतप्रधान मॅक्डोनाल्ड यांनी दिलेल्या जातीय निवाड्याविरुद्ध येरवडा तुरुगात प्राणांतिक उपोषण केले त्यातून, हरिजनचळवळ निर्माण झाली व सत्याग्रहाचा कार्यक्रम तहकूब केला होता काँग्रेसच्या नेत्यांमध्येही त्यामुळे फाटाफूट व मतभेद सुरू झाले होते गांधीजींनी तुरुगातूनच हरिजन चळवळीवर सर्व शक्ती केंद्रित केल्याबद्दल नेहरू–सुभाषचंद्रच नव्हेत तर वल्लभभाई–राजेंद्रबाबू यांच्यासारख्या निकटवर्तीयामध्येही असमाधान होते. काँग्रेसचे अधिवेशन मुंबईस होण्याचे ठरले होते अशा परिस्थितीत खानबंधूना २७ ऑगस्ट १९३४ ला मुक्त करण्यात आले आणि त्याच दिवशी सीमाप्रांत, पंजाब, युक्त प्रदेश वगैरे प्रांतांत त्यांनी " प्रवेश करू नये, वास्तव्य करू नये किंवा थांबू नये " अशा आशयाचे हुकूम त्या त्या प्रांताच्या तर्फे त्यांच्यावर बजावण्यात आले त्यामुळे सर्व बाजूनी

कोंग्रेसनंतर " वर्ड विदाउट ए फिअर " या प्रकरणात टॅंडुलकराने स्वत बद्दल म्हटल्या सारखी बादशाहखानांची स्थिती झाल्ली होती कोणत्या प्रांतात जाता येईल याचीही त्यांना नीट कल्पना येणे कठीण होते कारण जिकडे जाण्यास निघाल तिकडील प्रांताचे प्रवशप्रति बंधाचे हुकूम निघावयाचे पण मुंबई प्रांताने " अशा प्रकारचा प्रतिबंधक हुकूम काढण्याचे आपल्यास प्रयोजन दिसत नाही ' अशा आशयाचे उत्तर दिले होते यामागेही काही हेतू असल गांधीजींनी स्वत स हरिजनबंधूमध्ये श्रुनून घतल्ले होतच, तेव्हा त्यांच्या प्रांतात बादशाहखानांना वावरू देणे शहाणपणाचे असा दूरवरचा विचार दिल्लीकरांनी केला नसल असे मानण्याचे कारण नाही त्यांच्यावरील प्रवशबंदीच हे हुकूम गांधीजी व त्यांचे वर्ध्यातील यजमान व पाचवे पुत्र मानले गेलेले सेठ जमनालाल बजाज यांना कळली तेनीच त्यांनी बादशाहखानांना लागलीच तारेने वर्ध्यास येण्यास विनती केली

हजारीबाग तुरुगातून सुटल्यापासून पुन्हा डिसेंबर ७ ला त्यांना पकडले तोपर्यंतच्या तीन महिने दहा दिवसांच्या काळाची माहिती स्वत बादशाहखानांनीच आपल्या " पख्तून ' मासिकात नतर प्रसिद्ध केली आहे " हजारीबाग जेलमधून आम्ही जेव्हा सुटलो तेव्हा ती एक विचित्र प्रकारची सुटका होती फक्त जेलमधून सोडले गेलो होतो आमच्या प्रांतात शिवा पजाबात प्रवेश करण्यास प्रतिबंध केला गेला होता आमच्या मुक्ततेबद्दल देशाच्या कोना कोपऱ्यातून अभिनंदनाची पत्रे येऊ लागली आम्ही हजारीबाग सोडण्यापूर्वी सेठ जमनालाल बजाज यांची तार पोहोचली त्यामध्ये आपण आपल्या प्रांतात जाऊ शकत नाही, म्हणून वर्ध्यास याव येथेच रहाव ' गांधीजींही तयेच होते शिवाय या आमत्रणाशिवाय देशातील अन्य कोणा हिंदू अगर मुसलमानातर्फे बोलावणे मिळालेले नव्हते म्हणून त्यांनी वर्ध्यास जाण्याचे ठरवले पण इतक्यात श्री अब्दुल्बारी आले व त्यांच्या आग्रहामुळे पाटण्यास प्रथम गेलो पाटणा स्टेशनवर आमचे जुने जेलसाथी राजेंद्रबाबू व इतर मह नुभाव आलेले होते तेथे रात्री एक मोठी जाहीर सभा झाली सकाळी कयानाला गेलो तेथे गरीबांच्या एका सभेत भाग घेतला नतर शातिनिकेतनला पोहोचलो तेथे कविराज टागोर व महाविद्यालयातील प्राध्यापक यांच्या गाठीभेटी घतल्या महाविद्यालय व त्यातील विद्यार्थी पाहिले रात्र अब्दुल गनीकडे घालविली सकाळी पाटण्याकडे रवाना झालो तेथून प्रयाण व पुढे वर्ध्यास पोचलो गांधीजींना भेटलो थोड्या दिवसांनी अ भा काँग्रेस कार्यकारिणीची बैठक झाली त्या वेळी मौ आझादांनी सांगितले की सबंध बंगालच्या मुसलमानांची व विशेषत कलकत्त्यातील पेशावरी व्यापाऱ्यांची मी तिकडे यावे अशी इच्छा आहे मी या निमत्रणाचा स्वीकार केला परंतु बापूना ते मान्य नव्हते सरकार पुन्हा पकडील असे त्यांना तेव्हाच वाटले होते परंतु मौलानांच्या आग्रहामुळे त्यांनी समती दिली आम्ही कलकत्त्याला निघालो

कलकत्ता स्टेशनवर स्वागतासाठी खूप मोठा जनसमुदाय हजर होता आम्हांला अत्यंत आदरसन्मानाने कलकत्त्यास नेले गेले कलकत्ता महानगरपालिकेतर्फे मानपत्र देण्यात आले काही दिवस तेथील पठाण भाईंच्याकडेही राहिलो

"बंगालमधील मुसलमानांना भेटावे अशी माझी इच्छा होती काही जाहीर सभांतूनही तसे बोललो, पण कलकत्त्यामधील (शहरातील) मुसलमानांच्या मनात मला या कामी साहाय्यक होण्याची इच्छा असल्याचे दिसून आले नाही माझा निर्णय पक्का होता मेदफलचंद्र घोष नावाचे एक काँग्रेसचे कार्यकर्ते आहेत मला साहाय्य करण्यास ते तयार झाले बंगालच्या एका भागात मी माझ्या मित्रासह गेलो डॉ खानसाहेब आगामी असेंब्लीच्या निवडणुकीसंबंधीचे काही कागदपत्र तयार करण्यासाठी कलकत्त्यासच राहिले त्या भागातील परिस्थिती मी पाहिली तेथील सार्‍याच लोकांची स्थिती बरी नव्हती, परंतु मुसलमानांची स्थिती अधिक खराब होती त्या भागात मी काही दिवस घालविले मुंबईला परत लवकर जावयाचे होते म्हणून बंगालचा हा दौरा आटोपला कलकत्त्याहून वर्धा व वर्ध्याहून मुंबईस पोहोचलो बंगालमधील मुसलमानांची जी शोचनीय परिस्थिती पाहिली होती तिचा माझ्या अंतःकरणावर व डोक्यावर खूप परिणाम झालेला होता त्या लोकांची सेवा करावी असा माझा विचार होता गांधीजींशीही मी याविषयी बोललो होतो त्यांची अनुकूलता होती व या कामी मला मदत करण्याचे वचनही त्यांनी दिले होते

"त्या बंगाली मुसलमानांची परिस्थिती मी थोडीशी पाहिली होती त्यांच्याकडे व सर्वच गरीब बंगाली जनतेकडे माझे त्या दिवसांत लक्ष लागलेले होते त्यामुळे दि ७ डिसेंबर १९३४ ला बंगालला जावयाचे ठरविले होते आमच्या हालचालींवर सरकारनेही सक्त नजर ठेविली होती त्यांना आमचा राग, नाराजी सहन होत नव्हती, बंगालमधील हिंदूंच्या जागृतीमुळे सरकारला अनेक अडचणींना तोंड द्यावे लागले होते आणि जेव्हा त्यांना कळले की मी बंगालमध्ये जाणार आहे व काही झाले तरी मी परावृत्त होणार नाही तेव्हा त्यांनी मला दि ७ डिसेंबरलाच वर्ध्याला पकडले व मुंबईला रवाना केले माझा गुन्हा एवढाच होता की माझ्या अंतःकरणात दुःखपीडित बंगाली बांधवांविषयी सहानुभूती होती, त्यांच्याविषयी माझ्या अंतःकरणात स्नेह व प्रेमभाव निर्माण झाला होता म्हणून माझ्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवला गेला व खटला सुरू केला-" (मुंबई क्रॉनिकल)

हजारीबाग तुरुंगातून सुटल्यापासून मुंबईच्या प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटच्या कचेरीच्या तुरुंगात पोहोचेपर्यंतच्या काळातील महत्त्वाच्या घटनांचा हा क्रमिक अहवाल आहे तो स्वतः बादशाह खानांच्या लेखणीतून उतरलेला आहे यांची दृष्टीने तो लक्षात घेण्यासारखा आहे त्यांच्या लेखनशैलीचा साधेपणा, त्यातील स्पष्टता व जिव्हाळा सहज ध्यानात येण्याजोगा आहे

बादशाहखानांच्या सेवेचा प्रभाव सीमाप्रदेशातीलच नव्हे तर स्वतंत्र पाकिस्तानमधील जमीनीवरही स्थिर पडलेला होता हे राज्यकर्त्यांना ठाऊक होते तेव्हा बंगालमध्ये तो प्रयोग त्यांनी बन्द केला नसता हे उघडच आहे, परंतु बादशाहखानांनी बंगालच्या ऐवजी बिहार किंवा ओरिसाकडे जाण्याचे ठरविले असते तरीही सरकारने तेच केले असते ते कुठे जाणार याला महत्त्व नव्हते, ते काय बोलणार व काय करणार हे इतरांना समजले तरी सरकारला ठाऊक होते म्हणून जन्मभराच्या मरणाचीही साथच ठरली त्याप्रमाणे तुरुंग मुक्ततेचे वेळेच दुसऱ्या तुरुंगाची तयारी झालेलीच होती बादशाहखानांवर हा खास धा यांचे उत्तरही कठीण नाही इतक्या शुद्ध राष्ट्रवादाचा मुस्लिमनेता मोकळा ठेवणे सरकारला जड गेले असते नव्या राजकीय सुधारणा त्यांना लवकरच पुढे आणावयाच्या होत्या पुढील पण वाटवणारे मुस्लिम नेतेच त्यांना वाढवावयाचे होते अशा वेळी बादशाहखानांसारख्यांना मोकळे कसे सोडून दिले जाईल? हा केवळ तर्क नाही! तुरुंगातून सुटल्यावर बादशाहखानांच्या हालचाली सुरू होताच हिंदुस्थान सरकारने प्रांतांना सूचना देऊन ठेवल्या होत्या दि २० सप्टेंबरला मुंबईच्या गृहखात्याचे चिटणीस मॅक्सवेल यांनी जिल्हाधिकाऱ्यांना दिलेल्या सूचनांत त्यांचा हेतू स्पष्ट केलेला आहे खानबंधू फिरतीवर आहेत, त्यांची भाषणे काळजीपूर्वक नोंदली गेली पाहिजेत, असे सांगताना सदर पत्रात म्हटले आहे "Have their speeches carefully reported with a view to their prosecution, should they bring themselves within the mischief of the law " याचा भाव व अर्थ दोन्ही अगदी स्पष्ट आहेत. त्यांना बाहेर ठेवू नये हा सरकारचा निर्णय त्याच वेळी झाला होता हे उघड आहे

गांधीजींनी दांडीयात्रेसाठी निघताना साबरमती-आश्रमाचा निरोप घेतला होता पंधरा वर्षे अनेक कार्यकर्त्यांनी अविश्रांत श्रम करून हा आश्रम उभारला होता शेकडो कार्यकर्ते तेथे देशसेवेचे धडे घेत होते संपूर्ण सामाजिक क्रांतीचे विधायक प्रयोग तेथे चाललेले होते जगाच्या निरनिराळ्या भागांतून पत्रकार, समाजसेवक, तत्त्ववेत्ते त्या आश्रमात येऊन अहिंसात्मक क्रांतीचे दर्शन घेऊन जात विश्वकीर्तीच्या त्या निर्मितीवर पाणी सोडण्याचा निर्णय गांधीजींनी क्षणार्धात घेतला होता दगड-मातीच्या संस्थांना चिकटून राहणारी माणसे त्या दगडमातीइतकीच जड किंवा मृत झालेली असतात म्हणून संस्थांच्या मालकीसाठी, तेथील सत्तेसाठी लोकांची धडपड चालते सर्वसंगपरित्यागी परमहंसपरिव्राजकाचार्यांच्या मठांतही पिढ्यान् पिढ्या वारसा हक्काचे खटले चालतात गांधीजी कार्यासाठी संस्था उभ्या करीत व निरपेक्ष वृत्तीने कार्यासाठी त्यांची आहुती देत

" स्वातंत्र्य मिळाल्यानंतरच आता येथे निवास " असे उद्गार काढून गांधीजी साबरमती

आश्रमातून दोन्हीवेळेवर निरा झाल होते १९३४ मध्ये चळवळीला हरिजन कार्याने वळण देऊन ते सतत देशभर हिंडत राहिले त्या वेळी वर्ध्याच रत्यन्त लक्ष्मीपुत्र जमनालालजी बजाज यांनी त्याना–गांधीजींना–त्यांच्याच मालकीच्या वर्ध्यास येऊन तेथे कार्यकेन्द्र केले जाव अशी विनंती केली जमनालालजींनी गांधींना आपले वडील मानले होते इतकेच नव्हे तर गांधीजींनी जमनालालजींना आपले पाचवे पुत्र मानण्याचे बांधले गेले होते, आणि हा भाग अलौकिक नेतृत्वनिष्ठेचा साधा उभयतांमधे प्रेमाचे-स्नेही वगैरे-सदार होऊन पक्का झालेला होता त्यामुळ बादशहाखानानाही त्यांनी तिकडेच बोलवावे हीही साळच होते या दोन्ही गांधींच्या मनात होते तरी एकत्र राहाव असे मनोमनी वाटत होते आणि ही त्यांची इच्छा सरकारने अशा रीतीने सफल केली होती बादशहाखान १९१८ व २१ मध्ये सत्याग्रही मार्गाने तुरुंगात गेले होते व गांधीजींचा सत्याग्रही मार्ग त्यांनी मनोमनी स्वीकारला होता १९३० ३१ च्या लढ्यात ते नेते बनले होते व गांधीजींशी त्यांचा प्रत्यक्ष सवधही काँग्रेसमध्ये आला होता असे असले तरी त्या दोघांची प्रत्यक्ष भेट झालेली नव्हती आणि एकटे बादशहाखानच नाही तर दोन्ही बधू त्यांच्याकडे आता आले, थोड्याच दिवसांत खानबंधूचे छोटे कुटुंब बजाजांच्या 'हुजऱ्या'त जमा झाले सीमा प्रांतात अतिथिगृहाला "हुजरा" म्हणतात, पण त्यात केवळ अतिथिगृहाची कल्पना नाही थोरामोठ्यांच्या वाड्यांना जोडून एक स्वतंत्र बठकीचे छप्पर असते तेथे गावातील लहानमोठे सर्व लोक दिवसभर एकमेकांची सुखदुःखे सांगण्यास येत जात असतात, गप्पा मारण्याचे, खळण्याचे अड्डे तेथे पडतात जमनालालजींचे अतिथिगृहच नव्हे तर त्यांचा राहता वाडाही पठाणी "हुजऱ्या" सारखा होता तेथे कोणाला मज्जाव नसावयाचा जुन्या परंपरेचे मारवाडी धनिकांचे ते घर! पण ते फक्त व्यापारी नव्हते मोठे जमीनदार आणि जमातदार व सेठिये यांच्या संस्कृतीत जमीन–अस्मानाचा फरक असतो शेतीवाडीशी संपर्क असलेले मन समाजातील सर्व थरांशी स्पर्श पावणारे ईश्वरी सत्तेपुढे लीन राहणारे व त्यामुळे लहान-थोर सर्वांबद्दल स्नेहभावना राखणारे असे असते याच्या उलट व्यापारी व उद्योगप्रधान संस्कृतीत वाढणारे मन वैयक्तिक कर्तृत्वावर अधिष्ठित अखंड स्पर्धाभावनेवर तरणारे व त्यामुळे समाजभावनेकडे पाठ फिरलेले असे बनते जमनालालजींच्या राहत्या वाड्यातून काम करणाऱ्या बायांची अवडी रडवी पोरे इतस्ततः कोठेही त्यांच्या आयांच्यामागे रडत खळत फिरताना दिसायची, तर त्या पोरांच्या मागे व मधे फिरणारी कुत्रीही तितकीच असायची मलेकाची बाजू धरणारा तेथे कोणी असायचा घरात गरीब व श्रीमत हा भेदमात्र फक्त तिजोरीतील पसा मोजणाऱ्या दिवाणजीला माहीत, किंवा खरे म्हणजे त्यांच्या जुन्या विश्वस्त दिवाणजीकडे त्यांच्या कुटुंबीयाना त्यांच्या संपत्तीची काही माहितीही नसेल,

त्यांच्या थोर पत्नींनी कधी स्वतांची भाकरी केली नसणार. घरातील दहा नोकर चाकर भोवती सतत. मेहरी व त्यांच्या सुनाबेटींनी ऐषआरामाच्या कामात भाग घेत असे. हे चित्र सरंजामशाही समाजपद्धतीतील जमीनदारांच्या घराण्याचे असते. साऱ्या गावाचा गाडा ह्या घराण्यावरून त्यांच्या समाजाचा भार असायचा. मुख्यत साऱ्या समाजजीवनाशी त्यांचे संबंध जिव्हाळ्याचे असत. विदर्भात अशी शेकडो जमीनदार-इनामदार कुटुंबे होती. त्यांपैकीच बजाजकुटुंब होते आणि सीमाप्रदेशातील खानांची कुटुंबे तीही त्याच प्रकारची होती.

परंतु बादशहाखान व डॉ. खान हे राजकीय निराश्रित म्हणून वर्धाला पोचले होते म्हणून सरकारी छळामुळे त्यांच्याबद्दलचे जनतेतील प्रेम अलोट वाढले होते.

गांधीजींचा सेवाग्राम आश्रम अद्याप निर्माण व्हायचा होता. मगनवाडीत त्यांचा आश्रम होता. खानबंधूंना जमनालालजींच्या प्रेमाने इतके जिंकले होते की, बादशहाखानां-सारख्या थोड्याशा अबोल व अंतर्मुख वृत्तीच्या माणसालाही जमनालालजींनी बोलके व अधिक हसरे बनविले होते. अतिथिगृहात त्यांचा मुक्काम असला तरी श्रीमती जानकीदेवींच्या– जमनालालजींच्या सेवाशील पत्नी–व त्यांच्या मुलाबाळांच्या परिवारात त्यांना कोठेच हिंदू मुसलमानपणा नव्हे तर कसलाच आडपडदा आडवा आला नाही. जमनालाल-कुटुंब म्हणजेच एक लहानसे खेडे होते व त्यात सारी अठरापगड जात गुण्यागोविंदाने नांदत होती. त्या वेळी जमनालालजी हरिजनकार्यात गुंतले होते. तेथे भेदभाव नसतील असे नव्हे, पण स्नेहभाव सर्वत्र पसरलेला असे.

या वातावरणात खानबंधू लवकरच एकरूप झाले असल्यास आश्चर्य कसले? डॉ. खानसाहेब हे लंडनच्या हॉस्पिटलमध्ये हुशार म्हणून कीर्ती मिळविलेले व लष्करी नोकरीत वाढलेले. परंतु ते त्या ग्रामीण व कडक बंधनात शहरी संस्कृतीला मान्य वागण्याच्या वातावरणात रमून गेले. आश्रमी लोकांसच नव्हे तर सेवाग्रामपासून दूरदूर पायी जाऊन वैद्यकीय उपचार करू लागले. कन्याशाळेला साहाय्य करू लागले. खान रुग्णांसाठी मोसंब्या किंवा सूप तयार करून देण्याच्या कामात ते रमलेले दिसायचे. बादशहाखान देशाच्या व समाजाच्या दुःखाच्या विचारात नेहमीच मग्न असत. तोच भार आयुष्यभर सांभाळण्यासाठीच देवाने त्यांना जन्माला घातले आहे की काय न कळे! पण त्यांनाही आश्रमी जीवनातील आध्यात्मिक वाऱ्याची थोडी झुळूक तेथे लागली, त्यात ते रमू लागले होते. सकाळी गांधीजी तुलसीरामायण ऐकत त्यापूर्वी त्यांची प्रार्थना असे. या प्रार्थनेत एकनाथांवरील भावपूर्ण भजने होत. त्यामध्ये बादशहाखान तल्लीन गुंग होत, किंबहुना या आध्यात्मिक जीवनात ते थोडेसे तरंगू लागले होते. तुलसीदास, मीरा, तुकाराम, कबीर, नामदेव यांची भजने नीट समजणे त्यांना कठीण जाई, तेव्हा त्यांचा भावार्थ नीट समजावा म्हणून ते व्याकुळतेने महादेवभाई किंवा प्यारेलाल यांना

विचारांत, लिहून घेत. हीच अखण्ड क्रांती होय. निरखून; अनुभूतीतून होणारी क्रांती तीच खरी व टिकाऊ क्रांती असते, ती क्रांती भारतात सत्याग्रहाने घडवून आणली व दीर्घकाळ टिकून धरली. तीही आता बदललीच पाहिजे; त्यात बाह्य भेदभाव टिकलेले आहेत. ते रूपरंगाच्या भेदभावाप्रमाणे आहेत, पण अंतरीचा परमात्मा ओळखणाऱ्यास बहिरंगाचा भेदभाव बोचत नाही. याच्या उलट व्यापक बंधुभाव न ओळखता कायद्याची समानता स्थितीशी वाढली तरी तो सारखेपणा अंगाला लागत नाही त्यातून असमाधानाचा क्षोभ वाढतच असतो.

बादशहाखान व गांधीजींचा हा अल्प सहवास त्या दोघांना मनाने निकट आणण्यास जास्त कारणीभूत झाला. तसाच तो हजारो कार्यकर्त्यांना प्रभावी व मार्गदर्शक ठरला. तेथील संस्कारक्षम व प्रेमळ वातावरण पाहून बादशहाखानांनी आपली मुलगी मेहेरताज हिला तेथेच कन्याविद्यालयात आणून ठेवण्याचे ठरविले. लंडनमधील शाळेपेक्षा वर्ध्याचे महिलाविद्यालय अधिक हिताचे वाटणे हीच खरी क्रांती होय! त्यांचा छोटा मुलगा अली हाही तेथे आला. गनी सादुल्ला व वली हेही येऊन-जाऊन होते. इंग्लंडमधील नौदलाच्या प्रमुखाची कन्या मिस स्लेड-मीरा-बहन याही जिवंत ख्रिस्ताच्या शोधार्थ भारताच्या वाटेला त्या वेळी लागल्या होत्या. त्यांच्याबरोबर मेहेरताजला आणण्यात आले आणि या साऱ्या विश्वकुटुंबाचे यजमान होते जमनालालजी! गांधीजींच्या निर्वाणानंतर व स्वातंत्र्यप्राप्ती-नंतरच्या वीस वर्षांच्या घडामोडीनंतर वर्ध्याच्या त्या विश्वकुटुंबातून सख्या सहजीवनाची वाटचाल केलेल्या क्रांतीची आज काय कल्पना येणार? पण ज्यांनी ते वातावरण पाहिले त्यांना तो आनंद आयुष्यभर पुरला आहे. अनेक कार्यकर्त्यांनी त्या दर्शनातून आपले नवे जीवन व नवे जग निर्माण केलेले आहे.

१४

# खिस्ती समाजापुढील भाषण व शिक्षा—१९३४

बादशाहखान वर्णांच्या आध्यात्मिक वातावरणात कदाचित अधिक रमतील म्हणूनच की काय न कळे, त्यांना मौलाना आझादांनी कलकत्त्याला येण्याबद्दल गळ घातली. तसेच मुंबईच्या मित्रांनीही त्यांना कामाचा लोभ लावला. मुंबईला त्या वर्षी काँग्रेसबैठकीच्या गर्दीतही होत. त्यांमुळे त्यांना मोठमोठे पाहुणे मिळवता आले तर हवा पैदा करायला, ते हरहेनेच पुढाऱ्यांसाठी कार्यकर्त्यांचा निरनिराळ्या हेतूने डोळा असतोच.

खान बादशाहखानांचे नाव मुंबईच्या काही मित्रांनी काँग्रेसच्या अध्यक्षपदासाठी सुचविले असता काही प्रकार पाहिला म्हणजे गदसम्न्न जाणाऱ्या नेत्यांपैकी बादशाहखान हे आहेत. त्यांनी तात्काळच सांगून टाकले "मी एक साधासुधा शिपाई आहे व मला तसाच राहू द्या. मित्रांचा हेतू मी समजू शकतो. माझ्या प्रांताच्या त्यागाचा गौरव करावा हा त्यांचा हेतू आहे. माझी स्वतःची सेवा फार तोकडी आहे हे त्यांनी विसरू नये. राजकारणातूनी नाव भाग घ्यावा हा विचारही मला झेपणारा नाही. तरी हा विचार मित्रांनी सोडून द्यावा." त्यांच्या त्या नकारामुळे तो प्रश्न संपला. पण मुंबईतील काही ना काही कार्यक्रमाची निमंत्रणे त्यांच्या मागे चिकटू लागली. नेत्यांचे बादशाही स्वागत मुंबईने नाही करायचे तर मग कोण करील हाही विचार मुंबईच्या कार्यकर्त्यांच्या मनात असतोच. मुंबई अधिवेशनाच्या वरळीतील विस्तृत नगराला "गफारखाननगर" असे नाव देऊन मुंबईकरांनी त्यांच्या बद्दलचा आदर व्यक्त केलेला होता. मुंबईच्या काँग्रेस बैठकीसाठी व त्यांचे तेथे ठेवलेले कार्यक्रम उरकून घेण्यासाठी ते मुंबईस दि. १९ ऑक्टोबर १९३४ ला येऊन पोचले. मग महोदयांना स्वागताचे कमान होते. त्यांचे शरीर दुबळे असले तरी वयाच्यांनी सबंध

करून पाडला होता बादशहाखानांची थाटात मिरवणूक काढली गेली

या खेपेचा त्याचा मुंबईतील मुक्काम १०-१२ दिवस झाला त्या काळानंत त्याची व्याख्याने त्याच्यावर खटला भरला गेल्याकारणाने चिरजीव केला गेली अथवा त्या व्याख्यानां मध्ये त्यांनी वेगळे किंवा विशेष कट्ट असे काही सांगितले नाही सरकार खटल्याचा कशी तयारी करीत होते ते वर व्यक्त केलेले आहेच

दि २० ला गफारखान-नगरातील खादीप्रदर्शनाचे उद्घाटन करताना ते म्हणाले

"लोकांना उपदेश करणाऱ्या पुढाऱ्यांनी स्वत तसा आचार करून नतर उपदेश केला पाहिजे सूत कातण्यास वेळ होत नाही असे आपण म्हणतो, बापूजींना वेळ मिळू शकतो आणि आम्हांला मिळू नये? अजब बात आहे चरखा खेड्यातील दरिद्री लोकांना एक वेळ जेवण देऊ शकतो चरखा हा अन्नदाता आहे केवळ गिरणी दुकाने काढण्यापेक्षा खेड्यातील उत्पादनकेंद्रावर अधिक भर दिला जावा माझ्या बदिवासामुळे आमच्या प्रान्तात सुरू केलेले विधायक कार्य बद पडले आहे" वर्धास आल्यानतर सूत कातण्याच्या कामात खानांनी खूप प्रगती केली होती या आठवड्यात कॉंग्रेसवर्किंगकमिटीमधील भाषणाशिवाय त्यांची विद्यार्थी, पठाणांच्या बैठकीत व हिंदी ख्रिस्ती समाजाने मुद्दाम आयोजिलेल्या सभेत अशी स्वतत्र भाषणे झाली यातील ख्रिस्ती समाजापुढील व्याख्यानामाठीच त्यांच्यावर डिसेंबर मध्ये खटला भरला गेला व पुन्हा दोन वर्षे तुरुगात काढावी लागली कॉंग्रेस अधिवेशनातील विषयनियामक-समितीच्या बैठकीत व दुसऱ्या बैठकीतही त्यांची भाषणे झाला खादी ग्रामोद्योग विषयाकडे त्याचे लक्ष अलीकडे विशेष लागले होते कॉंग्रेसनेत्यामधील दुफळी व विशेषत विधायक कार्याकडे होत चाललेले दुर्लक्ष यामुळे गांधीजींनी कॉंग्रेसमधून निवृत्त होण्याचे ठरविले होते हरिजनकार्यासाठी देशाच्या कानाकोपऱ्यापर्यंत ते सदेश पोहोचवून आले होते यापुढे ते हिंदू-मुस्लीम ऐक्य, खादी ग्रामोद्योग, अस्पृश्यतानिवारण आदि कामास वाहून घेणार होते बादशहाखानाच्या मनाची ठेवण गांधीजींसारखी ततोतत बनत चालली होती यामुळे गांधीजींना जे ठराव पास होणे अभिप्रेत होते त्या ठरावांवरच बादशहा-खानाची भाषणे झाली विषयनियामक सभेत ते म्हणाले, '९८ टक्के लोक खेड्या पाड्यांत आहेत त्यांची दुखद् खे माझ्या डोळ्यांपुढे आहेत बंगालमधील गरीब जनतेचे कैविल्याचे चित्र माझ्या डोळ्यापुढे आहे ते इतके भिन्न बनले आहेत की मला मनुष्य भारताच खेड्यातीच मुळे भिऊन दूर पळत सुटतात त्यांच्यातील बहुतेक अर्धपोटी आहेत जेथे चरखा पोचला तेथे एक तरी जेवण मिळू लागले चरख्यावरून राजकीय विचारही जातात हे लक्षात घ्या!" गांधीजींनी दि २८ ला कॉंग्रेस सघटनेच्या प्रत्यक्ष सभासदत्वाचा सबंध सपला व ते सघटनेतून निवृत्त झाले, पण या निवृत्तीच्या वेळी कॉंग्रेसमध्ये राहून

जेव्हा बबने कांग्रेसजनांवर लादता आली नसती त्यातून रिती तरी वडक यधने त्यांनी कॉंग्रेसजनाकडून मान्य करून घेतली मूलवर्गणीचा अनमान याच वेळी केला गेला बादशाहखान या सर्व कार्यक्रमांचे पुरस्कर्ते होते गांधीय विचारांच्या नेतृत्वामध्येही त्यांच्या इतक्या बोलम श्रद्धेचे फार थोडे लोक होते स्वातंत्र्योत्तर कालान तर हे सत्य भयावह रीतीने स्पष्ट झाले

मुंबईतील स्त्रियांसाठी बादशाहखानांचे एक भाषण झाले या सभेच्या अध्यक्ष श्रीमती गोशीबेन या होत्या १९३० च्या लढ्याच्या काळात मदर्शी दादाभाई नौरोजींच्या तीन नातींनी फार थोर अशी अबोल कामगिरी केली होती पेरिनबेन, गोशीबेन व खुर्शीदबेन या या तीन भगिनी होत त्यांनी गांधीजींच्या कार्यास सर्वस्व दिलेले होते सत्यनिष्ठा, सदाचार, धय व वेश मोमण्याची तयारी या भगिनींनी असामान्यपणाने दाखविली होती १९३१ मध्ये गांधी आयर्विन तडजोडीच्या काळात सीमा प्रांतातील अत्याचार-दंगली आदि परिस्थिती पाहण्यासाठी ज्या वेगवेगळ्या मंडळींनी त्या प्रांतास भेटी दिल्या त्यांमध्ये खुर्शीदबेन या होत्या भीतिदायक वाटणाऱ्या पठाणांच्या मध्ये त्यांनी सुमारे एक वर्ष काळ घालवला होता पठाण स्त्रियांमध्ये प्रवेश केला व पठाणांची बहीण म्हणून त्या समज त्यांनी पावल्या सीमाप्रांतात त्यांनी काम करू नये म्हणून सरकारने त्यांना तुरुंगही दाखवला पण त्यांनी कशाचीही तमा न बाळगता तथून पाय काढला नाही खुर्शीदबेन व त्यांच्यासारखेच भारतीय स्त्रीवर्गाचे हे ऋण बादशाहखान फार मोठे मानीत त्याच्या ऋणाचा ते वारंवार उल्लेखही करीत मुंबईतील व्याख्यानात ते म्हणाले आमच्यासाठी पारशी स्त्रियांनी केलेल उपकार पठाण कधीही विसरणार नाहीत खुर्शीदबेन आमच्यासाठी दोन वेळा तुरुंगात गेल्या सरकारचा पठाणांवर राग का तर ते भारताशी, कॉंग्रेसशी एकरूप झालेले आहेत म्हणून इंग्रजांनी या हेतूने आम्हांला भारतापासून तोडून आमचा वेगळा प्रांत बनवला तो त्यांचा हेतू आम्ही उधळून लावीत आहोत भारताच्या स्वातंत्र्याच्या लढ्यात पठाण कॉंग्रेसबरोबर आहेत हे दृश्य त्यांना सहन होत नाही आम्ही भारत सोडला तर या देशात जातीजातींमध्ये दंगली होतील असे आमचे चीफ कमिशनर म्हणाले हे त्यांचे म्हणणे साफ खोटे आहे हे मी त्यांना सांगितले ते खोटा प्रचार करतात म्हणून माझा त्यांच्यावर राग खुदाई खिदमतगार हे प्रेमाचे प्रचारक व मानवतेचे पुजारी आहेत कोणताच धर्म एकमेकांचा द्वेष करण्यास शिकवीत नाही इस्लाम आम्हांला मातृभाव व प्रेम करण्यास शिकवतो

या काळात मुंबईतील पठाणांपुढेही दि २८ रोजी एका स्वतंत्र बैठकीत ते बोलले " भारत हा कोण्या एका जमातीचा नाही, तो हिंदू शीख पठाण अशी असा सर्वांचा आहे सर्वांनी त्याच्या स्वातंत्र्यासाठी शक्तिप्रमाणे भाग दिला पाहिजे "

इकडे खानसाहेब आपल्या प्रचारात गुंग होते त्या वेळी अधिकारी त्यांच्या व्याख्यानांचे अहवाल जमवण्यात व त्यातील वाक्याची चीरफाड करून सरकारला सोयीचे असे अर्थ कसे काढता येतील या विवंचनेत गर्क होते बादशाहखानांच्या व्याख्यानाचे अहवाल नीट समजून पुरवले जावेत म्हणून पंजाब व फ्रँटियर भागातील लघुलेखक आणवून त्यांच्या मागे ठेवले मुदतीपूर्वी बादशाहखान परत वर्ध्यास गेले व तेथे इंग्लंडहून परत आलेली आपली कन्या मेहेरताज हिच्या शिक्षणाची वगैरे व्यवस्था पाहण्यात थोडा वेळ घालवला मेहेरताज ही १५-१६ वर्षांची असणार व लाली हा चार वर्षांचा दुसऱ्या पत्नीच्या अकाली व अनपेक्षित मृत्यूमुळे पोरकी झालेली ही दोन्ही मुले हाजरानीच्या मायेवर त्यांची आई त्यांना सोडून गेलेली, तर वडील देशासाठी कायमचे सत्याग्रही जिहादच्या मार्गावर असलेले. त्यांच्या कुटुंबीयांच्या मानसिक क्लेशांचे वर्णन कोण करू शकेल ? डॉ खानसाहेबांच्या पत्नीने स्वत च्या मुलांच्या बरोबर मेहेरताजला इंग्लंडला नेले होते ती परत आल्याने आपल्या या दोन मुलांच्या सहवासात ते चार आठवडे घालवू शकले तेवढेच कुटुंबसौख्य त्यांना लाभले इंग्लंडमधून आलेल्या आपल्या मुलीला जानकीबेहेन, मदालसा, कमलनयन या मंडळींशी कसे वागावे, आश्रमातील झाडलोट करण्याची शिस्त कशी पाळावी वगैरे ते स्वत शिकवीत जमनालालजी लालीचे कोडकौतुक करण्यात व्यग्र असल्याचे पाहून खानांच्या डोळ्यांचे पारणे थोडे स्थिर होते, तोच एक दिवशी छोट्या लालीने धावत येऊन जमनालालजींच्या गळ्याला मिठी मारली व ओक्साबोक्शी स्फुदत स्फुदत विचारले, "तुम्ही सगळे इथे राहणार आणि माझ्या पपांना तेवढे पकडून कशासाठी नेणार ?" असा हृदय व्याकुळ करणारा प्रश्न विचारला

आक्टोबरअखेर बादशाहखान वर्ध्यास आले डिसेंबर ता ७ ला सध्याकाळी गांधीजींशी चर्चा करीत बसले असता सी इन्स्पेक्टर खान यांनी त्यांच्यावर काढलेले पकड वॉरंट त्यांच्या हाती दिले बादशाहखान हे नेहमीच तुरुंगाच्या तयारीने वावरत असत गांधीजींना तर सरकारी धोरणाचा वास तत्काल येचत असे दोन महिने या दोघाना मिळालेला परस्परांच्या निकट परिचयाचा व आध्यात्मिक प्रेमाचा पाश इतक्या त्वरेने तुटणार होता मगनवाडीतील ही वार्ता अतिथिगृहात कळताच लालीने जमनालालजींना वरील प्रश्न विचारला होता ! भारताच्या कोट्यवधी गरीब जनतेचे कुटुंबजीवन स्वास्थ्याचे, सुखाचे, आनंदाचे व्हावे म्हणून त्यांच्या वडिलांनी आपल्या संसारसुखाचे सहारा वाळवंट केले होते हे लालीला माहीत नसले तरी ते त्याग पत्रणे जमनालालजींसारख्या माणसाला सुद्धा त्या वेळी जमले नाही जमनालालजी कुटुंबीय वृत्तीत रमणारे असले तरी तत्त्वनिष्ठेसाठी अयन कठोर निग्रहाने वागणारे होते त्यांनी बादशाहखानांना विदा करण्याची तत्काळ तयारी केली सर्वांना

प्रवेश होताच सान्या लोकांनी उभे राहून अभिवादनपूर्वक त्यांचे स्वागत केले श्री भुला भाई, मुनशी, तसेच अनेक प्रमुख वकील हजर होते, पण कोणास वसले कष्ट पडू नयेत अशी त्यांची इच्छा होती मजिस्ट्रेटचे शिक्षेची वाक्ये उच्चारण्याचे कष्ट कमी करणे तेवढे त्यांच्या हाती नव्हते मॅजिस्ट्रेटच्या 'तुम्ही गुन्हा नाही केला काय ?' या प्रश्नाला बादशाह खानांनी उत्तर दिले, 'मी काहीच म्हणत नाही—I do not plead—मला काही म्हणावयाचे नाही' अशा आशयाचे उत्तर दिले मॅजिस्ट्रेटनी "मी निर्दोषी आहे असे तुमचे म्हणणे मी नादले" असे सांगून त्यांनी कामाला प्रारंभ केला सरकारी वकील बॉकर यांनी आरोपासबंधीचे भाषण केले पोलिस इन्स्पेक्टर चादखान व भाषणाचा अहवाल घेणारे यांच्या जबाब झाल्यावर भुलाभाईंनी साक्षीदारांची उलटतपासणी करीत नसल्याचे सांगितल्यावर आरोप ठेवला गेला बादशाहखानांनी आपले लेखी पत्रक सादर केले

या निवेदनात ते म्हणतात, "भाषणाच्या अहवालातील एकदर भावार्थ बरोबर असला तरी त्यामध्ये पुष्कळ दोष राहिलेले आहेत ती कायद्याच्या कक्षेत येणारी अशी आहेत असे माझ्या वकीलमित्रांनीही मला सांगितले आहे त्यामुळे मला माझ्या विधानांबद्दल खेद वाटतो व तो मी व्यक्त करतो कारण मी काँग्रेसचा एक सैनिक आहे, तत्जोडीच्या या कालात कायदा मोडला जाता कामा नये असा माझ्या संस्थेचा आदेश असता मजकडून कायदा मोडला गेला याबद्दल मला दु ख वाटते माझे भाषण ख्रिस्ती समाजापुढे होते सत्य ते मला बोलावयाचे होते मान्या इग्रजांविरुद्ध मला द्वेष पसरावयाचा असता तर माझ्या ख्रिस्ती शिक्षकांबद्दलची कृतज्ञता मी तेथे कशाला व्यक्त केली असती ? खुदाई खिदमतगार चळवळीसबधी सत्यस्थिती मी तेथे निवेदन केली " मॅजिस्ट्रेटनी निकालपत्रात सरकारवर केलेले आरोप भयकर स्वरूपाचे असल्याचे ठरवून दोन वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावली

ज्या भाषणावर हा खटला धाईधाईने भरण्यात आला ती भाषणे आक्षेपार्ह ठरतील की नाही यासबधी पोलिसकमिशनर स्मिथ, कायदासल्लागार मिस्टर टेंडिस, सरकारी वकील मि बॉकर यांच्यामध्ये बरेच मतभेद होते दि २९ ला जिना हॉलमध्ये झालेले भाषण आक्षेपार्ह ठरवून त्याबद्दल खटला भरण्याचे प्रथम ठरले होते, पण स्मिथ यांनी त्याबद्दल पुन्हा शका प्रकट केली होती " It is better not to prosecute if the case is doubtful " असे स्मिथ यांनी दि १६ नोव्हेंबरला होम सेक्रेटरी मॅक्सवल् यांना स्पष्ट कळविले होते

त्यानतर फेरविचार होऊन " दि २७ चे भाषण आक्षेपार्ह ठरू शकेल, त्यावरून शिक्षा देता येईल " वगैरे सल्ला सरकारी वकिलांनी दिला होता कदाचित खटला लढवणार

नाहीत ही त्यांची अपेक्षा रास्तच ठरली. हा दाखला वा मजला याचे कारण बादशहाखानांनीच सांगितले आहे. सीमाप्रांतातून बाहेर ठेवल्यानंतर त्यांनी बंगालच्या मुसलमानांमध्ये मुक्काम ठेवण्याचा निर्णय केला होता. मुसलमानांबद्दल त्यांना वाटणारे दुःख व त्यासाठी त्यांचे बंगालमध्ये जाऊन बसणे, हे सरकारला धोक्याचे वाटावे हे स्वाभाविक होते. एक बहुसंख्य मुस्लीम लोकसंख्येचा प्रांत सर्वस्वी काँग्रेसच्या मागे व सरकारवर संपूर्ण अविश्वास करणारा जसा झाला आहे हे त्यांनी पाहिले होते. बंगाल हा पुन्हा क्रांतिकारकांच्या पदर्दीत जात आहे, हेही त्यांना ठाऊक होते. बादशहाखान तिकडे जाऊन बसतील तर अहिंसक प्रतिकाराचे रेशमी काम आपल्या गळ्याला लागणारच, हा धोका सरकारने ओळखला व म्हणूनच तडकाफडकी पकडून त्यांना तुरुंगात पाठवले. आपल्या अन्यायी कारभार उघड करून दाखवणाऱ्यांना तुरुंगात टाकून टाकणे एवढाच मार्ग ज्या राज्यकर्त्यांना सुचतो, त्यांनी सुसंस्कृत राज्यकर्ते म्हणून स्वतःस समजावे ही केवढी आत्मवंचना आहे ? बादशहाखानांचा हा तर्क बरोबर होता. काँग्रेसअध्यक्षतेतून निवृत्त झालेले गांधीजी त्याच वेळी सीमाप्रांतात जाऊन राहण्याच्या विचारात होते हेही लक्षात घेण्यासारखे आहे. मुंबई काँग्रेसच्यापूर्वी दि. २७ सप्टेंबरला काढलेल्या पत्रकात "कोठे तरी, शक्य तो वायव्य सीमा प्रांतातील एखाद्या खेड्यात स्वतःला गाडून घेण्याची माझी इच्छा आहे" असा आशयाचे उद्गार गांधीजींनी काढले होते आणि स्वतः गांधी तिकडे जाऊन राहते तर १९३०-३२ च्या काळात तेथे केलेल्या सर्व अत्याचारांवरील पडदा उघडा होईल ही भीती लॉर्ड विलिंग्डनना असणार ! तेव्हा या योजनेचे आधार जे बादशहाखान त्यांना तुरुंग दाखणे एवढाच इलाज त्यांच्या हाती होता.

दि. २६ डिसेंबरला बादशहाखानांना साबरमतीला पोचवण्यात आले मुंबईहून त्यांना इरच्या डब्यातून नेले गेले वस्तुतः त्यांना 'ब' वर्गाऐवजी 'अ' वर्गाचे कैदी समजले जावे अशी विनंती कोर्टाला करण्यात आली होती, परंतु स्वतः बादशहाखानांना त्यांची आर्थिक स्थिती वगैरेसंबंधी माहिती विचारता त्यांनी ती चौकशी उतमहाईला करण्यास सांगितले ही त्यांची तुरुंगाची चौथी खेप होती. खुद्द हिंदुस्थान सरकार त्यांचा स्थानबद्धते-मधील सर्व गेली तीन वर्षे करीत आले होते असे असूनही कोर्टाला किंवा सरकारी वकिलास त्यांचा सामाजिक दर्जा माहीत नसावा या वृत्तीचा अर्थ स्पष्ट आहे. पोलिसांच्या दांडगाईत ज्यांची हाडे मोडली जातात त्याचा सामाजिक दर्जा दुसरा कोणता असणार ? गुन्हेगार-ानची पठाण—हाच त्यांचा दर्जा. तेव्हा त्यांना तुरुंगात कोठे कसे ठेवले जाणार याकडे लक्ष देण्याची काय जरूरी ?

दि. २६ जानेवारीला मुंबईत चौपाटीवर जाहीर सभा झाली सभेत सात्या

वक्त्यांनी कडाडून या सरकारी धोरणाचा निषेध केला सरदार पटेल अध्यक्ष होते समत नरीमन, भुलाभाई, स पा पाटील, मुनशी, मसानी यांची भाषणे झाली, पण सरकारी निषेधाचे हे वादळ थोडा वेळ टिकणारे होते कारण दोन वर्षांच्या लढ्यानून देश तुरतास बाहेर पडलेला होता धडुतेकांचे डोळे नव्या राजकीय स्थानतर येणाऱ्या कायदेमंडळाकडे व विधेयकांचे गांधीजींनी दाखवून दिलेल्या सोयिस्कर अशा हरिजन सेवाकार्याकडे लागले होते सत्याग्रहीनतेने त्या प्रमाणात 'सत्याग्रही' असतात त्याच प्रमाणात 'सत्याग्रह' यशदायी होत असतो गांधीजींनी सत्याग्रह करण्याचा अधिकार आपल्या एकट्याच्या हाती राखून ठेवला होता त्याना योग्य वाटेल तेव्हा काँग्रेसच्या नाव सत्याग्रह करण्यास ते स्वत मुखत्यार होते, परतु काँग्रेसच्या नाव त्यांनी सत्याग्रह केल्यास ती मानगड आपल्या कायद मंडळाच्या कार्यक्रमात आड येणार नाही ना, या चिंतेने पछाडलेले इतर नेते, हा अधिकार एकट्या गांधीजींकडे राहू नये किंवा तो काँग्रेससाठी म्हणून वापरला जाऊ नये, असे म्हणत होते काँग्रेसची सारी शक्ती या प्रत्यक्ष प्रतिकाराच्या कार्यक्रमातूनच निर्माण होऊ शकते व ते नेतृत्व फक्त गांधीजीच देऊ शकतात याची जाणीव जवाहरलाल-सुभाष या पुरोगामी व नातिवादी समजल्या जाणाऱ्या नेत्यांना झालेली होती पण विधिमंडळातील कार्यक्रमातच चमकू शकणाऱ्यांची गोष्ट वेगळी असते वस्तुत मोतीलाल नेहरूनी १९२९ मध्येच या क्षेत्रातील कायदभंगाच्या मर्यादेची कबुली दिली होती पण गांधीजींनी प्रतिकारलढ्याच्या रणगाड्याला हरिजनकार्याच्या रस्तासफाईच्या केरसुण्या बांधल्यामुळे काही नेत्यांनी नाराजी व्यक्त केली असल्यास आश्चर्य नाही त्यापेक्षा कायदेमंडळातील तोंड-गोळ्यांनी थोडे तरी अधिक यश खास मिळेल असे भुलाभाई-असफअली, अनसारी, नरीमन आदि नेत्यांना वाटत होते रांची येथील गांधीजींच्या परवानगी विधिमंडळाच्या पुरस्कर्त्यांची जी चर्चा गांधीजींशी झाली त्या वेळी असफअली, भुलाभाई हे एखाद्या खेडवळ साक्षीदाराची उलट तपासणी करण्याच्या अवसानात गांधीजींशी बोलले होते

हरिजनकार्याचा पुरस्कार म्हणजे काँग्रेसची राजकीय आमहत्या होय असे पुष्कळांना वाटत होते, परतु चारी वाजूनी कोंडले गेल्यानंतर व कार्यकर्त्यांच्या प्रतिकारशक्तीची मर्यादा कळल्यावर गांधीजींनी काढलेला मार्ग वावगा नव्हे तर तो निकराचा होता हे थोड्या विचारांनी पटू शकले असते सर्वसामान्य कार्यकर्ते दीर्घकाळ तुरुगात काळ कठण्यास तयार नसतात परिस्थितिप्रमाणामुळे तुरुंगात ढकलले गेलेले काँग्रेसमधील काही नेतेही तुरुंगात पाऊल ठेवताच असे येथे निष्क्रिय आयुष्य घालविण्याचा काय उपयोग? याची चर्चा करण्याचा कार्यक्रम सुरू करीत तुरुगातील जीवनसाधना ही शुद्ध प्रकारी प्रतिकाराचाच एक भाग आहे या श्रद्धेने वागणारे फारच थोडे नते त्यांनी घालत होते अशा नेत्यांमध्ये गांधीजींच्या

दोन पावले पुढे नेणारी निष्ठा अमलेले एकटे बादशाहखानच होते. गांधीजींनी वर्धाची साबरमती केल्यामुळे साबरमती पोरकी झाली होती. त्या साबरमतीत सोबत करावी, गांधीजींची अपूर्ण राहिलेली शिक्षा आपण भरून काढावी म्हणून तर ते साबरमतीच्या तुरुंगात येऊन बसले नव्हते ना असेही बोलणारा वाटले असेल. साबरमतीत आल्यानंतर तीन महिन्यांच्या काळात त्यांचे वजन तेरा पौंडांनी घटले होते. मार्च महिन्यात सरदार पटेल यांनी त्यांची भेट घेतली त्या वेळी महादेवभाईंची खरी हकिगत कळली. त्या सुमारास गांधीजींकडे आश्रमाची कंडी पोहोचताच त्यांनी सरदारांना लिहिले, 'खानसाहेबांकडे फळे जातात ना ?' गांधीजींची दक्षता इतकी होती. खानसाहेबांकडे त्यांच्या घरचे कोणी मेटीस जात नव्हते, कारण इतक्या दूरवर कोणी भेटीस येण्याचे कारण नाही असे डॉ. खानसाहेबांना त्यांनी कळविले होते. ते स्वत: असेंब्लीची निवडणूक लढवण्याच्या उद्योगात गढलेले होते. तीन चार महिन्यांत प्रकृति-स्वास्थ्याच्या कारणावरून बादशाहखानांना बरेली ( संयुक्त प्रदेश ) जेलमध्ये हलविण्यात आले. हवाबदलीसाठी जेल बदलण्यात येत, पण हा बदल पूर्ण अमलात करण्यात येई, म्हणजे त्या वर्षी जेथील हवा पूर्ण प्रतिकूल किंवा वाईट त्या वेळी त्यांना तथे पोहोचविण्यात येई. म्हणजे जेलमध्ये बदल तर करण्यात येई, आणि हवामानाचा फायदा त्यांना मिळू नये हे यशाने सरकारच्या पदरी पडे. पुष्कळ वेळा कामकाजाच्या गच्छान पद्धती मुळेही असे घडे. हुकूम निघाल्यापासून त्याचा अमल होण्यास इतका विलंब लागे, त्या-प्रमाणे बरेलीला ते हलविले गेले तेव्हा तेथेही कडक उन्हाळा होता, त्यांच्या अंगावर फोड उठू लागले, स्वास्थ्य कोणतेच नाही त्यामुळे तेथून थंड हवेच्या ठिकाणी हलवावे असे हुकूम पुन्हा सुटले. ते हुकूम अमलात येईपर्यंत पावसाळा सुरू झाला होता. त्यामुळे बरेलीचा कडक उन्हाळाही त्यांना उपभोगता आला व त्यापाठोपाठ आल्मोड्याच्या जीवघेण्या पावसाळ्याची गमतही त्यांना अनुभवता आली. अशा रीतीने त्यांची ही दोन वर्षांची सजा शारीरिक क्लेशांच्या कचाटीत सपली. नव्या शिक्षेच्या वेळी ( १९३२ ते ३४ ) त्यांचे निकटचे बंधू डॉ. खानसाहेब हे त्यांना साथीदार होते. त्यामुळे वैद्यकीय दृष्टीने त्यांना त्याचा फायदा झाला. या खेपेस शिक्षेची सर्व मुदत एकाकी व निरनिराळ्या रोग्यांच्या सगतीत काढण्याची संधी लाभल्यामुळे त्यांना खुदाचे स्मरण व सान्निध्य अधिक लाभले असणार ! सरकारने हाच अधिक फायदा करून दिला असे ते मानीत राहिले. अल्मोडा जेलमध्ये पूर्वी जवाहरलालजींनी सुदर बाग तयार केली होती, त्या बागेची निगा राखण्याचे काम बादशाहखानांनी केले. माळी, पपया वगैरे काढल्या. त्या कामामुळे त्यांना थोडी अधिक सूट मिळाली व ऑगस्ट १९३६ मध्ये त्यांची सुटका झाली. [ बादशाहखान यांचे २७ ऑक्टोबर १९३४ चे हे भाषण मुंबईच्या हिंदी ख्रिश्चन समाजाच्या तर्फे करण्यात आलेले होते व या समाजाच्या

४० हजारांवर गेलेली आहे. मग तिला राजकीय स्वरूप आले.

"अशा रीतीने अडचणीत सापडल्यामुळे कोणा तरी लोकांचे सहाय्य घ्यावे म्हणून आमचे खुदाई-खिदमतगार दिल्ली, सिमला, लाहोर या ठिकाणच्या मुसलमान नेत्यांकडे गेले, पण ते मदत करण्यास तयार नव्हते. मी तेव्हा जेलमध्ये होतो. मुस्लिम नेते आम्हाला मदत करण्यास तयार नव्हते. बुडत्याला काडीचा तरी आधार लागतोच. आम्ही तुमच्या पाठीशी आहोत, असे काँग्रेसने सांगितले. "आम्हीही तुमच्या मागे आहोत" असे आमच्या कार्यकर्त्यांनी त्यांना सांगितले. आमच्या चळवळीचे हे राजकीय रूपांतर सरकारनेच घडवून आणले. आमच्यावरील अत्याचारांचे प्रचार पाहून आफ्रिकन लोकांनी सरकारवर सूड उगवण्याचे ठरवले. काँग्रेसचाही प्रचार आमच्या बाजूने सुरू झाला तेव्हा सरकार शहाणे झाले. त्यानंतर "तुम्हाला काय पाहिजे?" असे अधिकारीच आमच्या लोकांना विचारू लागले. 'ती वेळ निघून गेली' असा जबाब आमच्या लोकांनी कळविला. 'तुम्हाला काय करावयाचे असेल ते करा. आम्ही आता मागे फिरणार नाही.' असे त्यांनी अधिकाऱ्यांना सांगितले.

सरकारी हस्तक नंतर आमच्या कार्यकर्त्यांना भेटले व त्यांना म्हणाले की, "तुम्हाला काय पाहिजे असेल ते आम्ही देऊ, तुम्ही गांधीजी व काँग्रेसला सोडले पाहिजे." त्यावर आमच्या लोकांनी उत्तर दिले की 'आम्ही पठाण असे विश्वासघातकी नाहीत.' संकटात असताना ज्यांनी आम्हाला साहाय्य केले त्यांना पठाण कधी सोडणार नाहीत!

"गांधी-आयर्विन तडजोडीचे वेळी आमच्या चीफ कमिशनरने लॉर्ड आयर्विनला कळवले की या प्रांतात दोघांपैकी एक कोणी तरी राहू शकेल. आम्ही येथे राज्य चालवले पाहिजे नाही तर बादशाहखानांनी राहावे पण लॉर्ड आयर्विन यांनी माझी तुरुंगातून मुक्तता केली. आयर्विनकडे रोज आमच्या विरुद्ध खोटे रिपोर्ट जात, ते गांधीजींना कळले. तेव्हा त्यांनी आयर्विनना सांगितले की तुम्ही पुन्हा खानबंधूंना अटकेत टाकले तर तडजोड टिकणार नाही.

"आमच्यात झालेली ही जागृती खेड्यांतील लोकांच्या त्यागामुळे झालेली आहे. ही खुदाची करणी आहे. खुदानेच त्यांना जागे केले. आम्ही धर्माप्रमाणे चाललो म्हणून हे घडू शकले. इतका त्याग दुसरीकडे कोठे झालेला नसेल. १९३२ मध्ये आम्ही पुन्हा पकडले गेलो. त्या वेळी आमच्या २६ लाख लोकसंख्येपैकी तीन लाख लोक खुदाई खिदमतगारांमध्ये दाखल झाले होते

"ट्रूस (गांधी-आयर्विन करार) सरकारने आमच्याकडे कधी मानलाच नाही. चोहीकडे १४४ कलम शिल्लक होते. हिंदू-मुसलमानांचे झगडे लावण्याचे प्रयोग झाले. प्रत्येक गोष्टीचे पुरावे आमच्याजवळ आहेत.

" गांधींनी गोलमेज-परिषद आटोपून परत आल्यावर आम्ही त्यांच्यापुढे ही सर्व परिस्थिती मांडणार होतो, सर्व कागदोपत्री पुरावे त्यांच्या पुढे ठेवणार होतो. सर्व कागदपत्र माझ्याजवळ पेशावर येथे होते. माझी प्रकृती थोडी बरी नव्हती. दुसरे दिवशी फ्रंटियर मेलने मी निघणार होतो, पण त्यापूर्वीच रात्री मला पकडले व हजारीबाग जेलकडे रवाना केले. आमच्या सर्व प्रमुख कार्यकर्त्यांना तीन तीन वर्षांच्या शिक्षा ठोठावल्या. आमच्या घरी जप्त्या नेल्या ! कशासाठी ? मी काही कोणाचे देणे लागत नव्हतो. आम्हाला तक्रार करावयाची नाही. त्यांना ठीक वाटेल ते ते करतील. पण आमच्या मुस्लिम बांधवांना आम्हांला सांगावयाचे आहे. आम्ही ते प्रेमानेच त्यांना सांगू व त्यांना सद्बुद्धी देण्याबद्दल खुदाची प्रार्थना करू. "

# १५

## तडीपार दिवसांची दैनंदिनी—१९३६-३७

या सुटकेनंतरही पंजाबमध्ये व वायव्य सीमाप्रांतात प्रवेश न करण्याचे हुकूम सुटकेपूर्वी त्यांच्यावर बजावण्यात आले होते. मुंबईसरकारने पूर्वीप्रमाणेच आपल्या प्रांतात त्यांना प्रतिबंध करण्याचे कारण दिसत नाही असे हिंदुस्थान सरकारला कळविले होते आणि सर्वच प्रांतांनी त्यांना आपल्या राज्यात येऊ नका असे हुकूम काढले तर त्यांनी राहावयाचे कोठे हा एक विचार बुद्धिमंत अधिकाऱ्यांना सुचला असेल. तसेच पुढेमागे कोठल्याही कटाखाली शिक्षा ठोठावण्याची झाली तरी ते काम दक्षतेने करणारे काही प्रान्त असतात. तशीच मुंबई होती. फाशीची शिक्षा अमलात आणण्याची सोय सर्वच जेलमध्ये असत नाही. निर्धास्त मनाने गळफास चढविण्यात तरबेज असणारा फेऱ्यांचा संच, त्या पद्धतीची परंपरा माहीत असलेला अधिकारी वर्ग वगैरे सर्वच साधनांची जरुरी तेथे असावी लागते. त्या दृष्टीने ठाणे जेल फाशी कर्मासाठी ब्रिटिश अमदानीत राखून ठेवला गेला होता. त्याचप्रमाणे कोणाही देशभक्ताला काहीही खबरबार कोठल्याही जेलमध्ये उचलून टाकण्याची जरुरी सरकारला दिसली म्हणजे ते काम मुंबईच्या अधिकारीवर्गावर सोपवले जात असावे. तसे तज्ज्ञ अधिकारी या सुंदर नगरीत जोपासलेले जात. लोकमान्यांच्यावरील ताईमहाराज प्रकरणासारखा खटला असो किंवा चाफेकरांची फाशी असो, कोठल्याही बेकायदेशीर बाबीला कायदेशीर ठरविण्याची करामत करणारे कायदेपंडित व अधिकारी मुंबईत मिळत. गोऱ्या नोकराप्रमाणे काळे नोकरही त्या दृष्टीने सांभाळावे लागतात आणि अशी अनुकूल परिस्थिती मुंबई प्रांतात असल्याने सर्व राजबंद्यांना नेण्याला तेथे सुरक्षित असे. तेथे त्यांचे खटले मोठमोठ्या मिरवणुकांसह होत व त्यांच्या तुरुंगाची व्यवस्थाही चोखपणे होई. त्यामुळे बादशाहशाहीच्यासाठी मुंबई प्रांताने आपले

दार उघडे ठेवावे यात आश्चर्य कसले? भारताची वायव्य सीमा त्यांना बंद होती. बहुसंख्य इस्लामी लोकमत असलेले ते प्रान्त तेथे त्यांनी जाणे व राहणे तेथील अज्ञ मुस्लीम जनतेच्या दृष्टीने अहिताचे होय, असे सूज्ञ ब्रिटिश राज्यकर्त्यांनी ठरवून टाकले होते. हे सर्व कायदेशीर होते. बरे, गांधीजींचे कार्यकेंद्रही मुंबईमध्ये होते. त्यामुळे एका म्यानात दोन तलवारी, एका प्रांतात दोन पुढारी कधी नांदू शकत नाहीत हा सिद्धान्त कोणी तरी खोटा ठरविणे जरूर होतेच. या दोन गांधींचा जन्मच अशा प्रयोगासाठी होता. तेव्हा अल्मोडा जेल-मधून सुटताच बादशहाखानांनी गरुडभरारीने गांधीजींकडे निघावे हे स्वाभाविकच होते. त्यांचे घरटे तेथेच असावे म्हणून तो उद्योग जमनालालजींनी १९३४ मध्ये आरंभला होता. त्यामुळे त्यांची लाडकी मेहेरताज हिला लंडनच्या शाळेतून काढून तेथे आणविली होती. परन्तु ते घरटे तसेच मोकळे राहिले होते. बादशहाखानांसारख्या प्रखर कर्मवाद्यालाही आपल्या घरट्याची आठवण असतेच. म्हणून ते वर्ध्याच्या वाटेला लागले होते. प्रकृती नादुरुस्त असतानी त्यांनी तिसऱ्या वर्गानेच प्रवास केला. त्यांची प्रकृती किती क्षीण झाली होती हे नागपूर स्टेशनवर त्यांना जी मंडळी भेटली त्यांच्या लक्षात आले. तेथेच बादशहा-खानांनी उतरावे अशी त्यांनी विनंतीही केली. तिसऱ्या वर्गाच्या एका मोकळ्याशा डब्यात ते नागपूरच्या कार्यकर्त्यांना सापडले. एका लहानशा पोत्यात त्यांचे सर्व सामान गुंडाळून ठेवलेले होते. लोकांनी गराडा घालताच ते खिडकीतून पाहू लागले. त्यांची क्षीणता लक्षात येताच डॉ. सोनार यांनी त्यांची प्रकृती पाहिली. ताप १०० चे वर होता. आलेल्या मंडळीत मोरोपंत अभ्यंकर नव्हते. त्यांनी त्यांची चौकशी केली व त्यांच्या मृत्यूबद्दल वाटलेली हळहळ व्यक्त केली.

तेथे जमलेल्या कार्यकर्त्यांशी बोलताना ते म्हणाले, "आपल्याला बघून फार बरे वाटले. आपले हे एक मातृमंडळच आहे." गाडी बराच वेळ स्टेशनवर उभी असल्याने वृत्तपत्रांच्या काही प्रतिनिधींनीही काही प्रश्न विचारले. जेलमधील जीवनासंबंधी ते म्हणाले, "मुंबईस एक आठवडा काढला, मुंबईस शिक्षा झाल्यानंतर साबरमती येथे कडक थंडी पडली, पण कांबळी दोनच, तेथे थंडी वाजली व इन्फ्लुएंझाचा ताप आला. तेथून ऑगस्टमध्ये बरेलीला बदली केली. बरेलीला साबरमतीप्रमाणेच रात्री बत्ती दिवा मिळत नव्हता. शिवाय एकांत कोठडीमध्ये (सेपरेट) ठेवले होते. उन्हाच्या झळांनी सर्व शरीरावर फोड उठले होते. त्यामुळे तेथून अल्मोडा येथे बदली केली, पण ती पावसाळ्याच्या तोंडी. पंडितजींनी तेथे आरंभलेले बगीच्याचे काम पुरे केले. त्यामुळे पंधरा दिवस जादा रेमिशन मिळाली. एकूण चार महिने शिक्षा कमी झाली." त्यांचा साधासुधा वागण्याबोलण्याचा प्रकार व प्रसन्न सौजन्याने त्यांच्या चेहऱ्यावर दिसणारी प्रसन्नता यामुळे कोणालाही गहिवर आला

असता मंडळींनी त्यांना तेथेच थोडी विश्रांती घेण्याबद्दल विनंती केली, पण ते कम थांबणार? त्यांची वर्ध्याकडील ओढ वाऱ्याच्या मनाच्या ओढीपेक्षा अनंत पटींची किंवा अमर्याद असणार 'थोडे बरे वाटल्यावर नागपूरला जरूर येईन ' असे त्यांनी निरोप घेताना सांगितले तेथीउ वार्तालापात "गांधीजींचा सत्र घतल्यावर हिंदू-मुस्लिम ऐक्याचे होईल तेवढे काम करीत राहीन" असेही ते बोलले या तुरुंगाच्या काळात त्यांनी चहा सोडला असेही त्यांच्या केल्याणात आले बन्नूच्या हाजी महमद अमलाम शाह यांना पाठवलेल्या पत्रातनी चहा सोडल्याचा त्यांनी उल्लेख केलेला आहे "निरर्थक खर्च व आरोग्यविघातक" या दोन कारणांचा उल्लेख त्यात आहे

• वर्ध्यास पोहोचल्यावर तेथे अनेकांची तारा-पत्रे आल्याने महादेवभाईंनी त्यांच्या प्रकृता सबधा दि ८ ऑगस्टला पत्रक प्रसिद्ध केले त्यात ते म्हणतात, "गेले तीन महिने ते तापाने आजारी आहेत म्हणून वयक्तिक उत्तरे कोणाला पाठवू शकले नाहीत सध्या वर्धा येथेच त्यांचा मुक्काम राहील "

बजाज यांच्या घरकुलात व जमनालालजींच्या प्रमल व सत्तीच्या शिस्तीत खानसाहेबांना एकदोन आठवडे विश्रांती व प्रसन्नताही लाभली गांधीजींचे वास्तव्य आता सेवाग्रामला सुरू झालेले होते, परतु तेथे सोयीची जागा नव्हती वैद्यकीय उपचार वगैरे दृष्टीनेही त्यांनी वर्ध्यासच राहणे ठीक होते कन्या मेहेरताज त्या वेळी तेथेच होती गांधीजीकडे जाऊन येऊन स्वस्थपणे गाठीभेटी होत पण गांधीजींनी त्यांना काही दिवस विश्रांती घेण्यास सांगितले या १० १२ दिवसात त्यांना बराच आराम वाटला व प्रकृतीतही बरीच सुधारणा झाली त्यामुळे त्यांना मुंबईच्या काँग्रेस कार्यकारिणीच्या बेळी हजर राहण्यास गांधीजींनी परवानगी दिली तशी परवानगी देण्यास जमनालालजी तयार नव्हते, पण मुंबईस जाणाऱ्या सर्वच भारतीय नेत्यांना भेटण्याची उत्कंठा असणारच म्हणून त्यांना जाऊ दिले बोरीबंदर स्टेशनवर त्यांचे यथोचित स्वागत झाले दि २० रोजी सुरू होणाऱ्या काँग्रेस समिती बैठकासाठी आलेले मोठमोठे नेते या स्वागतासाठी स्टेशनवर उपस्थित होते या नेत्यांमध्ये राष्ट्रसभाध्यक्ष जवाहरलालजी, सरदार पटेल, सरोजिनी नायडू, भुलाभाई देसाई शार्दूलसिंग कवीश्वर आदी होते आपल्या पुतण्या सादुल्लाखान यांच्याकडेच बादशाहखानांचा मुक्काम होता काँग्रेसकार्यकारिणी व अ भा काँग्रेस समितीच्या बैठकीस ते उपस्थित राहिले ते सर्वांच्या गाठीभेटींसाठीच त्यांच्या प्रत्यक्ष भेटीमुळे सर्वांना फार मोठे समाधान लाभले यांचे भाषण पत्त त्यांच्या जाहीर सत्काराच्या सभेमध्ये झाले सरदार पटेल यांच्या अध्यक्षते खाली चौपाटीवरही गोरजनसभा झाली व तेथे जवाहरलालजी, सरोजिनी नायडू, विजयालक्ष्मी पंडित आदींची भाषणे झाली उत्तराच्या भाषणात बादशाहखानांनी सांगितले, ' साम्राज्य

टिकविण्यासाठी 'कम्यूनल अवॉर्ड आहे. स्वातंत्र्यासाठी फार मोठा त्याग करावा लागतो. सर्व जगात तोच अनुभव आहे. आमच्या अडचणी वाढवण्यासाठी हिंदू-मुसलमानांचा प्रश्न, हे झगडे निर्माण केले जातात; पण माझ्या प्रांतात तो प्रश्न नाही. आम्ही मुसलमान-हिंदू एकदिलाने वागतो; लोकांचे खरे प्रश्न अन्न-वस्त्रांचे आहेत. मुंबईतील लोकांना त्या प्रश्नाची तीव्रता ठाउक नाही. मला विश्रांती घेण्यास सांगण्यात आले. लोक भुकेले आहेत, दुःखी आहेत आणि मी खुदाई-खिदमतगार आहे. मला स्वस्थ कसे बसता येईल? जातीय-निवाडा (कम्यूनल अवॉर्ड) कोणा जमातीच्या भल्यासाठी नाही. तो साम्राज्य अबाधित राखण्यासाठी आहे. हिंदू-मुसलमानांनी मायभूमीसाठी एकीनेच त्याला उत्तर दिले पाहिजे, तरच आपण जे घालवले आहे ते परत मिळवता येईल. इस्लाम गुलामीविरुद्ध लढण्यास सांगतो; गुलाम बनून राष्ट्र नको असे कुराणात मांगितले आहे ते तुम्ही स्वतः पाहा. ते सांगण्यास कोणा मुल्ला-मौलवीची जरूर कशाला? आमच्या फ्रंटियर प्रांतातही पूर्वी एकमेकांविरुद्ध अभाव अविश्वास होता; पण आम्ही जवळ आल्यावर एकमेकांचा विश्वास वाढला. आम्हा खुदाई-खिदमतगारांना आठ कोटी मुसलमानांच्या हिताप्रमाणेच २७ कोटी हिंदूंचेही हित सांभाळवयाचे आहे."

१९३६ च्या ऑगस्टमध्ये बादशहाखान यांची सुटका होताच ते गांधीजींच्याकडे वर्धास येऊन राहिले. सीमाप्रांतात पुन्हा प्रवेशबंदी केल्यामुळेच त्यांना वर्धाचे वास्तव्य पत्करावे लागले हे खरे! पण त्याचमुळे या दोन गांधींना एकत्र राहण्याची ही संधी मिळून गेली हेही तितकेच खरे. पापालासुद्धा आपल्या नाशाच्या पुण्यबीजांची पेरणी करावीच लागत असणार! त्याशिवाय त्याचा शेवट कसा होईल? नाही तर दोन गांधींना एकत्र आणण्याची बुद्धी राज्यकर्त्यांना कशाला झाली असती? बादशहाखान हे सशस्त्र प्रतिकाराचे एके काळी पुरस्कर्ते होते व त्यांनी घेतलेले अहिंसानिष्ठेचे पांघरूण खरे नसावे या विचाराने तर राज्यकर्ते त्यांना सीमाप्रांताबाहेर ठेवीत राहिले नव्हते ना अशी शंकाही मनास चाटून जाते. परन्तु गांधी अगर त्यांची अहिंसा हीही पापाला म्हणजे राज्यकर्त्यांच्या अन्यायाला नष्ट करण्यासाठीच आहे हेही त्यांनी ओळखले होते; पण अहिंसेचा प्रतिकारही डॉक्टरने केलेल्या शस्त्रक्रियेसारखा असतो. तो रुग्णाला पथ्यकर ठरत असतो. काही झाले तरी बादशहाखानांना सीमाप्रांतात येऊ देण्यास स्थानिक अधिकारीच नव्हे तर स्वार्थी मुस्लिम नेतेही विरोधी होते. त्यामुळे सुमारे वर्षभर बादशहाखानांचे वास्तव्य वर्धासच राहिले व त्यामुळे गांधीजींच्या म्हणजेच अहिंसानिष्ठेच्या सान्निध्यात त्यांना राहता-वावरता आले. त्यांची अहिंसानिष्ठा गांधीजींच्या जीवनप्रयोगामुळे खंबीर होत गेली असली तरी पठाण प्रदेशातील परिस्थितीमुळे त्यांनीही हे अस्त्र अनुभवाने उपयुक्त ठरल्यामुळेच आत्मसात केलेले होते.

खरे ज्ञान हे प्रत्यक्ष कर्मातूनच विकसित होत जाते व त्या दृष्टीने या उभयतांचा परस्पर परिचय होण्याची ही संधी उभयतांना पाहिजे होती, ती संधी याही खेपेस सरकारच्या शहाणपणामुळे मिळाली. बादशहाखानांच्या गाठी-भेटीची इच्छा सर्वच प्रांतांना होती. त्यामुळे या वर्षांत त्यांना थोडा प्रवासही करावा लागला.

ते वर्धास राहिले किंवा मुंबई, दिल्ली, काशी, प्रयाग या भागात फिरत राहिले तरी त्यांचा सारा जीव सीमाप्रदेशातील त्यांच्या सहकाऱ्यांमध्ये व तेथील जनतेच्या सुखदुःखात अडकलेला होता. आपल्याला होणाऱ्या कठोर शिक्षांमुळे किंवा मुदतीनंतरही प्रवेशबंदीचे हुकूम जारी ठेवल्यामुळे पठाण हैराण व अनावर होतील अशी भीती त्यांना सारखी वाटत होती; पण या सर्व छळाला व प्रक्षोभक वातावरणाला त्यांचे पठाण कार्यकर्ते अगदी शांतपणे तोंड देत होते, हे पाहून त्यांना फार संतोष वाटत असे.

मुंबईच्या काँग्रेस बैठका संपवून परत जातेवेळी त्यांनी श्री. शार्दूलसिंग, कवीश्वर यांच्याबरोबर आपल्या प्रांताला व कार्यकर्त्यांना निरोप दिला. त्यात ते म्हणतात : "काँग्रेसच्या लोकांनी सरकारी दडपशाहीला घाबरता किंवा कंटाळता कामा नये. काँग्रेसचे नेतृत्व आता आपण स्वीकारले आहे. तेव्हा ती जे जे आदेश देईल ते ते आपण पाळले पाहिजेत. मग, निवडणुकांवर बहिष्कार घालता येणार नाही." पंजाबातील जातीय दंगलींना उद्देशून त्यांनी सांगितले, "पंजाबातील या दुर्दैवी दंगलीच्या वेळी मला त्यांना काही साहाय्य करता येत नाही याबद्दल फार वाईट वाटते; शक्य असते तर मी मध्यस्थी जरूर केली असती. खुदाई-खिदमतगारांनी आपली मने ज्याप्रमाणे निर्मळ केली त्याप्रमाणे पंजाबातील मुसलमान जर करतील तर येथील प्रश्नही लवकरच सुटेल."

वर्षे जी काँग्रेसने आम्हाला मदत दिली त्या काँग्रेसला सोडण्यास सांगेल तो कसला धर्म व ती कसली नीती? कोणता धर्म गोरक्ष्यांना मोडण्यास सांगेल? काँग्रेसला हिंदू काँग्रेस म्हणण्यापासून सावध रहा हा प्रश्न फक्त कायदेमंडळातील दहा वीस जागांचा नाही तो जनतेच्या भावनेचा प्रश्न आहे ''

प्रयाग नगरपालिकेने त्यांना मानपत्र दिले त्याच्या उत्तराच्या भाषणात त्यांनी नगर पित्यांना योग्यशा कानपिचक्या दिल्या "बहुतेक नगरपालिका सुस्थितीतील लोकांच्या गरजांचाच विचार करतात कर देतात त्यांची सेवा केली पाहिजे हे खरे असले तरी बाप सर्व लेकरांची काळजी वाहतो त्याप्रमाणे नगरपालिकांनी वागले पाहिजे ' आपली तुलना गांधीजींशी केलेली त्यांना केव्हाच आवडत नसे या देशाला एकच गांधी पुरे असेही ते म्हणत प्रयागच्या या भाषणात ते म्हणाले, "दोन गांधी निर्माण करू नका, चीनमध्ये त्यामुळे गैरसमज झाला तसे घडू नये '

नोव्हेंबरमध्ये त्यांनी अहमदाबाद व गुजरातमधील काही खेड्यांना भेट दिली अहमदाबादमधील मुक्कामात त्यांनी कामगारसंघटनेची माहिती घेतली कामगार व मालक-संबंध सलोख्याचे राखण्याच्या प्रयत्नाचे त्यांनी अभिनंदन केले सर्व ठिकाणच्या प्रचारात जातीय ऐक्याबद्दल त्यांनी प्राधान्येकरून चर्चा केली खानसाहेबांनी काँग्रेस सोडावी यासाठी सरकारने कसे व किती प्रयत्न केले याचा स्फोट उभयता खानबंधूंनी दिल्लीच्या चर्चेत केला होता

'काँग्रेस सोडल्यास सर्व खुदाईखिदमतगारांस तुरुंगातून मुक्त करण्यास सरकार तयार होते ' असे त्यांनी स्पष्टपणे सांगितले

या वर्षातील थोडाच काळ ते वर्ध्यास राहू शकले त्यांना सेवाग्राममध्ये राहता आले नाही, पण सतत सतत राहात असत विशेषत महत्त्वाच्या चर्चेसाठी किंवा रुग्ण म्हणून ऑक्टोबर महिन्यात त्यांना दातांच्या विकाराने थोडासा त्रास झाला, त्या वेळी स्वत गांधीजी त्यांची शुश्रूषा करीत असत काही वेळा गांधीजीच बादशाहखानाचा खाना स्वत तयार करीत

बादशाहखान हे स्वतःस इतरांचे खिदमतगार मानीत व सर्वांची सेवा करण्यासाठी धडपडत असत पण त्यांच्या शारीरिक दुर्बलतेच्या काळात त्यांना इतरांना खिदमत करू द्यावी लागे स्वत गांधीजीच जेव्हा त्यांच्या सेवेत गुंतत तेव्हा बादशाहखानांची किती पंचाईत उडत असेल हे तर्कानेच अजमावले पाहिजे

तुरुंगाबाहेरच्या काळातही आपण तुरुंगातच आहोत असे अनेक प्रसंग केव्हा केव्हा त्यांना असे प्रसंग वर्ध्यास येत गांधीजींकडून शुश्रूषा करून घ्यावी लागावी हा त्यांपैकीच एक भाग होय पण जमनालालजी हे खरोखरच जेलमधल्याप्रमाणे वागणारे व वागवणारे सज्जने

विश्रांती घेण्यास व खाऊपिऊ घालण्यात ते कोणाचेच काही चालू देत नसत, त्यांच्या प्रेमामुळे त्यांचा शब्द मोडण्याचीही कोणाला हिंमत होत नसे, ते कोणाचे काही चालूच देत नसत स्वत गांधीजींना व विनोबांनाही आपले बोचरे बोलणे ऐकवीत त्यांच्या प्रेमाचा खाक्याच असा होता हे पाहिले म्हणजे हा अहिंसेचा खरा साक्षात्कार होय असेच कोणालाही वाटेल बादशहाखान आपल्या मित्र-सहकाऱ्यांच्या भावनांचा सन्मान राखण्या साठी मांसाम घेण्याचे नाकारीत तर एकदा डॉक्टरने 'मांसरस' हेच त्यांना औषध सांगितले. बादशाहखान त्याला तयार नव्हते, स्वत स पण्णार्ग सर्व धर्मनधने निग्रहाने पाळणारे जमनालालजी स्वत च मासरस तयार करून देण्यास तयार झाले, पण आपल्या यजमानानी हे करणे बरे नाही म्हणून स्वत बादशाहखानच तो आहार घेण्यास तयार झाले खरी निष्ठ व खरे प्रेम असले म्हणजे तेथे सर्व भेदभाव कसे विरघळून जातात याचे हे सुदर दर्शन होते या एक वर्षाच्या काळात उभय गांधींनी एकमेकाना आत्मसात केले. हिंदू-मुस्लिम-ऐक्याचे एक आदर्श म्हणून गांधीजी बादशाहखानांना मानू लागले त्याच प्रमाणे अहिंसेवरील बादशाहखानांची श्रद्धा किती जिवत आहे हेही गांधीजींच्या प्रचीतीला आले "मुसलमानांना अहिंसा नवीन अगर अपरिचित असण्याचे कारण नाही सत महमदसाहेबांनी मक्केत असताना अहिंसाच शिकवली आहे त्या तत्त्वाची गांधीजींनी पुन्हा एक आठवण करून दिली आहे," असे बादशाहखान सांगत १९३७ च्या निवडणुकीनंतर बादशाहखानावरील बदी उठेपर्यंत त्यांचे वास्तव्य वर्ध्यास राहिले

# १६

# राजकीय सुधारणाबरोबर अंतर्गत दुहीची पेरणी—१९३७-३९

१९३७ अखेर सहा वर्षांचा कारावास व वनवास सहून बादशहाखानांचा गृहप्रांत प्रवेश व्हावयाचा होता. तत्पूर्वी फक्त आपल्या बंधूंना वाजत-गाजत स्वगृही आणण्याचा मान डॉ. खानसाहेबांच्या मंत्रिमंडळास मिळाला. फक्त आपली मंत्रिमंडळे असून देशाचे प्रश्न सुटत नाहीत. खरोखर पूर्वीच दरम्यान कायदेमंडळात असले व त्यांच्या हाती भरपूर सत्ता असली तरच ती कायदेमंडळे उपयुक्त ठरू शकतात. अन्यथा मोतीलालजींनी म्हटले त्याप्रमाणे ते लाकडी घोडे ठरतात. त्यावर स्वार होऊन लढाई मारता येत नाही. खरी सत्ता नसलेली कायदेमंडळे ही आपल्यालाच गळफास होऊन बसतात. म्हणून त्यावर बहिष्कार घालण्याचा गांधीजी सल्ला देत. बादशहाखान तर अशा कायद्या मंडळापासून अलिप्त राहण्याच्या मनोवृत्तीचे होते आणि त्यांचे प्रत्यंतर सीमाप्रांताच्या कायदेमंडळाने पुरेपूर आणून दिले.

नोव्हेंबर अखेर १९३२ मध्ये नव कायदेमंडळ मिळाले व सर अब्दुल कय्युमखानने दिलदार व बाणाने पगार मुख्य मंत्री झाले. परंतु केवळ मुसलमानांच्या मताने नव्हे तर हिंदू आमदारांच्या पाठिंब्यामुळे बादशहाखान व खुदाईखिदमतगार यांच्याविरुद्ध तरी उठू नये असे ठराव पास झाले. चांगले नवे विधिमंडळात न पाठविल्याने ही आपत्ती आली होती असे नव्हे. गव्हर्नर अनियंत्रित अधिकार वापरू शकत असे. बादशहाखानांना या विधिमंडळाच्या कामाचे कधीच आकर्षण वाटले नाही. बाहेर समाजाची ताकद वाढलेली असली तरच कायदेमंडळाचे तट आपल्या बाजूने ठेवता येते नाही तर आपण फक्त स्वार होतो व घोडा नेईल तिकडे घेऊन जातो, असे ते म्हणत.

डॉ. खानसाहेबांचा स्वभाव व लायकी या दोन्ही दृष्टींनी ते या कामाला पात्र होते व

त्यापूर्वीचे वर्ष जातीय निवाड्यासंबंधीच्या भांडणतच्यातच गेले खुद्द काँग्रेसनेत्यांमध्ये यासंबंधीचे दोन तट पडून मालवीय-अणे ही मंडळी थोडी धीर झाली मुस्लिम लीगमध्ये जमियत-उल-उलेमा, मुस्लिम लीगमध्ये अहरार पार्टी आदि भेद वाढले त्याशिवाय बंगाल, सिंध, पंजाब येथील मुस्लिम पक्ष हे मुस्लिम लीगपासून सर्वस्वी फटकून वागणारे असे होते मद्रासचे रा ब एम् सी राजा व मुंबईचे डॉ आंबेडकर आदींनी हरिजनांची वेगळी फळी उभारली फेडरेशन बारगळल्यामुळे संस्थानिकही वाटेल ते खेळ खेळण्यास स्वतंत्र राहिले अशा रीतीने देश नव्या राजकीय सुधारणाच्या उंबरठ्यावर असताना देशातील दुफळी वाढलेली होती आणि हिंदू मुसलमानांमधील मतभेद हे मतभेदावर न थांबता दहशतीवर येऊन मिडलेले होते सत्तालोभ हेही एक वैयक्तिक कर्तृत्वाला मोठे आकर्षण असते, त्याप्रमाणे अनेक तरुण नेते सत्तेच्या आकर्षणाने निवडणुकांच्या राजकारणात उतरलेले होते वायव्य सीमाप्रांतातील निवडणुकीचे वेळी सरदार अब्दुर-रब-निश्तार, पीर सय्यद लालशाह वगैरे तुरुंगाची हवा खाऊन आलेले लोक मुस्लिम नॅशनॅलिस्ट पक्षामध्ये समाविष्ट झालेले होते निवडणुकीचे पूर्वी या मतभेदांचे पर्यवसान देशात ठिकठिकाणच्या दंगलीत झालेले होते त्यामुळे बादशहाखानांनी हा सर्व काळ हिंदू-मुस्लिम ऐक्याच्या प्रचारासाठी लावलेला होता

१९३७ च्या मेमध्ये मुंबईतील राष्ट्रीय मुस्लिम कार्यकर्त्यांपुढे त्यांनी या विषयाची विस्ताराने चर्चा केली होती ते म्हणाले, "मुसलमान अल्पसंख्यांक असले तरी सामर्थ्य वान आहेत त्यांनी कशासाठी म्यावयाचे ? हिंदू-मुसलमानांचा हा प्रश्न परस्परांमधील खोट्या अविश्वासामुळे निर्माण होत असतो तो कसा दूर करता येतो हे खुदाईखिदमतगारांनी दाखवून दिलेले आहे परस्परांनी एकमेकांजवळ यावे व खरे सत्कार्य करावे त्यातूनच ऐक्य निर्माण होऊ शकते स्वातंत्र्याच्या लढ्यात योग्य तो वाटा उचलला तरच मुसलमानांना सन्मानाचे स्थान लाभू शकेल त्यामुळे आपले कर्तव्य केले याचे समाधानही त्यांना मिळेल साम्राज्यसत्तेशीही टक्कर देण्यात खुदाईखिदमतगार खडे झाले, त्याबरोबर आज ते भारताच्या आदराचे स्थान बनले आहेत यापासून इकडील मुसलमानांनी योग्य तो बोध घेतला पाहिजे" जुलै महिन्यात दिनापूर (संयुक्तप्रांत) येथील एका भाषणात ते म्हणाले, 'अल्पसंख्याकांचा प्रश्न नाही कोठे ? तो इतर राष्ट्रांतही आहे, पण असा रक्तपात कोठेही झालेला नाही या देशात आपण सर्वत्र जातवारीचे तुकडे करून टाकलेले आहेत, स्टेशनवर "हिंदू पाणी" 'मुस्लिम पाणी' अशा पाण्याच्या सुद्धा जाती करून टाकल्या आहेत आमच्या सीमाप्रांतात हे भेद गाडून टाकण्यात आम्ही बरेच यशस्वी झालो आहोत परंतु तिकडील खऱ्या-खोट्या बातम्या इकडे पसरविल्या जातात व त्यामुळे इकडे दंगे होतात सीमाप्रांतात हिंदू मुली पळविल्या जातात असा खोटा प्रचार

इकडे केला जातो व त्यामुळे पठाणांचे नाव इकडे बदनाम केले जाते, पण पळविलेल्या मुलींच्यामध्ये हिंदू मुलींच्याप्रमाणे मुसलमान मुलीही असतात हे सत्य इकडे कधीही सांगितले जात नाही इप्पीच्या फकिरांच्यासंबंधी इकडे भरपूर खोडसाळ प्रचार राज्यकर्त्यांनी केलेला आहे, पण त्यांना खरोखर त्यांचा स्वतंत्र प्रदेश इंग्रजांच्या तावडीतून वाचवावयाचा होता त्यासाठी ते सीमाप्रांतावर हल्ले चढवीत असत ते फकीर नव्हते ते मोठे अमीर व सधन होते एक धर्मवेडा म्हणून त्यांची इकडे राज्यकर्त्यांनी प्रसिद्धी केली, पण या फकिरांनाच ही बदनामी यांविषयी जरूर वाटले व त्यासाठी त्यांनी एक मोठा " जिरगा " बोलाविला त्यामध्ये त्यांनी हिंदू नेत्यांनाही बोलाविले त्या सर्वांच्या पुढे त्यांनी सर्व वस्तुस्थिती मांडली या जिरग्यापुढे स्वतः इप्पीच्या फकिरांनी मुली पळविणे, लूटमार करणे, जाळपोळ करणे वगैरे गोष्टींचा तीव्र निषेध केला पण या निषेधाची व जिरग्याची बातमी राज्यकर्त्यांनी बाहेर कोठेही जाऊ दिली नाही "

हे जातीय दंगे निवडणुकीच्या वेळीच कसे व का होतात ? अल्पसंख्याकांना हिंदू राज्याची भीती घालून राजकीय चळवळीपासून कसे फोडले जाते वगैरे प्रचार बादशहाखानांनी हिंदुस्थानात वर्गल्याप्रमाणे ठिकठिकाणी केला यावरून त्यांना सीमाप्रांताबाहेर का ठेवले जात होते याचा उलगडा सहज होईल सीमाप्रांतात ते प्रविष्ट झाल्याबरोबर तेथे त्यांनी पुन्हा खेड्यापाड्यांत प्रचार करून लोकमत जागृत केले व त्याबरोबर हिंदू-मुस्लिम द्वेषाचे दंग विरून जाऊ लागले १९३७ साली डॉ खान-मंत्रिमंडळ स्थापन झाल्यावरही मंत्रिमंडळसभोवारच्या कार्यात ते कुठेच गुंतून राहिले नाहीत उलट " ही मंत्रिमंडळे फारशी टिकाऊ नव्हेत गरिबांच्या भाकरीचा प्रश्न ती सोडवू शकत नाहीत यापूर्वीही अविश्वास व झगडेच निर्माण केले जातील " वगैरे सल्ला ते मंत्र्यांना वारंवार देत असत " जनतेची अनर्गत सवलना व त्यांचे राजकीय शिक्षण यावरच खरे स्वातंत्र्य अवलंबून आहे " हा त्यांचा पहिला सिद्धांत होता " खरे स्वातंत्र्य मिळेपर्यंत आपण जागरूक व कार्यनिष्ठ राहिले पाहिजे " असे ते म्हणत त्याप्रमाणे ते अखंड फिरते व प्रचार-मग्न राहिले होते मंत्रिमंडळ आले किंवा गेले तरी त्यांची राहणी, त्यांचे पायी फिरणे व कार्यकर्त्यांच्यामध्ये मिसळून राहणे या त्यांच्या धोरणामध्ये काडीचाही फेरफार झालेला नव्हता

सीमाप्रांतात होणारी माणसांची पळवापळव हा एक राजकीय चढाईचाच प्रकार होता ब्रिटिश सरकारने स्वतंत्र टोळीवाल्यांच्या मुलखांवर हल्ले केले म्हणजे त्याच्या प्रतिकारार्थ म्हणून टोळीवाले पठाण सीमा प्रांतातील लष्करी केंद्रांवर हल्ले चढवीत धर्मभावनेने व हिंदू जमातीवर सुद्धा हल्ले होत, पण ते अगदी क्वचित होत ब्रिटिशांच्या चढाईच्या प्रतिकारार्थ होणारे प्रकारच अधिक मुख्यतः पळविलेल्या लोकांमध्ये फक्त हिंदू मुली पळविल्या जातात हा

प्रचार सर्वस्वी व छोडसाळपणाचा होता. त्यामध्ये मुसलमानही असत, हे पुढील आकड्यांवरून उघड होते. ( १९३६ ते १९४१ मध्ये ) एकूण खून, जखमी करणे व पळविण्याचे गुन्हे.

| | हिंदू | मुस्लिम | एकूण |
|---|---|---|---|
| खून | ४९ | ७३ | १२२ |
| जखमी | २३ | ३७ | ६० |
| पळविणे | १२७ | १२९ | २५६ |

वरील आकड्यांवरून हिंदूप्रमाणे मुस्लिम माणसांची पळवापळव व हत्या झालेली आहे हे स्पष्ट आहे. ही माहिती सरकारी अहवालावरून घेतलेली आहे. (Frontier speaks-page 68 ) केवळ पठाणांच्यामधील गरिबीमुळे हे डाके घातले जातात हे म्हणणेही चुकीचे आहे असे श्री. महमूद युनूस मानतात. मुस्लिम लोकसंख्या ९३ टक्के व हिंदू व इतर सात टक्के असता दोन्ही जमातींचे बळी साधारणपणे सारखेच दिसतात. या उलट सात टक्के हिंदूंकडे ८० टक्के संपत्ती कॉन्ट्रॅक्ट वगैरे रूपाने जाते हेही लक्षात ठेवले पाहिजे.

डॉ. खानसाहेब यांचे मंत्रिमंडळ सत्तेवर येण्यापूर्वी सीमाप्रांतात सर अब्दुल कय्यूम यांचे मंत्रिमंडळ अधिकारारूढ झाले होते. कायदेमंडळातील अल्पसंख्याक पक्षाने एखादे मंत्रिमंडळ बनविणे: म्हणजे पक्षपक्षांमध्ये समासदांची किती फोडाफोड करावी लागते, त्यासाठी किती मलेकुरे डावपेच करावे लागतात याचा अनुभव आता खेड्यापाड्यापर्यंत पोहोचलेला आहे. एखाद्या नगरपालिकेचे अध्यक्षपद किंवा ग्रामपंचायतीचे प्रमुखपद मिळवावयाचे म्हणजे तेथील बहुसंख्य व अल्पसंख्य पक्षाच्या नेत्यांना काय काय उचापती कराव्या लागतात-याचा अनुभव सर्वांना आहे.

लोकशाहीनिष्ठ पक्षात तत्त्वनिष्ठ माणसे असतील तरच ते पक्ष योग्य रीतीने वागतात; तसे नसल्यास हे पक्ष सर्वस्वी लोकशाही तत्त्वांना व भावनांना मारक अशा रीतीने वागतात; यामुळे अशा लोकशाही संस्थांचा नाशच होतो. म्हणून या संस्था चालविण्यास योग्य अशी तत्त्वनिष्ठ मनोवृत्ती निर्माण करणे जरूर असते. मशागत करण्यापूर्वी पेरणी करणे जितके हानिदायक, तितकेच लोकशाही निष्ठा तयार नसता या संस्था आपणे धोक्याचे होते. हे दोन्ही प्रयोग एकदम चालवले पाहिजेत. बादशाहखान यांनी हेच केले. म्हणून अशा थोर तत्त्वनिष्ठ नेत्यांपैकी ते एक ठरले आहेत.

कय्यूमखान मंत्रिमंडळावरील अविश्वास व्यक्त करण्याच्या वेळी काँग्रेस पक्षास बहुमत मिळण्यासाठी अधिक समासदांची जरूरी होती आणि ते बहुमत हिंदू-शीख नॅशनॅलिस्ट पक्षाचे काही लोक मिळाल्याने होऊ शकले. पण बहुमत अवघ्या चार मतांचे होते. "पक्ष

बदलणार हे सदस्य अतिशय कमोरीने तपासले जावेत व मंत्रिमंडळाची जबाबदारी घेताना आपण आपल्यावरील जबाबदारी किती धार पाडू शकू याचा पूर्ण विचार करावा " असे बादशहाखान पुन पुन्हा बजावीत असत

या मंत्रिमंडळाच्या कारकीर्दीच्या काळातच सीमाप्रांतात प्रथम मुस्लिम लीगचा प्रवेश झाला, तीही अधिकृत संघटना म्हणून नव्हे या मुस्लिम लीगमध्ये बरेचसे सेवानिवृत्त सरकारी अधिकारी व बडे जमीनदार होते हिंदू-शीख नॅशनॅलिस्ट पार्टीमध्ये असाच जमीन दारांचा व सावकारांचा भरणा होता खाकसार पक्षही तेथे निघाला होता पण त्यामध्ये विशेषसे सामर्थ्य नव्हते कॉंग्रेस पक्ष सत्तेवर आल्यावरोबर या विरोधी पक्षात स्वतःचा पक्ष सोडण्याचे राजकारण सुरू झाले त्यामुळे त्यांच्या पक्षात दुही माजली तशीच कॉंग्रेस पक्षातही बंदिली निर्माण झाली कार्यकर्त्यांच्या स्वार्थासाठी हे घडत असते, यात जन हिताचा काही संबंध नसतो कॉंग्रेसविरोधी पक्षातील फाटाफुटीप्रमाणे कॉंग्रेस पक्षात निर्माण झालेले दुहीचे प्रवाह नितकेच देशहिताला मारक ठरले कॉंग्रेस हा केवळ एकविचाराच्या प्रणालीचा पक्ष नव्हता लढ्यासाठी निर्माण झालेली ती सर्वसंग्राहक संघटना होती सत्तेची भागीदारी ज्यांना चाखण्यास मिळत नाही असे लोक एकमेकांचे विरोधक व कधीकधी वैरीही बनतात तेच सीमाप्रांतातही घडले

डॉ खानसाहेबांच्या जराती व शेतसेवातील नेतृत्वामुळे मंत्रिमंडळाने बरेच उपयुक्त कार्य केले त्यांनी सुल्तानीस ऑनररी मॅजिस्ट्रेटचा हुद्दा रद्द केला वेटबिगारसाठी असलेली चौकीदार पद्धती निकालात काढली, शेतीकायदे शेतकऱ्यांच्या हिताच्या दृष्टीने दुरुस्त केले, शिक्षणाचा विस्तार खेड्यापाड्यात केला, इत्यादी लोकहिताची कामे केली परंतु आपल्याच पक्षात असंतुष्टांची संख्या वाढली म्हणजे केलेल्या कामाचे श्रेय मिळण्याऐवजी न केलेल्या कामाबद्दल तडाखे खावे लागतात हाही अनुभव सर्वत्र येतोच

भारतात सर्वच कॉंग्रेस मंत्रिमंडळांच्या राज्यात झपाट्याने आर्थिक सुधारणा घडवून आणण्याबद्दल तगादा सुरू झालेला होता याच्यामागे जनतेच्या कल्याणाप्रमाणेच छोट्या मोठ्या पुढाऱ्यांच्या असंतुष्ट भावनांचे खडक लपलेले होते भारतात समाजवादी पक्षाची स्थापना या वेळी होऊन चुकली होती या समाजवादी मतप्रणालीच्यावरून स्वत जवाहरलाल, सुभाषबाबू, सरदार पटेल व गांधीजी यांच्यामध्ये कसकसे मतभेद झाले होते याचा इतिहास सर्वांना माहित आहे ठिकठिकाणच्या प्रांतिक मंत्रिमंडळांच्यापुढे शेतकऱ्यांच्या व कामगारांच्या गाऱ्हाण्यांचे पर्वतप्राय ढीग येऊन पडत असत व ते सोडवि ण्याचे सामर्थ्य मंत्र्यांमध्ये नव्हते राज्यघटनेखाली अधिकाराची मर्यादाही फार होती आणि पक्षांच्या आज्ञा अमलात आणणारी नोकरशाही गोऱ्या लोकांनी व त्यांच्या प्रभावाखाली काढली

बदलणार हे सदस्य अतिशय कसोशीने तपासले जावेत व मंत्रिमंडळाची जबाबदारी घेताना आपण आपल्यावरील जबाबदारी किती पार पाडू शकू याचा पूर्ण विचार करावा " असे बादशाखान पुन पुन्हा बजावीत असत

या मंत्रिमंडळाच्या उलाढालीच्या काळातच सीमाप्रांतात प्रथम मुस्लिम लीगचा प्रवेश झाला, तोही अधिकृत सवस्ता म्हणून नव्हे या मुस्लिम लीगमध्ये बरेचसे सेवानिवृत्त सरकारी अधिकारी व बडे जमीनदार होते हिंदू-शीख नॅशनॅलिस्ट पार्टीमध्ये अमाप जमीन दारांचा व सावकारांचा भरणा होता खाक्सार पक्षही तेथे निघाला होता पण त्यामध्ये विशेषसे सामर्थ्य नव्हते काँग्रेस पक्ष सत्तेवर आल्याबरोबर या विरोधी पक्षात स्वतःचा पक्ष सोडण्याचे राजकारण सुरू झाले त्यामुळे त्यांच्या पक्षात दुही माजली तशीच काँग्रेस पक्षातही बंदिली निर्माण झाली कार्यकर्त्यांच्या स्वार्थासाठी हे घडत असते यात जन हिताचा काही संबंध नसतो काँग्रेसविरोधी पक्षातील फाटाफुटीप्रमाणे काँग्रेस पक्षात निर्माण झालेले दुहीचे प्रवाह तितकेच देशहिताला मारक ठरले काँग्रेस हा केवळ एकविचाराच्या प्रणालीचा पक्ष नव्हता त्यासाठी निर्माण झालेली ती सर्वसंग्राहक संघटना होती सत्तेची भागीदारी ज्यांना चाखण्यास मिळत नाही असे लोक एकमेकांचे विरोधक व कधीकधी वैरीही बनतात तेच सीमाप्रांतातही घडले

डा खानसाहेबांच्या उत्साही व लोकसेवांतील नेतृत्वामुळे मंत्रिमंडळाने बरेच उपयुक्त कार्य केले त्यांनी मुलकातील ऑनररी मॅजिस्ट्रेटचा हुद्दा रद्द केला वेठबिगारसाठी असलेली चौकीदार पद्धती निकालात काढली शेतीकायदे शेतकऱ्यांच्या हिताच्या दृष्टीने दुरुस्त केले शिक्षणाचा विस्तार खेड्यापाड्यात केला, इत्यादी लोकहिताची कामे केली परंतु आपल्याच पक्षात असंतुष्टांची संख्या वाढली म्हणजे केलेल्या कामाचे श्रेय मिळण्याऐवजी न केलेल्या कामाबद्दल तडाखे खावे लागतात हाही अनुभव सर्वत्र येतोच

भारतात सर्वच काँग्रेस मंत्रिमंडळांच्या राज्यात झपाट्याने आर्थिक सुधारणा घडवून आणण्याबद्दल तगादा सुरू झालेला होता याच्यामागे जनतेच्या कल्याणाप्रमाणेच छोट्या मोठ्या पुढाऱ्यांच्या असंतुष्ट भावनांचे खडक लपलेले होते भारतात समाजवादी पक्षाची स्थापना या वेळी होऊन चुकली होती या समाजवादी मतप्रणालीच्यावरून स्वत जवाहरलाल सुभाषबाबू, सरदार पटेल व गांधीजी यांच्यामध्ये कसकसे मतभेद झाले होते याचा इतिहास सर्वांना माहित आहे ठिकठिकाणच्या प्रांतिक मंत्रिमंडळांच्यापुढे शेतकऱ्यांच्या व कामगारांच्या गाऱ्हाण्यांचे पर्वतप्राय ढीग येऊन पडत असत व ते सोडवि ण्याचे सामर्थ्य मंत्र्यांमध्ये नव्हते राज्यघटनेखाली अधिकाराची मर्यादाही फार होती आणि पक्षांच्या आज्ञा अमलात आणणारी नोकरशाही गोऱ्या लोकांनी व त्यांच्या प्रभावाखाली बांधूनी

व्यापलेल्री होती त्यामुळे मन्त्र्यांचे योग्य निर्णयही वळेवर किंवा पूर्णतया अमलात येत नसत यामुळे काँग्रेसमधील असंतुष्ट कार्यकर्त्यांना मार्गावर हट्टे चढविणे सोपे होई या अंतर्गत दुहीमुळे काँग्रेसचे सामर्थ्य वाढण्याऐवजी ते खच्ची होऊ लागले होते

गल्लादेर ( जिल्हा हजारा ) येथील शेतकऱ्यांचा लढा हे एक नमुनेदार उदाहरण आहे डॉ खानमन्त्रिमंडळापुढे अशी अनेक संकटे आलेली होती, पण त्यातून ते पार पडलेले होते, पण गल्लादेर येथील शेतकऱ्यांच्या चळवळीस समाजवादी कार्यक्रमाचे आमक स्वरूप दिले गेले. काँग्रेसमधील काही कार्यकर्ते मन्त्रिमंडळाविरुद्ध लढण्यास तयार झाले त्याचा फायदा विरोधी पक्षाने घेतला "डॉ खानमन्त्रिमंडळ हे एक अत्यंत प्रतिगामी मन्त्रिमंडळ आहे जुन्या ब्रिटिश राजवटीला लाजविणारे पोलिसी राज्य सुरू झालेले आहे स्त्रिया व मुलांच्यावर पोलीस लाठ्या चालवीत आहेत " वगैरे प्रचार देशभर केला गेला या वेळी बादशहाखानांसारखा सर्वांचा विश्वास असलेला नेता मन्त्रिमंडळाची बाजू समजून घेण्यास लागला नसता तर खानमन्त्रिमंडळाची खांडोळी केव्हाच झाली असती स्वत बादशहाखानांना या प्रकाराने खूप व्यथित केले होते इतकेच नव्हे तर या अशा सत्ताखोराच्या कार्यक्रमामुळे जनतेची शक्ती वाढण्याऐवजी ती कमीच होईल या निर्णयाला ते पोचेचले होते त्यांच्या स्वभावाचे वैशिष्ट्य व तत्वनिष्ठेचा प्रकार येथेच प्रचीतीला येतो

गल्लादेर हे तुराच्या नवाबांचे गाव तेथील शेतकऱ्यांवर नवाबसाहेबांनी अनेक प्रकारचे जुलूम केलेले होते हेही खरे पण हे डाव मुस्लिम लीगचेच पुरस्कर्ते व सरकारी अधिकारी खेळत होते आणि तुराच्या नवाबांचे सर्व जुने पाठीराखे आता काँग्रेस मन्त्रिमंडळाच्या विरुद्ध कावकार करू लागले होते काँग्रेस मन्त्रिमंडळ अधिकारावर येण्यापूर्वीच खडकऱ्यांच्याकडील थारी वसूल करण्यासाठी जप्ती-वॉरंटेही काढली गेलेली होती आणि त्या जप्ती हुकुमाची अमलबजावणी करण्यासाठी चाणाक्ष अधिकाऱ्यांनी हीच वेळ पसंत केली होती याच वेळी काही काँग्रेस कार्यकर्त्यांची समाजवादी तत्त्वनिष्ठा जागृत झालेली होती समाजवादी नेत्यांनी हजारो शेतकऱ्यांच्यातर्फे सत्याग्रह करविण्याच्या घोषणा केल्या "कोर्टातून मिळालेल्या आज्ञा ( डिक्री ) धाब्यावर बसविल्या गेल्यास देशात अराजक निर्माण होईल व तसे तर घडताच कामा नये" असा सल्ला नोकरशाही डॉ खानसाहेबांना देई, तर पोलीस अधिकारी, सशस्त्र पोलीस तुकड्या घेऊन गल्लादेर येथे शेतकऱ्यांची घरेदारे उध्वस्त करण्याचा कार्यक्रम पार पाडीत अशा निर्दोषांनी डॉ खान मन्त्रिमंडळ आसन्नमरण झाले होते गल्लादेर येथील पोलीस अत्याचाराच्या बातम्या या सीमाप्रांतातच नव्हे तर लाहोर लखनौ कलकत्ता येथील वृत्तपत्रातून प्रसिद्ध होत या सर्व प्रकारामुळे बादशहाखान हैराण झालेले होते "आमच्यामध्ये अंतर्गत झगडे इतके वाढले आहेत की, त्यामुळे माझे डोके भणभून जाते

व त्या मानसिक दडपणातून महिना महिना माझ्या चित्ताला स्वास्थ्य लाभत नाही '' अशा आशयाचे उद्गार त्यांनी काढले आहेत

मर्दान येथील शेतकऱ्यांवरील पोलीस-अत्याचारांची पाहणी स्वत करावी म्हणून बादशाखान तिकडे गेले त्यांनी केलेल्या पाहणीत मंत्रिमंडळाविरुद्ध केलेले आरोप खरे असल्याचे आढळून आले त्यामुळे ते अधिकच कष्टी झाले ही वस्तुस्थिती बादशाहखानांनी डॉ खान-साहेबांच्या निदर्शनास आणली त्यानतर डॉ खानसाहेब हे स्वत मर्दानकडे गेले व तेथील परिस्थिती पाहिली त्यावरून पोलिसांनी तेथे केलेले अत्याचार बव्हशी खरे असल्याचे त्यांनाही कळून चुकले त्यांच्या सरळ स्वभावाप्रमाणे, डॉ खानसाहेबांनी पोलिसी अत्याचारांची कबुली दिली त्याचप्रमाणे झालेल्या चुका दुरुस्त करण्याचे आश्वासनही शेतकऱ्यांना दिले, पण मुख्य मरी अजूनही झालेल्या चुका ते दुरुस्त करू शकले नाहीत सत्ता काँग्रेस मंत्रिमंडळाची असली तरी कारभार त्यांच्या नोकरशाहीच्याच पकडीत होता, आणि या नोकरशाहीचे खरे नियते ऊर्फ चाणाक्ष गव्हर्नर कनिंगहॅम हेच होते कनिंगहॅम यांच्यावर डॉ खानसाहेबांचा इतका विश्वास होता की त्यांच्या इच्छाविरुद्ध आपल्या प्रमुख सहकाऱ्यांचे म्हणणेही स्वीकारण्यास ते तयार नसत त्यामुळे या काँग्रेस मंत्रिमंडळात ही परस्पर अविश्वासाची पेरणी झाली आपल्यावरील डॉ खानसाहेब यांच्या विश्वासाचा कनिंगहॅम पुरेपूर फायदा करून घेत होते सुदैवाने दोन वर्षांच्या आतच दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी काँग्रेस-मंत्रिमंडळाला राजीनामा देण्याचा आदेश दिला गेला त्यामुळे अतर्गत झगड्याचे मूळच नष्ट झाले त्या वेळी "सत्तात्याग ही एक फार मोठी कल्याणकारी घटना ठरली '' असे ससदीय कार्यक्रमाची कदर करणारे मन्मद यूनुस यानाही म्हणावे लागले बादशाहखान यांना मंत्रिमंडळाच्या कामातून भरीव सामर्थ्य निर्माण होईल असे कधी वाटले नव्हतेच त्यांचा सबंध खुदाई खिदमतगारसघटनेच्या विधायक कार्यक्रमावरच होता, परंतु अखिल भारतीय काँग्रेस सघटनेशी बांधले गेल्याने त्यांना हा कायदेमंडळाचा कार्यक्रम पत्करावा लागला होता

व्यापलेली होती. त्यामुळे मंत्र्यांचे योग्य निर्णयही वेळेवर किंवा पूर्णतया अमलात येत नसत. यामुळे काँग्रेसमधील असंतुष्ट कार्यकर्त्यांना मंत्र्यांवर हल्ले चढविणे सोपे होई. या अंतर्गत दुहीमुळे काँग्रेसचे सामर्थ्य वाढण्याऐवजी ते खच्ची होऊ लागले होते.

गल्लादेर ( जिल्हा हजारा ) येथील शेतकऱ्यांचा लढा हे एक नमुनेदार उदाहरण आहे. डॉ. खानमंत्रिमंडळापुढे अशी अनेक संकटे आलेली होती; पण त्यातून ते पार पडलेले होते; पण गल्लादेर येथील शेतकऱ्यांच्या चळवळीस समाजवादी कार्यक्रमाचे व्यापक स्वरूप दिले गेले. काँग्रेसमधील काही कार्यकर्ते मंत्रिमंडळाविरुद्ध लढण्यास तयार झाले. त्याचा फायदा विरोधी पक्षाने घेतला. “ डॉ. खानमंत्रिमंडळ हे एक अत्यंत प्रतिगामी मंत्रिमंडळ आहे. जुन्या ब्रिटिश राजवटीला लाजविणारे पोलिसी राज्य सुरू झालेले आहे. स्त्रिया व मुलांच्यावर पोलीस लाठ्या चालवीत आहेत. ” वगैरे प्रचार देशभर केला गेला. या वेळी बादशहाखानांसारखा सर्वांचा विश्वास असलेला नेता मंत्रिमंडळाची बाजू समजून घेण्यास लायक नसता तर खानमंत्रिमंडळाची खांडोळी केव्हाच झाली असती. स्वतः बादशहाखानांना या प्रकरणाने खूप व्यथित केले होते. इतकेच नव्हे तर या अशा सवंगलोकप्रियतेच्या कार्यक्रमामधून जनतेची शक्ती वाढण्याऐवजी ती कमीच होईल या निर्णयाला ते पोहोचले होते. त्यांच्या स्वभावाचे वैशिष्ट्य व तत्त्वनिष्ठेचा प्रकार येथेच प्रत्ययाला येतो.

गल्लादेर हे तुरूच्या नवाबाचे गाव. तेथील शेतकऱ्यांवर नवाबसाहेबांनी अनेक प्रकारचे जुलुम केलेले होते हेही खरे. पण हे डाव मुस्लिम लीगचेच पुरस्कर्ते व सरकारी अधिकारी खेळत होते आणि तुरूच्या नवाबाचे सर्व जुने पाठीराखे आता काँग्रेस मंत्रिमंडळाच्या विरुद्ध धावपळ करू लागले होते. काँग्रेस मंत्रिमंडळ अधिकारावर येण्यापूर्वीच खंडकऱ्यांपासून बाकी वसूल करण्यासाठी जप्ती-वॉरंटेही काढली गेलेली होती आणि त्या जप्ती हुकुमांची अंमलबजावणी करण्यासाठी चाणाक्ष अधिकाऱ्यांनी हीच वेळ पसंत केली होती. याच वेळी काही काँग्रेस कार्यकर्त्यांची समाजवादी तत्त्वनिष्ठा जागृत झालेली होती. समाजवादी नेत्यांनी हजारो शेतकऱ्यांच्याकडून सत्याग्रह करविण्याच्या घोषणा केल्या. “ चोरांकडून मिळालेल्या आम्ही ( डिक्री ) धाब्यावर बसविण्या गेल्यास देशात अराजक निर्माण होईल व तसे तर घडता कामा नये ” असा सल्ला नोकरशाही डॉ. खानसाहेबांना देई; तर पोलीस अधिकारी, गस्तीचे पोलीस तुकड्या घेऊन गल्लादेर येथे शेतकऱ्यांची घरेदारे उध्वस्त करण्याचा कार्यक्रम पार पाडीत. अशा विरोधांनी डॉ. खान मंत्रिमंडळ अडचणीत आले होते. गल्लादेर येथील पोलीस अत्याचाराच्या वार्ता या प्रांतातच नव्हे तर लाहोर, लखनौ, कलकत्ता येथील वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होत. या सर्व प्रकारामुळे बादशहाखान हैराण झालेले होते. “ काँग्रेसमध्ये अंतर्गत झगडे इतके वाढले आहेत की, त्यामुळे मागे होऊ म्हणून असे

व त्यां मानसिक दडपणातून मन्त्रिमंडळ माझ्या विचाराशी सहमत नाही " अशा आशयाचे उद्गार त्यांनी काढले आहेत

मल्लादेर येथील शेतकऱ्यावरील पोलीस-अत्याचारांची पाहणी स्वत करावी म्हणून बादशाह खान तिकडे गेले त्यांनी केलेल्या पाहणीत मन्त्रिमंडळाविरुद्ध केलेले आरोप खरे असल्याचे आढळून आले त्यामुळे ते अधिकच दुखी झाले ही वस्तुस्थिती बादशाहखानांनी डा खान साहेबांच्या निदर्शनास आणली त्यानंतर डा खानसाहेब हे स्वत मल्लादेरकडे गेले व तेथील परिस्थिती पाहिली त्यावरून पोलिसांनी तेथे केलेले अत्याचार व हरी खरे असल्याचे त्यांनाही पटून चुकले त्यांच्या सल्ल समजाप्रमाणे, डा खानसाहेबांनी पोलिसी अत्याचारांची कबुली दिली यापमाणे झालेल्या चुका दुरुस्त करण्याचे आश्वासनही शेतकऱ्याना दिले, पण मुख्य मंत्री असूनही झालेल्या चुका ते दुरुस्त करू शकले नाहीत सत्ता काँग्रेस मन्त्रिमंडळाची असली तरी कारभार जुन्या नोकरशाहीच्याच पकडीत होता, आणि या नोकरशाहीचे खरे नियते उर्फ चाबुकस्वार गव्हर्नर कनिंगहॅम हेच होते कनिंगहॅम यांच्यावर डा खानसाहेबांचा इतका विश्वास होता की त्यांच्या शब्दाविरुद्ध आपल्या प्रमुख सहकाऱ्यांचे म्हणणेही स्वीकारण्यास ते तयार नसत त्यामुळे या काँग्रेस मन्त्रिमंडळात ही परस्पर अविश्वासाची पेरणी झाली आपल्यावरील डा खानसाहेब यांच्या विश्वासाचा कनिंगहॅम पुरेपूर फायदा करून घेत होते सुदैवाने दोन वर्षांच्या आतच दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी काँग्रेस-मन्त्रिमंडळाना राजीनामा देण्याचा आदेश दिला गेला त्यामुळे अतर्गत झगड्याचे मूळच नष्ट झाले त्या वेळी ' सत्तात्याग ही एक फार मोठी कल्याणकारी घटना ठरली अस ससदीय कार्यक्रमाची कदर करणारे मन्मद अनूस यांनाही म्हणावे लागले बादशाहखान यांना मन्त्रिमंडळाच्या कारभारातून सगळ सामर्थ्य निर्माण होईल असे कधी वाटले नव्हतेच त्यांचा मनकसा खुदाई खिदमतगारसघटनेच्या विधायक कार्यक्रमावरच होता परतु अखिल भारतीय काँग्रेस सघटनेशी बांधले गल्याने त्यांना हा कायदेमंडळाचा कार्यक्रम पत्करावा लागला होता

# १७

# स्वातीला साबरमतीची भेट

वायव्य सीमाप्रांतात पठाणांनी अहिंसेच्या राजकारणांत अग्रस्थान मिळविले होते जगाच्या दृष्टीने हा चमत्कार होताच, पण भारताच्या इतर भागातही पठाणांच्याइतकी उत्कट व क्रियाशील निष्ठा कोठे आढळून आलेली नव्हती स्वत गांधीजींना पठाणांच्या या अहिंसाप्रेमाचा अर्थ कळलेला होता, आणि पठाणच कदाचित अहिंसेचे खरे पुजारी बनू शकतील अशी अपेक्षाही त्यांना वाटू लागली होती मुंबई कॉंग्रेस अधिवेशनाच्या पूर्वी ( १९३४ ) त्यांनी काढलेल्या एका पत्रकात त्याचा हा विश्वास व्यक्त झालेला आहे बादशहाखान वर्धास काही काळ राहिले होते तेव्हा सीमाप्रांताचे काही कार्यकर्तेही गांधीजींच्या संपर्कात आले होते. या सर्व घटनांमुळे बादशहाखानांच्या बगीच्यात वाढत असलेले अहिंसेचे रोपटे प्रत्यक्ष जाऊन पाहण्याची उत्कटा गांधीजींना लागून रहाणे स्वाभाविकच होते त्यापूर्वीही कोहाटच्या दंग्यानंतर तेथील परिस्थिती स्वत पाहण्याची गांधीजींची इच्छा होती, परंतु त्यांची ती इच्छा सरकारने कधीच पूर्ण होऊ दिली नव्हती १९३७ अखेर डॉ खानसाहेब यांचे मंत्रिमंडळ अधिकारावर आल्यानंतर हा सर्व योग जमून आला आणि गांधीजींना आपल्या लाडक्या उतमझाई गावास नेण्याचे बादशहाखानांचे स्वप्न प्रत्यक्षात उतरले गांधीजींची प्रकृती त्या वेळी तितकीशी बरी नव्हती अशा वेळी इतक्या दूरचा प्रवास त्यांनी अंगावर घेऊ नये असा सर्वांचा आग्रह होता असे असतानाही दोन्ही गांधींनी विचारपूर्वक हा निर्णय घेतला सप्टेंबर १९३८ अखेर त्यांनी वर्धा सोडले दिल्लीस कॉंग्रेस कार्यकारिणीच्या बैठकीसाठी त्यांना काही दिवस घालवावे लागले युरोपमधील युद्धाचे ढग सर्वांच्या सीमेपर्यंत येऊन पोचल्याने कार्यकारिणीच्या बैठकीत जागतिक परिस्थितीवर

अखंड चर्चा चालू होती. ऑक्टोबरच्या पहिल्या आठवड्यात ते पेशावरला पोचले. गांधीजींचा हा वर्धदिवस प्रवासात झाला असावा. दिनांक ५ ते ९ ऑक्टोबर हे दिवस त्यांनी खुदाईखिदमतगारांच्या समवेत घालविले. मुख्य मंत्री डॉ. खानसाहेब व बादशहाखान हे उभयता गांधीजींचा सर्व कार्यक्रम रेखीव पद्धतीने पार पाडण्यासाठी अत्यंत दक्षतेने झटत होते. मुख्यतः गांधीजींना भरपूर विश्रांती मिळावी, त्यांना जरूर वाटेल तेव्हा खुदाईखिदमतगारांशी बोलता यावे अशी योजना केलेली होती. त्यामध्ये कुठलेही जाहीर कार्यक्रम न घेता गांधीजींनी पेशावरचा मुक्काम पार पाडला. या मुक्कामात त्यांनी प्रमुख खुदाईखिदमतगारांपुढे आपले अंतःकरण मोकळे केले व स्वतःच्या अपेक्षाही व्यक्त केल्या.

"अहिंसेवर खरी श्रद्धा असलेले मूठभर लोकसुद्धा सभोवारच्या जगाचा कायापालट करू शकतील. तुम्ही लाख लोक आहात. काँग्रेसजवळ सगळ्या देशात इतके स्वयंसेवक नाहीत. तुमची श्रद्धा खरी असेल तर साऱ्या भारताचे रूप तुम्ही बदलू शकाल. स्वतंत्र प्रदेशातील टोळीवाल्यांच्या झगड्याचा प्रश्न ब्रिटिशांना शंभर वर्षांत सोडविता आलेला नाही. तो प्रश्न तुमच्यासारखे कार्यकर्ते सोडवू शकतील. मात्र तुमची अहिंसेवरील श्रद्धा टिकाऊ स्वरूपाची असली पाहिजे." गांधीजींच्या आगमनाने साऱ्या पेशावर शहराचे वातावरण उत्साहाने भरून गेले होते. खुदाईखिदमतगारांना तर तो सोन्याचा दिवस वाटत होता. बादशहाखान स्मृत व उद्दसित मनाने गांधीजींच्या आरोग्याचे रखवालदार म्हणून त्यांच्या कार्यक्रमावर पहारा ठेवण्याचे काम करीत होते. खुदाईखिदमतगारांनी आपली अहिंसेवरील श्रद्धा रेचीपेची नाही हे गांधीजींना पटवून देण्याचा प्रयत्न केला. 'स्वतः बादशहाखानांनी उद्या अहिंसा सोडली, तरी आम्ही ती सोडणार नाही.' असे त्यांनी सांगितले.

'मी झेक असतो तर' हा जगविख्यात झालेला आपला लेख गांधीजींनी पेशावरच्या या मुक्कामातच लिहिला. पेशावरहून गांधीजी खानांच्या उतमनझई गावाला पोहोचले. ही त्यांची भेट म्हणजे साबरमती आणि स्वाती या दोन पुण्य गंगांची भेट होती. तो शाश्वत प्रीति-संगम ठरावा ही ईश्वरी इच्छा नव्हती. साबरमती नंतर लुप्त व्हावयाची होती. बादशहाखानांना आपल्या प्रांताचा, तेथील हवामानाचा, आपल्या नदीचा, आपल्या ग्रामस्थानांचा, आपल्या सर्वच गोष्टींचा निरतिशय अभिमान वाटतो. या अभिमानात दर्प नाही, दुसऱ्याबद्दल अनादर नाही. त्यात फक्त उत्कट आत्मीयता असते. आपल्या फळफुलांची आणि शेतीची वर्णने सांगताना अगदी गंभीर भावनेने ते त्यांची माहिती देत होते.

गांधीजी आपल्या सर्व परिवारासह स्वाती नदी ओलांडून ग्रामप्रवेश करीत असता बादशाह-खान सभोवारच्या पीकपाण्याचे व वस्तूचे मनमुराद वर्णन करीत होते, तर गांधीजी त्यांचा हात धरून आपला तोल सांभाळताना थोडे बेजार झालेले होते. मांडीपर्यंत आपले कपडे

# १७

# स्वातीला साबरमतीची भेट

वायव्य सीमाप्रांतात पठाणांनी अहिंसेच्या राजकारणात अग्रस्थान मिळविले होते जगाच्या दृष्टीने हा चमत्कार होताच; पण. भारताच्या इतर भागातही पठाणांच्याइतकी उत्कट व क्रियाशील निष्ठा कोठे आढळून आलेली नव्हती. स्वतः गांधीजींना पठाणांच्या या अहिंसाप्रेमाचा अर्थ कळलेला होता, आणि पठाणच कदाचित अहिंसेचे खरे पुजारी बनू शकतील अशी अपेक्षाही त्यांना वाटू लागली होती. मुंबई काँग्रेस अधिवेशनाच्या पूर्वी ( १९३४ ) त्यांनी काढलेल्या एका पत्रकात त्यांचा हा विश्वास व्यक्त झालेला आहे. बादशहाखान वर्ध्यास काही काळ राहिले होते तेव्हा सीमाप्रांताचे काही कार्यकर्तेही गांधीजींच्या संपर्कात आले होते. या सर्व घटनांमुळे बादशहाखानांच्या बगीच्यात वाढत असलेले अहिंसेचे रोपटे प्रत्यक्ष जाऊन पाहण्याची उत्कठा गांधीजींना लागून राहणे स्वाभाविकच होते. त्यापूर्वीही कोहाटच्या दंग्यानंतर तेथील परिस्थिती स्वतः पाहण्याची गांधीजींची इच्छा होती; परंतु त्यांची ती इच्छा सरकारने कधीच पूर्ण होऊ दिली नव्हती १९३७ अखेर डॉ. खानसाहेब यांचे मंत्रिमंडळ अधिकारावर आल्यानंतर हा सर्व योग जमून आला आणि गांधीजींना आपल्या लाडक्या उतमंझाई गावास नेण्याचे बादशहाखानांचे स्वप्न प्रत्यक्षात उतरले गांधीजींची प्रकृती त्या वेळी तितकीशी बरी नव्हती. अशा वेळी इतक्या दूरचा प्रवास त्यांनी अगावर घेऊ नये असा सर्वांचा आग्रह होता. असे असताही दोन्ही गांधींनी विचारपूर्वक हा निर्णय घेतला. सप्टेंबर १९३८ अखेर त्यांनी वर्धा सोडले. दिल्लीस काँग्रेस कार्यकारिणीच्या बैठकीसाठी त्यांना काही दिवस घालवावे लागले. युरोपमधील युद्धाचे ढग संघर्षाच्या सीमेपर्यंत येऊन पोहोचल्याने कार्यकारिणीच्या बैठकीत जागतिक परिस्थितीवर

अखंड चर्चा चालू होती. ऑक्टोबरच्या पहिल्या आठवड्यात ते पेशावरला पोहोचले. गांधीजींचा हा बारादिवस प्रवासात झाला असावा. दिनांक ५ ते ९ ऑक्टोबर हे दिवस त्यांनी खुदाईखिदमतगारांच्या समवेत घालविले. मुख्य मंत्री डॉ. खानसाहेब व बादशहाखान हे उभयता गांधीजींचा सर्व कार्यक्रम रेखीव पद्धतीने पार पाडण्यासाठी अत्यंत दक्षतेने झटत होते. मुख्यत: गांधीजींना भरपूर विश्रांती मिळावी, त्यांना जरूर वाटेल तेव्हा खुदाईखिदमतगारांशी बोलता यावे अशी योजना केलेली होती. त्यामध्ये कुठलेही जाहीर कार्यक्रम न घेता गांधीजींनी पेशावरचा मुक्काम पार पाडला. या मुक्कामात त्यांनी प्रमुख खुदाईखिदमतगारांपुढे आपले अंत:करण मोकळे केले व त्यांच्या अपेक्षांशी व्यक्त केल्या.

" अहिंसेवर खरी श्रद्धा असलेले मूठभर लोकसुद्धा समोवारच्या जगाचा कायापालट करू शकतील. तुम्ही लाख लोक आहात. काँग्रेसजवळ सगळ्या देशात इतके स्वयंसेवक नाहीत. तुमची श्रद्धा खरी असेल तर साऱ्या भारताचे रूप तुम्ही बदलू शकाल. स्वतंत्र प्रदेशातील टोळीवाल्यांच्या झगड्याचा प्रश्न ब्रिटिशांना शंभर वर्षांत सोडविता आलेला नाही. तो प्रश्न तुमच्यासारखे कार्यकर्ते सोडवू शकतील. मात्र तुमची अहिंसेवरील श्रद्धा टिकाऊ स्वरूपाची असली पाहिजे." गांधीजींच्या आगमनाने साऱ्या पेशावर शहराचे वातावरण उत्साहाने भरून गेले होते. खुदाईखिदमतगारांना तर तो सोन्याचा दिवस वाटत होता. बादशहाखान सतृप्त व उल्हसित मनाने गांधीजींच्या आरोग्याचे रखवालदार म्हणून त्यांच्या कार्यक्रमावर पहारा देण्याचे काम करीत होते. खुदाईखिदमतगारांनी आपली अहिंसेवरील श्रद्धा स्पष्टपणे गांधीजींना पटवून देण्याचा प्रयत्न केला. 'स्वत: बादशहाखानांनी जरी अहिंसा सोडली, तरी आम्ही ती सोडणार नाही.' असे त्यांनी सांगितले.

'मी शेतकरी असतो तर' हा जगविख्यात झालेला आपला लेख गांधीजींनी पेशावरच्या या मुक्कामातच लिहिला. पेशावरहून गांधीजी खानांच्या उतमझाई गावाला पोहोचले. ही त्यांची भेट म्हणजे साबरमती आणि स्वाती या दोन पुण्य गंगांची भेट होती. तो शाश्वत प्रीति संगम ठरावा ही ईश्वरी इच्छा नव्हती. साबरमती नंतर लुप्त व्हावयाची होती. बादशहाखानांना आपल्या प्रांताचा, तेथील हवामानाचा, आपल्या नदीचा, आपल्या मामस्थानांचा, आपल्या सर्वच गोष्टींचा निरतिशय अभिमान वाटतो. या अभिमानात दर्प नाही, दुसऱ्याबद्दल अनादर नाही. त्यात फक्त उत्कट आत्मीयता असते. आपल्या फळफुलांची आणि शेतीची कौतुकाने सांगताना अगदी गंभीर भावनेने ते त्यांची माहिती देत होते.

गांधीजी आपल्या सर्व परिवारासह स्वाती नदी ओलांडून ग्रामप्रवेश करीत असता बादशहाखान समोवारच्या पीकपाण्यांचे व वस्तूंचे मनमुराद वर्णन करीत होते. तर गांधीजी त्यांचा हात पकडून आपला तोल सांभाळताना थोडे बेजार झालेले होते. मांडीपर्यंत आपले कपडे

वर करून चालल्या गांधीजींच्या मुद्रेकडे पाहताना बादशहखानांच्या मनात उसळणाऱ्या कौतुकोर्मींचे वर्णन करण्यास मोठ्या प्रतिभेचे कविहृदय पाहिजे आपल्या गरीबखान्याच्या वाटेकडे गांधीजींच्या पडणाऱ्या प्रत्येक पावलाबरोबर बादशाहखानाच्या आनंदाला भरती येत होती स्वागतार्थ जमलेल्या उतमझाईच्या आबालवृद्धांची नजर गांधीजींच्या अर्धनग्न छोट्याशा शरीरावर खिळली होती, पण त्या सर्व वातावरणात अपूर्व अशी शिस्त व शांती नांदत होती गांधीजींना मोजके काय पाहिजे असते हे ओळखून बादशहखान तशी व्यवस्था करीत असत

उतमझाई येथे एक आठवडा गांधीजींनी पूर्ण विश्रांती घेतली जास्तीत जास्त मान व कमीतकमी समाषणे, मुक्तपणे बाहरचा सचार व बादशहखानांसारख्या प्रेमळ यजमानाची अखंड जागरूकता यामुळे गांधीजींना हा आठवडा अनेक महिन्यांच्या स्वास्थ्यासारखा मानवला त्याचा हा आनद त्यांनी वल्लभभाईंना लिहिलेल्या एका पत्रातही डोकावलेला आहे ' तुम्हाही मला इतके स्वास्थ्य कधी देऊ शकलेले नाहीत, खानसाहेब सध्या केवळ माझ्या साठी आहेत ' मधून मधून बादशहखान यांच्याशी अहिंसातत्त्वांची चर्चा एवढाच विषय बोलण्यात असे

बादशहखानांनी गांधीजींच्या सरक्षणाच्या दृष्टीने रानपहाऱ्यासाठी सशस्त्र स्वयसेवक ठेवलेले होते त्यावरून त्या उभयतांच्यामध्ये झालेला सवाद मोठा बोधप्रद ठरला वस्तुत पोलीससरक्षणाचा हा प्रश्न बादशहखानानी गांधीजींच्याजवळ अगोदरच काढलेला होता साधारणपणे पोलीससरक्षण घ्यावे की नाही असा सर्वसाधारण प्रश्न आहे असे समजून गांधीजींनी त्या प्रश्नास मान हलवून समती दिली होती त्या दिवशी त्यांचे मौन होते या प्रश्नाचा सबध आपल्या स्वत च्या व्यवस्थेसाठी असेल असे गांधीजींच्या ध्यानीमनीही नव्हते उलट आपल्या स्वयसेवकांच्या जवळची शस्त्रे केवळ इतरांना भिवविण्यासाठी असल्याने तसा पहारा ठेवण्यास हरकत नाही अशी बादशाहखानांची समजूत होती, पण गांधीजीना हे कळताच त्यानी आपल्या सरक्षणार्थ रात्री ठेवण्यात येणारा पहारा तात्काळ बद करण्यास सांगितले " इतरांच्या सरक्षणासाठी सशस्त्र पोलिसांचा उपयोग होऊ देणे वेगळे व अहिंसावाद्याने स्वत च्या सरक्षणासाठी असा वापर करणे हे वेगळे माझ्या सर्व आयुष्यातील धोरणाशी हे विसगत आहे " असे गांधीजींनी सांगितले या निमित्ताने गांधीजींनी त्याना उपनिषदांतील सर्पाची गोष्ट सांगितली " विषारी दात काढून घेतले तरी हरकत नाही मला फक्त फूत्कार करण्याची शक्ती राहू द्या " अशी मागणी करणाऱ्या सर्पाला महादेवाने सांगि तले की तू फूत्कार करून राहिलास तरी लोक तुला झोडून काढतीलच, प्रत्यक्ष हिंसा करण्यापेक्षा हिंसा करण्याची साधने जवळ आहेत अशी शंका वाटण्यानेही शत्रू तुमच्या नाशाचा प्रयत्न करणारच " या सदर्भात गांधीजींनी बादशाहखानांना सांगितले,

' "अहिंसाप्रधान व्याप्तमार्गे स्वत च्या सरक्षणासाठी शस्त्राचा वापर होऊ देता कामा नये त्याचप्रमाणे अहिंसामार्गाने स्वतंत्र होणाऱ्या भारताच्या सीमेवरील स्वतन्त्र जमातीपासून रक्षण करण्यासाठी पोलीस किंवा लष्कराची जरुरी असता कामा नये " बादशाहखानांचे त्या दृष्टीने प्रयत्न पूर्वीपासून चालले होते गांधीजींच्या अखड सहवासात बादशाहखानांना व त्यांच्या स्वयसेवकांना अहिंसेच्या स्वरूपाचे नित्य नवे नवे पैलू दिसत होते त्या आनंदात हे सारे खुदाचे सेवक बेहोषपणे डुबत राहिले होते

गांधीजींचा हा दौरा एक महिन्याचा आखला गेला होता, या चार आठवड्यात मर्दान, कोहाट, बन्नू, डेराइस्माइलखान या जिल्ह्यांत त्यांनी प्रवास केला नौशेरा येथील कार्यकर्त्यांच्या चर्चेत "अहिंसावादी स्वयंसेवक हा अखड उद्योगी असला पाहिजे आपल्या उद्योगातून त्यांनी शेजाऱ्याला सहाय्य देण्याचा प्रयत्न केला पाहिजे " असे सांगितले कार्यकर्त्यांमध्ये मुरलेल्या अहिंसेची महिती देताना बादशाहखान म्हणाले, " एका ठिकाणचा अधिकारी खुदाईखिदमतगारांची मिरवणूक बद करण्यासाठी गेला होता, त्याच्याजवळ भरलेल्या बदुकी तयार होत्या त्याने खुदाईखिदमतगारांना अडविले, त्यांचा झेंडा काढून घेतला, स्वयसेवकांवर सर्व प्रकारचे आक्रमण होत असताही ते काहीही प्रतिकार करीत नाहीत हे पाहून तो अधिकारीच गोंधळून गेला व त्याने त्यांना सोडून दिले " कार्यकर्त्यांसाठी मरदान येथे चरखाकेन्द्र काढण्याची आपली योजना बादशाहखानांनी गांधीजींना सांगितली, तसेच उतमनझाई हे गाव आदर्श करण्याचा आपला सकल्पही सांगितला या दौऱ्याच्या काळात बादशाहखान रोजे पाळत असत स्वत सर्व दिवस अन्नाला स्पर्श करावयाचा नाही व गांधीजी व इतर पाहुणे यांच्या भोजनासाठी मात्र ते जातीने सर्व व्यवस्था करीत हे पाहून गांधीजींना विषाद वाटला, पण गांधीजींनी स्वत उपवास केले असते तर ते बादशाहखानांना पटले नसतेच कोहाट, बन्नू भागातील दौऱ्याचे वेळी स्वतन्त्र भागातील काही टोळीवाले गांधीजींना येऊन भेटले टोळीवाल्यांच्या होणाऱ्या धाडीपासून सर्वसामान्य लोकांचे व विशेषत अल्पसंख्य हिंदूंचे रक्षण कसे करता येईल ही गांधीजींच्या मनाला लागून राहिलेली एक गोष्ट होती, पण या भागातील कार्यकर्त्यांशी झालेल्या चर्चेनंतर टोळीवाल्यांचे हे डाके केवळ जातीय अगर धर्मान्ध दृष्टीने घातले जात नसत हे गांधीजींना आढळून आले पैगंबरमनिमडळ आल्यानंतर हे डाके वाढल्याचे त्यांना समजले डाके घालण्याचा हेतू मुख्यत त्यांच्या गरजा भागविणे हा असतो व हे डाके हिंदूप्रमाणेच मुसलमानांच्या घरांवरही घातले जातात हेही गांधीजींना दिसून आले गांधीजींचा हा दौरा खुदाईखिदमतगारांच्या दृष्टीने फार महत्त्वाचा व मार्गदर्शक असा ठरला त्याचप्रमाणे स्वत गांधीजींना एक प्रयोगशाळा मिळाली ' वायव्यसरहद्दप्रांत हे माझ्या अहिंसेच्या कसोटीचे

यात्रेचे ठिकाण व्हावयाचे आहे ' असे मान्य गांधीजींनी या दौऱ्यावर केले. बादशहाखानांची ईश्वरनिष्ठा व त्यांची समर्पणभावना गांधीजींनी वेगवेगळ्या बाजूंनी व अगदी जवळून पाहिली. तक्षशिलेहून गांधीजींनी बादशाहखानांचा निरोप घेतला त्या वेळी " आम्हा दोघांचे डोळे ओले झालेले होते," हे गुपित गांधीजींनीच आपल्या लेखात सांगितले म्हणून कळू शकले. इतक्या कठोर तत्त्ववृत्तीने वागणाऱ्या या दोन महात्म्यांच्या डोळ्यांना पाणी आणणार तो प्रसंग कोण शब्दांकित करू शकेल ? ते पाणी का आले असेल ?

महात्माजींच्या या दौऱ्यात अबोटाबाद येथे अल्पसंख्याकांच्या अडचणीच्या दृष्टीने पुष्कळ चर्चा झाली. अल्पसंख्याकांच्या संरक्षणाच्या दृष्टीने सरकारने भरपूर व जरूर त मोफतही शस्त्रे पुरवावीत अशी एक त्यांची मागणी होती. हिंसा-अहिंसेचा प्रश्न बाजूस ठेवला तरी " ही मागणी उपयुक्ततेच्या दृष्टीनेही कठीण, अव्यवहार्य व विशेषशी प्रभावी न होणारी आहे." असे गांधीजींनी सांगितले. सरकार मोफत शस्त्रे पुरवू शकणार नाही. ती खासगी निधी उभारून वाटल्यास खरेदी करावीत असेही ते म्हणाले. त्याहीपेक्षा बन्नूसारख्या जिल्ह्याच्या ठिकाणी जेव्हा शे-दोनशे टोळीवाले चढाई करतात त्या वेळी तेथे हजारो नागरिकांच्या जवळ शस्त्रास्त्रे असतात. पोलीस व लष्कराच्या सशस्त्र तुकड्या असतात. असे असूनही नागरिकांचे संरक्षण होऊ शकत नाही व टोळीवाले लाखो रुपयांची लूट घेऊन आपला एकही मनुष्य मरू न देता परत जातात यावरून काय बोध घ्यावयाचा ? हा प्रश्न गांधीजींनी अल्पसंख्याकांच्या पुढे ठेवला. अल्पसंख्याकांमध्ये शीख व हिंदू अवघे चार-सहा टक्केही नव्हते; पण व्यापार, सरकारी लष्करी कंत्राटे व सरकारी नोकऱ्या यामध्ये ते आघाडीस असत व ते सरकारी कृपेच्या तोऱ्यात वागत. परिणामतः बहुजनसमाजामध्ये त्यांच्याबद्दल अनादरच वाटतो. असे असता त्यांना लोकांचे साहाय्य कसे मिळेल ? पुष्कळसे शीख आणि हिंदू दोघेही धार्मिक दृष्ट्या मुसलमानांचा स्पर्श निषिद्ध मानतात. अन्य धर्मासंबंधी इतकी आंधळेपणाचा विरोधभाव मनात असल्यावर त्यांचे परस्पर संबंध सलोख्याचे कसे राहू शकतील ? अशा ठिकाणी परस्परांच्या हार्दिक सहकार्याच्या बळावरच अल्पसंख्याकांना राहता येईल. सन्मानाने त्यांना वागविणे हे बहुसंख्याकांचे कर्तव्य राहील; पण अल्पसंख्याकांच्या वागण्याच्या धोरणावरही हे अवलंबून राहील. बादशाहखान व खुदाईखिदमतगार हे अल्पसंख्याकांच्या साहाय्यासाठी व संरक्षणासाठी किती दक्ष असतात हेही हिंदी-नेत्यांनी गांधीजींच्या पुढे मांडले. या दौऱ्यात खान मंत्रिमंडळ व खानबंधू यांच्याविरुद्ध त्यांच्या टीकाकारांनीसुद्धा त्यांच्यावर जातीयदृष्टी असल्याचा आरोप केला नाही. गांधीजींना त्याचे फार समाधान वाटले.

# १८

# युद्धकालातील अहिंसायुद्धाच्या आघाडी ( १९३९—४० )

महायुद्धाचा गडगडाट व त्यानंतर मन्त्रिमंडळाचे राजीनामे हा भारतातील इतिहास हा केवळ मन्त्रिमंडळांच्या शासनाचा इतिहास नाही. त्या दृष्टीने त्या लढ्याचा अभ्यास व विचार विशेषसा झालेला नाही. या मंत्रिमंडळाचा कारभार म्हणताच, खेर-नरिमन प्रकरण, डॉ. खरे यांच्या करस्थानांचा प्रकार, पंतमन्त्रिमंडळ व मुस्लिम लीगची फसलेली तडजोड याच घटनांचे चर्वित-चर्वण घटनापडितांच्या विवेचनातही दिसून येते. त्या घटनांना काही महत्व जरूर आहे; पण लोकसोहळ्यातील विहिरींच्या मानापमानाच्या मांडणापेक्षा फारसे महत्त्व त्यांना देण्याचे कारण नाही. विहिरींच्या मांडणांनाही काही रिवाज-रूढींचा आधार असतोच. काँग्रेसचा सत्ता-स्वीकार हा स्वातंत्र्याच्या लढ्याचा एक भाग होता आणि मंत्रिमंडळाचे राजीनामे हा त्या लढ्यातील एक मोठ्याचा भाग होता; उकर्कच्या पराभवाने जितकी वाताहत ब्रिटनची झाली तशीच नैतिक दुर्दशा वैयक्तिक सत्याग्रहाच्यामुळे ब्रिटिशांची झाली होती ही नोंद इतिहासाला केव्हा तरी करावीच लागेल. मानवी प्रगती घडविणाऱ्या नैतिक लढ्यांचा इतिहास केव्हातरी लिहिला जातोच। तोपर्यंत या अहिंसायुद्धाचे मूल्यमापन करण्याचे धाडस कदाचित कोणी करणार नाही; महायुद्धाचे रणकुंड पेटलेले असता स्वतःचा राजकीय पक्ष निष्क्रिय

[ वायव्यसीमा प्रांताची ( १९४७ ) लोकसंख्या २४·७ लक्ष असून त्यात २२·५ मुसलमान, १.५ लक्ष हिंदू, ४८ हजार शीख, १६ हजार ख्रिस्ती, ६२ पारशी ११ ज्यू व २ बुद्ध अशी अल्पसंख्याकांची वस्ती होती. सावकारी कंत्राटे व व्यापार हे व्यवसाय मुख्यतः शीख व हिंदू यांच्याच ताब्यात होते.]

होऊ न देता प्रतिकार चालू ठेवणे, तो प्रतिकार राज्यकर्त्यांचा विवेक जागृत करू शकेल अशा पद्धतीने आखणे आणि लक्षावधी अनुयायांचा क्षोभ विधायक कार्माकडे वळविणे ही इतिहासातील केवळ अजब नव्हे तर महनीय अशी घटना व यश होते युद्धकाळात त्रिकोळ दगेधोपे घडविणे, रेल्वेतार यांच्या मोडतोडी करणे किंवा राज्यातील फितुरीचे प्रकार घडविणे अशक्य होते असे नव्हे, तसे न केल्याबद्दल काँग्रेस व गांधीजींची अहिंसा यांच्या नावाने बोटे मोडीत राहिलेल्या लोकांना उत्तरे देण्याचे येथे प्रयोजन नाही ज्यांचा त्या मार्गावर विश्वास होता त्यांचे ते काम होते काँग्रेसने मनिमडळे सोडली तर कोणतीच लढाई न मारता त्या जागांवर डोळा ठेवून असणाऱ्यांची गर्दी राजमानावर नेहमीच जमत असे हिंदुमहासभा, मुस्लिमलीग, संस्थानिक, हरिजन या साऱ्यांचे तडे आपल्या लायकी किंवा लाचार सहकार्याच्या ठगाची मॅडोळी हाती घेऊन तयार राहात असत त्यांच्या या सहकार्याचा डांगोरा जगभर करणे हाच राज्यकर्त्यांचा हेतू असे मुख्यत अमेरिकेसारख्या सामर्थ्यशाली मित्रांच्या डोळ्यांत धूळ टाकणे हा चर्चिल यांच्या धोरणाचा महत्त्वाचा भाग होता, पण काँग्रेसच्या न्याय्य व लोकशाहीनिष्ठ धोरणावर आघात करणाऱ्या ब्रिटिशांचे ढोंगी स्वरूप उघडे करण्यासाठी शांततेचा प्रतिकार चालू ठेवणे हे त्या काळी महत्त्वाचे होते व तेच गांधीजींनी बरोबर साधले नि शस्त्रांच्या युद्धाचा एक नमुना ठरण्याच्या लायकीचा तो लढा आहे भारतातील अंतर्गत भेदाप्रमाणेच ब्रिटिशांच्या अदूरदर्शी व भ्रष्ट लोकशाही वृत्तीमुळे त्या युद्धात काँग्रेस-नेतृत्व यशस्वी होऊ शकले नाही, ते व्यवहारत यशस्वी झाले नसले तरी विघातक झाले नाही, उलट आपल्या कुटिल धोरणामुळे त्या वेळी विजयी झालेली ब्रिटिश सत्ता आज पराभवाच्या दरीकडे लोटली जात आहे व त्यांच्या प्रेरणेने किंवा प्रोत्साहनाने स्वतः सुभा उभारणारे पाकिस्तानी नेते भारताच्या व त्याबरोबर स्वतःच्या नाशाचे खदक खोदण्यासाठी राबत गेले हिंसा-अहिंसायुद्धाच्या परिणामांचे मापन करताना एक-दोन युद्धांचा व पिढ्यांचा काळ जमेला धरून चालणार नाही केवळ मानवजातीच्या नव्हे तर स्वतःच्या भावी पिढ्यांच्या भांगल्याचा विचार ज्यांना करावयाचा आहे त्यांना या विवेकी मार्गाचा शेवटी विचार व आश्रय करावा लागणार आहे अणुयुगाच्या उंबरठ्यावर आल्यावर तर हा विवेक अधिक जागृत झाला पाहिजे

या वैचारिक पार्श्वभूमीची आदिशक्ती आहे जनता, जनतेत खरी वैचारिक जागृती होईल तर खरी शक्ती निर्माण होते ती जागृती केवळ भावनात्मक असली तर ठिसूळ ठरते, टिकाऊ होऊ शकत नाही ही भावनात्मक जागृती स्थिर करण्यासाठी गांधीजींनी विधायक कार्याचे तत्र सांगितलेले होते हे विधायक कार्य म्हणजे काही मततत्र नव्हे ती सद्गुणांची म्हणजे लोकशाहीची आराधना आहे ते तत्र भारताने आत्मसात न केल्याने त्याला आजचा

पणमत पाळावा लागत आहे आणि त्या तत्त्वाची निष्ठेने उपासना केलेल्या बादशहाखानांच्या नशिबी आजही सर्व प्रकारच्या यातना व छळ उभे असले तरी पठाण आजही अधिक पुरुषार्थी जीवन जगत आहेत. तो इतिहास जगापुढे न आला तरी आत्मस्वातंत्र्यासाठी अखंड झगडत राहणारे लोक व सत्तास्पर्धेच्या शुष्कर्मात गुरफटलेले लोक यांमध्ये तुलना कशाची करावयाची ?

सुगंधाची एखादी लाट येऊन जावी किंवा गाण्यानंतर आलापाची लकेर कानात गुणगुणत रहावी त्याप्रमाणे गांधीजींच्या पहिल्या भेटीने पठाणांना मोहित केले होते बादशहाखान कार्यकर्त्यांच्या शिक्षणकेंद्राच्या तयारीत गुंतले होते. कारण केवळ सत्ता हाती येऊन पुरी पडत नाही, लोकांना सत्तेला पात्र केले पाहिजे, या सिद्धांतावर त्यांचा विश्वास असल्याने लोकशिक्षण व समाजसुधारणा यांवर त्यांचा सारा भर होता त्यांचे शरीर गांधीजींच्यामुळे, काँग्रेसच्या नेत्यांच्या ओढीने उभे दिसे, पण त्यांचे चित्त नेहमी पठाणांच्या सघटनेच्या विचारात व्यग्र असे

सीमाप्रदेशाखालील स्वतंत्र पठाणांच्या मैत्रीचा प्रश्न गांधीजींनी बादशहाखानांशी चर्चिलेला होता त्या दृष्टीने त्यांनी स्वतंत्र मुलखातील नेत्यांच्या गाठीभेटी घेण्याची इच्छा मांडली तेव्हा सरकारला काळजी वाटली आपल्यातर्फेवर सरकारने त्यांच्या विश्वासाचा कोणीही मनुष्य ठेवण्यासही सुचविले, पण तरी त्याचा उपयोग झाला नाही मध्यवर्ती विधिमंडळातील काँग्रेसपक्षाचे त्या वेळेचे नेते भुलाभाई देसाई यांना तिकडे पाठवावे म्हणून प्रयत्न झाला, त्यांनाही जाऊ दिले नाही यामुळे स्वतंत्र पठाणांना ब्रिटिश राज्यकर्तेच भारताचे मित्र बनू देत नाहीत हे स्पष्ट झाले तसे झाले तर पठाणांची भीती भारतातील हिंदूंना दाखवून हिंदु-मुसलमान हे झगडे वाढवता येणार नाहीत हे ब्रिटिश राज्यकर्त्यांना माहीत होते व म्हणूनच ते आपल्या हातचा हा पत्ता उघडा होऊ देत नसत, पण बादशहाखानांनी त्यांना दिलेल्या शिक्षणाचा प्रभाव पठाणांच्यावर पडत चालला होता

मंत्रिमंडळाच्या राजीनाम्यापाठोपाठ देशात सर्वत्र सत्याग्रह आरंभला जावा या विचाराचा एक वर्ग काँग्रेसमध्ये होता विशेषत सुभाषबाबू त्या दृष्टीने दडपण आणण्याचा प्रयत्न करीत होते समाजवादी विचाराचा काँग्रेसमधील तरुणवर्ग याच मताचा होता पण केवळ प्रक्षुब्ध मन स्थितीत सत्याग्रह केला तर त्यातून दंगे, मारामाऱ्या होतील हे गांधीजींना ठाऊक होते म्हणून ते काँग्रेस कार्यकर्त्यांना विधायक कार्यांत गुंतवीत होते

बादशहाखानांइतके या लोकसंपर्काच्या व संघटनेच्या कामाकडे कोणी विशेषसे लक्ष पुरवले नव्हते स्त्रियांच्या भावना शुद्ध व विवेक नियंत्रित करणे व जनतेलाही ते शिक्षण देणे या कामाचे महत्त्व बहुतेक काँग्रेसनेत्यांनी विशेष लक्षात घेतले नव्हते जनतेत जाऊन

राहणाऱ्या कार्यकर्त्यांसाठी योजनापूर्ण शिक्षण देणारे एक केंद्र त्यांनी उघडले. त्याआधीच जुलै १९३९ मध्ये गांधीजींनी पुन्हा सीमाप्रांताला भेट दिली; पण या खेपेस गांधीजींचे आरोग्य नीट न राहिल्यामुळे ते अबोटाबादपर्यंतच पोहोचले. खुदाईखिदमतगारांच्या सरदरयाव ( सर-दरयाब ? ) केंद्रात जाऊन राहू शकले नाहीत किंवा अन्य कोठे ते फिरलेही नाहीत. त्यांचा हा मुक्काम अबोटाबाद येथेच सुमारे दोन आठवडे झाला. तेथेच कार्यकर्त्यांशी चर्चा व भेटीगाठी हा कार्यक्रम ठेवला होता. जाहीर कार्यक्रम बादशहाखानांनी काहीच ठेवले नव्हते. युद्धाचे ढगच नव्हे तर शखनाद ऐकू येऊ लागले होते. गांधीजींनी हिटलरना लिहिलेले सुप्रसिद्ध पत्र आबोटाबादहून व याच मुक्कामातून दि. २३ जुलैला पाठवले होते. गांधीजींना तेथून विदा करून दिल्यानतर बादशहाखान यांनी आपले सर्व लक्ष सर-दरयाब येथील केंद्रावर लावले. हे केंद्र हेही त्यांचे एक स्वप्न होते ते व ते त्यांच्या सिद्धान्तानुसार पार पडले होते. सरदरयाब हे ठिकाणही या आश्रम स्वरूपाच्या शिक्षा-केंद्राला अनुरूप असे रम्य व गडबडगोंगाट नसलेले असे आहे. शेकडो कार्यकर्त्यांना एकत्र राहता येईल व समाजसेवेचे शिक्षण घेता येईल अशी तेथे व्यवस्था केली होती. बांबूतट्टयाचे मांडव व काही तंबू राहुट्या यांमध्ये शेकडो कार्यकर्त्यांची राहण्याची व्यवस्था केली होती. बादशहाखानांच्या संस्कारामुळेच त्यांचे कार्यकर्ते स्वावलंबी व गरीबीत राहत. मंत्रिमंडळे आली व गेली; पण त्यांचा वारा त्यांना फारसा लागला व बाधला नव्हता. लोकांकडून पैसा उभारून कार्य करण्याची पद्धती बादशहाखानांनी कधी स्वीकारली नाही. कार्यकर्त्यांची प्रेरणा व श्रद्धा हाच त्यांचा खरा द्रव्यनिधी व त्या बळावर शेकडो कार्यकर्त्यांची दीर्घ मुदतीची शिबिरे त्यांनी चालविली; पण कधी खाण्यापिण्याच्या तक्रारी नाहीत किंवा झाडू-सफाईची अडचण नाही. सारी कामे ज्याची त्याने करावयाची, वाटखर्च, पोटखर्च, ज्याचा त्याने करावयाचा. अशा श्रद्धेची माणसे तयार होतात तेव्हाच ते क्रांतीचे शिपाई ठरतात. तेच जनतेत एकजीव होऊन तिला जागृत करू शकतात, वेड लावू शकतात; आणि इतक्या गरिबीने कामे करण्याबद्दल जवाहरलालजी व बादशहाखान यांचे मतभेदहि झाले होते. खुदाईखिदमतदारांची आर्थिक ओढाताण फार असल्याचे डॉ. खानसाहेबांच्याकडून पंडितजींनी जेलमध्ये असताना ऐकिले व लागलीच काही मदत पाठवणेही सुरू केले; पण १९३४ मध्ये बादशहाखान जेव्हा तुरुंगातून बाहेर आले तेव्हा त्यांना हे कळताच त्यांनी ती मदत बंद केली. बाहेरच्या आर्थिक साहाय्याने कार्यकर्त्यांच्यामध्ये परावलंबन व परधार्जिणेपणा वाढतो; इतकेच नव्हे तर कित्येक वेळा कार्यकर्त्यांमध्येही भांडणे सुरू होतात. पैसा आधी आपल्याकडे ओढण्याची काहींना सवय लागते. त्याऐवजी सारेच आपल्या घरच्यासारखे एकत्र खाऊ-राहू लागले तर ते अधिक बरे. या धोरणाप्रमाणे खुदाईखिदमतगारसंघटना उत्तम

रीतीने वाढविली. एवढेच नव्हे तर आता निची सदस्यसंख्या १ लाखाजवळ गेली होती. तरीही त्यांनी बाहेरून त्यासाठी निधी केव्हाही आणला नाही. १९४२ च्या लढ्याचे वेळी मात्र त्यांनी 'बैतूल-माल' हा निधी तुरुंगात गेलेल्या गरीब कार्यकर्त्यांच्या कुटुंबीयांच्या साहाय्यासाठी उभारला होता; पण तोही आमजनतेकडे मागणी करून त्यांनी उभारला. त्यामुळे कार्यकर्त्यांना द्रव्यलोभ कधी वाटला नाही त्यांची राहणीही कधी बदलली नाही. दरिद्रीनारायणाच्या सेवकाला शोभावा असाच स्वतःचा सारा पोशाख व आहार बादशाहखानही ठेवीत असत. या त्यांच्या त्यागी व सेवामय जीवनामुळेच त्यांचे नेतृत्व खंबीर राहिलेले आहे व त्यांच्याबद्दलचे प्रेम स्थिर व वाढते आहे. सरदरयाब केंद्राबरोबरच त्यांनी आपल्या 'पख्तून' पाक्षिकाचे साप्ताहिक केले व प्रचारसाधनात भर घातली. या साप्ताहिकासभोवार तरुण कवी, लेखक, जमा झाले. त्यांच्या साहित्याचा पठाण जागृतीला फार मोठा उपयोग झाला आहे. 'पख्तून' च्या लेखकांमधून अनेक मोठेमोठे साहित्यिक पुढे आले. त्यांचे पोवाडे, प्रहसने ऐकण्यास व पाहण्यास हजारो पठाण स्त्री पुरुष जमत असत. समाजसुधारणेचा बराच प्रचार या कवींच्या गझल, कवालींच्याद्वारे झाला आहे; पण हे सारे नवशिके कार्यकर्ते एकत्र येऊन राहू शकावेत; त्यांना तेथे जरूर ती सावली मिळावी व मार्गदर्शक शिक्षक व ग्रंथ लाभावेत ही योजना सरदरयाब केंद्राने पुरी केली.

या केन्द्रासंबंधीचे त्यांचे विचार त्यांच्या या केन्द्राच्या उद्घाटनाच्या वेळेच्या भाषणात व्यक्त झालेले आहेत. ते म्हणतात : "आज माझी कित्येक वर्षांची इच्छा पुरी झाली आहे. आमच्या विरोधकांच्या विरोधी प्रचारामुळे या कामात खूप अडचणी उत्पन्न झाल्या होत्या. पण आज आपण सफल झालो आहोत. प्रत्येक चळवळीच्या कार्यकर्त्यांना एकत्र राहून काम करण्यासाठी एका केंद्राची विशेष जरूरी असते. अशा रीतीने जे कार्यकर्ते एकत्र येऊन काम करू शकत नाहीत, ते नीट यशस्वीही होऊ शकत नाहीत. आमच्या विरोधकांमध्ये पर प्रांतातील जुनाट वृत्तीचे वृत्तपत्रकर्ते आतापर्यंत होते, त्यांच्या मदतीला आता काही मुस्लिम पंडितही येऊन मिळाले आहेत. 'येथे गांधीजींच्यासाठी एक आश्रम तयार केलेला आहे किंवा धर्म शिक्षणाची व्यवस्था केली जात आहे;' असाही प्रचार केला. आमच्याविरुद्ध घृणास्पद असा प्रचार झाला, पण त्याचा पठाणांच्यावर काही परिणाम होऊ शकला नाही सरकारची व सनातनी वृत्तीच्या विरोधकांची मला किंचितही फिकीर वाटत नाही. कारण त्यांचा विरोध सत्यावर आधारलेला नाही, तो पैशाच्या बळावर उभारलेला आहे. तो टिकणार नाही...खुदाईखिदमतगारांना मी इशारा देतो, त्यांनी आपले मित्र व शत्रू यांना नीट ओळखावे, ("अपने मित्रों और शत्रूओंमें चारबाइ और कसाईयों की तरह के अंतर को जानें व समझें",) बुद्धी व विवेकाने काम करावे; सत्य समजून घ्यावे आणि जे आपल्याला

समजले ते दुसऱ्यांना समजून सांगावे; आमच्यावर निंदा टीका केली जाते. तिचे स्वरूप साऱ्या जनतेलाही कळावे. माझा हा विचार आपल्या साऱ्या जमातीला पोचवा.

" लवकरच आपल्या नव्या आंदोलनांचा प्रारंभ या केंद्रापासून होईल. खुदाच्या कृपेने हा प्रारंभ येत्या ऑगस्टमधेच होईल. आमचे कार्यकर्ते या केंद्रातूनच आपल्या कार्यक्षेत्राकडे जातील व आपल्या पवित्र उद्देशानुसार कामाला लागतील...मला जे कार्यकर्ते योग्य वाटतील त्यांना दि० २ ऑगस्ट रोजी बोलाविले जाईल; व त्यातील जे कार्यकर्ते धैर्य व स्नेहभावाने अहिंसापुद्धतीची जबाबदारी पार पाडू शकतील असा मला विश्वास वाटेल त्यांच्या तुकड्या निरनिराळ्या विभागात पाठवल्या जातील...

" महायुद्धामुळे परिस्थिती बदलली असता या वेळी केंद्रासाठी ही जागा घ्यावयाला नको होती, असे कित्येकांना वाटते; पण माझा विश्वास आहे, आम्ही या केंद्रातच जमले पाहिजे. इतकेच नव्हे तर माझी कबरही येथेच झाली पाहिजे असेही मी सांगतो. "

सरदरयाबमधील या भाषणाने नवे वातावरण निर्माण झाले व कार्यकर्ते उत्साहाने कामाला लागले. सर्वत्र तुफानी दौरे काढले गेले व गावोगाव ऐक्याचा व त्यागाचा संदेश पोहोचवला गेला; बादशहाखानांचा हा प्रचार किती प्रभावी होईल हे सरकारला ठाऊक होते. पण या वेळी त्यांनी दडपशाही करण्याचा मार्ग सोडून प्रथम नवा मार्ग वापरून पाहिला. भाडोत्री मौलवी हाताशी धरून त्यांच्याकरवी " बादशहाखानांनी एक हिंदू आश्रम उभारला आहे व तेथे मुसलमानांना गीता शिकवली जाते, हिंदूंची प्रार्थना शिकविली जाते व हिंदूधर्माचा प्रचार केला जातो " असा प्रचार आरंभला. युद्धकाळातील सरकारी तडाखा हा असा मवाळ होता. या प्रचाराचा थोडाबहुत प्रभाव पडून चांगले चांगले लोकही बादशहाखानांच्या कामासंबंधी साशंक बनले. पण बादशहाखान मात्र तिकडे लक्ष न देता आपल्या कार्यात मग्न राहिले. त्यांचा सत्यावर व आपल्या कामावर भरवसा होता. या केंद्रात वरिष्ठ स्वयंसेवकांच्या शिक्षणाची व्यवस्था केली होती, तर जिल्ह्यात ठिकठिकाणी इतर शिक्षाकेंद्रे उघडली गेली होती. हे सर्व शिस्तबद्ध काम पाहून सरकारी विरोधक दबून गेले होते. युद्धविषयक परिस्थिती रोज बदलत होती. पुढे जपान युद्धात पडले तेव्हा बादशहाखान म्हणाले, " आता जपान युद्धात उतरल्याने युद्ध आमच्या डोक्यावर आले आहे; पण आपल्या येथे जपान येऊ शकणार नाही की जर्मनी येणार नाही. आम्हांला गुलाम करण्यासाठी इकडे कोणी वळेल तर त्याच्याशी मुकाबला करण्यासाठी मी पुढे खडा आहे...आपल्या भागात स्वयंसेवक-शिबिरे उभारलेली आहेत. ते सर्वत्र शांतता राखतील. आमचे सर्व काम उघडपणे चालले आहे. गुप्तपणे कामे करू लागल्यास त्यातून भीरुता निर्माण होते. " आत्मविश्वास व स्वाधीनतेचे वारे युद्धकालातही व तेही सीमाप्रांतात सुटले होते. ही शक्ती अहिंसेने काम

करण्याच्या पद्धतीची होती. भारतात कित्येक ठिकाणी जाहीर व्याख्याने देण्यामही काही पुढारी भीत असत तर बादशाहखानांचे खुदाईखिदमतगार स्वातंत्र्याची व शांततारक्षणाची जबाबदारी स्वत: घेतली असल्याचे जाहीर करीत होते नागरिक हक्कसंरक्षणाच्या सभा बैठकीत घेण्यासाठी कोठे कोठे वक्ते मिळत नव्हते मग थोते कोठून मिळणार? अशा भीतिमस्त काळात सत्याग्रही तयार करण्याचा कारखाना उभारण्याच्या उद्योगात गांधीजी होते, तोच सीमा प्रांताने सत्याग्रहाचे प्रत्यक्ष पाऊलही टाकले होते बादशहाखान सरहद्दप्रांत छावणीतील योजना आखीत होते त्याच वेळी बन्नू विभागातील काही कार्यकर्त्यांनी प्रत्यक्ष कायदे मोडण्याचा उतावीळपणा केला, पण वर उल्लेखिल्याप्रमाणे या वेळी सरकारने गोळीबाराऐवजी मौलवींच्या रेवक गोळ्या दिल्या मुल्ला-मोलवींना माऱ्याने घेऊन बादशाहखानांविरुद्ध प्रचाराची आघाडी उघडली या सर्व परिस्थितीला नव्या निर्धाराने तोंड देऊन कार्यकर्ते जनतेत पोचले होते.

हा युद्धकाल हा कॉंग्रेसनेत्यांच्या निष्ठेच्या कसोटीचा ठरला त्याचप्रमाणे हातची सत्ता न सोडण्याचा साम्राज्यवादी ब्रिटिशांचा किती निर्धार होता हेही उघड झाले, हिटलर-मुसोलिनींच्या हुकुमशाही रणगाड्यांच्या खाली यूरोपची लोकशाही चिरडून, चेंगरून ठार केली जात होती व पुरोगामी विचाराचे सारे जग चिंताक्रांत झाले होते या सकटकाळात कॉंग्रेस-नेत्यांनी लोकशाहीच्या रक्षणार्थ आपण तयार असल्याचे आगमापासून स्पष्ट केले होते पण तुमचे युद्ध जर खरोखर लोकशाहीसाठी आहे तर ती लोकशाही स्वत च्या गोठ्यास-भारतास-राणू असल्याचे मान्य करा ही मागणी कॉंग्रेसची होती शब्दांचा सारा गोंधळ घातला पण काही कृती करण्यास ब्रिटिश तयार नव्हते सापाच्या तोंडात सापडलेला बेडूकही मिळतील तेवढ्या माशा गिळण्याच्या उद्योगात मरेपर्यंत रहातो, तशी बुद्धिशून्य व पोगयी दृष्टी ब्रिटिश-नेत्यांची होती, त्यांना शहाणपण व सुसगत विचार शिकविण्यासाठी कॉंग्रेसनेत्यांनी शब्दश भगीरथ प्रयत्न केला, पण कॉंग्रेसच्या प्राजळ व कल्याणकारी सूचनांचा स्वीकार करून भारताच्या लोकशाही स्वातंत्र्याला मान्यता देण्याऐवजी येथील हिंदु मुसलमान, हरिजन संस्थानिक यांच्या परस्पर अविश्वासाची अडचण पुढे करून वेळकाढू धोरण त्यांनी चालू ठेवले, आणि दुर्दैवाची गोष्ट ही की, अहंकाराला बळी पडलेल्या जीनासाहेबासारख्या नेत्याला स्वत:च्या राजकारणी डाव साधण्याची हीच योग्य संधी आहे असे वाटले बॅ जीना हे मूलत घनगामक कार्यक्रमाचे व्यासगी व पुरस्कर्ते, गांधीयुगातील सर्व राजकारण म्हणजे बैरागी-गोसाव्याचे वेडे चाळे होत असे त्यांना प्रांजळपणे वाटे, खिलाफतीच्या चळवळीत त्यांच्या नेतृत्वाचा पतग तुटल्याने ते राजकारणातून पराङ्मुख झाले, नतर त्यांनी इग्लडातच कायमचे राहण्याचे ठरवून तेथे घरही विकत घेतले होते, पण भारताचे घरकूल मोडण्या-तोडण्याचे

वेळी ते काँग्रेसचे अध्यक्ष होते इतरही भिन्न भिन्न विचार काँग्रेसकार्यकारिणीत होते आणि राजगोपालाचारींशी वेगवेगळ्या वेळी ज्या वाटाघाटी झाल्या त्यांमध्ये गांधीजींच्या नैतिक पाठिंब्यापासून तो राजाजींच्या सक्रिय सहकार्याच्या पुणे-ठरावापर्यंत वैचारिक भेदाभेद व्यक्त झाले होते त्यांमध्ये बादशहाखानांची भूमिका अगदी अटळ अशी होती ते युद्धाशी कसलेच सहकार्य करण्यास तयार नव्हते काँग्रेसने पुणे ठराव पास करताच काँग्रेसच्या नेतृत्वाचे कधीच विशेषत्व न मानवलेले पांघरूण त्यांनी दूर केले व राजीनामा दिला आपल्या राजीनाम्यात ते म्हणतात,

"पुणे-ठरावाचे (अ भा काँग्रेस समितीचा जुलै १९४० चा ठराव) विवरण करणारी निवेदने मौ आझाद व राजाजी यांनी केलेली आहेत त्या निवेदनावरून काँग्रेसने आपला अहिंसेचा स्वच्छ (clear) मार्ग सोडून हिंसेच्या मार्गाचा स्वीकार करण्याची तयारी केली आहे ब्रिटिशांनी काँग्रेसच्या अटी मान्य केल्या तर काँग्रेस युद्धात सहकार्य करण्यास तयार आहे काँग्रेसने पसंत केलेला हा मार्ग खुदाईखिदमतगारांचा मार्ग नाही खरोखर म्हणजे आमच्या श्रद्धेला व तत्त्वांना सर्वस्वी प्रतिकूल असा तो मार्ग आहे आमचा मार्ग शांततेचा व प्रेमाचा आहे, युद्धाचा व द्वेषाचा नाही. जगातील कोणाही लोकांशी आमची शत्रुता अगर लढा नाही आम्ही खुदाईखिदमतगार आहोत व सृष्टीची-जीवमात्राची-(मखलूख) सेवा करणे हे आमचे काम आहे दुसऱ्यांना ठार मारणे हे आमचे काम नाही, उलट स्वतःचे बलिदान इतरांसाठी देण्याचा आमचा धर्म आहे या कारणामुळे मी काँग्रेस कार्यकारिणीचा राजीनामा दिला आहे या मार्गाने (पुणे ठराव) देशाचे हित होणार नाही हे मला दिसते आणि माझा विश्वास आहे की पठाणांचे कल्याण अहिंसेशिवाय होणार नाही अहिंसेमुळेच पठाणांचे धैर्य व साहस वाढले आहे या चळवळीच्यापूर्वी त्यांच्यामध्ये जो भित्रेपणा होता त्या जागी धैर्य उत्पन्न झाले हे आपण पहातो आहोत या तत्त्वांना चिकटून राहण्यानेच पठाणांचे उद्ध्वस्त झालेले जीवन नीट मार्गावर येईल म्हणून माझ्या सर्व खुदाईखिदमतगार बांधवांना विनंती आहे की त्यांनी प्रांजळपणाने याचा विचार करावा त्यांना हे पटले नाही तर या मार्गाचा त्यांनी येथेच त्याग करावा व सच्च्या खुदाईखिदमतगारांना देशाची व जातीची सेवा करण्याची सवड करून द्यावी" इतक्या स्पष्ट निर्धार वृत्तीनेच पुणे-ठरावाविरुद्ध आवाज उठविणारा अन्य कोणी नेता नव्हता

बादशहाखानांच्या या निवेदनानंतर सीमा प्रांताच्या काँग्रेस कार्यकर्त्यांमध्ये चळवळ उडाली तेथेही थोडे मत-भेद होतेच, पण खु खि कार्यकारिणी व प्रदेश काँग्रेससमिती यांच्या बैठका होऊन त्यांमध्ये बादशहाखानांच्या धोरणाचा पुरस्कार करणारे ठराव बहुमताने पास केले ब्रिटिश सरकारने खुदाईखिदमतगारांनी आपले राजीनामे काँग्रेसकडे पाठवण्यास सुरवात

केली, मॉडरेट काँग्रेस समितीनेच युद्धसहकार्याविरुद्ध ठराव पास केला असल्याने व्यक्तिशः कोणी राजीनामे पाठवण्याची जरूरी नाही असा खुलासा केला गेला, पुणे-ठरावानंतर साऱ्या देशात फक्त एकच प्रदेश काँग्रेस समिती असा ठराव करणारी निघाली बादशाहखानांचे नेतृत्व अशा प्रभावी रीतीने पुन्हा देशाच्या पुढे आले त्यामुळे गांधीजींना स्वाभाविकच धन्यता वाटली कारण बादशाहखान कोणत्याही परिस्थितीत अहिंसेचे तत्त्व सोडण्यास तयार नव्हते युद्धकार्यास आशीर्वाद देण्यास तयार नव्हते भारताचे स्वातंत्र्य मान्य केले गेल्यास स्वतंत्र भारताने युद्धसहकार्याविषयीचा वाटेल तो निर्णय घ्यावा अशी वाट पाहण्यास गांधीजी तयार झाले होते, पण बादशाहखान तेवढीही ढिलाई करण्यास तयार नव्हते, असे असता मौ आझादांनी "आमच्याप्रमाणे गफारखानही आम्ही शस्त्रबळाने देशरक्षण करण्याच्या विचाराचे होते" असे विधान केले आहे (इंडिया विन्स फ्रीडम पान ३४,) ते वाचून वाचकांचा गोंधळ झाल्यावाचून राहणार नाही परंतु त्यांच्या या विधानाची उकल करणे शक्य आहे काँग्रेसने घेतलेल्या अहिंसाव्रताची मर्यादा बादशाहखानांना ठाऊक होती तसेच युद्धकाळाची संधी घेऊन देशाला सशस्त्र बनवावे या विचाराचे नेते काँग्रेसमध्येही होतेच सुभाषबाबूंचे धोरण स्पष्ट होते अशा नेत्यांना व त्यांच्याबरोबर काँग्रेसला अहिंसेच्या धाग्याने बांधून ठेवण्यात अर्थ नाही, त्यांना ती मुभा देऊन काँग्रेसचा रस्ता मोकळा करून द्यावा असा बादशाह खानांच्या म्हणण्याचा अर्थ लावला पाहिजे रजत बादशाहखानांचे वर दिलेले जाहीर भाषण अगदी स्पष्ट आहे अर्थात हे धोरण त्यांनी आपल्या संघटनेपुरते मर्यादित केलेले आहे, पण त्यामध्ये त्यांची स्वत ची श्रद्धाही स्पष्ट झालेली आहे त्यामुळेच गांधीजींनाही धन्यता वाटली "त्या वेळी काँग्रेसकार्यकारिणीच्या बऱ्याचशा सदस्यांच्या श्रद्धा डळमळीत झाल्या, परंतु एकटे बादशाहखान मात्र पर्वतासारखे आपल्या सिद्धांतावर खडे होते त्यांनी दिलेल्या त्यागपत्रामुळे पुष्कळांचे डोळे उघडतील" असे विचार गांधीजींनी 'हरिजन'मधील लेखात काढले आहेत

बादशाहखानांनी स्वत ला व खुदाईखिदमतगारांना काँग्रेससंघटनेतून अलग करून घेतल्यामुळे त्यांचे काँग्रेसवरील प्रेम तितकेच बरवरचे होते अशी तक्रार करणारेही लोक पुढे आले जात्यंधता व धर्मांधता ही एक अपूर्वी गोष्ट आहे हे काहींच्या बाबतीत अनुभवास येते बादशाहखान काँग्रेसमध्ये एकरूप होण्यास तयार नव्हते कारण खिलाफत चळवळीच्या वेळी काही मुस्लिम नेते काँग्रेसमध्ये कसे व का आले व नंतर ते कसे विरोधक बनले वगैरे देखावे त्यांनी पाहिलेले होते आपला राजकीय प्रश्न मुख्यत सामाजिक क्रांतीतून सुटेल हाही त्यांचा विश्वास होता त्यामुळे ते काम खुदाईखिदमतगारांच्या द्वारे करीत राहणे, सत्याच्या व प्रेमाच्या मार्गाने लोकजागृतीचे हे कार्य घडवून आणणे यावर त्यांचा पुरा विश्वास होता, त्यामुळे ते आपल्या

मार्गानेच स्वतंत्रपणे आरू इच्छीत होते परंतु १९३०–३२ च्या लढ्यातील अत्याचारांचे वेळी खुदाई खिदमतगारांना मुस्लिम नेत्यांनी वेळेतच साहाय्य न केल्याने त्यांना काँग्रेसकडे जावे लागले हे त्यांनी मुस्लिमनेत्यांना वारंवार बजावले आहे यामागील त्यांचा हेतू एवढाच होता की, इतर मुस्लिमसंघटनांना खुदाईखिदमतगारांविरुद्ध प्रचार करण्यास संधी राहू नये असे असले तरी ज्या लोकांनी संकटकाळी मदत केली त्यांना—काँग्रेसला–प्रसंगी सोडता कामा नये अशी उत्कट कृतज्ञताही पठाणांमध्ये आहे त्यामुळे काँग्रेसमैत्री उपद्रवाची झाली तरी ती सोडण्यास ते केव्हाही तयार झाले नाहीत. तशा विचारांच्या खुदाई खिदमतगारांना त्यांनी आपल्या संस्थेतून अलग होऊ दिले, पण काँग्रेसच्या युद्ध-सहकार्याच्या ठरावामुळे त्यांनाही अलग होण्याची संधी मिळाली व त्याबद्दल त्यांनी ईश्वराचे आभारच मानले असतील युद्धकाळात राज्यकर्ते वागले ते पाशवी अत्याचार करतील, त्यासाठीच केवळ समाजसुधारणेचे कार्यक्रम हाती घेण्याची ही त्यांची कल्पना असेल, बन्नूच्या कार्यकर्त्यांनी उतावळेपणे कायदे मोडण्यास प्रारंभ केला तेव्हा तसल्या कायदे भंगाला बादशाहखानांनी तत्काळ पायबंद घातला पेशावरमध्ये प्रवेशबंदी करणारे हुकूमही कार्यकर्त्यांवर लागू केले होते ते न मोडण्याच्या आज्ञा बादशाहखानांनी तातडीने दिल्या अशा रीतीने त्यांनी आपल्या प्रांतात सत्याग्रही मार्गाने म्हणजे लोकशिक्षण व लोकसेवा या साधनाने स्वातंत्र्याचा लढा लढवण्याचे नवे पर्व आरंभले होते

बादशाहखानांच्या या तत्त्वनिष्ठेला विजय झालेलाही पठाणांना लवकरच पाहण्यास सापडला. स्वतःच्या अहिंसाधोरणांची मर्यादा काँग्रेसने स्पष्ट केली, इतकेच नव्हे तर गांधीजींसारख्या आपल्या मान्यवर मार्गदर्शकालाही काँग्रेसने त्यासाठी थोडे दूर केले इतके स्पष्ट केल्या नंतरही राज्यकर्त्यांनी भारताच्या स्वातंत्र्याचा प्रश्न अनिश्चित स्वरूपात भिजत ठेवल्यामुळे काँग्रेसने पुढे केलेला युद्धसहकार्याचा हात झिडकारला गेला यामुळे काँग्रेस नेत्यांना आपल्या धोरणाचा फेर विचार करणे भाग पडले

ब्रिटिश राज्यकर्त्यांचे लोकशाही प्रेमाचे ढोंग काँग्रेसच्या पुणे ठरावाने उघडे पडले त्या ठरावाने काँग्रेसनेत्यांची खरी भूमिका स्पष्ट झाली हेही खरे, काँग्रेसने अहिंसेचे निर्बंध, धोरण म्हणून व स्वातंत्र्यप्राप्तीचा मोठीचा मार्ग म्हणून स्वीकारलेले होते, पण या मतभेदामुळे गांधीजी व बादशाहखानांसारखे नेते व सहकारी काँग्रेसपासून अलग झाले आणि इकडे ब्रिटिश राज्यकर्त्यांकडून काही प्रतिसाद मिळाला नाहीच साम्राज्य कोसळत असताही भारताच्या स्वातंत्र्याचा विचार करण्यास ते तयार नव्हते हे यामुळे पूर्णपणे स्पष्ट झाले ब्रिटिशांच्या या बलवत्तर साम्राज्यवादी धोरणामुळे पुणे ठराव रद्द करण्यासाठी काँग्रेसला मुंबईच्या बैठक घ्यावी लागली मुंबईच्या अखिल भारतीय काँग्रेस समितीच्या बैठकीत (१५ सप्टेंबर

१९४० ) पुणे ठराव रद्द केला अवघ्या तीन महिन्यांच्या आत काँग्रेसने गांधीजींना पुन्हा नेतृत्व स्वीकारण्याची विनंती केली मुंबई ठरावाने काँग्रेसने आपले धोरण पुन्हा बदलले या घटनेचा सीमाप्रदेशाच्या राजकारणावर विलक्षण परिणाम झाला आपला नेता बौद्धिक व नैतिक पातळीवर किती श्रेष्ठ आहे याची प्रचीती तेथील कार्यकर्त्यांना आली बादशाहखानांच्या कीर्तीत व लोकप्रियतेत यामुळे अधिक भर पडली, पण त्यांनाही पुन्हा गांधीजींनंतर काँग्रेसप्रवेश करावा लागला त्यांनी आठ जुलैला दिलेला राजीनामा परत घेतला पुणे ठराव ४८ विरुद्ध मते असता पास झाला होता तर गांधीजींकडे पुन्हा नेतृत्व देण्याच्या ठरावाला फक्त ७ विरोधी मते पडली युद्धकाळातही अहिंसेची आराधना चालू ठेवण्याचे श्रेय साम्राज्यवादी राज्यकर्त्यांकडून जाते हेही विसरता कामा नये त्यानंतर गांधीजींनीही आपल्या नेतृत्वाचे स्वरूप झपाट्याने स्पष्ट करण्यास सुरुवात केली त्यातून ऑक्टोबरमध्ये वैयक्तिक सत्याग्रह सुरू झाला युद्धकाळात भाषणस्वातंत्र्याचा अधिकार उपभोगता आला पाहिजे या भूमिकेवरून हा सत्याग्रह आरंभला त्या वेळी भारताला फारशी अज्ञात असलेल्या अहिंसा मनी जीवनाचे आदर्श असा पू० विनोबा भावे यांच्या द्वारे तो प्रारंभ केला गेला दुसरा मान पं० जवाहरलालजींचा होता देशभर शिस्तीने व निवडक कार्यकर्त्यांचा हा सत्याग्रह गांधीजींच्या आदेशाप्रमाणे सुरू झाला सीमाप्रांतात हीच तयारी सरहद्दयाब येथील शिबिराने केलेली होती अधिकृतपणे पठाणांनी सत्याग्रहाला प्रारंभ केला तरी त्यांना न पकडण्याचे धोरण राज्यकर्त्यांनी ठरविले होते मुसलमान जनता व संघटना आपल्यास सहाय्यक आहेत, विरोधक नाहीत असे जाणकार राज्यकर्त्यांना जगापुढे दाखवायचे होते काँग्रेसच्या युद्धविरोधाच्या चळवळीत सारे पठाण आहेत हे बादशाहखानांच्या चळवळीमुळे जगापुढे येईल ही प्रसिद्धी टाळण्यासाठी सीमा प्रांतावर या वेळी वेगळेच कृपाकटाक्ष टाकण्यात आले होते भावी काळाचे व लढ्याचे स्वरूप जनतेला कळावे म्हणून बादशाहखानांनी या काळात सतत प्रवास केला, खेडे न् खेडे पायाखाली घातले त्यांच्या भेटीने, उपदेशाने कार्यकर्ते व सामान्य लोक किती प्रभावी होत असत याचे सुंदर शब्दचित्र व मुहमद युनूस यांनी आपल्या लेखातून केले आहे ( फ्री प्रेस जर्नल, डिसेंबर १९४० ) मॅ० युनूस त्या काळात त्यांच्या बरोबर संघटनाकार्याचे शिक्षण घेण्यासाठी राहिले होते ते म्हणतात, ' गेले १५ महिने मी त्यांच्याबरोबर आहे खेड्यापाड्यातील लोकांवर यांच्या बोलण्याचालण्याचा विलक्षण प्रभाव पडतो ते तात्काळ त्यांच्या सुखदुःखांशी समरस होतात स्त्रिया त्यांना पाहून डोळे भरून रडतात त्यांना त्यांच्यातील सच्चेपणाची प्रचीती तात्काळ येते त्यांच्या हस्तस्पर्शासाठी आशीर्वादासाठी त्या उत्सुक असतात खेड्यांतल्या स्त्रिया आपली लहान-मोठी मुले त्यांच्या पायांवर घालतात मुलांमध्ये ते तात्काळ रमतात त्यांची भाषणे व संभाषणे प्रभावी असतात

साध्या सोप्या भाषेत ते बोलतात. कार्यकर्त्यांचे दोष ते स्पष्टपणे त्यांच्यापुढे ठेवतात. सकाळच्या प्रार्थनेनंतर ते गावात फिरतीला निघतात. ते दिवसभर लोकांच्यामध्ये राहतात. तोच चालता बोलता प्रचार. आपसातील प्रेम, सहकार्य व अखंड उद्योग यावर त्यांचा भर असतो. भावी लढ्यास तयार होण्याचे त्यांचे आवाहन लोकांच्या अंतःकरणास पोचते. अहिंसेने आपले कल्याण झाले आहे व त्याच मार्गाने आपले सारे प्रश्न सुटतील ही त्यांची श्रद्धा त्यांच्या शब्दाशब्दातून स्पष्ट होते. लोकांच्या गरिबीबद्दलचे त्यांचे दुःख त्यांच्या शब्दांतून सारखे ओसंडत असते. प्रवासासाठी घोडा, टांगा, लॉरी व जेथे यापैकी काही उपयोगी नाही तेथे पाय, अशा सर्व साधनांनी त्यांचा प्रवास होतो. 'फक्रे अफगान झिंदाबाद' या घोषणांचे नारे देत मुलांचे थवे त्यांच्याबरोबर चाललेले असतात."

वैयक्तिक सत्याग्रहात भारतातील मोठमोठे काँग्रेसनेते व कार्यकर्ते यांनी भाग घेतला. विनोबाजी नंतर जवाहरलाल यायचे, पण त्यापूर्वीच त्यांना चार वर्षांची जबर शिक्षा ठोठावण्यात आली. सरदार पटेलांनाही स्थानबद्ध करून ठेवले. काँग्रेसकार्यकारिणीचे सदस्य, मानही प्रांतांच्या मंत्रिमंडळांतील मंत्री, विधिमंडळाचे पक्षीय सदस्य व प्रमुख कार्यकर्ते, असे सुमारे २,५०० सत्याग्रही तीनचार महिन्यांत शिस्तशीर रीतीने तुरुंगात गेले. सीमाप्रदेशात पंतप्रधान डॉ. खानसाहेबांनी लाल डगल्याच्या वेषात स्वतःच्या जुन्या सचिवालयात जाऊन युद्धविरोधी घोषणा केल्या. त्यांना पकडून तुरुंगात पाठवण्याऐवजी पोलिसांनी बळाने त्यांच्या बंगल्यावर नेऊन सोडले.

रणभूमीवर—युरोप व दक्षिणपूर्व आशियामध्ये पराभवाच्या लाथा रोज खाणारे ब्रिटिश साम्राज्य घरच्या म्हातारीचे कसे काळ होते याचे उत्तम उदाहरण या दीड वर्षात भारतात दिसून आले. नित्य नवी आश्वासने, नव्या घोषणा, राजदूतांच्या भेटी ही सर्व नाटके केली, पण त्या सर्वांतून युद्धाला हात लावू न देण्याचे गोचिडी धोरण दिसून येत होते. त्यामुळे काँग्रेसनेत्यांची ही सत्त्वपरीक्षा मांडली गेली होती. नैतिक पाठिंब्यापासून तो पुणे ठरावाच्या सशर्त युद्धसहकार्याच्या आश्वासनापर्यंत धोरण बदलले. मुंबई ठराव केला. त्यातून वैयक्तिक सत्याग्रह झाला. हा सारा तारेवरील नाच करताना गांधीजी, बादशहाखान, नेहरू, आझाद, वल्लभभाई, राजाजी यांचे क्रमक्रमे साम्य तसेच तीव्र मतभेद होत गेले, त्यातून तडजोडी कशा होत, याचा सारा वृत्तान्त आता प्रसिद्ध आहे. साऱ्या खाचखळग्यांतून काँग्रेसचा रथ जात असताना जगात विस्कळित होत चाललेल्या लोकशाहीला तर धक्का लागू द्यावयाचा नाही, व प्रतिकाराच्या निर्धारापासून काँग्रेसनेही वंचित होऊ द्यावयाचे नाही हा विलक्षण कर्मयोग काँग्रेसने यशस्वी रीतीने आचरला. तो कर्मयोगच होता. त्यात हिशेबी मोजमापाला स्थान नव्हते. निष्क्रियतेचे पतन टाळणे व खडे राहणे हेच या काळचे यश होते. राष्ट्राचा

स्वाभिमान टिकवला. जगातील विचारवंतांना भारताची बाजू नीतीची व न्यायाची नाही असे म्हणता आले नाही. त्या काळातील हे यश लहानसे नव्हे. इंग्लंडचे नेतृत्व चर्चिल यांच्याकडे गेल्यानंतर भारताचा काळ अधिक कसोटीचा आला, पण त्या काळातही काँग्रेसने आपला मार्ग सोडला नाही.

# १९

# १९४२ च्या चढाईची पठाणी आखणी

ऑगस्ट ठराव करणाऱ्या मुंबईच्या अखिल भारतीय काँग्रेसच्या बैठकीस बादशहाखान हजर राहू शकले नाहीत, पण त्यांना ऑगस्ट-लढ्याची स्वप्ने पूर्वीपासूनच पडत होती ते त्या तयारीतच होते सरहद्दप्रदेश काँग्रेससमिती व खुदाई खिदमतगार पुन्हा एकमय केले गेले होते त्यांच्यामधले मतभेद मिटवून टाकले लढ्यासाठी खुदाईखिदमतगारांमधूनच प्रत्येकाच्या उत्पन्नाच्या प्रमाणात निधी जमविण्यात त्यांनी काही काळ घालवला तुरुंगात गेलेल्या कुटुंबीयांची शक्य ती व्यवस्था करण्यासाठी "बैतुल्-माल" हा निधी मुख्यत उभारला होता लढा दीर्घकाळ चालणार या दृष्टीने ते सारी तयारी शिस्तशीर रीतीने करीत होते साऱ्या भारतात इतक्या व्यापक दृष्टीने कोठे आखणी झाल्याचे पाहण्यात नाही ऑगस्ट ठराव पास होण्यापूर्वी बादशहाखान त्या तयारीला लागले होते जिल्ह्याजिल्ह्याच्या शिबिरात सैनिकांच्या तुकड्या येऊन दाखल होत व त्या खेड्यापाड्यांत फिरत राहत वैयक्तिक सत्याग्रह संपल्यावर सीमाप्रांतात त्यांनी शहरामध्ये दारू पिकेटिंग आरंभले त्याचप्रमाणे टोळीवाल्यांच्या स्वतंत्र प्रदेशातही काही तुकड्या पाठवल्या वझिरिस्थानामध्ये मात्र ते पोचू शकले नाहीत त्या वेळी प्रांतात गव्हर्नरचे राज्य चालू होते त्या वेळी टोळीवाल्यांच्या मुलुखात प्रचारासाठी गेलेल्या कार्यकर्त्यांना पुढे १९४५ पर्यंत परत येऊ दिले नाही

सुमारे दोन महिने बादशहाखानांनी स्वतःच्या नेतृत्वाखाली व निवडक खुदाईखिदमतगारां तर्फे शिस्तीने कार्यक्रम आखले व केले अधिकाऱ्यांनीही धरपकड अगर लाठीमार न करता सौम्यपणे वागून लढ्याची धार झिजू पाहत होते कार्यकर्ते थोडे निराश होत त्यांचा उत्साह दडपशाहीवर पोसत असतो पण बादशहाखानांनी त्यांना शिस्तीच्या व संयमाच्या

मुशींतून ओतून काढले होते भावी दिव्यासाठी त्याना तयार करावयाचे होते

सप्टेंबरअखेर सरकारी इमारतींचा ताबा घेण्याचा चढाऊ कार्यक्रम त्यानी पाचही जिल्ह्यांत दिला स्वयंसेवकांनी इमारतींना घेरा घालून शांततेने त्यांचा ताबा घेण्याचा हा कार्यक्रम होता पोलिसानी कितीही अत्याचार केले तरी स्वयंसेवकानी मागे हटावयाचे नाही, जो खाली पडेल त्याची जागा शेजाऱ्याने घ्यावयाची अशा आज्ञा होत्या, आणि त्याप्रमाणे चार ऑक्टोबरचा कार्यक्रम अतुल धैर्याने पार पडला लाठी न चालविण्याचे अधिकाऱ्यांचे धोरण कोठल्या कोठे विरले जिल्हा कचेऱ्या व कोर्टे याच्या रक्षणार्थ पोलिसानी सर्व शक्ती पणाला लावली विषारी धूर वापरले गेले दुसरे दिवशी लष्कर व पोलिस यांचा सरकारी कचेऱ्यावर बंदोबस्त केला, त्याची कोंडी मोडून चढाई करण्याचा संग्राम सुरू झाला घायाळ स्वयंसेवकासाठी खुदाईखिदमतगारांचे शुश्रूषापथक व इस्पितळ उभारले गेले होते काही कचेऱ्यात स्वयंसेवक घुसू शकले कोर्टाच्या खुर्च्यांवर ते अधिष्ठित झाले व तेथून काँग्रेस कचेरीला टेलिफोन करून सत्ता ताब्यात घेतल्याचे संदेशही त्यानी दिले

या दोनतीन दिवसात काही ठिकाणी लोकांकडूनही दगड वगैरे फेकणे अशा आगळिकी घडल्या त्या किती तत्काळ थांबविल्या गेल्या याचा एक पुरावा पेशावरच्या दोन गोऱ्या सोजिरांनी दिल्याची नोंद श्री यूनुस याच्या पुस्तकात आहे या गोऱ्या सायकलस्वारांना विद्यार्थ्यांनी अडविले होते त्यांच्यावर हल्ला होणार अशी बातमी कळताच श्री यूनुस तेथे धावले त्यानी आज्ञा देताच सारे विद्यार्थी शांत झाले व त्यांनीच सोजिरांना वाट करून दिली कार्यकर्त्यांवर नेत्यांचे किती वजन होते याचा हा पुरावा होता. गोळीबार न करण्याचा व तुरुंगात न पाठवण्याचा सरकारचा निर्धार दोन दिवसातच उखडून निघाला शेकडो घायाळ स्वयंसेवकाना तुरुंगांत पाठवले गेले हजारो जखमी स्वयंसेवक पकडले जाईपर्यंत चढाई करीत राहिले रक्तबंबाळ झालेले स्वयंसेवक शांतपणे चढाई करीत होते पठाणी सत्याग्रहाचे हे दर्शन अपूर्व असे होते प्रांताबाहेर या बातम्या जाऊ नयेत यासाठी अधिकारी जीवापाड मेहनत घेत होते पंजाबातील अनेक वृत्तपत्रांतून उलट्या बातम्या छापण्याची व्यवस्था अधिकाऱ्यांनी केली होती

बादशाहखान स्वत फार दिवस मोकळे राहू शकले नाहीत आपल्यास पकडणार नाहीत किंवा सरकारी अत्याचार होणार नाहीत हा समज लवकरच चुकीचा ठरेल हे त्यांचे म्हणणे कार्यकर्त्यांच्या लवकरच प्रतीतीस आले त्यांनी स्वत मर्दान जिल्हा कोर्टावर चढाई करण्याचे ठरवले त्यासाठी मब्वद स्वयंसेवकांची तुकडी घेऊन ते तिकडे गेले ते झाले शक्य नव्हते आपल्या हातांची साखळी करून लाल बावटेवाले घेरा धरून चालत ते कडे तोडणे पोलिसांना अशक्य होई मर्दानला पोचण्यापूर्वीच त्यांच्यावर तीव्र लाठीचे प्रहार

फेले गेले त्याच वेळी बादशाहखानांच्या बरगडीची दोन हाडे मोडली तशाच स्थितीत काही उपचार न करता त्यांना जेलमध्ये नेऊन टाकले नतर त्यांना अटोपर्यंत अबोटाबाद जेलमध्ये बंद कोठडीत टाकून दिले होते या लाठीमारात त्यांच्या बरगड्या मोडल्याने जो दुबळेपणा आला तो अद्याप तसाच आहे त्यामुळेच मधूनमधून त्यांचे इतर रोग बळावतात

मुस्लीम लीगचे औरंगजेबमन्त्रिमंडळ सत्तेवर येण्यापूर्वीच बादशाहखानांच्या तुरुंगवासाबद्दल व त्यांचे आरोग्य सपशेल ढासळल्याबद्दल सीमाप्रांतात भरपूर गवगवा झालेला होता अबोटाबाद जेलमध्ये त्यांना फार वाईट रीतीने वागवले गेले होते त्यामुळे औरंगजेब मन्त्रिमंडळ सत्तारूढ होताच त्यांनी खानांच्यासाठी ज्यास्त बरेच देण्याची योजना सुचविली, पण बादशाहखानांनी ती अमान्य केली १९४३ अखेर त्यांना हरिपूर जेलमध्ये हालविण्यात आले तेथे स्वत मुख्य मंत्री व जेलखात्याचे मंत्री समिंजनखान यानी त्यांची भेट घेतली या भेटीनंतर मुख्यमन्त्र्यांनी पत्रकारांशी बोलताना सांगितले ' बादशाहखानांचे आरोग्य ठीक आहे ते जेलच्या सामान व इतर पेयांच्या प्रश्नांतही लक्ष घालतात ' या मन्त्र्याच्या पाठोपाठ लीगचे एक आमदार मि रशीद हेही त्यांना जाऊन भेटले त्यांनीही याची प्रकृती ठीक असल्याची माहिती वृत्तपत्रांना पुरविली पण राज्यकर्त्यांच्या या आश्वासनामुळेच जनतेच्या मनातील त्यांच्या प्रकृतीबद्दलची चिंता वाढली ती भीती साधार होती असे दिसते कारण नतरच्या दोन तीन महिन्यांत त्यांची प्रकृती बिघडत गेली व एप्रिल १९४४ मध्ये त्यांचा आजारपणा फार वाढला गांधीजींची प्रकृती बरी नसल्याच्या वार्ता त्यांच्या कानी जात होत्या कस्तुरबांच्या मृत्यूच्या वार्तेचे परिणाम त्यांच्यावर काय झाले असतील याची कल्पनाच केली पाहिजे तुरुंगातून सुटलेल्या एका पठाणाबरोबर त्यांनी गांधीजींच्याकडे एक शोक समाचार धाडला होता स्वत बादशाहखानांच्या प्रकृतीबद्दल वार्ता फेलावत ल्याने डा खानसाहेब व इतर कुटुंबीय मंडळी हरिपूर जेलमध्ये त्यांना जाऊन भेटली मंत्री समिंजनखान हे आक्टोबरमध्ये पुन्हा भेटले होते यांनी काढलेल्या पत्रकात, ' मला त्यांच्याबद्दल पूर्ण आदर आहे मला त्यांच्याकडून पत्र आले होते त्यांच्या आरोग्याची मी पूर्ण काळजी घेत आहे " असे आश्वासन जनतेला दिले होते आपल्या मन्त्रिमंडळा बद्दल जनतेत उत्पन्न होणाऱ्या अविश्वासाची त्यांना चिंता होती हे जरी खरे असले तरी बादशाहखानांच्याबद्दल समिंजनखानांना आदर होता हेही खरे आहे ते मूळचे खुदाई खिदमतगार व १९३७ मध्ये मुख्यमन्त्रिपद न मिळाल्याने लीगला मिळाले होते पण त्यांच्या त्या आदराची व प्रेमाची जागृती लोकमताच्या क्षोभाची आच लागल्यानतरच झाली असे जनतेला वाटले खरे

पाठवला. काँग्रेसबाहेरचे अनेक आमदार ओगानेची पारमाफल काढलेले होते. मंत्री व नोकरशाही या दोघांच्या हातमिळवणीने राज्यकारभाराचा चुथडा थोड्या दिवसांतच झाला होता. लाचखाऊपणा सर्वत्र बोकाळला होता. मिलेटरी मंत्र्यांचे राजमहाल उघारले गरीब लोकांच्या डोळ्यांसमोर उभे होते. प्रांतात दुष्काळाने डोळे वटारले असता गरिबांच्या यातना त्यांना पाहण्यास मंत्र्यांना सवड झाली नाही. या सर्व परिस्थितीमुळे इतर अनेक आमदार काँग्रेस पक्षाला पाठिंबा देण्यास तयार झाले होते. गव्हर्नरला हे टाउक असल्यामुळे त्यांनी विधिमंडळाची बैठकच लांबणीवर टाकली, पण गाव झोडणाऱ्याच्या सुनेला सवाल झाल्यावर बाहेर पडावच लागते, त्याप्रमाणे बजेट मंजुरीसाठी शेवटी बैठक बोलवावीच लागली. १९४५ च्या मार्च महिन्यात पार्टीच्या घोड्यावर चालणारे हे तेरा घोडेस्वार दाणदून पडले. पन्नास सदस्यांच्या कायदेमंडळात तेरा मंत्री-उपमंत्री केले गेले होते. मंत्रिमंडळासाठी मुस्लिम लीग मधे आलेले काही लोकच लीगवर पाय उचलण्यास तयार झाले. डॉ. खानसाहेबांच्या मंत्रिमंडळाला स्वतःच्या पायावर उभे राहण्याची शक्ती होती व म्हणूनच ते गव्हर्नरच्या साऱ्या डावपेचांना तोंड देऊन स्वतःचे मंत्रिमंडळ बनवू शकले. डॉ. खानसाहेबांच्या मंत्रिमंडळाच्या प्रारंभीच्या कामकाजामध्ये राजबंद्यांच्या सुटकेचे काम होते. युद्ध संकटाचे पांघरूण बाजूला गेल्याने नवे वातावरण निर्माण झाले होते. धोक्याच्या वादळातून बाहेर पडलेल्या निःशक्त साम्राज्याची स्थिती झाली होती. येथील गोऱ्या नोकरशाहीचे डोळे इंग्लंडमधील आपल्या तिकडे लागले होते. मुस्लिम लीगच्या आधारावर आपल्यास काही दिवस काढता येतील याची त्यांना चिंता वाटू लागली होती.

गांधीजींची मुक्तता होऊन दहा महिने लोटले होते. आपले तीनचतुर्थांश शरीर आगाखान-पॅलेस परिसरात टेकून ते विषण्ण मनाने बाहेर आलेले होते. १९४५ च्या मे-जून महिन्यांत काँग्रेसकार्यकारिणीचे बहुतेक सदस्य मुक्त झाले. बादशहाखान त्याच सुमाराला सुटले व उत्तमझाईला परत आले. पोलिसांनी १९३२ मधे केलेल्या जाळपोळीत काळे पडलेले काँग्रेसभवन त्या अवस्थेत उभे होते. बादशहाखानाचे उदार गंभीर हृदय ईश्वरी श्रद्धेने व्यापलेले असले तरी पंचवीस वर्षांच्या त्यागमय व क्लेशमय राजकीय प्रवासानंतर आपला उजाड संसार, उद्ध्वस्त झालेले घर व अर्धवट जळक्या खांबांवर उभे असलेले काँग्रेसभवन, या सर्वांचे चित्र पाहून तशा काळजालाही घरे पडली असणार! वेदनाशीलता हा जसा शरीरधर्म आहे तसाच कठोर कर्मपरायणता हा कर्मयोग्यांचा स्वभावधर्म बनतो. बादशहाखान हे त्या कर्मयोगी परंपरेतले आहेत. त्यांच्या डोळ्यांना आसवांचा स्पर्श कधी झाला असला तरी तो इतरांच्या दुःखासाठी व इतरांना न दिसलेला. उत्तमझाईतील त्यांच्या आगमनाच्या वेळी तेथे जमलेल्या बालवृद्ध नरनारींच्या डोळ्यांतून आसवे वाहिली.

मग तुमचा मोटा जनरल मानलेला आहे तुमच्या हिताचे काय आहे, काय नाही हे पाहण्याचे काम माझे आहे मी मंत्रिमंडळाच्या कार्यक्रमाविरुद्ध आहे तो पूर्वीच्या अनुभवावरूनच, जेलमध्येच मला काही कार्यकर्ते भेटून गले होते मी साफ विरुद्ध अमल्याचे त्यांना सांगितले होते गल्या मंत्रिमंडळाच्या वेळी तुम्ही कायदेमंडळे व कचेऱ्या यामध्येच हिंडताना आढळत होता, खुदाईखिदमतगारांनी नबाबांच्या व खानांच्या जागा घेतल्या होत्या. त्यामुळे लोकांचे लक्ष वशिले लावण्याकडे लागले होते आणि त्यांची कामे झाली नाहीत म्हणजे तटे-भांडणे होत आमच्या इच्छेनुसार जनतेची सेवा जर आम्हाला करता येत नाही तर ही सत्ता घेऊन काय करायची? शासनाची किंवा सरकारची शक्ती वाढवण्याची माझी इच्छा नाही लोकांची सेवा करण्याची आमची शक्ती वाढावी अशी माझी इच्छा आहे १९३७-३९ च्या आमच्या मंत्रिमंडळाला इंग्रजांनी साहाय्य दिले नाही उलट विरोध केला आताही मी इशारा दिला आहे मंत्रिमंडळाला जर इंग्रजाचे सहकार्य मिळाले नाही व गरिबांची सेवा नीट होऊ शकली नाही तर त्याची जबाबदारी मी घेणार नाही आपले उद्दिष्ट ९ ऑगस्टचा ठराव हेच आहे हे लक्षात ठेवा ' तुम्ही माझे मित्र आहात साथी आहात, तसे राहा अगर राहू नका मी कोणाला सक्तीने साथी करू इच्छीत नाही तो तुमचा प्रश्न आहे तुम्ही माझे मित्र राहा अगर राहू नका, पण दोघांचे मित्र होऊ नका! कुराणात सत्पर सेवकांना ' हज्ब अल्लाह ' असे म्हटले आहे तसेच खोट्याची बाजू घेणाऱ्यांना ' हज्बुल शैतान ' असे म्हटलेले आहे तुम्ही सैतान बनू नका जनतेला तुम्ही माझा हा संदेश पोचवा त्यांनी अमलापासून अलग राहावे काही लोक स्वतःला आमच्यापासून वेगळे मानतात मला त्याचे फार दुःख होते आपण सारे पठाण एकच आहोत आमच्यात भेदभाव नाही हे जर खरे आहे त्याच सर्वांचे सुखदुःख एकच आहे आम्ही एकाच देशाचे वतनी आहोत, आमचे बरे वाईट एकच आहे तर मग आम्ही एक दुसऱ्यापासून अलग अगर वेगळे कसे होऊ शकता? दुसऱ्या कोणाला मी माझ्यापासून वेगळा मानीत नाही पण जे स्वतःला आमच्यापासून वेगळे मानतात त्यांनी मी काय म्हणतो त्याचा विचार करावा ''

' डू ऑर डाय-करू किंवा मरून जाऊ ' या प्रतिज्ञेने प्रारंभिलेला बेचाळीसचा लढा देशाच्या स्वातंत्र्यनिष्ठेस शोभावा अशा तेजाने उफाळला व उजळूनही निघाला युद्धकालात अहिंसेच्या लढ्यांना जेवढे यश येणे शक्य असते तेवढे यश या लढ्यालाही लाभले आहे या लढ्याच्या यशापयशाचे मोजमाप करण्याच्या निकषासंबंधी पूर्वी विवेचन आलेले आहे बदीशाहीतून सुटलेले देशभक्त—स्मशानातून परत चाललेल्या दुःखितांच्या पावलाने आपल्या घराकडे जात होते असे वर म्हटले आहे तेही खरे आहे हा निकराचा—शेवटचा लढा होता! देशाने त्यात थोडाथोडका त्याग केला नव्हता! हजारो तरुणांचे बलिदान झालेले होते महा

पुढच्या पाच वर्षांनी साऱ्या जगाची कायापालट झाली तरी ब्रिटनच्या साम्राज्यवादी वृत्तीचे कवच फुटलेले दिसत नव्हते. यामुळे या लढ्याचे भवितव्य काय होणार या चिंतेने तुरुंगातून सुटणाऱ्यांच्या सुटकेचा आनंद बाहेर पडताच ओसरून जात होता आणि त्याहीपेक्षा विव्हल करणारी बाब म्हणजे जातीय द्वेषाच्या ठिणग्या पेट घेत होत्या. देशाची फाळणी हेच आपले उद्दिष्ट असल्याचे मुस्लिम लीग उघडपणे बसली होती. मुस्लिम लीगचा हा विषारी दात निपटून काढण्याचे सामर्थ्य कोणामध्ये नव्हते अशा विषण्ण मन स्थितीत कार्यकर्ते व पुढारी हळूहळू सुटत होते.

१९४५ च्या जूनमध्ये या विजयाचे चौघडे वाजू लागले आणि त्याच्या पाठोपाठ इतक्या वेगाने घटना घडत गेल्या की आजही त्या घटनांच्या स्मरणाने अंत:करण विव्हल होऊ लागते. १९४५-४७ च्या दोन अडीच वर्षाच्या काळाच्या लहानशा पटावर भारताच्या भवितव्यतेच्या विविध व विलक्षण खेळ्या मांडल्या जात होत्या. इंचाइंचाने स्वातन्त्र्याच्या समीप आणलेला देश क्षणाक्षणाला स्वातन्त्र्यापासून कोठेतरी दूर दरीक्यापारीत लोटला जात आहे याची दुश्चिन्हे दिसत होती. उंच झाडावरील फळापर्यंत हात पोचावा आणि ते फळ तोडण्यापूर्वी खालून कोणी तरी पाय ओढावेत व चारी बाजूंनी मधमाशांनी हल्ला चढवावा अशी ती स्थिती होती, पाठलाग करून हैराण झालेल्या शिकाऱ्याला सावज सापडावे व त्याला गोळी लागावी आणि तेवढ्यात शिकारीच्या पायाला विषसर्पाने विळखा घालावा, भारताच्या स्वातन्त्र्यासाठी आयुष्यभर राबलेल्या देशभक्तांची परिस्थिती ४५-४६ सालामध्ये तशी झाली होती. स्वातन्त्र्य हाताशी आलेले होते; ते लांबवण्याचे किंवा नाकारण्याचे सामर्थ्य महायुद्धात विजय मिळवणाऱ्या ब्रिटिशांमध्ये राहिलेले नव्हते, पण स्वातन्त्र्य मिळणार हे निश्चित झाल्यानेच त्या सत्तेवर सत्ता सांगणारे सर्व लोक पुढे धावले. पूर्वी कोणी भांडले तडले असले तरी प्रत्यक्ष समय येताच सारे एकजुटीने स्वातन्त्र्याचे स्वागत करून व देशाचा गाडा सलोख्याने व सहकाराने पुढे नेऊ या अपेक्षा फसव्या ठरल्या. युद्धकालातील सत्तात्याग आणि आणि सत्याग्रह यांचा डाव आमच्याच अंगावर उलटवला जात होता हा राज्यकर्त्यांनी घेतलेला सूड होता का मुस्लिम लीगसारख्या जातीय संघटनांच्या नेत्यांच्या क्षुद्र राजकारणाचे ते घोर पर्यवसान होते का काँग्रेसच्या राजकारणातील चुकांचा तो परिपाक होता यासंबंधीचा निःपक्षपाती निर्णय अद्याप दिला गेलेला नाही, कदाचित तो लवकर दिला जाणार नाही ! केवळ परिणामावरून परीक्षा केली गेल्यास आलेले अपयश भयाण आहे. या साऱ्या घटनांची ध्याननी जागरूकपणे केली जाणे जरूर आहे

सुटकेनंतर बादशहाखान उत्तमझाईस गेले व तेथे कार्यकर्त्यांच्या बैठकीत त्यांनी सद -

स्थितीसंबंधी आपली धोरणे स्पष्ट केली स्वभावत च ते धर्म प्रवृत्तीचे व राजकीय डावपेच न मानवणारे असल्याने त्यांना मंत्रिमंडळाचे आकर्षण केव्हाच वाटले नाही, परंतु जनतेचे जीवित या सत्तास्थानात गुरफटलेले असल्याने पुष्कळ कार्यकर्त्यांचे डोळे स्वत च्या हातापायांपेक्षा नेहमी सत्तेकडे वळलेले असतात बादशहाखानांना ते पसंत नसे, ते आपला मार्ग व सल्ला कार्यकर्त्यांपुढे ठेवून आपल्या उद्योगाला लागतात " सरकारी घोषणा काही असोत, खरी सत्ता देण्यास सरकार तयार नाही आर्थिक सत्ता हाती असल्यावाचून आपली मंत्रिमंडळे लोकांच्या गरजांचे प्रश्न सोडवू शकणार नाहीत अशा मंत्रिमंडळाची शक्ती वाढविण्यासाठी मी माझी शक्ती खर्ची घालणार नाही " असे त्यांनी स्पष्ट केले पण काँग्रेसमधील कार्यकर्त्यांचाच एक मोठा वर्ग मंत्रिमंडळाकडे आकर्षिला गेला होता आणि खरोखर शेवटी त्या सत्तेच्याच द्वारे लोकसेवा साधावी लागते, सत्ता वापरूनच त्या क्षेत्रातील शहाणपणा येत असतो सत्तेकडे नेहमी अविश्वासाने व किंवा न्यूनतेने पाहून भागत नाही, हे गांधी गफारखानासारख्यांच्या गळी उतरणे कठीण असते पण ही दृष्टी सर्वसामान्यांना झेपण्यासारखी असत नाही, त्यामुळे फार मोठे पुढारी व त्यांचे दुय्यम अनुयायी यांच्यामधील अंतरही फार मोठे राहाते परिणामी जनता नेत्यांपासून दूर राहते, दुरावलीही जाते

सीमाप्रांतातील काँग्रेसकार्यकर्त्यांमध्येही हे मतभेद होतेच म गांधींना काँग्रेस अनेक वेळ्या सोसावी लागली लढ्याचे साधन म्हणूनच ते काँग्रेसला आपल्या हाती ठेवीत बादशाहखानांची दृष्टी थोडी तशीच होती किंबहुना त्यांची अडचण अनेक प्रकारची व अनेक पटींनी मोठी होती ज्या पठाणांमध्ये त्याना काम करायचे त्यांचे प्रमुख नेते खान मलिक वगैरे मोठेमोठे जमीनदार हे गव्हर्नरांच्या हाती आणि जनता पूर्ण अज्ञानी व धर्मवेडी या जनतेवर मुल्ला-मौलवींचे बरेच प्रभुत्व त्यामुळे त्यांच्यामध्ये काम करणे अधिक अवघड होते यासाठी काँग्रेसच्या नावापासून अलिप्त राहण्याचा खुदाई खिदमतगारांचा प्रयत्न असे पण त्यांचा हा खरा हेतू फार थोड्यांनी लक्षात घेतला लोक शहाणे, समजस झाल्यावाचून स्वातंत्र्य नीट वापरता येणार नाही या दृढ सिद्धांतावर त्यांचे कार्य आधारलेले होते तेच त्यांनी सुटकेनंतरही हाती घेतले

काँग्रेस कार्यकर्त्यांमधील मतभेद मिटवावेत व पुरोगामी दृष्टीच्या पक्षांना एकत्र आणावे या दृष्टीने प्रांतिक कार्यकर्त्यांचा मेळावा एप्रिल २० २१ २२ ला पेशावर येथे घेतला गेला काँग्रेसजनांचे हे संमेलन म्हणजे जवळजवळ काँग्रेसच्या वार्षिक अधिवेशनासारखे भव्य व तसेच आकर्षक व प्रभावी झाले सुमारे एक लाख लोकांचा समावेश होईल एवढा प्रचंड मंडप उभारला होता नेत्यांच्या व कार्यकर्त्यांच्या निवासाची वगैरे सोय तशीच व्यवस्थित व आकर्षक पद्धतीने केलेली होती सजावट, रोषणाई, सुखसोयी व आरोग्य

रक्षणाची व्यवस्था आदी सर्व बाबतीत काँग्रेस-अधिवेशनाला मागे टाकणारी अशी ही व्यवस्था होती सीमाप्रदेशाच्या काँग्रेसकार्यकर्त्यांच्या सघटित परिश्रमाचा आदर्श म्हणून हे संमेलन चिरस्मरणीय असे झाले अहिंसात्मक लढ्यामुळे पठाण चिरडले गेले नव्हते याचे हे एक उत्तम उदाहरण होते मुख्यत या समेलनाच्या निमित्ताने सर्वच स्वातन्त्र्यनिष्ठ व पुरोगामी विचारांच्या राजकीय सघटनांना एकत्र आणण्याचा काँग्रेसकार्यकर्त्यांचा प्रयत्न होता पजाब सोशलिस्ट व कम्युनिस्ट पक्ष, किसान पक्ष, मुबईचे कामगार फेडरेशन आदी सघटना-मध्ये काम करणाऱ्या पठाणांनीही त्यात भाग घेतला होता यावरून त्याचे स्वरूप लक्षात येईल बादशाहखान मुक्तेच सुटून आल्याने त्या संमेलनात त्यांनी भाग घेतला व त्याला विधायक वळणही लागले समेलनाचे अध्यक्ष डॉक्टर सय्यद महमूद हे होते व प्रमुख पाहुण्यांमध्ये भुलाभाई देसाई, शेख अब्दुल्ला, डॉ किश्लू, बलुचिस्तानचे गांधी अब्दुस-समदखान आदी नेते उपस्थित होते समेलनाच्या दुसऱ्या दिवसाच्या बैठकीत भाषण करताना बादशाहखानांनी बेचाळीसच्या लढ्यासबधी निराश झालेल्यांना चांगले जागे केले "सत्या-ग्रहीला अपयश टाउक नसते त्याचा कोणी पराभव करू शकत नाही कारण तो आपल्या उद्दिष्टासाठी अखेरपर्यंत झगडत राहातो माझे ध्येय तेच म्हणजे स्वातन्त्र्य आहे, माझा मार्ग तोच म्हणजे सत्याग्रहाचा, खुदाईखिदमतगारांनी खूप कष्ट सोसले हे खरे आहे तुम्ही नुसत्या टाळ्या वाजवल्यात तेवढ्या पुरेशा नाहीत तुम्ही थोडा अधिक त्याग केला असता तर यश मिळाले असते देशात आज अनेक मतभेद व सघटना निर्माण झाल्या आहेत मी खुदाई खिदमतगार असल्याने इतराना त्यांच्या मार्गाने जाऊ देणे माझे कर्तव्य आहे, पण माझा मार्ग ठरलेला आहे तुमच्यामधे शिरलेला निराशावाद मला प्रथम नष्ट करायचा आहे" ब्रिटिश सरकारला खरोखर सत्ता सोडायची नाही, राजकीय सुधारणांच्या घोषणा हे निव्वळ नाटक आहे याविषयी बोलताना ते म्हणाले, "स्वतत्र पठाण टोळ्यांकडून आपल्या मुलुखावर डाके पडतात माणसे पळवून नेली जातात यावर इलाज करण्यासाठी मी प्रयत्न केले १९४२ मध्ये त्या भागात आमचे कार्यकर्ते पाठवले, परतु त्याना सरकारने पकडून तुरुगात टाकले टोळीवाल्यांना आम्ही मित्र बनवू शकलो तर सरकारचे कोणते नुकसान होते? सरकार जर प्रामाणिक असेल तर त्यांनी या कामी मला सहकार्य द्यावे तसे घडल्यास थोड्याच दिवसात हिंदुस्थानचे शत्रू म्हणून ज्याच्या नावाचा डांगोरा पिटला जातो ते टोळीवाले आमचे मित्र असल्याचे प्रचीतीला येईल"

*या समेलनात भाषण करताना काश्मीरचे नेते शेख अब्दुल्ला यांनी जीनांचे नेतृत्व लोक-*प्रिय का होते आहे याचे नीट परीक्षण केले गेले नाही तर आपण गोत्यात येऊ असे सांगि-तले ते म्हणाले "मौ आझाद, बादशाहखान किंवा डॉ सय्यद महमूद यांचा स्वार्थत्याग,

त्यांची विद्वत्ता, त्यांची लोकप्रियता हे सर्व लोकांना माहीत आहे पण हे नेते धार्मिक नेते नाहीत तर ते राजकीय नेते समजले जातात आणि त्याग किंवा धर्मनिष्ठा यामध्ये त्यांच्या पासंगालाही न पुरणाऱ्या जीनांच्या मागे मुसलमान धावतात मुसलमान आंधळे नाहीत! पण हा प्रकार काय आहे हे नीट उलगडले न गल्यास धरा लागणार नाही ''

# २०

# राजकीय भूकंपाचा प्रारंभ

१९४५ च्या डॉ खान-मंत्रिमंडळाचा कारभार पहिल्या खान-मंत्रिमंडळाप्रमाणेच नीट रीतीने चालला होता, परंतु लीगच्या औरंगजेबमंत्रिमंडळाचा पराभव करून ते अधिकारावर आलेले होते यानंतर मुस्लिम लीगने सर्वत्र खोटा धर्मप्रचार व दंडेलीचे वर्तन सुरू केले सत्तास्पर्धा हेच अशा झगड्याचे कारण असते हेही खानमंत्रिमंडळाला या काळात अनुभवावे लागले डॉ खानसाहेबांच्या एका मुलीने कर्नल जसवंतसिंग या ख्रिस्ती शीखाशी लग्न केले या घटनेचा फायदा घेऊन निमित्तास टेकलेल्या लीगवाल्यांनी डॉ खानसाहेबांच्या विरुद्ध आंदोलन सुरू केले स्वतः डॉ खान यांची एक पत्नी ऑस्ट्रेलियन होती त्यांच्या मुलीचा हा विवाह हीही तिच्या इच्छेची व स्वातंत्र्याची बाब होती परंतु काही मुसलमानांना हा इस्लामवर आघात आहे असे वाटले या निमित्ताने काही जुन्या काँग्रेसकार्यकर्त्यांनीही काँग्रेस सोडली व ते मुस्लीम लीगला जाऊन मिळाले, पण याहीपेक्षा भयंकर प्रक्षोभ अशाच दुसऱ्या एका घटनेने उडविला हाजारा येथील राजकीय दंगलीत बळी पडलेल्या एका शीखाच्या निधवला मुसलमान केले गेले व एका मुसलमानाशी तिचे लग्न लावले गेले मुलीला आपल्या स्वाधीन करावे असा अर्ज बापाने केला डॉ खानसाहेबांनी सदर प्रकरण न्यायालयाकडे सोपविले त्या निर्णयानुसार सरकारने मुलीस बापाकडे पोचवण्याची आज्ञा दिली पण या घटनेने खानमंत्रिमंडळाविरुद्ध शब्दशः प्रक्षोभाचा डोंब उठवला गेला याविरुद्ध आंदोलन संघटित करणाऱ्यांमध्ये काँग्रेसचे एका काळचे नेते कय्यूमखान व अब्दुल गफूरखान आदी होते त्यांनी प्रचंड आंदोलन उभारले व डॉ खान यांच्या बंगल्यावर मिरवणुका नेल्या या चळवळीमध्ये शेकडो स्त्रियांनी पुढाकार घेतला ही चळवळ बरेच दिवस

पेशावर टेकडी मैत्री' हा उत्तर जीनांच्या डायरेक्ट ॲक्शनचा भाग होता. खिलाफ मेटणा सत्तेने भाग घेत, कायदे मोडीत व पार्टी पाडीत एके अर्थात. अशा शर्तीने लोकांच्यामध्ये धर्म-भावना पेटवून राज्यकारभारावर आघात सुरू केले होते आणि या सर्वांचे खरे कारण होते ते हे की बहुसंख्य इस्लामी प्रांतातील हे मंत्रिमंडळ काँग्रेसपक्षाचे होते. काँग्रेसचे हे नेतृत्व जीनांच्या डोळ्यांत काट्यासारखे सलत होते. मुसलमानांचे नेतृत्व करणारी एकमेव संघटना म्हणजे लीग असा जीनांचा दावा होता आणि तिची स्वतःची खास सत्ता मानणारे एकही मंत्रिमंडळ भारतात नव्हते! बंगालचे मंत्रिमंडळ लीगचे होते तेही खऱ्या अर्थाने नव्हे. उलट काँग्रेसचा भारतीय मिळवत सात प्रांतांचे राज्यकर्ते सत्तास्थानावर राज्य मारून बाहेर गेले होते. या सर्व स्थितीबद्दल समाधान व आनंद वाटण्याऐवजी दिवसेंदिवस जीनासाहेब काँग्रेसचा द्वेष घेऊ लागले. त्यांना मत्सराने वेडे केले आणि त्या मनःस्थितीत ते आपले गतवैभव परत उठू लागले. देशहिताचा किंवा मुस्लिमहिताचाही त्यांना विसर पडू लागला होता. त्यांच्यासारख्या देशप्रेमी बुद्धिमंताचे झालेले हे स्खलन विलक्षण होते. अन्यथा त्यांच्या वर्तनाचा उलगडा होत नाही.

पण मुस्लिम लीगच्या या वाढत्या घोर प्रचारामागे केवळ मुस्लिम जनतेचे धर्मप्रेम अगर लीगबद्दलची निष्ठा नव्हती, तर भारतातील ब्रिटिश सत्ता खलास होऊ नये यासाठी धडपडणाऱ्या गोऱ्या नोकरशाहीची प्रेरणा व सामर्थ्य त्यांच्यामागे होते. सीमाप्रांताचे गव्हर्नर कनिंगहॅम हे हा डाव खेळत होते. एका बाजूस डॉ. खानसाहेबांचे जिगर दोस्त म्हणून त्यांच्याशी ते ब्रिजचे डाव खेळण्यात तासन् तास घालवीत आणि दुसरीकडे सत्ताभ्रष्ट झालेल्या नेत्यांना खेळवीत. दहावीस वर्षे ज्यांनी स्वार्थत्याग केला व कष्ट भोगले होते असे अनेक खुदाईखिदमतगारही आता आपल्या हाती सत्ता आलेली आहे, त्यातील अंशभाग आपणास मिळावा म्हणून उतावीळ झाले होते. त्यातील धोरणी, पाकिस्तानी लोकांना फितविण्यास लीगनेत्यांनी प्रारंभ केला होता. धर्मांधतेच्या प्रचाराला खंबीर बळी पडणारांचा एक वर्ग असतो. त्या सर्वांमधील सत्तेच्छू, स्वार्थी व पाकिस्तानी अशा लोकांना ब्रिटिश नोकरशाही खेळवीत होती.

डॉ. खान-मंत्रिमंडळ हे कनिंगहॅमच्या ताब्यात असलेल्या घोड्यावर स्वार झालेले होते आणि या परावलंबी जीवनाचे चटके त्यांना स्वतःच बसू लागले. त्यामध्ये स्वतः बादशाहखानांना डॉ. खानसाहेबांच्या पोलीसखात्याने अडवावे हा एक चमत्कार होता. तीन वर्षांनंतर सुटून आलेल्या बादशाहखानांना टिरटिराणच्या कार्यकर्त्यांना-मित्रांना भेटावयाचे होते. त्याप्रमाणे ता. दि. २८ जून रोजी हजारा जिल्ह्यातील मित्रांना भेटण्यास निघाले. बरोबर प्रां. काँग्रेसचे अध्यक्ष अलिगुलखान व चीफ पार्लमेंटरी सेक्रेटरी अमीर मुहमद हे होते. अमीर मुहमद यांच्याच गाडीतून ते निघाले होते. थोडा रस्ता पंजाबहद्दीतून होता. पेशावरहून

वादी सामान्य नागरिकांचे हक्कही अपल्याला उपभोगता येणार नसतील असे कोठलेही हुकूम आपण मानणार नाही " असे बजावले होते. या घटनेसंबंधी त्यांनी स्वतः काढलेल्या दि. ३० जुलैच्या पत्रात खानसाहेब या नाट्यमय अटकेचे वर्णन करताना म्हणतात "आता निदान सामानाची तरी व्यवस्था होईल व आराम मिळेल म्हणून मी थोडा खूष होतो, पण मग युसुफ गाडीकडे नेले जात होते हे लक्षात येताच मग आश्चर्य वाटले. रात्री १० च्या सुमारास आगगाडी जमरुदला पोचली तेथे गाडीचे दिवे गेले, त्यामुळे तेथेच मुक्काम थांबला. कोहाटचे पोलिस रोथ साहेब बसले त्यांनी आपल्या रोटीतील एक मग दिली व मी ती थोडी दुधाशी खाल्ली. रात्री एकचे सुमारास मुजफ्फरगड पुलापाशी आम्ही पोचलो (मीमासोनात) तेथे पोलिसांच्या जागेतच त्यांच्यासमवेत रात्र काढली मी आता स्वतंत्र झालो होतो. सकाळी तेथून मुजफ्फरगड सिदनगरागमह नमाज पढलो व चहा घेतला. नंतर रेल्वेगाडीने कॅम्बलपूरला आलो (पंजाब) परंतु माझ्याजवळ पैसे नव्हते त्यामुळे तिकिटही काढले नव्हते. मरदानने (पंजाब) माझ्या इच्छेविरुद्ध तेथे सोडले होते. तेव्हा ते मला अबोटाबादला जाण्याची व्यवस्था करतील अशी अपेक्षा होती, पण कॅम्बलपूरला मी पोचताच तेथील पोलिसाने मला एका लष्कराच्या लॉरीत चढवले व एखाद्या बदमाष गुन्हेगाराला पोलिसांच्या स्वाधीन करतात त्याच पद्धतीने त्यांनी मला अबोटाबाद पोलिसांच्या स्वाधीन केले" आणि बादशहाखान पुन्हा आपल्या भावाच्या राज्यातील स्वातंत्र्य उपभोगण्यास मोकळे झाले. वव्हेल-योजना येऊन गेली होती. भारताच्या पूर्व सीमेवरील युद्धात यश मिळावे म्हणून भारतीय नेत्यांचे हार्दिक साहाय्य मिळावे म्हणून अमेरिका चिवाईने प्रयत्न करीत होती. काँग्रेस नेते पुन्हा युद्धसह कार्यास तयार झाले होते. त्या काळात एका थोर भारतीय नेत्याची पिंड एखाद्या दर्शनाप्रमाणे निघू शकत होती! एखादा रोग जिव्हारी हे करू शकत होता! मुस्लिम लीगच्या निदर्शनामुळे शांतताभंग होईल म्हणून गफारखानांसारख्या नेत्यास जमावाच्या बाजून पोलिसांच्या लॉरीतून तो फिरू शकत होता, आणि डॉ. खानसाहेबांचे मंत्रिमंडळ पार्टीशी असताना ते काही करू शकत नव्हते! हे सर्व कसे घडू शकले हे समजत नाही! आमच्या स्वातंत्र्याचे स्वरूप आम्हास पटण्यास बादशहाखानांच्या या सोडण्याची जरूरी नव्हती. ते त्यांनी ठीक हेरलेले होते, पण त्यांच्या सहकाऱ्यांचे डोळे उघडत नव्हते. वेव्हेलसाहेब हे दगेखोर सगळे फळार्थीचे व्यादस्थीय होते असे प्रशस्तिपत्र मौ. आझाद यांनी दिलेले आहे आणि खानबंधू पठाण काँग्रेसवाल्यांचे योग्य ते आदरातिथ्य करीत नसत व त्यामुळे ते सीमाप्रांतात थोडे अप्रिय होऊ लागले होते असेही आझादांनी लिहून ठेवले आहे. लॉर्ड वेव्हेल यांची योग्यता आझादांना केव्हा पटली कळली असेल ते असो, पण

बादशाहखानांचे त्यागी व तेजस्वी जीवन त्यांना दीर्घकाल सुपरिचित असताना त्यांनी असे विधान केले कसे याचा विषाद वाटल्यावाचून राहात नाही हजारो तत्त्वनिष्ठ खुदाई-खिदमतगार बादशाहखानांनी तयार केले होते, ते चहा बिस्किटांच्या कृत्रिम आतिथ्यामुळे तयार झालेले नव्हते हे खिदमतगार आपल्या गरीब रोजीतून हजारो स्वयंसेवकांची शिबिरे चालवीत असत बाहेरच्या पैशाचा वारा आपल्यास लागू नये—वाधू नये, अशी त्यांना बादशाहखानाची शिकवण होती बादशाहखानांना भावी जातिद्वेषाच्या स्फोटाची स्वप्ने पडत होती असे दिसते, त्यामुळेच ते सिमला परिषदेत किंवा तसल्या कार्यक्रमात वावरतान दिसले तरी त्यांना त्या कार्यक्रमाबद्दल फारसा भरवसा वाटत नसे "माझ्या भावाची व माझी मने सारखी आहेत असे समजू नका मन्त्रिमंडळांना गरिबांचे प्रश्न सोडवण्याची शक्ती नाही मोठमोठ्या लोकांसाठी ती खेळणी आहेत" असे ते कार्यकर्त्यांना बजावीत आणि त्यांचे हे म्हणणे १९४५ मध्येच दोन वेळा अगदी भयानकतेने प्रचीतीला आले जुलैअखेर अटक-पुलावर त्यांना अटक केली होती तिचे वर्णन वर आलेच आहे त्या अटकेविषयी भारत सरकारने पाठलेल्या पत्रात खेद व्यक्त केला नव्हताच, उलट पंजाबसरकारचा पाठपुरावा केला होता शिवाय या अटकेच्या काळात गफारखानाची सर्व व्यवस्था नीट रीतीने ठेवली गेली होती असे धादांत खोटे विधान या सरकारी पत्रात केलेले आहे आपल्या खाण्यापिण्याचे हाल किती व कसे झाले होते ते स्वत बादशाहखानांनीच सांगितले आहे तेव्हा खरेखोटे कोण हे वाचक ठरवू शकतील.

त्यांच्या अपमानाचा प्रसंग एवढ्यावरच संपला नव्हता सप्टेंबर महिन्यात बादशाह-खानांनी पुन्हा हजारा जिल्ह्यात व पंजाबच्या छछ विभागात मित्रांच्या भेटीस जाण्याचे ठरवले या खेपेस त्यांनी काही खुदाईखिदमतगारांना आधी पुढे पाठवले सभा वगैरे न घेण्याचेही कळवले फक्त छछ विभागातील सर्व पठाण कार्यकर्त्यांना एकत्र भेटता यावे म्हणून ही व्यवस्था केली होती तेथून ते हजारा जिल्ह्यात (मॅनिग्यर) जावयाचे होते परंतु ते तिकडे जाण्यास निघण्यापूर्वीच कॅम्बेलपूर विभागाच्या कमिशनरतर्फे चारसद्दा येथे पंजाब-प्रवेशबंदीचा हुकूम त्यांवर बजावण्यात आला. बादशाहखान तत्काळीच पेशावरला गेले व तेथून मित्रांसमवेत अटकपुलाच्या रस्त्यास लागले अटकपुलावर प्रांतिय पोलिसांनीच बादशाहखानांना रोखले, पण थोडा वेळ फोनवर बोलणी झाल्यावर त्यांना जाऊ देण्यात आले, पण पुलाच्या दुसऱ्या टोकाला पोचताच त्यांना अटक करण्यात आली पहिल्या खेपेप्रमाणेच सारा तमाशा झाल्यावर त्यांना अबोटाबादमध्ये नेऊन सोडण्यात आले

पंजाबच्या अनुभवाप्रमाणेच बादशाहखानांना काश्मीरनेही नवा अनुभव दिला तीन ऑगस्टला काश्मीर परिषदेची बैठक सुपूर येथे भरली होती शेख अब्दुल्लांच्या खास निमंत्रणा

बम्न बादशाहखान तिकडे गेले पडितजी सिमला परिषदेनतर काही दिवस विश्रांतीसाठी काश्मीरमध्ये राहिले होते. तेही या परिषदेस उपस्थित राहिले होते जनतेने या दोन्ही थोर नेत्यांना शब्दश अलोट प्रेमाची व त्यावरोबर काश्मिरी फुलांची वृष्टी केली, पण या देशात जनता व तिचे लाडके नेते याच्याशिवाय एक तिसरी शक्ती होती या फुलांपाठोपाठ त्यांच्यावर दगडांचीही वृष्टी झाली पन्डितजी व शेख अब्दुल्ला यांना थोडा मार बसला हे दगड फेकणार हात कोणाचे होते ? काश्मीरच्या महाराजाच्या हस्तकांचे ते दगड होते, हे खरे, पण मुस्लिम लीगचे नेते तेथे आले असते व त्यांची परिषद भरती तर हे दगड आले असते का ? स्वातंत्र्यासाठी झगडणाऱ्या सर्व शक्तींना दुर्बळ करण्यासाठी हे सर्व घडत होते देशातील जातिवादी सस्था, सस्थानिक आदी प्रतिगामी लोकांकडून राज्यकर्तेच हे करून घेत होते अब्दुल गफारखानाच्या अनुभव घेऊन बादशाहखान सुपूरच्या परिषदेला आले होते तेथील दगडमारात ते स्वत सापडले नव्हते, पण या दगडफेकीबद्दल त्यांनी लोकांचे अभिनदन केले "दगड फेकण्याइतके धैर्यवान तुम्ही झालात ही तुमची थोडीथोडकी प्रगती नाही बाहेरचे नेते आले म्हणजे तुम्ही त्यांना पाहाण्यासही घाबरत होता ! आता त्यांच्यावर दगडफेक करण्याएवढे धैर्यवान तुम्ही झालात हेच भाग्य मानले पाहिजे " असे उद्गार त्यांनी या बैठकीत काढले सस्थानी जनतेच्या लढ्यांना काँग्रेस नेते प्रोत्साहन व साहाय्य करीत असत तर त्या चळवळी दडपण्यासाठी सस्थानिकांना सर्व प्रकारचे साहाय्य राज्यकर्ते व जातिवादी करीत होते या दुसऱ्या प्रकारचे चित्र सुपूर येथील सस्थानी प्रजापरिषदेत दिसून आले सरकारच्या या धोरणात लोकहित किंवा लोकशाहीचे सरक्षण याचा सबध कोठे पोचत होता का ? खाय लोकनेत्यांना दगडमार खावा लागणाऱ्या लोकशाहीच्या उदयाचे ते प्रसादचिन्ह होते

सिमला परिषद जीनांच्या दुराग्रहामुळे मोडली हा डका जगभर झालेला आहे व ते खरेही आहे मध्यवर्ती सरकारसाठी निवडावयाचे मुसलमान प्रतिनिधी फक्त मुस्लिम लीगच निवडू शकेल, तो अधिकार अन्य कोण्या सघटनेला राहाता कामा नये हा जीनांचा आग्रह मान्य करण्याचे खापर लॉर्ड वेव्हेल यांच्या माथी मारले जाते, स्वत वेव्हेल स्वतत्र मुसलमान नेत्यांचीच निवड करू पाहात होते, पण भारतमत्री ॲमरी यांच्या दडपणामुळे वेव्हेल बदलले होते, तसेच काँग्रेसअध्यक्ष आझाद यांनीहि गांधीजी व कार्यकारिणीचे इतर सदस्य यांना कळू न देता तसल्या देशविघातक धोरणाचा पुरस्कार केला होता हे आता बाहेर आलेले आहे मा आझादाच्या त्या विलक्षण धोरणावर आता पुरा प्रकाश पडलेला आहे

केवळ लीग प्रतिनिधित्वाच्या मुद्द्यावर कॅबिनेट मिशन योजना उधळली जाऊ नये म्हणून आझादांनी तो विषाचा घोट घेण्याचे धाडस केले असे या बनावाचा स्पोट करणारे सुधीर घोष मानतात तेच समजनीयही आहे मुख्य प्रश्न हे बोलदांडे घालणारे कोण ? ब्रिटिश

राज्यकर्ते का जीनासाहेब? आझादांनी केलेले वर्णन क्षम्य का अक्षम्य हा वेगळा प्रश्न आहे. काँग्रेस नेत्यांच्या प्रतिष्ठेच्या दृष्टीने ती महाभयंकर घटना ठरली आहे, पण जीनांच्या मागणीचा पाठपुरावा करणारे ॲमरी होते याचा एक मासला पुढील जीनांचे एक वेळचे उजवे हात खलिक उज्जमान यांच्या आत्मचरित्रात आहे ते म्हणतात :

"This was the last memorable act of Mr. Amery before he handed over charge of his office" (Pathway to Pakistan, p 368) हा उल्लेख लीगच्या एकमेव प्रतिनिधित्वाबद्दलचा आहे

ही ब्रिटिश राजनीती बादशहाखानांना सहन होत नसे त्यांच्यासंबंधीचा त्यांचा अविश्वास खोलवर मनात रुजलेला असल्याने ते राज्यकर्त्यांशी विचारविनिमय करण्यास तयार होत नसत, यामुळे पार्लमेंटरी पद्धतीच्या कार्यक्रमामधी त्यांना फारशी आस्था वाटत नसे, पण त्या कार्यक्रमांतही त्यांना भाग घ्यावा लागेच

गव्हर्नर कनिंगहॅम यांच्या कारवायांचा वर उल्लेख आलेलाच आहे सीमाप्रांतात अन्नाचा दुष्काळ वाढत होता व औरंगजेबमंत्रिमंडळाच्या काळात लाचलुचपतीने भ्रष्ट झालेली नोकरशाही वठवून घेण्याचे काम डॉ खानसाहेबांच्या गळ्यात अडकविण्यात आले होते डॉ खानसाहेब मंत्रिमंडळाने लाचलुचपतीची ही घाण शोधून काढावी म्हणून एक चौकशीमंडळ नेमले व चौकशीही केली, पण ती घाण कनिंगहॅमनी बाहेर काढू दिली नाही, तो अहवाल तसाच अखेरपर्यंत अंधारात राहिला या दुर्बलतेच्या प्रकारामुळे काळ्या बाजाराशी संबंधित असलेले काळे व गोरे अधिकारी पण खानमंत्रिमंडळाचे छुपे शत्रू बनले या सर्व पार्श्वभूमीवर मुस्लिम लीगचा (धर्म ?) प्रचार सीमाप्रांतात सुरू झाला होता वस्तुत औरंगजेब मंत्रिमंडळामुळे सीमा प्रदेशावर अनेक आपत्ती ओढवल्या होत्या, त्यापैकीच तेथील दुष्काळ हाही एक होता लोकांसाठी आलेले धान्य लोकांपर्यंत कधी पोहोचलेच नाही, पण अगल्या कृष्णकर्मांमुळे हाकलले गेलेले मंत्री व त्यांचे पाठीराखे धर्मरक्षक मुल्ला मौलवी, यांनी खानमंत्रिमंडळाविरुद्ध खोट्या प्रचाराची राळ उडवण्यास आरंभ केला डॉ खानसाहेबांच्या मुलीचा विवाह व हजरा जिल्ह्यातील शीख मुलीचे धर्मांतर यासारख्या कारणावरून पेशावरच्या मुस्लिम लीगवाल्यांनी तेथे धुमाकूळ कसा उठवला याचा थोडा उल्लेख पूर्वी आला आहे या चळवळीत पेशावरमध्ये बायकांनी १९४५ मध्येच 'ले के रहेंगे पाकिस्तान। बटके रहेगा हिंदुस्थान' असा फाळणीचा घोष गाजला होता, आणि निरनिराळ्या कारणांमुळे काँग्रेसमध्ये असंतुष्ट झालेले कार्यकर्ते मुस्लिम लीगमध्ये जाऊ लागले होते या काँग्रेसविरोधी आंदोलनाचे नेतृत्व अनेक वेळा काँग्रेस चळवळीत तुरुंगवास भोगलेले अरबाब अब्दुल गफूरखान यांचेकडे होते व त्यांच्यामागे गोरे अधिकारी जमीनदार व नबाब अशी ही साखळी बांधली गेली होती कारण

स्वररत्न जीनासाहेबांचे तेथे आगमन व्हायचे होते, निवडणूकप्रचाराच्या निमित्ताने भारतातील इस्लामधर्मावरील संकटाचा संदेश त्यांना सीमाप्रदेशात पोहोचवावयाचा होता सिमला परिषदेच्या वेळी जीनासाहेबांनी एकमेव प्रतिनिधित्वाचा केलेला दावा व्हेवेल्नी मानला नव्हता. ते शल्य जीना उपटून टाकण्यास बद्धपरिकर झालेले होते आणि त्यांच्यासाठी पायघड्या घालून ठेवण्याचे काम डॉ खानसाहेबांचे दोस्त गव्हर्नर कनिंगहॅम व इतर अधिकारीच कसे करीत होते याचे वर्णन बॅ युनुस यांनी केले आहे ते म्हणतात, 'Meanwhile the forces of reaction were mustering and we have sufficient proof in our hands that the Governor and the entire hierarchy of officials were shepherding the powerful landlords into the league-fold All the big Pirs suddenly came out of their hiding places and sinking their differences over ”

“ खुद्द तुर्कस्थानच्या क्रांतीच्या वेळी तर खुद्द तुर्कांना या मुल्लामौलवींनी काफीर ठरविले होतेच या फकिरांच्या कारनाम्यांनी इस्लाम पोखरून काढला गेला होता अमानुल्लांच्या विरुद्ध यांनीच फतवे काढून ब्रिटिशांना पुरविले होते मध्यपूर्वेचा इतिहास मुस्लिम धर्मनेत्यांच्या या कार्यावरुद्ध धारस्थानांनी भरलेला आहे, आणि आपल्या राज्यकर्त्यांच्या गरजेच्या वेळीही हे नेते अगदी देवांनी धाडावेत अशा रीतीने त्यांच्या मदतीला येतात ’ ( युनुस )

सीमाप्रांतातील जीनासाहेबांच्या स्वागतार्थ अशाच धर्मपुरुषांचे जथे पोलिटिकल खात्याच्या प्रेरणेने मर्दान जमू लागले होते ने नोव्हेंबरअखेर जीनांनी पेशावरला धावती भेट दिली पठाणांच्या पाठिंब्यावर त्यांचा केव्हाच विश्वास नव्हता, पण ठिकठिकाणी झालेल्या यांच्या राजशाही स्वागताने त्यांचेही डोळे दिपून गेले ' सरहद्द प्रांत हा मुस्लिम लीगमागेच आहे ' मुद्दलीराला शोभावा अशा घोषात ते सीमाप्रांतातून परत गेले या परिस्थितीने गांगरलेल्या काँग्रेसकार्यकर्त्यांनी बादशहाखानांना निवडणुकीच्या प्रचारकार्यात साहाय्य करण्यासाठी कार्तुव्हर्तीने विनंती केली, तरीही त्यांनी त्या कामात विशेषसे लक्ष दिले नाही लोकांनी बादशहाखानांच्या स्थिती तरी निवडणुकी स्वत काढल्या होत्या ! त्याच रस्त्यावरून जीनांचीही निवडणूक निघाली पाहणारे लोकही कदाचित तितकेच असतील, एक निवडणूक लोकांनी स्वत व सरकार विरुद्ध असताना काढलेली तर जीनांची निवडणूक सरकारी साधनसामुग्रीतील दारूगोळा अधिक उडवून झालेली येथे जनता फक्त प्रेक्षक होती पण हा फरक भोळ्याभाबड्यांच्या डोक्यात उतरण्यास वेळ लागतो जनतेचे अज्ञान हेच राजकीय नेत्यांचे मोठे भांडवल असते

सरकारी अधिकाऱ्यांच्या गुप्त कारवाया व पीर फकिरांचे उघड चाळे यांमुळे बादशहा

खानांना गूप्त दु:खित केले; त्यामुळे लोकांचे गैरसमज दूर करण्यासाठी म्हणून ते निवडणुकीच्या प्रचारार्थ बाहेर पडले. डिसेंबरमध्ये मध्य कायदेमंडळाची निवडणूक झाली. सीमाप्रांताच्या एका जागेसाठी ही लढत होती. जीनासाहेबांनी मॉन्टियर जिंकल्याच्या घोषणा रतन.च केल्या होत्या. तरीही मुस्लिम लीगतर्फे ही निवडणूक त्यांनी लढविली नाही. लीगपुरस्कृत पण स्वतंत्र उमेदवारातर्फे ही निवडणूक लढविली गेली. कारण दिले की 'हा संयुक्त मतदार संघ आहे'. जेथे बिगर मुसलमान पाच-सहा टक्के तेथे संयुक्त मतदार संघाची भीती वाटण्याइतके जीनासाहेब अनभिज्ञ होते, का मॉन्टियर जिंकला, हा त्यांचा घोषच फुसका होता? बरे, संयुक्त मतदार संघ हे त्यांना धोक्याचे वाटले म्हणावे तर जमीनदार मतदार संघाच्या जागेसाठी मात्र लीगने सार्वत्रिक निवडणुकीच्या वेळी आपले अधिकृत उमेदवार उभे केले. हा जमीनदार वर्ग हमखास सरकारी अधिकाऱ्यांच्या ताब्यात आहे हे आश्वासन त्यांना पोहोचल्यानंतरच त्यांनी तो निर्णय घेतला होता. साऱ्या भारतात लीगला सार्वत्रिक निवडणुकीत भरघोस यश आले होते हे सत्य असले तरी सीमाप्रांतातील परिस्थिती वेगळी होती व त्याचे कारण खुदाईखिदमतगारांनी दीर्घकाळ केलेली जनतेची सेवा हेच होते, ते जनतेचे जीवन जगत होते व तिच्या सुखदु:खाशी एकरूप झालेले होते, पण हा सेवेचा डोंगरही स्वार्थ व मत्सर यांनी लवकरच पोखरून काढला. डिसेंबरमधील प्रचारासाठी बाहेर पडताच पहिल्याच व्याख्यानात

बादशाहखानांचा प्रभावी प्रचारच या निवडणुकीच्या वेळी काँग्रेसच्या यशाला कारणीभूत झाला. मध्यवर्ती असेंब्लीची जागा काँग्रेसलाच मिळाली. पण त्याचप्रमाणे नंतरच्या सार्वत्रिक निवडणुकीत काँग्रेसला भरघोस यश लाभले. मुस्लिम लीगला त्यामुळे ते यश होते वा अपयश होते हे त्यांनीच वाल्यास शोधावे.

त्यांना मिळालेले उमेदवार योग्य व क्षमेचे होते. त्याच्या यशामागी कोणी व कसा प्रचार केला हा विचार पाकिस्तानच्या पुरस्कर्त्यांनी अद्यापी करणे तिथेच आहे. सीमाप्रांतात हा ब्रिटिशांच्या विशेष जिल्ह्याचा प्रश्न असल्याने पोलिटिकल खात्याने त्या बाबी तयार दिलेल्या होत्या. रेफरेन्डम विषयीचा होता. तिनक्याच ब्रिटिश जनतेने पुन्हा एक बळ बादशाहखानांना साथ दिली. त्यांचा निवडणूकद्वारा चालू असतानाच ब्रिटिश पार्लमेंटमधील डेलिगेशनचे सभासद सीमाप्रांतात आले. यावरूनही या प्रांताचे स्थान त्या वेळी किती महत्त्वाचे मानले जात होते हे दिसून येते. नौशेरा येथील एका सभेत बादशाहखानांचे व्याख्यान चालू असता या शिष्टमंडळाचे काही सभासद तेथे पोचले. या निवडणुकीच्या निर्णयानंतर आश्वासनाप्रमाणे हा देश सोडून निघून जाण्याची टाळाटाळ ब्रिटिश करू लागले तर तुम्ही त्यांच्या विरुद्ध लढा करण्यास मजबरोबर याल किंवा नाही? हा प्रश्न ऐकताच सभेतील लोकांनी अनुमतीचे जोरदार घोष केले. या सभेतील लोकांचा उत्साह पाहून नंतर बादशाहखान यांच्याशी झालेली त्यांची बोलणी यासंबंधी या सभासदांनी काढलेल्या उद्‌गारांवरून सीमाप्रदेशातील जागृती व बादशाहखान यांचे नेतृत्व व व्यक्तिमत्त्व यामुळे ते खूप प्रभावित झाले होते असे दिसले.

बादशाहखान यांच्या प्रचाराचा योग्य तो प्रभाव पडला. मुस्लिम लीगच्या नावाखाली सरकारी अधिकाऱ्यांनी जो गोंधळ घातला होता त्याचा फारसा दुष्परिणाम घडला नाही. दहेली दहशत याला न जुमानता मतदारांनी निर्भयपणे व सुसंघटितरीत्या मतदान केले. काही मतदानकेंद्रावर मात्र अधिकाऱ्यांनीच मतदारांना फसविले. या चुरशीच्या लढ्यात ५० पैकी ३२ जागा काँग्रेसने मिळविल्या. १९३७ मध्ये काँग्रेसला फक्त १९ जागा जिंकता आल्या होत्या. १९४६ च्या या निवडणुकीत ज्या जागा मुस्लिमलीगला मिळाल्या त्या मुख्यतः पुष्कळ मानिक लोकसंख्या कमी असलेल्या हाजारा व मदान जिल्ह्यांत मिळाल्या. त्यांनी फार थोड्या मतांनी काँग्रेसने गमावलेल्या होत्या. अशी वस्तुस्थिती असता सीमाप्रांतात लीगचा विजय झाल्याच्या वार्ता सर्वत्र पसरविल्या गेल्या. मुस्लिम लीगच्या या दहेलीचा व प्रचाराचा परिणाम काँग्रेस नेत्यांवर थोडासा झाला होता हे श्री. आझादांच्या टीकेवरूनही दिसते.

"सीमाप्रांतात खानबंधू व काँग्रेस सरकार हे अप्रिय होत चालले आहे. तथापि तरी पंत लीगच्या मताचे आहे. ही हर्षे वगैरे यांची माहिती होय. आझादांच्या विधानांचा

मोर्च्यावर झाला. या सभेचे नेतृत्व मांकी शरीफचे पीर याचेकडे होते, हे पीरसाहेब खरेखरच लीगचे प्रमख नेते म्हणून पुढे आले या दगलीत बादशाहखान नेहरूंच्यावरील दगड झेलण्यासाठी पुढे झाले असता ते दगड दोघांनाही लागले. दोघांचेही रक्त तेथे सांडले. " आमचे दोघांचे रक्त एकत्र सांडले यात वाईट काय झाले? भारत व सीमाप्रांत तितके जवळ येतील." असे उद्गार नेहरूंनी नतरच्या कार्यकर्त्यांच्या बैठकीत काढले नेहरू-भेटीच्या वेळी घडवून आणलेल्या दगलीसबधी सरदरयाव येथील- जाहीर सभेत गफार-खान म्हणाले, "व्हाइसरॉय व गव्हर्नर यांना नेहरूनी इकडे येऊ नये असे वाटत होते नेहरूनी ते ऐकिले नाही आमच्यात अतर्गत यादवी निर्माण व्हावी व आमचा नाश व्हावा हा ब्रिटिशाचा हेतू आहे. या घडलेल्या सर्व घटना पूर्वनियोजित होत्या हे घडवणारा इंग्रज स्वत च्या घरी मागे बसतो व आमच्या लोकांकडून आमचा अपमान करविला जातो"

पडितजींच्यावरील या हल्ल्यामुळे बादशाहखानांच्या प्रांतातील वातावरणही किती दूषित होऊ लागले होते हे स्पष्ट झाले डॉ खानसाहेबाची सत्ता किती पोखरलेली होती हेही स्पष्ट झाले, पण त्यावर इलाज करण्यास त्यांना उसत मिळाली नाही दिल्लीत नित्य नव्या घडामोडी होत होत्या. कॅबिनेट मिशन योजना मुस्लिम लीगवर बधनकारक होती असे एका बाजूने वेव्हेल नेहरूना सांगत होते, तर निरनिराळे पेचप्रसग निर्माण करून लीगची शक्ती वाढविली जात होती तात्पुरत्या सरकारातून अलिप्त राहणे गैरफायद्याचे होईल हे ओळखून महिनाभरातच लीगने आपली चूक दुरुस्त केली नेहरूंच्या सल्ल्याशिवाय वेव्हेलनी लीगला सरकारात आणण्याची ही घटना घडवून आणली होती घटनापरिषदेवरील बहिष्कार स्पष्टपणे मागे घेण्यापूर्वीच लीगचे प्रतिनिधी हगामी सरकारमध्ये येऊ देण्यात वेव्हेलनीच कॅबिनेट मिशनचा अर्धा भाग खची केला होता देशात दगे व रक्तपातसारात दडेली करून लीगचा विजयी वारू वेव्हेल यांनीच दिलेल्या साहाय्याने थैमान घालत होता या सर्व घटनाक्रम वागघाटीत व्हाइसरॉय व त्यांची नोकरशाही यांचे साहाय्य लीगलाच बळकट करण्यास झाले आहे, असे करण्यात कॅबिनेटला दिलेले आश्वासन लाथाडले जात आहे हे नेहरूनी त्यांना वारवारस्यानतरही असहाय्यता व्यक्त करण्यापलीकडे वेव्हेलनी काही केले नाही मग सीमाप्रदेशात गव्हर्नरच्या साहाय्याने कय्यूमखान व मांकीशरीफचे पीरसाहेब यांच्या द्वारे तेच प्रयोग डॉ खान मत्रिमडळावर चालू राहावेत हे स्वाभाविकच होते

नेहरूंच्या भेटीच्या निमित्ताने पेशावरला सुरू झालेल्या दगली पुढे पतप्रधानांच्या बगल्यात शिरून केलेल्या, अशा अगजवात हे मत्रिमडळ टिकाव धरू शकले हेच विशेष होते नॅशनल गार्ड्सच्या दगलीपुढे पजाबात खिजर हयातखान मत्रिमडळाने निगच्या दिवशीच राजिनामा देऊन गव्हर्नरचे राज्य सुरू होऊ दिले होते.

हजारा येथे सुरू झालेली दंगल जरी एका बाटवलेल्या बाईच्या निमित्ताने सुरु झाली होती, तरी तिला पुढे पाकिस्तानवाद्यांच्या स्वप्नाचे वळण लवकरच देण्यात आले आणि त्या प्रचारामुळे शामधारा, ओघी, बालाकोट, पाग्न, बेखुड इत्यादी गावी दंगे सुरू झाले नाथियागली व राजोइया या गावी अल्पसंख्यांकांची लूटमार झाली तीच तऱ्हा डेरा इस्माइलखान जिल्ह्यात भयाण स्वरूपात पेटली त्या अत्याचारातील सरकारी सहकार्याचे भयाण स्वरूप पाराचिनार येथील निर्वासित छावणीमधील असहाय्य स्त्रिया व बालकांवरील हल्ल्याच्या वेळी दिसून आले मुस्लिम लीगमध्ये अलीकडेच गेलेले व पूर्वीचे खुदाई खिदमतगार अरबाब अब्दुल गफूर, आगाबाबा वकील, पिंदा मुहमदखान वकील, हाजी करीम इलाही वगैरेंनी या दंगलीचे नेतृत्व केले, त्यांना पकडून डॉ खानसाहेबांनी तुरुंगात टाकले परंतु त्याचाच उपयोग प्रचाराला करून घेऊन मुस्लिम लीगने सर्व प्रांतभर चळवळ पेटवली

पण ज्वेव्हा पोलिस व लष्कर जनतेच्या संरक्षणास असमर्थ ठरले किंवा त्यांनी काँग्रेस सरकारला दगा दिला त्या वेळी खुदाईखिदमतगारांचे सामर्थ्य प्रचीतीला आले डॉ खान साहेबांनी खुदाईखिदमतगारांचे साहाय्य पेशावर शहरात शांतता राखण्यासाठी मागितले खेड्यापाड्यांतून हिंदूशीख प्राणभयाने शहराकडे पळत सुटले पेशावरला पोहोचल्यावरही कॅन्टोन्मेंट भागात लष्करी व पोलिस चौक्यांसमोर हिंदूवर हल्ले चढवले गेले मंत्रिमंडळाची बैठक चालू असताना ( एप्रिल १९४६ ) व राजधानीच्या शहरातही काँग्रेस सरकारची सत्ता चालू शकत नाही असा बाका प्रसंग गुंडांच्या द्वारा उभा केला गेला ! अशा वेळी निरोप जाताच बावीस तासांत दहा हजार लाल डगलेवाले शहरात येऊन खडे झाले त्यांच्या येण्याबरोबर शहरातील अल्पसंख्यांकांना धीर आला इतकेच नव्हे तर त्यांच्यापुढे दंगलखोरांनी माघार घेतली केवळ त्यांच्यामुळे पेशावरला काही काळ शांतता लाभली याचा उल्लेख न्या खोसला यांनी केलेला आहे तसेच ' प नेहरूंच्यावर देशखिंडीत जेव्हा दगडमार झाली व त्यांच्यावर हल्ला करण्याच्या हेतूने टोळीवाले जमले होते, त्या वेळी खानबंधूंचे नेतृत्व व जागरूकता यामुळेच नेहरूंना दगाफटका होऊ शकला नाही ' असाही निर्वाळा न्या खोसला यांनी दिला आहे

फाळणीच्या दंगलीच्या ज्वाला सर्व बंगालमध्ये पसरण्यास वेळ लागला नाही नोआखलीच्या आक्रोशाने सारा देश हादरला त्यांच्या वेदनांची जाणीव इतरांना फक्त गांधीजींच्या प्रायोपवेशनाने व नंतरच्या पदयात्रेने झाली मनुष्याला त्याच्या दु खाची जाणीव त्या त्या वेळीच होते असे नाही खून चढलेल्या माणसाचे अंगेच असते हातपाय तुटलेली माणसे रडत रहतात ती वरी व कशाच्या बळावर? त्यांच्या वेदनांची जाणीव तो सर्व सफ्गा

नंतरच येत असणार फाळणीच्या धुमाळीच्या वेळी परस्परांना आव्हान देणारे नेते त्या बलिदानातच नव्हे तर कसल्याच धोक्याच्या क्षेत्रात नव्हते! देशाच्या शांततारक्षणाची हमी घेणारे सरकारही कोठे व कोणत्या स्वरूपात अस्तित्वात होते हे स्पष्ट झालेले आहे! मग दंगलींच्या वेळी प्रत्यक्ष लष्करही तेथे पुरे पडू शकले नाही यात आश्चर्य कसले! अशा अत्याचारी वातावरणात गांधींचा उपचार ( one man boundary force ) " लोकांना शांत करण्याचा चमत्कार करू शकला " असे उद्गार माउंटबॅटन यांना काढावे लागले ऑगस्टमध्ये गांधीजींनी नोआखालीच्या कत्तल-दंगलींनी व दलदलींनी व्यापलेल्या खेड्यापाड्यांतील जनतेत जी माणुसकी जागृत केली तिला इतिहासात तोड नाही! सारे आकाश कोसळल्यावर पण महान शांतिवीर पुरुषच जे करू शकेल ते गांधीजी करीत राहिले होते, आणि त्यांच्या निष्ठेशी समांतर रेषेने व स्वयंभूपणे वागणारे बादशहाखान त्याचसाठी बिहार कडे धावले नोआखालीत बहुसंख्य मुसलमानांनी जी पशुता जागृत होऊ दिली तिचे प्रत्युत्तर बिहारमधील बहुसंख्य हिंदूंनी तसेच दिले हिंसेच्या मार्गानेही माणसाने माणुसकीचा विकास साधलेला आहे केव्हा केव्हा आत्मरक्षणार्थ त्याला तो मार्ग पत्करावा लागतो, केव्हा केव्हा ते कर्तव्यही ठरते भावनांच्या आगी पेटवून त्यात अख्ख्या समाजाची होळी होऊ देणाऱ्या क्रूर व भ्याड नेत्यांपेक्षा स्वतःच्या जिवाचे मोल देऊन लढलेले लोक निदान प्रामाणिक होते ते वाट चुकलेले व भावनांना बळी पडलेले असल्यामुळे त्यांना समजावून सांगणे शक्य असते तोच अनुभव गांधीजींना आला प्रत्यक्ष भारी थैमान घालीत असता निबिड वनातील एकाकी खेड्यात त्यांनी आपल्या सातही साथींना एकाकी सोडून दिले होते वाघसिंहांनी व्यापलेल्या जंगलात हरिण ससांच्या पाडसा-पिलांना मुक्त संचारार्थ सोडण्यासारखा अचाट धैर्याचा तो प्रयोग होता एकेकाला एकेका खेड्यात जाऊन राहण्यास सांगितले हिंदू स्त्रियांची विटंबना व कत्तल करणाऱ्या मुस्लिमांच्या शेजारी त्यांना वस्ती करण्यास सांगितले या सातांमध्ये आभा गांधी, अमतुस सलाम, सुशीला नय्यर, सुशीला पै या चार तरुण सेविका होत्या धन्य त्यांची गांधीजींवरील निष्ठा व धन्य त्यांचे शौर्य! या तरुण भगिनींनी त्या वेळी केलेली बलिदानाची तयारी, त्यासाठी दाखवलेले धैर्य अलौकिक व अजोड स्वरूपाचे आहे

बिहारमधील अत्याचारांच्या बातमीने नेहरू सरकार गडबडले स्वतः नेहरू तिकडे धावले हिंदूंची प्रतिक्रिया स्वाभाविक होती की नाही हा प्रश्न नव्हता! सर्व देशभर असे प्रकार घडल्यास येथून परत जाऊ नका असा अर्ज ब्रिटिशांना करणे एवढाच मार्ग उरला असता, अविवेक, अमानुषता यांनी उफाळलेल्या काळात अपार उंचीची दोन नररत्ने बिहारी ज्वालामुखीच्या खोऱ्यात उतरून तेथे शांत चित्ताने ते सेवा करू शकले

बादशाहखानांना आपल्या प्रांतातील या दृष्टीने भरपूर काम वाढून ठेवलेले होतेच, पण भागात इतरत्र आग पेटू लागल्याने त्यांना विशेष निकडीची निमंत्रणे आली. बिहारच्या काँग्रेस व मुस्लिम लीग कार्यकर्त्यांच्या आग्रहाला त्यांना नकार देता आला नाही. बिहारमध्ये खेड्यापाड्यांतून मुस्लिमांच्यावर भीषण अत्याचार केले गेले. गांधींचा मानला गेलेला बिहार हिंसेकडे इतका कसा वळू शकला? याचे उत्तर त्या वेळी राजेंद्रबाबूही देऊ शकले नाहीत.

गांधीजी किंवा सरहद्द गांधी या दोघांना स्वतःची जात अशी थोडीच होती? परंतु त्यांच्या जन्माची जात जनता विसरत नव्हती. हिंदू गांधी प्रक्षुब्ध मुसलमानी विभागात मुसलमानांना समजावण्यासाठी व अल्पसंख्याकांना धीर देण्यासाठी गेले, तर बिहारमधील बहुसंख्य हिंदूंना भेटण्यासाठी व मुसलमानांना धीर देण्यासाठी बादशाहखान पाटण्याकडे रवाना झाले. त्यांच्या आदेशानुसार शेकडो खुदाई खिदमतगारही निघाले होते. त्यांच्या या कामाची विशेष मोठी नोंद नाही. हिंसा आणि दहशत कमी होण्याच्या मार्गाला लागलेली होती, तेथे कामाच्या नोंदीच्या चोपड्या व वर्तमानपत्री अहवाल कोण लिहून ठेवणार? बादशाहखान खेड्यापाड्यांतून फार हिंडले आणि भीतिग्रस्तांना धीर देण्याचा त्यांनी प्रयत्न केला. त्यांच्या साध्या शब्दांचा प्रभाव हिंदूंच्यावरही खूप पडला. मुस्लिमांनाही त्यांच्या सद्भावाचा उपयोग झाला. पाटणा येथे एका गुरुद्वारामध्ये त्यांचे व्याख्यान झाले. आपल्यास चोहोकडे अंधार दिसत असल्याचे त्यांनी सांगितले. सत्तेच्या राजकारणाबद्दल त्यांनी घृणा व्यक्त केली व सर्व देशभर परस्पर द्वेषाचा जो प्रचार केला जात आहे त्याबद्दल होणाऱ्या वेदना व्यक्त केल्या. "एक खुदाई खिदमतगार म्हणून आपल्याला दुःखितांची सेवा करता यावी एवढीच इच्छा आहे" असे त्यांनी कळकळून सांगितले. सभेत झालेल्या प्रभावामुळे तेथील श्रोते सभेनंतर शेजारच्या मशिदीत एकत्र जमून गेले व परस्परांना प्रेमाने भेटले. दुसऱ्या एका सभेत ते म्हणाले, "हिंदुस्थान हा हिंदू-मुसलमान या दोघांचा एकच देश आहे. काही प्रांतांत मुसलमान अल्पसंख्य आहेत, तर काही प्रांतांत हिंदू. बिहार व नोआखली येथे जे घडले ते सर्व भागांत घडेल तर या देशाचे भवितव्य संपले म्हणावे लागेल. प्रांतातील मंत्रिमंडळे आपल्या प्रांतातील उद्रेक रोखण्याचे सामर्थ्य दाखवू शकली नाहीत. आपण खरे मुसलमान असू तर आपल्या बांधवांमध्ये आपण अधिक सहिष्णुता वाढविली पाहिजे. आज इतर जमातीच अधिक सहिष्णू आहेत. आमच्यातील हा दोष आपण दूर केला पाहिजे, तरच आम्ही खरे मुसलमान ठरू. इस्लाम हा जगात सर्वांत अधिक सहिष्णू धर्म आहे."

थोड्याच दिवसांत गांधीजींशी बिहारमधील अल्पसंख्याकांना आश्वासन देण्यासाठी आले मंत्री व अधिकारी यांच्यावर करण्यात येणाऱ्या आरोपांचीही त्यांनी चौकशी केली. लोकांच्या

भावनांची माहिती घेतली. बादशहाखान त्या वेळी कोठे तरी दूर खेड्यात होते. त्यांनाही त्यांनी बोलावून घेतले. देशात भडकणाऱ्या एकंदर क्रौर्याच्या वातावरणाबद्दल उभयतांना चिंता वाटत होती; पण निराश होणारा तो सत्याग्रही नव्हे. बादशहाखानांनी उभय जमातींच्या नेत्यांना प्रेमाने व कडकपणानेही समजावले. मंत्रिमंडळाने त्याच्या सल्ल्याचा स्वीकार केला होता. राजकारणी लोकांचे क्षुद्र व लोकहितविघातक धोरण पाहून ते व्यथित होत. अशा राजकारणात आपण राहू नये असेही त्यांना या वेळी वाटू लागले, पण राजकारणापासून अलग होणे म्हणजे हवा व पाणी यापासून वेगळे होण्याच्या प्रयत्नासारखे असते; संपूर्ण जीवनाला व्यापणारे असे ते आहे. सूर्यप्रकाश जितका लाभेल तेवढे हवा-पाणी शुद्ध राहते. त्याप्रमाणे थोर लोक राजकारणाशी जेवढा संपर्क ठेवतील तेव्हढे ते शुद्ध राहू शकते. हा अनुभव बादशहाखानांना अनेक वेळा त्यांच्या प्रांतात आलेला होता. अपरिहार्यतेने त्यांना राजकारणाशी संपर्क ठेवावा लागे, पण त्यामुळे राजकारण शुद्ध राखण्यास मदत होत असे बिहारमध्ये दौऱ्यात असता गांधीजींना लिहिलेल्या एका पत्रात ते लिहितात, " सभोवारचे राजकारणी लोक जेव्हा धर्माच्या व देवाच्या नावांचा उपयोग द्वेषाचा फैलाव करण्यासाठी करतात तेव्हा राजकारणाचा मला तिरस्कार वाटू लागतो. आपण म्हणता ते खरेच आहे. आपल्या अहिंसानिष्ठेची ही कसोटी आहे. "

मार्चमधील दौऱ्यात ते गांधीजींच्याबरोबरच राहिले, पण त्यांचे लक्ष आपल्या प्रांताकडे सारखे लागून राहिले होते तेथेही आग पेटवण्याचे शिस्तीने प्रयत्न सुरू होते. हजारा जिल्हा हा मुस्लिम लीगचा बालेकिल्ला. तेथे उर्दू भाषेचे लोक बहुसंख्य होते. गेल्या निवडणुकीत लीगला मिळालेल्या एकूण १७ जागांपैकी ११ जागा फक्त हजारा जिल्ह्यातील होत्या. तेव्हा तेथे आधी दंगली होतील ही भीती स्वाभाविक होती व तेच घडले. त्यामुळे बादशहाखान जरी बिहारमध्ये शरीराने संचरत होते तरी त्यांचे चित्त घराकडे होते.

१६ मार्चला गांधीजींचा मौनदिन असल्याने त्या दिवशी गांधीजींनी बादशहाखानांना प्रार्थनासमेत भाषण करण्यास सांगितले त्या वेळी बादशहाखान अगदी व्यथित भावनेने बोलले, " साऱ्या देशभर आग पसरत आहे आणि सगळ्या देशाची राखरांगोळी झाली तर हिंदू, शीख, मुसलमान, खिस्ती या सर्वांचेच नुकसान होईल. हे ओळखणे हे त्यांचे काम आहे. एक खुदाचा सेवक व सच्चा मुसलमान या नात्याने दुसऱ्यांची सेवा करण्याची संधी चालून आली तर मला मागे हटता येणार नाही. म्हणूनच मी येथे तुमच्यामध्ये आहे, पण *मला काही प्रकाश दिसत नाही, आणि पंधरा महिन्यांच्या आत राज्य सोडण्याची ब्रिटिशांनी* आता घोषणा केल्याने आपली जबाबदारी वाढली आहे." मुसलमानांना उद्देशून ते म्हणाले, " पाकिस्तान पाहिजे असेल तर तेही प्रेमाने व संमतीने मिळवता येईल, सक्तीने मिळवलेले

पाकिस्तान किती हिताचे होईल कोण जाणे. साऱ्या देशाच्या हिताचा विचार आपण केला पाहिजे. हिंदू, मुसलमान, ख्रिश्चन, शीख—साऱ्यांनी ही द्वेषाची आग प्रथम विझविली पाहिजे.'

ही आग आपल्या प्रांतात भडकत आहे असे त्यांच्या कानी पुन्हा पुन्हा येऊ लागल्याने त्यांना बिहारच्या दुःखी बांधवांना सोडून परतावे लागले. त्या भागात त्यांनी तीन महिने अविश्रांत परिश्रम केले. बहुतेक भाग त्यांनी पायी फिरून गांधींसवे बिहारच्या खेड्यांतील मुसलमानांना परत स्वस्थानी आणण्याबद्दल हिंदूंची मने अनुकूल केली. सीमा प्रांतात पोचताच तेथेही त्यांना तेच दृश्य दिसले. त्यांनी इशारा दिला, "आमच्या देशाला तुम्ही पेटवीत आहात, पण एकदा ही आग भडकली म्हणजे तीत आपल्या सर्वांचीच आहुती पडणार आहे हे विसरू नका......दुसऱ्यांच्या धार्मिक स्थानांची व पूजास्थानांची राख-रांगोळी केल्याने किंवा निरपराधी लोकांची हत्या करून अगर त्यांना लुटून इस्लामची कोणती सेवा घडणार आहे ?"

बादशहाखानांनी पेशावर व हजारा या भागात दौरा केला; त्याचप्रमाणे खुदाईखिदमत-गारांनाही अहिंसानिष्ठेने अत्याचारांना संघटितरीत्या तोंड देण्यास सांगितले. अत्यंत प्रतिकूल वातावरण निर्माण होत चालले होते. "समोरच्या सृष्टीत प्रेम आणि मांगल्य हेच नांदत आहे. आपण श्रद्धेने वाट पाहिली पाहिजे. पेरलेले उगवण्यास काही वेळ लागतोच. आपण खुदावर भरवसा ठेवून वाट पाहिली पाहिजे." अशी विलक्षण श्रद्धा त्यांनी आपल्या स्वयंसेवकांना व सहकाऱ्यांना दिली. त्याची प्रचीती पेशावरच्या हिंदूंच्या रक्षणार्थ व राज्य-कर्त्यांच्या साहाय्यासाठी एका निरोपाबरोबर दहा हजार खुदाईखिदमतगार धावून आले तेव्हा आली. पण लोकसेवेचे व शुद्ध धर्मनिष्ठेचे इतके सुंदर पीक या जाळपोळीत भस्मसात व्हावयाचे होते. चोहोबाजूंना आग भडकत असताना बादशहाखान आपला प्रेमाचा मळा पिकविण्याच्या कार्यात दंग होते; अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत विवेक सांभाळून कार्य करीत राहणे हीच थोर संस्कृतीची खूण होय.

साहाय्याने मुस्लीम लीगला पाकिस्तान निर्माण करावयाचे होते  ज्या नेत्यांनी मुसलमान समाजाची कधी काडीची सेवा केली नव्हती, फोर्टातील पुढेदलाली व सेट्यांतील वेड-झिगर वापरणे याशिवाय मुस्लिम जनतेशी ज्यांचा संबंध कधी आला नव्हता असा नवाब-खानांच्या ताब्यात पाकिस्तान जावयाचे होते, हा इशारा बादशहाखानांनी अनेकवार दिला होता

विहारमधून मार्चअखेरीस ते आपल्या प्रांतात परत आले त्या वेळी खान-मंत्रिमंडळाचा गळफास आवळण्याची सर्व सिद्धता झाली होती  जीन पेन्सिल रेघेच्या घोरणामध्ये सत्ता सोडताना ती कदाचित सध्याच्या प्रांतिक मंत्रिमंडळाकडे देण्याची शक्यता व्यक्त करण्यात आली होती  त्यामुळे सीमाप्रांताचे मंत्रिमंडळ हे निर्णायक स्वरूपाचे होऊन बसले होते  जिनांना खिजर हयातखान मंत्रिमंडळाचा घास मटकावता घेता आला होता, पण खानबंधूंचा घास गिळणे तसे सोपे नव्हते, म्हणून जिनांनी साऱ्या शक्ती तेथे पणाला लावल्या  इमन अधिकाऱ्यांच्या मदतीपेक्षा अंतर्गत फुटीने त्यांना ते यश लाभले  ऐन लढ्याच्या गर्दीत पहारेकऱ्यांनी तटाचे दरवाजे उघडून द्यावेत तसे फितुरीचे वर्तन कय्यूमखान, जमान गफूरखान आदि जुन्या काँग्रेसवादी मुसलमानांनी केले  हजारा जिल्ह्यात सुरू झालेली कायदेभंगाची चळवळ पेशावरमध्ये डॉ  खानसाहेबांच्या बंगल्याच्या दारात त्यांनी नेऊन पोचवली होती

या कायदेभंगी लोकांना तुरुंगात डांबल्यावर तथेही दंगली सुरू झाल्या  तुरुंगात गोळीबार व विषारी धुराचा वापर केला गेला  हे सारे खान मंत्रिमंडळाला बदनाम करण्यासाठी होते हे उघड आहे  शासनयंत्रणेवर मुख्य मंत्र्यांचे नियंत्रण राहिले नव्हते  धरले तर चावते, सोडले तर पळते अशी मंत्रिमंडळाची परिस्थिती होती  खुद्द गव्हर्नरच सर्व प्रकारची फितुरी करण्यात गुंतलेला होता  मग मंत्रिमंडळाची शक्ती किती पुरणार ? विशेषत  आपल्या कार्यकर्त्यांमध्येच इतकी फूट पडल्यानंतर ती थोपवणे कठीण होते  या वेळी राजीनामा देणेही धोक्याचे ठरेल असे डॉ  खानसाहेबांना वाटत होते

गव्हर्नर सर ओलाफ केरो याने प्रथम बादशहाखान यांना त्यांच्या चिरंजीवातर्फे मुस्लिम लीगबरोबर संयुक्त मंत्रिमंडळ बनवण्याबद्दल निरोप पाठवला  " भारत व सीमाप्रांत यांचा संबंध काय ? तुम्ही काँग्रेस सोडाल तर तुमच्या सर्व मागण्या मान्य होतील, " अशी लालूच दाखवली, पण बादशहाखान ओलाफ गव्हर्नर ही काय चीज आहे हे जाणून होते व त्यांनी त्याची जाहिरातही एका व्याख्यानात केली होती  सीमाप्रांतापेक्षा स्वतंत्र मुलुखातील पठाण-टोळ्यांच्या दंगलीची भीती त्यांना विशेष वाटत होती  टोळी-वाल्यांना कुरापतीला काहीतरी संधी पाहिजेच असे, त्यांची मने भडकविण्याचा धडाका

फाळणी पश्चिमेनी चालवला होता. बादशाहखानांनी परत येताच येथील श्रोत्यांसाठी काही व्याख्याने दिली. त्यांना सांगितले, 'तुमच्या जिल्ह्यामध्ये येऊन हा फेरी तुमच्याशी मित्रभाव व्यक्त करतो, परंतु दिल्लीस जाऊन तुमच्यावर बॉम्बगोळे टाकण्याची तयारी करण्यास प्रवीण असतो. मी हे विधान दिल्लीस मिळालेल्या माहितीच्या आधारे करीत आहे. ते तुमच्याकडे पुन्हा आले म्हणजे तुम्ही हा सवाल त्यांना करा. धर्माच्या नावाखाली आपसी भांडणे होणे हे सर्वांच्या नाशाचे ठरेल. आपली गुलामगिरी सरणार नाही.' त्यांनी पुढे असेही सांगितले, 'ज्यांचे अनुयायी गुन्हेगारीचे उद्योग करण्यात गुंतलेले आहेत अशा जातिद्वेषावर आधारलेल्या मुस्लिम लीगसारख्या संघटनेला राजकीय संघटनेचे स्थान व मान लाभू देणे हे अप्रामाणिकपणाचे आहे.' पश्चिमचे कोसळणारे छप्पर सावरण्यासाठी ते अखेरपर्यंत झिजत होते. धडपडत होते.

माउंटबॅटन यांनी सीमा प्रांतास तातडीची भेट दिली. त्यानंतर सीमा प्रांतातील चळवळीत जाळपोळ-लुटालुटीसाठी शिक्षा झालेल्या नेत्यांना मुक्त करून त्यांची शिष्टमंडळे दिल्लीस त्यांना भेटली. स्वतःच्या मंत्रिमंडळा विरुद्ध गव्हर्नरने यापेक्षा अधिक कारस्थाने काय करावयाची? पण शिलवंत वृत्तीने ती चारित्र्यी होती आणि तुरुंगातून सोडून आलेल्या या लोकांच्या भेटी जिनांनी दिल्लीस माउंटबॅटन यांच्याशी करून दिल्या होत्या. पेशावरच्या भेटीतही माउंटबॅटन यांच्या भेटी, दंगली व अत्याचार करणाऱ्या लोकांशी करून दिल्या होत्या. अशा रीतीने मंत्रिमंडळ म्हणजे सुव्यवस्थेची पोटी आहे हा प्रत्यय डॉ. खानसाहेबांना ब्रिटिश लोकशाहीचे प्रतिनिधी केरो यांनी आणून दिला होता.

अशाही परिस्थितीत बादशहाखानांनी स्वाभिमान राखून व तत्त्व सांभाळून मुस्लिम लीगशी तडजोड करण्याची तयारी या वर्षात दोनतीन वेळा दाखविली. गव्हर्नर कॅरोने मंत्रिमंडळावर दडपण आणण्याचा उद्योग आरंभला तेव्हा त्याचा अर्थ ओळखून बादशहाखानांनी मुस्लिम लीगच्या नेत्यांना तडजोडीस आवाहन केले. "स्वातंत्र्याचा लढा आता संपला. आपण आता एकत्र निर्णयात बसू व आपले मतभेद मिटवून टाकू. अत्याचाराचा मार्ग सोडून आपण भावाभावाप्रमाणे भेटण्याचे ठरवले तर तडजोडीचा मार्ग सहज निघेल. आपआपसातील बोलण्यांनी समाधान तडजोडीला मी तयार होईन. तुम्हांला हिंदू वर्चस्वाचा धोका दिसतो तर आम्हांस ब्रिटिशांच्या गुलामगिरीची चिंता आहे. आम्ही त्यांच्या चिंता दूर करण्यास तयार आहोत, पण त्यांची तयारी आहे का?" भागाभागांनी फाळणी सदर्भात निर्णय घेण्याचा वाद चालू असतानाच बादशहाखानांनी आपण "ब" गटात (मुस्लिम बहुसंख्य-पश्चिमभाग) समाविष्ट होऊन पाऊल टाकण्यास तयार असल्याचे सुचविले होते, पण "त्यासाठी एकत्र येऊन भावाभावाच्या नात्याने एकमेकांच्या गैरसमजुती दूर करणे जरूर आहे. या प्रश्नात धर्माचा संबंध काय? हा पोटपाण्याचा प्रश्न आहे. कोणत्या गटात कोणी जाण्याने त्या लोकांचे नफा नुकसान काय आहे हे त्यांना समजायला नको? जबरदस्तीने काहीच जमणार नाही." सीमाप्रांतास हिंदुस्थानमध्ये समाविष्ट होणे कसे अशक्य आहे याचाही विचार त्या वेळी बादशहाखानांनी व्यक्त केला आहे. असे असता स्वतः हाती सत्ता घेण्यास आसुसलेल्या सत्तापिपासू लीगवाल्यांनी बादशहाखान हे हिंदूचे हस्तक व नेहरू वल्लभभाईच्या मुसलमानांचे खुनी असा प्रचार केला आणि तो प्रचार करणारे कय्यूमखान व मानकीशरीफचे पीर हे जिनांचे सल्लागार झालेले होते. त्यांच्याकडे जनतेचे नेतृत्व आहे असा गव्हर्नर केरोचा दावा होता. कय्यूमखानांच्या साहाय्यावाचून केरो काही करू शकले नसते आणि केरो राज्यकारणाचे प्रमुख नसते तर कय्यूमखान याचा हा पुनर्जन्म होताच ना! बोलण्याकडे रिती दोन या वाणीला आता फारसे महत्त्व नाही. गुंडांच्या खांद्यावर बसून

कर्यूम आपली उची वादवीत होते, तर महायुद्धातून वाचलेल्या भ्रष्ट ब्रिटिश लोकशाहीचे प्रतिनिधित्व कसे करीत होते

साम्राज्यलोभी ब्रिटिश राज्यकर्ते, धर्माच्या नावाखाली स्वबांधवांची दिशाभूल करणारी मुस्लिम लीग, स्वार्थांध होऊन एकमेकांशी प्रतारणा करणारे पठाण पार्टीचे या सर्वांच्या वर्तनाने आपल्या पायाखालील धरणी दुभगत आहे की काय असा भास निनेरी खुदाई खिदमतगाराना या काळात झाला अमल्यास नवल नाही असत्याची हवा दाटली म्हणजे सत्यनिष्ठाना मूर्च्छा येणे स्वाभाविक असते, पण या सर्वांपेक्षा अशा हीन परिस्थितीत सामर्थ्यशालीचेही कर्तृत्व दुबल होते, खची होते प्रियोत्तम रामचद्रानेच प्रसूतिकाल समीप आला असता वनवासात लोटून दिल्याने सीतामाईची जी दारुण स्थिती झाली असेल ती स्थिती काँग्रेसने बादशाहखानांचा सल्ला न घेता फाळणीचा निर्णय घेतल्याने झाली होती अन्याचार व अराजक यांच्या वणव्याने काँग्रेस नेत्याना घेरले होते हे खरेच! शक्तीच्या गर बाघणीस त्यांनी सत्त विरोध केला होता पण प्रलयकारी पाणलोटात कागदी नाव किती उपयोगी पडणार? ब्रिटिशांची आश्वासने पदोपदी बदलत होती व अत्याचारांची आग नित्य नवा रूद्र आणीत होती त्यामुळे शेवटी काँग्रेसने सीमाप्रातासाठी सार्वमत घेण्याचे (प्लेबिसाइट) मान्य केले होते बादशाहखानांना हा अत्यत असह्य असा अतराघात होता! धैर्याचे मेरुमणीनी अशा वेळी विह्वल व व्यथित होऊन कोसळून पडतात! लीगशी हातमिळवणी करून खानबंधूना सब काही मिळवता आले असते, तशी त्यांची मनधरणी लीगवाल्यांनी पुष्कळ वेळा केली होती, आणि आता राजसिंहासनापाशी चवऱ्या-मोर्चले जरी त्यांच्या वाट्याला लीगच्या नेत्यांनी दिली नसती तरी निदान वजीर तडजोड करण्याने त्यांच्या नशिबीच्या अनिश्चित भविष्यकाळातील यातना खास टळल्या असत्या पण तत्त्वासाठी झाले, नव्हे तत्त्वरक्षणासाठी नमाज आले बादशाहखान बन्द झाले, तस झाले, पण म्याले नाहीत वा भगले नाहीत किंवा काँग्रेसविरुद्ध चोटे मोडीतही बसले नाहीत शेवटी अखेर त्यांनी जेव्हा गांधीजींचा निरोप घेतला त्या वेळी त्यांना वाघ सिंहांच्या गुहेत नव्हे तर पिसाळलेल्या प्राण्यांच्या सापळ्यात प्रवेश करायचा होता

"You have thrown us to the wolves"

"लांडग्यांच्या तावडीत तुम्ही आम्हाला सोडले आहे" असे त्यांच्या जिव्हेला अति कठोर वाटलेले उद्‌गार त्यांनी गांधीजींच्या पुढे काढले!

पण दोघांनीही—दोन्ही गांधींनी, आपल्या भावनांना तत्काळ बध घातला! ते वीरोत्तम होते, शांतिसागर होते सागर कितीही खवळला तरी आपली मर्यादा तो कधी सोडीत नाही 'अहिंसेला अपयश नाही' या श्रद्धास्थानच त्यांनी एकमेकांचा निरोप घेतला! त्यांच्या

त्या विशाल हृदयातील आग आणि दुःख पाहू शकणारे प्रतिभासंपन्न डोळे अजून जन्मलेले नाहीत! ते दुःख वैयक्तिक पराभवाचे नव्हते किंवा मानी मनाच्या पराजयाबद्दल नव्हते. शेकडो पुण्य पुरुषांच्या तपश्चर्येचा तेजोभंग डोळ्यांपुढे होत होता. हजारो वर्षांची पूजिलेली मातृभू उजळ माथ्याने तोडली–छेदली जावयाची होती आणि असहाय्य स्त्रिया-बाळांचे नरसंहार उघड्या डोळ्यांनी पाहावयाचे होते. त्या आगामी अटळ घटनांबद्दलचे दुःख त्यांच्या या शेवटच्या व्यथेत होते! अन्यथा 'एकला चालो रे" हे ध्येयवाक्य जिभेवर घोळूनच ते जन्माला आले होते! १५ ऑगस्टच्या स्वातंत्र्यदिनाच्या फाळणीच्या तयारी-साठी ३० जूनला बादशहाखानांनी दिल्लीच्या भंगी-कॉलनीतून गांधीजींचा निरोप घेतला. त्याच दिवशी दोन गांधींची फाळणी झाली. मनाने कधी दूर न झालेले हे दोन महात्मे कोत्या धर्मकल्पनेच्या प्रभावाने कायमचे दूर फेकले गेले. एकाचा खून प्रार्थनामंदिराच्या पवित्र वाटेवर केला गेला! दुसऱ्यासाठी कायमची काळी कोठडी बनवली गेली. महान तत्त्वांचे व तत्त्ववेत्यांचे इतके भयानक विडंबन हजारो वर्षांच्या इतिहासाने क्वचितच पाहिले आहे!

# २२

# अग्निप्रवेश

३० जूनला बादशाहखानांनी दिल्लीचा निरोप घेतला, ती त्यांची दिल्लीभेट अद्यापतरी शेवटची ठरलेली आहे "भविष्याच्या उदरात काय दडलेले आहे ते परमेश्वराला ठाऊक" असे उद्गार त्यांनी निघते वेळी काढले होते भावी प्रवास किती वादळी वातावरणातील होता त्याची सर्वांनाच कल्पना होती दोन्ही गांधी तर त्या घोर रात्री, सारखे बेचैन होते 'क्षत्रि राइट'चा घोडा धोक्याचा होता व तो टाळण्याचे शिकस्तीचे प्रयत्न दोन्ही गांधींनी केले होते ८ जूनच्या बन्नू येथील प्रादेशिक जिर्गांच्या बैठकीत सार्वमत अमान्य असण्याचा निर्णय घेतला होता त्यानंतर दिल्लीत जिनांची भेट घेऊन त्यांची समजूत काढण्याचे प्रयत्नही बादशाहखानांनी महात्माजींच्या सूचनेवरून केले, परंतु जिनासाहेबांना कोणतीच तडजोड ऐकण्याचे आता कारण उरले नव्हते काँग्रेस आता आपली पाठराखण करू शकत नाही, न्यायाचा तराजू हाती घेऊन आलेले माउंटबॅटनही जिनांच्या सार्वमतमागणीला बांधले गेले होते आपल्या सीमाप्रांतात अंतर्गत यादवीचा वडवानल पेटवला गेला होता, अशा दारुण व कारुण्यजनक परिस्थितीत ते दिल्लीहून पेशावरकडे निघाले होते या अग्निप्रवेशाच्या प्रसंगाची त्यांची मनःस्थिती कोण वर्णन करू शकेल ? १४ ऑगस्टच्या पाकिस्तानच्या जन्माची व १५ ऑगस्टच्या भारताच्या स्वातंत्र्याची विश्वघोषणा व्हावयाची होती, पण त्यापूर्वी व त्यासाठी तीस लाख पठाणांच्या स्वातंत्र्याचा बळी द्यायचा होता वायव्य सीमाप्रांतात घटनेनुसार निवडून आलेले व भरपूर बहुमत असलेले डॉ खान-मंत्रिमंडळ मुस्लिम लीगच्या डोळ्यांत मुसळासारखे सलत होते वस्तुत काळजाच्या जखमेप्रमाणे ते लीगच्या नेत्यांना भिववीत होते कारण ज्या द्विराष्ट्रवादाच्या सिद्धान्तावर पाकिस्तान

उभारले जात होते तो लीगचा दिशाभूल करणारा वहिवाट नव्हता. ८० टक्के मुस्लिम वस्ती असलेला हा परगणा प्रदेश मानण्यास तयार नव्हता. म्हणून त्या जनमताच्या पुरावा पडदा पाडणे लीगनेत्यांना भाग होते. तेथील लीगच्यामागील खरी शक्ती केवढी तीच होती, हे पाहिले आहेच. बादशाह-खानांसारख्या धर्मपुरुषाला इस्लामच्या रक्षणासाठी जन्माला आलेल्या पाकिस्तानच्या शासकांनी नंतर १९४८ च्या जूनमध्ये तुरुंगाची वाट दाखविली. मध्यंतरीचा हा सुमारे एक वर्षांचा काळ बादशाहखानांनी पाकिस्तान सरकारशी सनदशीर व शांततेच्या मार्गाने दिलेल्या अचाट धैर्याच्या लढ्याचा काळ आहे. हा एक वर्षाचा त्यांचा लढा म्हणजे त्यांच्या तत्त्वनिष्ठ व निर्भय जीवनाचा एक नवा उज्ज्वल असा पैलू आहे. परकीयांना घालवून स्वकीयांची गुलामगिरी म्हणजे स्वातंत्र्य किंवा स्वराज्य नव्हे, हे ते वारंवार बजावीत आले होते. आपल्या श्रद्धेसाठी व सिद्धान्तासाठी आपल्या स्वतंत्र इस्लामी बांधवांविरुद्ध दिलेल्या लढतीचे हे वर्ष म्हणजे एक कारुण्यपूर्ण पण तेजस्वी असे हे पर्व आहे.

सत्तेसाठी स्पर्धा सुरू झाली म्हणजे सत्तापिपासू लोक काय काय कारस्थाने करू शकतात याची विपुल चित्रे कौरव-पांडव स्पर्धेत आलेली आहेत. त्यात द्यूत आहे, द्रौपदीची विटंबना आहे, तसेच लाक्षागृहही आहे. सार्वमत वेगळ्या उद्दिष्टासाठी व्यक्त करावयाचे ते उद्दिष्टच डोळ्यांपुढे नसता त्यावर मत देण्यास सांगणे हा अन्याय आहे असे बादशाहखानांनी पंडित नेहरूंना सांगितले, मौंटबॅटनना बजावले व जिनानाही समजावून सांगितले, पण त्यांच्या तर्कशुद्ध शंकेला समर्पक उत्तर दिलेले नाही. मात्र त्यांची ही तक्रार रास्त आहे व पाकिस्तानचे राजकीय चित्र डोळ्यांपुढे न ठेवता पठाणांना त्याविषयी मत देण्यास भाग पाडणे न्यायाचे नाही असे गांधीजींनी मात्र स्पष्टपणे बजावले. पंडित जवाहरलाल नेहरू हे या सार्वमताला अनुकूल झाले होते. 'हे टाळणे म्हणजे लोकमत आपल्या बाजूस नाही हे मान्य करण्यासारखे आहे' असे पंडितजींचे मत होते. 'पाकिस्तानची राजकीय घटना कोणत्या स्वरूपाची होणार? ते वसाहतीच्या स्वरूपाचे का संपूर्ण स्वतंत्र राष्ट्र होणार हे आम्हाला ठाऊक नाही, आम्ही कोणत्याही संपूर्ण स्वतंत्र न होणाऱ्या राज्यघटनेत राहू इच्छीत नाही' या बादशाहखानांच्या सवालाला पंडितजींनी उत्तर दिलेले नाही. देऊ शकत नव्हते. फाळणीच काँग्रेसनेत्यांनी पत्करली होती, तेव्हाच जिनांचा कार्यभाग झाला होता. त्यामुळे गटबंदी-योजनेप्रमाणे सीमाप्रदेशाने पश्चिम विभागात सामील होणे भाग आहे, असा जिनांचा दावा होता. तो त्यांचा आग्रह बरोबर आहे असा समज मौंटबॅटन यांचा झालेला होता किंवा करून घेतला होता. कारण गटबंदी सक्तीची आहे हा निर्णय ब्रिटिश पंतप्रधानांनी दिला होता, पण तो काँग्रेसनेत्यांनी मान्य केलेला नव्हता, पण प्राप्त कर्तव्य म्हणून गळी उतरवून घेतला होता, आणि या सर्व परिस्थितीमध्ये बादशाहखानांचा सरळ साधा तत्त्वनिष्ठ

आग्रह कोणीही समजून घेऊ शकत नव्हते. उलट बादशहाखानांची 'जनतेतील फूट फक्त अगत्याने ते सार्वमताला विरक्त असावेत' अशा रूपात प्रदर्शित केल्या जात होत्या. वस्तुतः मुस्लिम लीगची निदर्शनांची मागणी हीच मुळी गव्हर्नर करोच्या कोणातून निघालेली होती. ती डॉ. खानसाहेबांनी धाऊ नाकारली, त्यानंतर हुकूमशहा जिनांच्या आज्ञेने 'डायरेक्ट ॲक्शन' उर्फ दंगे-जाळपोळी सुरू केल्या. या डायरेक्ट ॲक्शनच्या बळावर पंजाबचे खिजर हयातखान मंत्रिमंडळ खाली खेचले गेले होते, पण पेशावरचे पठाण पंजाबी जमीनदार मुसलमानांपेक्षा वेगळ्या धाडसाचे व वेगळ्या दमाचे होते. लीगची ही डायरेक्ट ॲक्शन हजारा येथील दंगलीने सुरू झाली होती, त्यातून पुढे पेशावरमध्ये राज-यंत्र बंद पडल्यासारखे झाले. कारण मंत्रिमंडळाने व पोलिसयंत्रणेने दंगलखोरांना पकडण्याचे हुकूम दिले असता त्या हुकुमांचा अंमल केला गेला जात नसे. ज्यांच्यावर पकडण्याचे हुकूम होते असे लोक स्वतः गव्हर्नरांच्या गुप्त खलबतात बसलेले आढळत, ज्यांच्याशी आपण वार्तालाप करतो त्या लीगकार्यकर्त्याविरुद्ध पकडवॉरंट आहेत हे गव्हर्नरांना माहीत असे अशी माहिती जज्ज खोसलासारख्यांनीच दिली आहे. स्वतः लॉर्ड माउण्टबॅटन यांच्या भेटीच्या वेळी या दंगलीचे स्वरूप त्यांनी पाहिले होते. 'दंगे व अत्याचार यांच्यापुढे मी नमणार नाही' अशी आश्वासने माउण्टबॅटन यांनी डॉ. खान यांना दिली होती. स्वतः त्यांनी पेशावराहून परत जाताना दिल्लीच्या वाटेवर काहुथ येथील भीषण जाळपोळी पाहिल्या होत्या आणि त्या वातावरणात सार्वमताचा आग्रह धरला जात होता. ही शासनकर्त्या इंग्रजांची अत्याचारापुढील शरणागती होती का या अत्याचारांची भीती दाखवून पाळणीसाठी पठाणांना तयार करायचे होते ? कोणत्याही प्रांताला सक्तीने गटात लोटले जाणार नाही हेही कॅबिनेट मिशन योजनेचे आश्वासन होते. त्यातील कोणतेही तत्त्व पाळले गेले नाही. फाळणी घडवून आणण्याच्या गोंधळात लाखो लोकांचे हत्याकांड झाले ते प्रक्षुब्ध लोकांनी व गुंडांनी केले असे म्हटले जाते, पण तितकीच भीषण अशी ही तत्त्वहत्या गव्हर्नर कॅरो व सत्तेसाठी उतावीळ बनलेले कय्युमखान यांनी आरंभली होती. माउण्टबॅटननी ती पाहिली होती व काँग्रेस-नेत्यांना ती दिसत होती. या सर्वांना साक्षी ठेवून सीमा प्रदेशाच्या खान-मंत्रिमंडळाचे वस्त्रहरण सुरू झालेले होते. बादशहाखानांची श्रद्धा व धर्मनिष्ठा यांचे वस्त्रहरण मात्र कोणी करू शकले नव्हते. या काळात बादशहाखान यांनी जीना किंवा माउण्टबॅटन यांना दिलेली उत्तरे समर्पक अशी आहेत, त्यांनी केलेले आर्जव कोणाही सहृदय माणसाला कळू शकले असते इतके कळकळीचे आहे. 'युद्धकाळासारख्या अडचणीच्या काळात तुम्ही शांतता राखू शकलात, कारण त्या वेळी शांतता राखणे तुम्हांला भाग होते, आता मुसलमानांच्या कत्तली व स्त्रियांवर अत्याचार होत असता शांततारक्षणासाठी मंत्रिमंडळाला साहाय्यक

होराइझनजी, दगरींच्याकडे बोट दाखवून मरोनाच दडपण्याचा प्रयत्न करीत आहात, असे मर्मभेदक उत्तर त्यांनी दिले आहे, पण ते एवढी पडले होते त्यांचा आवाज समोवाऱ्या हलकल्लोळ्यात ओलांडून दिल्ली किंवा लंडनपर्यंत पोचत नव्हता पण ब्रिटिशांना विनंती करून न थांबता स्थानिक व राष्ट्रीय लीगनेत्यांचीही त्यांनी भरपूर मनधरणी केली 'भावाभावाप्रमाणे आपण एकत्र बसून तडजोड करू या' अशी प्रार्थना त्यांनी अनेक वेळा केली, पण त्यांचे ऐकण्याची आता गरजी उरली नव्हती डॉ खानमंत्रिमंडळ आता कोसळून पडणारच म्हणून त्या क्षणाची वाट पाहात लीगनेते राहिले 'या सर्व घटनांमागे कोणत्या इस्लामधर्माचे प्रेम होते व कोणाचे कल्याण होते' या बादशहाखानांच्या प्रश्नाचे उत्तर आजही कोणी देऊ शकणार नाही ते उत्तर बादशहाखानांनी त्याच वेळी दिले होते जीनासाहेब स्वतःच्या शक्तीचे बळ कितीही दाखवीत असले तरी त्यांचे शेपूट साम्राज्यवाद्यांच्या हाती होते चर्चिल यांचा निरोप हा माउंटबॅटन यांच्या हातचा शेवटचा पत्ता होता 'हे तुम्ही न ऐकल्यास तुम्हांला जन्मात कधी पाकिस्तान मिळणार नाही' हा निरोप माउंटबॅटन यांच्या द्वारेच कळल्यावर जिनासाहेब बालवीने खाडिले पाकिस्तान फाळण्यास व बंगाल-पंजाबच्या फाळणीस तयार झाले यांचा अर्थ जीनांची कळ साम्राज्यवाद्यांच्याच हाती होती आणि साम्राज्यवाद्यांना 'रशियाच्या विरोधासाठी सीमाप्रदेशात विमानतळ बांधायचे आहेत ते आम्ही ऐकणार नाही, म्हणून पठाणांना अंतर्गत लढ्यात गुंतवून हा डाव साधला जात आहे' हेही बादशहाखानांनी सांगून टाकले होते

डॉ खान मंत्रिमंडळात मुस्लीम लीगचे प्रतिनिधी घेतले नाहीत, सार्वमतात भाग घेतला नाही आणि पाचचा सातव्यदिन उजाडला तरी डॉ खान-मंत्रिमंडळ जागेवरून हालत नाही हा सारा तमाशा जिनांसारख्या सुलतानी वृत्तीच्या नेत्याला असह्य असा होता आपला कार्यक्रम घड्याळ्याच्या ठोक्याप्रमाणे पार पडला जातो या तान्यातच वावरणाऱ्या माउंटबॅटनना तत्त्वहट्टीच्या या गोष्टी गौण वाटू लागल्या होत्या ही त्यांची नस ओळखणाऱ्या जीनांनी खान मंत्रिमंडळ रद्द करावं अशी सूचना माउंटबॅटनना केली आणि त्यांनीही ती सूचना ब्रिटिश सरकारापुढे विचारार्थ मांडली यावरून ती त्यांना स्वतः ला मान्य झाली असावी असा तर्क केल्यास वावगा ठरणार नाही पण ब्रिटिश सरकारने असली घटना विरोधी गोष्ट करण्यास अनुमती दिली नाही घटनेनुसार निवडून आलेले व बहुमत असलेले मंत्रिमंडळ रद्द करणे अयोग्य होय हे मत ब्रिटिश पंतप्रधानांनी कळविल्यानंतर मंत्रिमंडळाच्या कारभारात हस्तक्षेप करण्याच्या गव्हर्नर-जनरलच्या अधिकारक्षेत्राचा विस्तार करणारी सुधारणा माउंटबॅटननी जिनांच्यासाठी करून दिली आणि त्या अधिकारान्वये पाकच्या पायदेपडित गव्हर्नरजनरलनी आपली सत्ता प्रथम खानमंत्रिमंडळ बरखास्त करण्यासाठी

वापरली पाकिस्तानच्या जन्मकाळाच पठाण जनतेवर हा जो कायदेशीर अत्याचार केला गेला तो लोकशाही तत्त्वाची विटंबना करणारा होताच, पण त्यापेक्षा पठाण जनतेशी जमाचे हाडवैर निर्माण करणारा ठरला हे फार थोड्या लीगनेत्यांच्या ध्यानी आले असणार। थोडेफार ते जीनांच्या ध्यानी आले असावे त्याचमुळे त्यांनी बादशाहखानांशी तडजोड करण्याचा विचार केला असे दिसते, पण डॉ खानसाहेबांच्या सत्तापदावर चढलेले कय्यूम खान यांनी जिनांच्या कानांत भरपूर विष ओतले व बादशाहखान जिनांची कधी भेट घेणार नाहीत अशा घटना घडवून आणल्या डॉ खान-मंत्रिमंडळाला वाचविण्यासाठी म्हणून या काळात बादशाहखानांनी फक्त जन-जागृतीची कास धरली खुदाईखिदमतगार संघटना बळकट करण्याचा प्रयत्न केला, स्वतंत्र येथीलवाल्या नेत्यांना पाकिस्तानी आक्रमणाचे स्वरूप समजावण्याची योजना आखली, पण त्यांना तिकडे जाऊ दिले गेले नाही सर्व प्रयत्न केवळ अपुरे पडले असे नव्हे तर अयशस्वी केले गेले एकदा सत्ता हाती आली की सत्ताधीश हा शिरजोर होत जातो, व सामान्य लोक त्या सत्तेच्या सावलीकडे वळू लागतात त्यांच्या ज्या कार्यकर्त्यांनी ' पाकिस्ताननिर्मितीला आपण जिद्दीने विरोध करावा व त्यात यश न आल्यास हिजरत करावी, ' असे एक वर्षापूर्वी प्रतिपादले होते त्यापैकी काही कार्यकर्ते लवकरच कय्यूमखान-मंत्रिमंडळाचे आश्रित बनले अल्लाहनवाज अब्दुर्रहमान यांच्यासारखे व पुढे काही जबाबदार खुदाईखिदमतगारही बादशाहखानांना सोडून कय्यूमखान मंत्रिमंडळात समाविष्ट झाले अशा रीतीने हळूहळू खुदाईखिदमतगारांच्या प्रदीर्घ निःस्वार्थ सेवेतून निर्माण केलेले कार्य लीगच्या कार्यकर्त्यांनी ब्रिटिश सत्तेच्या पाठिंब्याने पोखरून टाकले खानमंत्रिमंडळ हा त्यांच्या मार्गातील मोठा अडसर होता, तो तोडून टाकण्यास ब्रिटिश सरकार धजले नाही जाळपोळ, दंगली यामुळे तो मोडला नाही किंवा सार्वमता नंतरच्या परिस्थितीमुळेही हे मंत्रिमंडळ मोडता आले नाही पाकिस्तानशी राजनिष्ठ राहण्याची शपथ खानमंत्रिमंडळाने घेतली होती किंबहुना स्वत बादशाहखानांनी ' पाक च्या स्थैर्याला व सामर्थ्याला पठाण सहाय्यकच होतील, फक्त त्यांना त्यांचे स्वातंत्र्य उपभोगू द्या हे जिनांना कळकळून सांगितले पण तरीही जीनांना खानमंत्रिमंडळाचे रिंगण करायचेच होते ते कोणत्याच मार्गाने न साधल्यामुळे त्यांनी माउंटबॅटन यांना गळ घातली व त्यांनी पाकिस्तानच्या गव्हर्नर जनरलच्या अधिकारात वाढ करून दिली, ( गॅझेट ऑफ इंडिया, १४ ऑगस्ट १९४७ ) त्या अधिकारांची प्राप्ती जिनांना फक्त गव्हर्नर-जनरलपद मिळाल्यानंतरच होऊ शकली, आणि त्याप्रमाणे त्या विशेष अधिकाराच्या बळावर एक आठवड्याच्या आत ता २२ ऑगस्ट रोजी खानमंत्रिमंडळ बडतर्फ केले पाकिस्तानच्या जन्मकाली पठाणांच्या स्वाभिमानाचा बळी घेतला गेला स्वधर्म व स्वातंत्र्य यांच्यासाठी निर्माण झालेल्या पाकि-

स्तानच्या नेत्याचे हे कृत्य अत्यंत अन्यायाचेच नव्हे तर अत्यंत दुर्बुद्धीचे होते असाच निर्णय कोणीही त्रयस्थ देईल

डॉ खान मंत्रिमंडळाच्या बडतर्फीनंतर बादशहाखानांनी सार्वमतात भाग घेतला नाही उलट पख्तूनांच्या स्वातंत्र्याचा घोष चालू ठेवला या त्यांच्या धोरणास महात्माजींचा पाठिंबा होता जवाहरलालजींनी सार्वमताची अपरिहार्यता वाटली तरी पाकिस्तान ज्याप्रमाणे अटळ म्हणून स्वीकारले त्याचप्रमाणे हीदेखील अपरिहार्यताच होती सार्वमताच्या मागणीमागे काही अन्य नैतिक आधार नव्हता या दृष्टीने बादशहाखानांची सार्वमताशी असहकार करण्याची भूमिका कोणत्याही दृष्टीने पलायनवादाची नव्हती हे स्पष्ट होते अशा सक्तीच्या वातावरणात फक्त दंगली होतील, हे त्यांचे म्हणणे रास्त होते दंगली टाळण्याचा मार्ग म्हणून त्यांनी त्या सार्वमतात भाग घेतला नाही बादशहाखानांनी आपल्या सहकाऱ्यांचे व अनुयायांचे जिर्गा–संमेलन सरदर्याबाद येथे सर्वेबरमध्ये बोलावले दोन दिवसांच्या चर्चेनंतर त्यांनी आपला निर्णय पुन्हा खंबीरपणे घोषित केला ' अंतर्गत भांडणांनी दुर्बल झालेल्या माझ्या पठाणबांधवांची सेवा व त्यांचे स्वातंत्र्य हे माझ्या जीवनाचे कार्य आहे याच ध्येयाने व पठाणांची समाजसुधारणा घडवून आणण्यासाठी १९३० मध्ये खुदाईखिदमतगार-संघटनेची स्थापना केली गेली १९३० मध्ये जे ध्येय माझ्या डोळ्यांपुढे होते तेच ध्येय आजही माझ्यापुढे आहे जी तत्त्वे त्या वेळी मा पुरस्कारली तीच आजही माझ्यापुढे आहेत माझा रस्ता साफ आहे मी एकटाच राहिलो तरी माझा मार्ग व ध्येय सोडणार नाही ' त्यांच्या अनुयायांनीही पठाणिस्तानच्या या मागणीवरील आपली श्रद्धा पुन्हा घोषित केली येथे मंजूर केलेल्या ठरावात पाकिस्तानचे एक घटकराज्य या नात्याने पठाणिस्तान त्यांना इच्छित हे स्पष्ट केले होते त्या लाहोर ठरावान्वये पाकिस्ताची मागणी केली जात असे त्या तत्त्वाशी पठाणिस्तानची मागणी सर्वस्वी सुसंगत होती परराष्ट्रखाते, संरक्षण, दळणवळण ही खाती मध्यवर्ती सत्तेकडेच ठेवण्यास ते तयार होते, पण द्विराष्ट्रवाद मानण्यास बादशहाखान तयार नव्हते त्यामुळे आपल्या ओंजळीने पाणी पिण्याचा इन्कार करणाऱ्यांचा निकाल लावणे एवढाच मार्ग पाकनेत्यांपुढे मोकळा राहिला होता हे हत्याकांड करण्यास कय्यूमखान हे तयार होतेच, किंबहुना कय्यूमखानांसारखे सत्तापिपासूच अशा अघोरी घटना घडवून आणीत होते

कय्यूमखान यांची नियुक्ती डॉ खानसाहेबांच्या जागी झाली व ते सीमाप्रांताचे मुख्य प्रधान बनवले गेले आणि त्याचबरोबर मुस्लिम लीगच्या खोट्या धर्मप्रचारामुळे पाकिस्तानच्या कल्पनेला अनुकूल झालेल्या कार्यकर्त्यांत खळबळ व असंतोष पैलावला कय्यूमखान यांनी दीर्घ काळ खानबंधूंचे अनुयायी म्हणून निष्ठा समरसतेने काम केले होते हे सर्वांना ठाऊक होते परंतु खानबंधूंच्या राहून सत्ता जाईल असे दिसताच त्यांनी जीनांशी संधान बांधले

होते. हा त्यांचा विश्वासघातकी स्वभाव काही पठाण-नेत्यांना ठाऊक होता. त्यामुळे बादशाहखान व खुदाईखिदमतगार यांना विरोध करणारे व खानमंत्रिमंडळाच्या विरुद्ध प्रतिकार मोहीम उभारणारे मांकी शरीफचे पीर किंवा अब्बास अब्दुर गफूरखान यांच्यासारखे नेते कय्युमखानांना विरोध करण्यास तत्काळ पुढे आले. मुस्लिम लीगच्या नव्या नेतृत्वासाठी किंवा सीमाप्रदेशाच्या सत्तेसाठी तत्काळ झगडा सुरू झाला. मांकीशरीफच्या पीरसाहेबांच्या नेतृत्वाखाली मुख्य प्रधान कय्युमखान यांना विरोध करण्यासाठी ही आघाडी होती. खानमंत्रिमंडळ पाडण्यात त्यांचाच हात होता; किंबहुना त्यांच्या पाठबळावर कय्युमखान सत्तेवर आले होते. परंतु अशा रीतीने लीगच्या नेत्यांनी प्रांतावर मुख्य प्रधान लादू नये; प्रांतिक मुस्लिम लीगच्या साहाय्याने नेता निवडला जावा अशी मागणी पीरसाहेबांनी केली; परंतु जीनासाहेबांच्या कानांपर्यंत हा विरोधकांचा आवाज पोचला नाही. उलट कय्युमखानांचे हात आता सत्तेमुळे सामर्थ्यवान झाल्यामुळे त्यांनी त्यांच्या सहकाऱ्यांच्या डोळ्यांविरुन तो विरोधप्रयास प्रारंभ केला. १९४८ ते १९५१ या काळात कय्युमखानांच्या या अमानिनिधिक मंत्रिमंडळाच्या दंडेलीला पूर आला. त्यांनी खुदाईखिदमतगारांवर पक्क्या ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यांना लाजवणारे असे जुलूम व अत्याचार केले; इतकेच नव्हे तर स्वत:च्या साहाय्यकांनाही त्यांनी तुरुंग दाखवला. सत्तेवर आलेले तत्त्वभ्रष्ट लोक स्वातंत्र्याची कशी विटंबना करू शकतात हाही एक नमुना सीमाप्रदेशाच्या या कय्युम-मंत्रिमंडळाने दाखवला. डॉ. खान मंत्रिमंडळ पाडण्यासाठी गव्हर्नर कॅरो किंवा दिल्लीचे पोलिटिकल खाते पाठीशी सदा सिद्ध होते, तर आता कय्युमना पाठीशी घालण्यास कराचीचे पंतप्रधान लियाकत अलीखान व गव्हर्नर जनरल जीनासाहेब लाभले होते. स्वातंत्र्य आले, पाकिस्तान झाले; पण सीमाप्रदेशाच्या नशिबीचा छळवाद कमी होण्याऐवजी तो वाढता राहिला. तो आता पठाणांच्याच हस्ते सुरू झाला. केवळ नाव बदलण्याने किंवा जातवाले आल्याने स्वातंत्र्य लाभत नाही, हा बादशाहखानांचा आक्रोश इतक्या क्रूरतेने जनतेच्या अनुभवास आला.

स्वातंत्र्य तोंडाशी आले तेव्हा सर्व बाजूंनी कोंडल्या गेलेल्या सावजाप्रमाणे बादशाहखानांची स्थिती झालेली होती. किंबहुना चारी बाजूंनी जंगल पेटवले जावे व शिकाऱ्यापुढे सावजाने जावे अशी त्यांची स्थिती झाली असणार. त्यांच्या शिकाऱ्यांना—लियाकतअली कय्युमखान आदींना तसे वाटले असेल; पण हा धैर्याचा मेरुमणी तिळमात्रही आपल्या निर्धारापासून ढळला नव्हता. पाकिस्तानच्या निर्मितीनंतर सात-आठ महिने बादशाहखानांनी आपल्या मागणीमागील भूमिका समजावून सांगण्यासाठी प्रचार केला. गैरसमजुतीमुळे किंवा स्वार्थामुळे अंतर्गत दुफळी वाढू लागली हे पाहून त्यांना दु:ख होत होते. या पाकिस्तानमधील स्वतंत्र पठाणांसह पठाणिस्तान केले जावे अशी त्यांची अपेक्षा होती.

त्यासाठी पठाणमुलखात प्रचार करण्याची त्यांची इच्छा होती, पण ते घडू शकले नाही. बादशहाखान हे हिंदूंचे हस्तक, मूर्तिपूजक व म्हणून इस्लामचे विरोधक अशी त्यांची निंदा सर्वत्र केली जात होती आणि उलट बादशहाखानांचा प्रचार जनतेच्या कानांपर्यंत पोचणे कठीण होऊ लागले होते त्यांना घटनापरिषदेचे तसे आकर्षण नव्हते, परंतु आपल्या विचारांच्या प्रचारासाठी संधी घ्यावी म्हणून ते १९४८ च्या फेब्रुवारीत कराचीला घटना परिषदेला गेले त्यांनी या बैठकीस यावे असे सरकारी प्रयत्नही झाले होते अबुलखानांचे बंधू त्यांना त्यासाठी भेटले होतेही फाळणीमुळे दोन्ही देशांवर ताण पडला होता कराचीला पोहोचताच तेथील अवशिष्ट हिंदूंच्या शिष्टमंडळांनी त्यांची भेट घेतली गांधीजी सर्वांना सोडून गेले होते पाकिस्तानमधील अल्पसंख्यांकांची दृष्टी स्वाभाविकच बादशहाखानांकडे लागली होती त्यांना त्यांनी धीराचे व धैर्याचे मार्गनिदर्शन दिले, पण कराचीतील निर्वासित मुस्लिमांची दुर्दशा पाहूनही त्यांना विलक्षण दु ख झाले तेथील मुस्लिम लीगमध्येही संघर्ष सुरू झाले होते कराचीतील स्वतंत्र वृत्तीच्या जी एम सय्यद, अब्दुल मजीद सिंधी वगैरेंच्या सहकार्याने पाकिस्तान घटनापरिषदेत काही कार्यक्रम आखावा या दृष्टीने बादशाह खानांनी प्रयत्न आरंभले त्यांच्या तेथील थोड्याशा वास्तव्याने मुस्लीम लीगमधील व लीग बाहेरील स्वतंत्र वृत्तीच्या मुसलमानांमध्ये थोडे चैतन्याचे वारे सुरू झाले या बैठका व भेटी मधूनच स्वतंत्र लोकपक्षाची स्थापना ( पीपल्स पार्टी ) नंतर झाली बादशहाखानांच्या कराचीतील आगमनामुळे वृत्तपत्रांशीही त्यांना मोकळेपणाने बोलणे सुलभ झाले जगातील वृत्तपत्रांचे प्रतिनिधी कराचीत तळ मारून होते त्यांच्या प्रश्नांना उत्तरे देताना, त्यांनी पख्तुनिस्तानविषयीचे व पाकिस्तानसंबंधीच्या स्वत च्या धोरणाविषयी खुलासे करण्यास ही संधी वापरली "आम्हाला पाकिस्तानशी वैराचा करावयाचा नाही आम्ही पाकिस्तानच्या झेंड्याशी इमानदारीच्या शपथा घेतल्या आहेत पाकिस्तानचा झेंडा आम्ही मानीत नाही असा प्रचार आमच्या विरुद्ध केला जातो, तो सर्वस्वी खोटा आहे व खोडसाळपणाचा आहे इस्लामचा आधार बघुतेवर आहे एकमेकाला लहानमोठे लेखणे आमच्या धर्माला धरून नाही आम्ही पाकिस्तानमध्ये हाच हक्क पठाणांसाठी मागतो पाकिस्तानची आम्हाला काही मोडतोड करायची नाही आम्ही स्वतंत्र झालो म्हणजे त्यामुळे आमच्या स्वत च्या संरक्षणा बरोबर पाकिस्तानच्या संरक्षणालाही साहाय्य होईल पठाण फार गरीब आहेत तुमच्या मानाने मागासलेले आहेत तुम्ही सर्व धनिक आहात आमचा अफगाण लोकांशी काही संबंध नाही पख्तुनिस्तानचा बाहेरच्या कोणाशी संबंध जोडणे खोडसाळपणाचे आहे. आम्ही मागासलेले, स्वभावाचे थोडे वेगळे म्हणून आम्हाला आमच्या पद्धतीने गरिबीचा प्रतिकार करू द्या" हे धोरण त्यांनी जिनासाहेबांजवळही स्पष्ट केले त्यांच्या मुलाखतीतून

त्यांची ही भूमिका चांगली स्पष्ट झाली होती. कराचीतील त्यांच्या प्रचारकार्याने राज्यकर्त्यांनाच आपले बालिशपण उघडे पडते हे ध्यानात येऊ लागले होते

दिनांक ५ मार्च रोजी बादशाहखानांनी आपत्र सामान्य प्रशासनाविषयीचा मागणी कपातीचा ( कट मोशन ) विषय चर्चेस घेतला. त्यांचे भाषण ऐकण्यासाठी सारे सभागृह चित्रासारखे तटस्थ झाले होते त्यांचे भाषण उर्दू-हिंदी-पुश्तू यांचे मिश्रण होते. सुमारे ३५ मिनिटे ते बोलले. त्याचा सारांश—

" आतापर्यंत स्वातंत्र्याच्या लढ्याच्या काळात आपला रस्ता अलग अलग होता आता तो लढा संपला. पाकिस्तान हा आमचा देश आहे आणि त्याच्या भल्यासाठी स्वार्थत्याग करण्यासाठी त्याची सेवा करण्याच्या बाबतीत आम्ही कोणाच्याही मागे राहणार नाही आम्ही स्वतंत्र पख्तूनिस्तान मागतो त्याचा अर्थ आपण नीट समजून घ्या सहिष्णुतेने समजून घ्या. आम्ही स्वतंत्र झाल्यानेच आमचे स्वातंत्र्य वाढेल आणि आमची शक्ती वाढल्याने यात पाकिस्तानचीही शक्ती वाढणार आहे, आमची शक्ती तुमच्याही उपयोगाला पडणार आहे जीनासाहेबांना हे मी स्पष्ट केले होते पाकिस्तानमधे दुफळी व्हावी किंवा त्याला धोका निर्माण व्हावा अशी आमची कोणाची इच्छा नाही. देशाच्या भल्यासाठी आमचे सारे लोक तुमच्याबरोबर राहतील तुमचा एक मित्र म्हणून पाकिस्तानच्या हितासाठी म्हणून माझे बोलणे समजून घ्या इस्लाम म्हणजेच सहिष्णुता, समानता, व बंधुभाव आहे. या तत्त्वांना धरून वागण्याचे आपण ठरवले तर ते खरे पाकिस्तान ठरेल व त्याचमुळे ते सामर्थ्यवान बनेल "

पाकिस्तानच्या नव्या कारभारातील उधळपट्टी व इंग्रजी नोकरशाहीवरील परावलंबित्व यावर कडाडून हल्ला करताना ते म्हणाले, " आपला कारभार सुरू होऊन अद्याप सहा महिनेही पुरे झाले नाहीत, पण आपला हा कारभार पूर्वीच्या परक्या सत्ताधीशांच्यापेक्षाही उधळपट्टीचा व अरेरावीपणाच्या बाबतीत त्यांनाही लाजवणारा असा झाला आहे राज्यकर्ते हे जनतेचे सेवक बनले पाहिजेत. केवळ तंत्रज्ञ किंवा तज्ञ म्हणून जरूर तो परक्या लोकांचा उपयोग करून घ्यावा अन्यथा शासनात परक्या लोकांना किंचितही वाव मिळता कामा नये. पूर्वीपेक्षा अधिक ब्रिटिश राज्यपाल व ब्रिटिश अधिकारी येथे आहेत आणि काही वेळा पूर्वीपेक्षा अधिक अन्याय भोगावा लागत आहे. ब्रिटिशांनी तयार केलेल्या साच्याप्रमाणेच आपला कारभार चालला आहे वरहुकुमामुळे हा कारभार भयंकर झालेला आहे, परदेशी मिजासखोर किंवा उधळपट्टीच्या पद्धतीमुळे कारभार पूर्ण बिघडला आहे

" मुस्लिम लीगचे जीवनकार्य आता संपले आहे. लीगच्या जागी सर्व जातींच्या नागरिकांचा समावेश करू शकेल असा वेगळा राजकीय पक्ष स्थापन करा गरिबांची व दलितांची सेवा

करण्याचे उद्दिष्ट या सर्वानेंपुढे असले पाहिजे ”

बादशाहखानांचे भाषण अगद गंभीरपणाने ऐकले जात होते. पण सरहद्दी पेशाची उथळ-पट्टी व आर्तीय व प्रांतिक दृष्टिकोन या दृष्टीने त्यांचे हल्ले ऐकताना ट्रेझरी बेंचेसवरील नेते खळखळ करीत. ‘ तुम्ही प्रांतवाद वाढवीत आहात ’ असा आरोप एका मंत्र्याने करताच “त्यांचा जात पंजाबी लोकांना विचारा ! त्यांनी ही भाव भावना पसरली आहे ” असा रोकडा जबाब खानांनी दिला.

पंतप्रधान लियाकतअली यांनी नव्या जनतापक्षावर टीका केली, हा नवा पक्ष भारतीयांचा पक्ष-देशद्रोह्यांचा पक्ष–आहे वगैरे प्रकारची विधाने लियाकतअली यांनी आपल्या भाषणात केली त्यांना उद्देशून खानसाहेब म्हणाले, “ आम्ही सच्चे मुसलमान आहोत इस्लामचे बंदे आहोत आमचा नमाज कधी चुकला नाही, आम्ही पाकिस्तानी आहोत व पाकिस्तानच्या इमानाने इमानी राहण्याच्या शपथा घेतलेल्या आहेत आम्ही तुमचे नातलगही आहोत व मूळचे येथले रहिवासी आहोत आणि तुमच्यापैकी कोण केव्हा नमाज पढतो हे आम्हाला माहीत नाही, तुम्ही येथे परके निर्वासित म्हणून आलेले आहात तुम्ही आम्हाला परके म्हणावे, आम्हाला हिंदू म्हणून हिणवावे ? याला काय म्हणावे ? ”

‘ ही एक क्रांती आहे ’ असे लियाकत अलीखान पुटपुटले त्यावर बादशाहखानांनी फक्त हस्तक्षेप करून तुच्छता दर्शविली पण्पून मागणीला प्रांतीयवाद म्हणणाऱ्यांना त्यांनी पुन्हा बजावले “ प्रांतीयवाद मुस्लिम लीगच्या कार्याचे पर्यवसान आहे, आम्हाला पख्तूनिस्तान हवे आहे ते पंजाब सिंधप्रमाणे पाकिस्तानमधीलच हवे ”

कराचीतील त्यांचा हा मुक्काम दीडदोन महिन्यांचा झाला व या काळात त्यांनी पाकिस्तानी राज्ययंत्रणेवर व विशेषत आपल्या सीमाप्रदेशातील कय्यूमखानांच्या हुकूमशाहीवर प्रहार करणारा प्रचार मुलखातून केला.

स्वत बादशाहखानांची हिस्ती जेथे असेल तेथे काही ना काही निमित्ताने १४४ कलम लागू करून सभाबंदी, प्रचारबंदी वगैरे केली जाई परिणामत कार्यकर्त्यांच्या गाठीभेटीही कमी होऊ लागल्या होत्या.

पेशावर येथे असताना त्यांच्या घरी पाहुणा म्हणून आलेल्या एका कार्यकर्त्याजवळ पिस्तूल होते. ते त्याने स्वसंरक्षणार्थ ठेवले होते असे असताही ते अनधिकृतरीत्या बादशाह-खानांकडे होते म्हणून त्या मुद्यावर खटला भरला. कोर्टाने दोन रुपये दंड किंवा कोर्ट उठे-पर्यंतची शिक्षा सुनावली ही घटना १९४८ च्या जानेवारीतील होती अनेक वर्षे खुदाई-खिदमतगारांमध्ये काम केलेल्या कय्युमखानांच्या कारभाराला आणखी क्षुद्रतेचे किंवा सूड-बुद्धीचे स्वरूप ते काय यायचे ? त्यांचे ‘पख्तून’ साप्ताहिक बंद पाडले विरोधी पक्षांच्या

कोणत्याच बातम्या प्रसिद्ध केल्या जात 'नाहीत अशा अनेक तक्रारी त्यांनी केल्या; पण प्रत्यक्ष अत्याचार पचवणाऱ्या शासकांना असल्या टीकेचे काय वाटणार? परंतु स्वतः जिनासाहेबांना या दडपशाहीचा धोका वाटला असणार किंवा बादशहाखानांशी तडजोडीची बोलणी करण्याचा प्रयत्न आपण केला हे दाखविण्यासाठी त्यांनी बादशहाखानांना आपल्याकडे खान्याला पाचारण केले. त्याप्रमाणे उभयतांची भेट राजगृही झाली. दीर्घकाल बोलण्यावरून जिनासाहेबांचा गैरसमज बराच दूर झाला असावा; निदान बादशहाखानांना तसे वाटले. पठाणांची सामाजिक सुधारणा झाल्यावाचून ते कोणत्याच कार्याला लायक होणार नाहीत. शिक्षण व समाजकार्यासाठीच खुदाईखिदमतगार संघटना निघाली, पण ब्रिटिशांच्या छळणुकीमुळे आम्हाला राजकारणी बनविले. आता स्वातंत्र्यानंतर जर त्यांच्यात शिक्षण व समाजसुधारणेचा प्रसार केला नाही तर ते लोक मागेच राहतील; अशा मागासलेल्या लोकांमध्ये लोकशाही शासनाचे तत्त्व मूळ धरू शकणार नाही, अशा आशयाचे आपले धोरण जीनांना खानांनी सांगितले. ते ऐकून जीनाही प्रसन्न झाले. त्यांनी खानांना हार्दिक आलिंगन दिले. खानांच्या विधायक कार्याला सर्वतोपरी मदत करण्याचे आश्वासन दिले. 'एक लाख चरखे तयार करून पाठवतो.' असेही जीनांनी सांगितले. बादशहाखानांनी उलट सांगितले, "मला आर्थिक अगर अन्य कसली मदत नको, मला अन्तःकरणाची भेट द्यावी. मनापासून सहकार्य केल्यास आमच्या अडचणी दूर होतील" हे त्यांनी स्पष्ट केले. या चर्चेच्या वेळी खुदाईखिदमतगार संघटनेने आता मुस्लिम लीगमध्ये समाविष्ट व्हावे असेही जीनांनी सुचविले; पण ते कसे इष्ट नाही व शक्य नाही ते खानांनी सांगितले. "उभयतांची ध्येये वेगवेगळी व विशेषतः कार्यपद्धती वेगळी, लीगच्या कार्यकर्त्यांमध्ये आज प्रामाणिक मनुष्य मिळणे कठीण. अल्पसंख्याकांच्या लुटीतील पैसा ज्यांच्या घरी गेलेला नाही असा लीगचा कार्यकर्ता शोधावा लागेल. हा विषय मी आमच्या कार्यकर्त्यांपुढे ठेवीन. तुम्ही सीमा प्रदेशात या व आमच्या कार्यकर्त्यांपुढे ही चर्चा मांडू." अशा आशयाची बोलणी झाल्यानतर जीनांनी खुदाईखिदमतगारांना पेशावरभेटीच्या वेळी भेटण्याचे आश्वासन दिले. अशा रीतीने या दोन नेत्यांच्या भेटीनंतर त्यावून काही मते निर्माण होईल अशा अपेक्षाही थोड्या निर्माण झाल्या; परंतु नेहमीप्रमाणे घडले मात्र उलटेच. त्यावरून खरोखर समजूत घडवून आणण्याचा हा एक प्रयत्न होता का बादशहाखानांविरुद्ध कांगावा करण्यास पुरावा निर्माण करावयाचा होता हे ठरविणे कठीण आहे.

मार्च ते मे १९४८ या दोन-अडीच महिन्यांचा बादशहाखानांचा मुक्काम पार्लमेंट बैठकीसाठी बव्हंशाने कराचीतच झाला. या मुक्कामाचा फायदा त्यांची भूमिका स्वच्छ करण्यास भरपूर झाला; पण ज्यांना खरे ऐकून घ्यावयाचे किंवा समजून घ्यावयाचे नव्हते अशा लीग-

नेत्यांवर काही परिणाम झाला नाहींच, पण बादशाहखानांनी जो जनतापक्ष प्रस्थापित केले त्याला पाठिंबा देणारा वर्ग थोडा वाढू लागला सिंधमध्ये सक्त धरणामुळे जी बडी जमीनदारी वाटली होती त्या वर्गाला आपल्या सवेत इतरांची भागीदारी नको होती, तसेच तेथील मुस्लीम पुढाऱ्यांचा एक गट हळूहळू विरोधी पक्षाकडे ओढला जात होता या गटाला द्विराष्ट्रवादाचे राजकारण तितकेसे मान्य नव्हते, परंतु पाकिस्तानच्या धर्मप्रचाराच्या लोंढ्यात सारे पुढारी वाहून गेले होते प्रत्यक्ष पाकिस्तान निर्माण झाल्यावर व प्रतिगामी वृत्तीच्या स्वार्थांध पुढाऱ्यांच्या हाती पाकिस्तानचे नेतृत्व गेल्यावर अशा लोकांचे डोळे उघडले त्यांना बादशाहखानांचे नेतृत्व मिळताच त्यांच्यात पुन्हा धैर्य आले जी एम् सय्यद व सिंधी यांनी नवा पक्ष उभारण्यात पुढाकार घेतला व स्वत बादशाहखान यानाच नव्या पक्षाचे अध्यक्ष केले. पूर्व बंगालमध्ये बराच असंतोष झालेला होता परंतु कायदे आझम यांच्या प्रभावी नेतृत्वाला आव्हान देण्याची ताकद कोणाच्यात नव्हती बादशाहखानांनी निर्धारपूर्वक तो उद्योग १९४६-४७ मध्ये चालू ठेवला होता पाकिस्ताननिर्मितीनतर तर ते अगदी एकाकी पडले होते. खान-मंत्रिमंडळाचा बळी घेतल्यानंतर तर सीमा प्रदेशात २० २५ वर्षे त्यांनी उभारलेली सारी तेजस्वी संघटना हळूहळू ढिली होऊ लागली होती अशा पीछेहाटीच्या वातावरणात व परिस्थितीत जनतापक्ष उभारला गेला तो सर्व जातिधर्मांच्या नागरिकांस मोकळा होता. ज्या जी एम् सय्यदनी पाकिस्तानची कल्पना सिंधमध्ये लोकप्रिय करण्यात जिनांना साहाय्य केले होते तेच या नव्या पक्षाचे पुरस्कर्ते झाले होते हे लक्षात ठेवण्यासारखे आहे पाकनिर्मितीचा पहिला तडाखा कराची शहर मध्य सर्वेकडे जाण्याने सिंधला बसला होता सय्यद हे प्रारंभीपासून पुरोगामी दृष्टीचे व जनतेच्या सुखदु खाची चिंता वाहणारे जीनांना पुढे पुढे बड्या मांडवलदाराना सांभाळण्यासाठी सय्यदसारख्या कार्यकर्त्यांना दूर सारावे लागले होते उर्दू भाषेला राष्ट्रभाषेचे स्थान देण्याची सक्ती ( पाकमध्ये १९५१ मध्ये फक्त ७ टक्के लोकांना उर्दू येत असे ) केल्यानेही असंतोष माजला होता उर्दू भाषा फक्त पजाबी व सयुक्त प्रदेशाच्या निर्वासित सवाधाऱ्यांनाच येत होती बंगालमध्ये ती १ टक्का लोकांची भाषा आहे, तर पश्चिम पाकिस्तानमध्ये ३ टक्के लोक उर्दू जाणतात या भाषावादाने बरेच कलह वाढले, पण त्यापेक्षा राज्यकारभारातील मांडवली खर्च पक्षपाताने होई नोकऱ्यांत वर्चस्व पजाब व यू पी हून आलेल्या मुस्लिम नेत्यांचे, यामुळे प्रारंभापासून असतोष सुरू झाला होता, या विरोधाचा पुढाकार घेण्यास जी एम् सय्यद यांच्यासारखा स्वतत्र वृत्तीचा व जनतेच्या दु खाला वाचा फोडणारा जुना कार्यकर्ता पुढे आला होता त्यावरून तेथील लोकमताची कल्पना नीट येऊ शकते बादशाहखानांनी या नव्या पक्षाचे तात्पुरते अध्यक्षपद स्वीकारले, इतकेच नव्हे तर त्याच्या

पाकिस्तानमध्ये खुदाई खिदमतगार-संघटना संघटित करण्याची कल्पना कराचीच्या मुक्कामात घोषित केली मे—अखेर कराची सोडण्यापूर्वी पीपल्स पार्टीच्या नेत्यांनी या विचाराचे स्वागत केले पाकिस्ताननिर्मितीचे उद्दिष्ट साध्य झाल्यानंतर मुस्लिम लीगचे विसर्जन करा व सर्व नागरिकांना ज्यात काम करता येईल असा नवा पक्ष निर्माण करा अशी सूचना बादशहाखानांनी पार्लमेंटमध्ये केली होती. त्या सूचनेचा विचार सत्ताधारी पक्ष करणे शक्य नव्हतेच. परंतु मुस्लिम लीगमधून फुटून निघणारे व थोडे पुरोगामी विचाराचे लोक किती झपाट्याने पुढे जिनाच्या नेतृत्वापासून अलग होऊ लागले होते याचे हे उदाहरण आहे परंतु असा प्रामाणिक व जनतासेवक नेत्यांची राज्यकर्त्यांना अडचण होते व ते त्यांचा निकाल लावतात. त्यांच्या हाती सत्ता असल्याने जनतेच्या हिताच्या नावाखालीच अशा विरोधकांना सहज चिरडून टाकता येते, बादशहाखान किंवा जी एम् सय्यद यांच्या या पीपल्स पार्टीचे तेच भवितव्य झाले विशेषत व दशहखानांनी खुदाई खिदमतगार-संघटना सर्वत्र संघटित करण्याची योजना हाती घेतली व ती योजनाच त्यांच्या सर्व विधायक व अहिंसात्मक प्रयत्नांना गाडण्यास निमित्तमात्र झाली

कराचीतील या प्रदीर्घ मुक्कामात त्यांनी, मुख्यत पठाणांच्या पचवीस वर्षांच्या त्यागातून व क्लेशातून पाकिस्तान कसे निर्माण झाले, हे लोकांपुढे मांडले भारताचे स्वातन्त्र्य व त्यातून निर्माण झालेले पाकिस्तान हे स्वातन्त्र्यासाठी ज्यांनी बलिदान दिले त्यांनी कमाविले होते, पाकिस्तानचे प्रचारक किंवा आताचे शासक यांपैकी कोणीच पाकिस्तान मिळविण्यासाठी भोग दिलेला नव्हता स्वातन्त्र्य देणे लांबणीवर टाकण्यासाठी फक्त मुस्लिम लीगच्या पुढाऱ्यांनी ब्रिटिश राज्यकर्त्यांना मदत केलेली होती पठाणांनी मात्र स्वातन्त्र्याच्या लढ्यात अग्रभागाने भाग घेतला होता म्हणून पाकिस्ताननिर्मितीचे श्रेय त्याग केलेल्या पठाणाकडे जाते, आज सत्ता चालणारे धनिक भांडवलदार यांना त्याचे श्रेय घेता येणार नाही हा टोला उघड उघड शासकाच्या वर्मी बसणारा असा होता. आपण फाळणीच्या विरुद्ध होतो हेही त्यांनी स्पष्ट केले, "आता तो वाद शिल्लक नाही पाकिस्तानचे काहीही बरे अगर वाईट घडले तर तो आघात स्वत वर आहे असे मी मानतो" असे त्यांनी स्पष्ट केले.

कराचीतील दोन महिन्यांचा त्यांचा कार्यक्रम त्या वर्षातल्या उलाढालींच्या मानाने बराच उत्साहवर्धक व विशेषत लोकशिक्षणाच्या दृष्टीने उपकारक असा झाला आणि त्यामुळे त्यांच्या या विधायक कार्याचा राज्यकर्त्यांना धोका वाटला असणार, विशेषत कसेही करून सत्ता आपल्या पकडीत ठेवू पाहणाऱ्यांना त्यांच्या या कामाची भीतीच वाटली असणार

सीमाप्रांताचे मुख्य प्रधान अब्दुल कय्यूमखान हे अशा स्वार्थांध व भीतिग्रस्त नेत्यांपैकी होते या कुटिलनीतीच्या क्रूर, राक्षसी महत्त्वाकांक्षी नेत्याचा स्वभाव इतिहासात फाळणीमिश

म्हणून नोंदला जावा असा आहे. या सत्तापिपासू नेत्याने सीमा प्रदेशात बादशहाखानांनी केलेल्या तीस वर्षांच्या विधायक कार्यावर साफ बोळा फिरवला आहे. खुदाईखिदमतगार संघटनेत फितुरी व फाटाफूट केली आणि, ज्यांना त्यांनी गुरुस्थानी व ज्येष्ठ बंधू मानले त्यांनाच— खानबंधूंना—स्वदेशात गजाआड ठेवण्याचे तोमरे चालले. खुदाई खिदमतगार संघटना बेचिराग करण्यासाठी त्यांच्या बायकामुलांवर अनन्वित अत्याचार केले. खानबंधूंच्याबद्दल जीनांना सहानुभूती राहू नये म्हणून निंद्य अशी कपटनाटके रचली. जीनांना मारण्याचा कट खुदाईखिदमतगारांनी रचलेला आहे असे त्यांच्या कानात भरवून खानबंधूंची आणि त्यांची भेट होऊ दिली नाही. केवळ बादशहाखान किंवा खुदाइखिदमतगार यांना आपल्या वाटेतून कायमचे काढून टाकण्याचा निर्धार या सत्तापिपासूने केला होता. असेच नव्हे तर फ्रॉन्टिअर प्रांताच्या मुस्लिम लीगचे जे नेते खानमंत्रिमंडळ उडविण्याच्या कामी त्यांना साहाय्यक होते त्या मांकीचे पीरसाहेब, अब्दुल गफूरखान या साऱ्या लीगनेत्यांनाही या सत्तांध माणसाने पहिल्या वर्षातच तुरुंगाची वाट दाखवली. सत्तास्पर्धेच्या राजकारणातही इतक्या गलिच्छ कारस्थानांनी बरबटलेले चित्र क्वचितच सापडेल. त्यांनी 'गोल्ड अँड गन्स ऑन दि फ्रॉन्टियर' हे चोपडे डॉ. खानसाहेब यांना अर्पण केलेले असून त्यात बादशहाखान हे एक महान नेते व ईश्वराचे प्रेषित अशी त्यांची स्तुती केलेली आहे. काँग्रेस असेंब्ली पक्षाचे उपनेते व के. भुलाभाई देसाई यांचे साहाय्यक म्हणून १९३७ मध्ये त्यांची निवड झाली ती डॉ. खानसाहेबांचे शिफारशीमुळेच. पण जिनांची सत्ता येणार असे दिसताच या कायदे पंडिताने सर्वांने बाटलेल्या एका विधवेला परत तिच्या घरी पोचवावे अशा कोर्टाने दिलेल्या निर्णयाविरुद्ध सत्याग्रह आरंभला, त्यातूनच त्यांचे पुढारीपण निर्माण झाले! 'जसजसे काँग्रेसवाले अगर हिंदू विरोध करीत जातील तसतसे पाकिस्तान झपाट्याने विस्तार पावेल' असे जाहीर भाषण पाकिस्तान स्थापन झाल्यावर त्यांनी केले. ते जिनांचे एक विश्वस्त, लियाकतअल्लींचे आधार व त्याप्रमाणे खानबंधूंचे वैरी झाले. एक नमुनेदार विश्वासघातकी मित्र म्हणून हे चित्र बादशहाखानांच्या जीवनचरित्रात अपरिहार्य आहे. पण गुलाम महम्मद गव्हर्नर जनरल झाल्यानंतर पूर्वीच्या नाझीमुद्दीन कारकीर्दीतील कारस्थानी म्हणून कय्यूम यांना पाकमंत्रिमंडळातून, गचांडी मिळाली. अशा आदर्श कारस्थानी पुरुषाची 'सीमा प्रांताचे आदर्श कार्यकर्ते' अशी वर्णने काही परदेशी लेखकांनी (J W Spens–The Pathan Border) केलेली आहेत.

कराचीतील भेटीनंतर लवकरच जिना पेशावरला यावयाचे होते. जूनच्या पहिल्या आठवड्यातच बन्नू येथे कार्यकर्त्यांचे शिबिर-संमेलन बादशहाखानांनी घेतले व जिनांनी केलेल्या सूचना त्यांच्यापुढे ठेवल्या. मुस्लिम लीगशी सहकार्य करण्याची कल्पना कोणाला

मान्य नव्हतीच दोघ्या धर्मसंस्थानांचा प्रचार, अतर्गत दुफळी वाढवण्याची कारस्थाने व राज्यकारभारात चाललेली वशिलेबाजी वगैरे डोळ्यांपुढे असता तत्त्वनिष्ठेसाठी वर्षानुवर्षे घरची भाकरी खाऊन राबलेले खुदाईखिदमतगार तत्त्वभ्रष्ट व राजखाऊ लोकांशी कसे सह कार्य करू शकणार ? समाजसेवेच्या आपल्या कार्यासच वाहून घ्यावे हे धोरण या संमेलनात पुन्हा निश्चित करण्यात आले

या संमेलनानंतर बादशाहखानांनी जिनासाहेबांना एक पत्र पाठवून आपल्या खुदाई खिदमतगार संघटनेचे धोरण व पुढील कार्यक्रम यासंबंधी खुलासा केला त्यानंतरही जर त्यांच्या धोरणासंबंधी कोणाच्या मनात काही किंचित किंवा शका राहिली तर ती कोणत्याच मार्गाने दूर करणे शक्य झाले नसते या पत्रात (ता १८ एप्रिल १९४८) बादशाहखान म्हणतात,

*My Dear Quid E Azam*

They (Khudai Khidmatgars) have unanimously decided that they shall spare no efforts in strengthening and safeguarding the interest of Pakistan and shall do nothing which may tend to obstruct the work of Government but will indulge in legitimate criticism '

जून महिन्याचे दोन आठवडे बादशाहखानांनी मर्दान, कोहाट व पेशावर या जिल्ह्यात प्रचारसभा घेतल्या कराचीतील पार्लमेंटची बैठक, घटनापरिषद वगैरे मोठमोठ्या नावांच्या पोकळ संस्थांचा परिचय जनतेला करून दिला त्यांना खऱ्या प्रातिनिधिक संस्था पाहिजे होत्या लीगच्या झेंड्याखाली व धर्माच्या नावाखाली फक्त धर्मांध धनिक सत्तेसाठी हपापलेले लोक एकत्र झाल्याचे चित्र त्यांनी जनतेला दाखवून दिले जुने परके राज्यकर्ते व आमचे नवे धर्मबांधव यांच्या चेहऱ्यामोहऱ्यामध्ये काही फरक नसल्याचे कठोर सत्य त्यांनी सांगितले जनतेच्या हाती खरी सत्ता येण्यासाठी व इस्लामच्या आदेशानुरूप राजसत्ता चालवण्यासाठी पीपल्स पार्टी स्थापन झाली असल्याची व आपल्या भावी कार्यक्रमाची माहिती त्यांनी या प्रचारात दिली आपण राज्यकारभाराला नवे आहोत वगैरे सरकारी प्रचाराला त्यांनी उत्तर देताना भारताच्या कारभाराकडे बोट दाखवले, "स्वातंत्र्याच्या लढ्यात काँग्रेसबरोबर नसलेले व विरोधक असलेले डॉ श्यामाप्रसाद मुखर्जी किंवा डॉ आंबेडकर यांच्यासारखे लोक नेहरू पटेलांनी सहकारी निवडले आणि येथे लोकप्रतिनिधी दूर फेकले जात आहेत " अशी बोचक टीका त्यांनी केली, आणि जर इस्लामी धर्मतत्त्वानुसार राज्यकारभार चालवायचा तर तुम्हा पठाण भावांचा राज्यकारभारातील चोथा हिस्सा तुम्हाला का मिळू नये ? तुम्ही तुमचा

हिस्सा मिळविण्यासाठी खडे झाले पाहिजे अशी हाक त्यांनी मर्दानच्या प्रचंड सभेत दिली आलेल्या स्वातंत्र्यात फक्त पठाणांचाच वाटा आहे त्यासाठी त्यांनी वीस वर्षे सतत कष्ट केले आहेत सध्याच्या राज्यकर्त्यांनी कष्ट केलेले नाहीत हेही त्यांनी ठिकठिकाणी सांगितले

कय्यूमखानांसारख्या शासकाला या प्रचाराचे वादळ जाणवावे हे स्वाभाविक होते

# २३

## अग्निशयन

ठरल्याप्रमाणे जूनमध्ये जिनासाहेबांनी पेशावरला भेट दिली त्यांच्या स्वागताच्या समारंभातून खानबंधू येऊ नयेत अशी सर्व व्यवस्थाने कय्यूमखानांनी केली होती 'तुम्हाला भेटण्यात ते कमीपणा मानतात' असे विष जिनांच्या कानात ओतले इतके असताही गफारखान जीनांना जाऊन भेटले व खुदाईखिदमतगार संस्थेच्या कार्यकर्त्यांना भेटण्याचे त्यानी मान्य केले होते त्याप्रमाणे भेटीसाठी विनंती केली, पण काही सबबी सांगून त्यांनी आपले वचन मागे घेतले त्याबद्दल जीनांनी नतर खेदही प्रदर्शित केला 'पण तुम्ही आमच्या कोणत्याच समारंभात भेटला नाहीत, आमच्या कार्यक्रमावर बहिष्कार घातला आहे असे दिसते,' या जीनांच्या खोचक बोलण्यावर बादशाहखानांनी चोख खरमरीत उत्तर दिले, पण त्यामुळे जीनांचा गैरसमज दूर होण्याचा संभव नव्हता जीनांच्या एका जाहीर सभेत आपलेच हस्तक पेरून त्यांच्याकरवी 'बादशाहखान झिंदाबाद, खुदाईखिदमतगार झिंदाबाद' असल्या घोषणा कय्यूमखानांनीच करविल्या या घोषणा बंद करण्याच्या निमित्ताने दूरध्वनिक्षेपकावरून कय्यूमखानच ओरडत 'अरे, भारताच्या हस्तकांनो, चूप रहा तुमची मस्ती इथे चालू देणार नाही' हा सारा तमाशा त्यांनी जीनांच्यापुढे घडवून आणला आणि 'तुमच्या खुनाचे कट रचले गेले आहेत' असेही सांगितले जिनांचे गैरसमज दूर करण्याची संधी त्यांना मिळू दिली नाही या सर्व प्रकरणात जिनांचा गैरसमज झाला असे मानायचे का बादशाहखानांसारखा तत्त्वनिष्ठ प्रतिस्पर्धी आपल्याला अडचणीतच टाकील हे ओळखून कय्यूमखानाचे निमित्त वापरून जिनांनीच बादशाहखानांना दूर लोटले हे ठरविणे कठीण आहे 'पाकिस्तानचे मारेकरी, शत्रू' ही शिवी देऊन, जिनांनीच त्यांना निकालात काढले

हे वाचकांनीच ठरवायचे आहे जिनांचे ध्येय पाकिस्तान हे कसे काय ठरले ? ते मूळचे लोकशाहीनिष्ठ, जातिभेद, धर्मभेद न मानणारे, धनिक पारसी स्त्रीशी त्यांनी लग्न केलेले, कुशाग्र बुद्धीचे कायदेपंडित त्यांचा कुराणाशी परिचय नव्हता, त्यांना उर्दू समजत नव्हते, मित्रपरिवारात मुसलमानांपेक्षा हिंदू, पारसी, युरोपियन, पण ते महत्त्वाकांक्षेच्या बाजारात उतरल्यावर, आपल्या बुद्धीची सारी विपरीत वळवण करू लागले हिंदी पुढारी व ब्रिटिश मुत्सद्दी यांच्यावर बौद्धिक कुरघोडी करण्यात त्यांना धन्यता वाटू लागली हिंदी नेत्यांकडून झालेल्या काही चुकांमुळे ते दुरावले गेले असा दावा काही लेखकांकडून केला जातो, पण गांधी, नेहरू, राजेंद्रप्रसाद, आझाद, सुभाषबाबू यांच्यापरी एकाही नेत्याशी स्नेहभावाने अगर मनमोकळेपणाने त्यांना विचारविनिमय करता आला नाही, याचा अर्थ काय ? हे सारे भारतीय नेते जाति धर्मभेदांना विसरलेले होते याविषयी जगातील कोणी विचारवंत शंका प्रदर्शित करू शकणार नाहीत मग अशा नेत्यांना हेतुपुरस्सर त्यांनी डावलले, झुलवले, त्यांनी बादशाहखानांनाही झुलवले, चकवले असणार असेच कोणालाही वाटणार जिनांच्या या बदललेल्या महत्त्वाकांक्षी स्वभावाचा फायदा घेणारे पुढारी त्यांच्या सभोवार १९४० नंतर जमू लागले होते कय्यूमखान हे सर्वांत मागाहून म्हणजे १९४५ अखेर त्यांच्या गोतावळ्यात आले व त्यांच्याच दुष्ट सल्लामसलतीमुळे खानबंधूंचा व खुदाईखिदमतगार-संघटनेचा सत्यानाश झाला जिनासाहेबांनीही ‘ खानबंधू व खुदाइखिदमतगार-संघटना ही पाकिस्तानविरोधी आहे त्यांची राजनिष्ठा कसली आहे त्यांच्याशी जनतेने संपर्क ठेवणे पाकिस्तानला हिताचे नाही ’ अशी घोषणा पेशावर सोडण्यापूर्वी एका जाहीर सभेत केली ते पाकिस्तानशी राजनिष्ठ नाहीत असा शेरा गव्हर्नर जनरलनेच मारल्यावर पुढील भवितव्य उघड होते, पण जिनांचे हे वर्तन त्यांनी बादशाहखानांशी जी बोलणी कराचीत केली त्यांच्याशी सर्वस्वी विसंगत होते ही सर्व कय्यूमखान यांची कारवाई होती सीमाप्रांताचे मुख्य मंत्रिपद निर्वेधपणे त्यांच्या स्वतःच्या नियंत्रणाखाली पाहिजे होते जिनांनी दिलेल्या इशाऱ्याच्या पाठोपाठ तीनच दिवसांनी बादशाहखान बन्नूच्या वाटेवर बहादूरखेल खेड्यापाशी प्रवासात असता त्यांची गाडी अडविण्यात आली तेथून त्यांना तेही तहशीलकडे नेण्यात आले तेथे दिवसभर अन्नपाण्यावाचून अडकविण्यात आले कोहाटच्या डेप्युटी कमिशनरने त्यांच्यावर आरोप ठेवला व जामिनकी देण्यास सुचवले त्यांच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवला होता त्याबद्दल काही पुरावा दाखवा असे बादशाहखानांनी सुचवले पण त्याची जरूरी नव्हतीच बादशाहखानांनीही जामिनकी देण्यास इन्कार केला डेप्युटी कमिशनरने त्यांना तीन वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावली शिक्षा दिल्यानंतर त्यांच्याबरोबरच्या सहकारी मित्रांना भेटही दिली नाही किंवा जरुरीच्या वस्तूही घेऊ दिल्या नाहीत शिक्षा सुनावताच त्यांना मॉटगॉमरी

जेलकडे रवाना केले. फाळणीनंतर बरोबर दहा महिन्यांनी पंधरा जूनला या थोर देश-भक्ताचा पुन्हा बंदिवास सुरू झाला. पंधरा वर्षांनंतरही तो चालूच होता. त्यांच्या पाठोपाठ पेशावर येथे प्रांतिक काँग्रेसचे पूर्वीचे अध्यक्ष अमीर मुहंमदखान व माजी मंत्री काझी अताउल्ला यांनाही तुरुंगात पाठवले. पाकिस्तानच्या पाठीराख्यांनाही या अशुभ घटनांनी विवंचनेत टाकले. पाकिस्तानच्या स्वातंत्र्याची प्रभात सीमाप्रांताच्या पठाणांना ही अशा रीतीने दाहक व मारक वाळगत झाली; आणि आता तर स्वधर्मासाठी राज्यकर्ते बनलेले धर्मबांधव स्वतः कारभार पाहात होते. कय्यूमखान हेच मुख्यमंत्री होते व त्यांचा इस्लाम-रक्षणाचा हा कार्यक्रम होता. इस्लामच्या एका थोर फकिराच्या छळावर पाकिस्तानच्या धर्म-सेवेच्या राजकारणाचा प्रारंभ होत होता. इप्पीच्या फकिराच्या मदतीने पाकिस्तानविरुद्ध पठाण टोळ्यांना उठवण्याची कारस्थाने करण्याचा आरोप बादशहाखानांवर ठेवला होता. बन्नू-कोहाटकडून खानांना पठाण टोळ्यांच्या नेत्यांना भेटण्यास जायचे होते; पण त्यांची अंतर्गत भांडणे मिटवणे, पाकिस्तानने खुदाईखिदमतगारांवर जे शस्त्र उचलले होते किंवा मुस्लिम लीग नेत्यांमध्ये जी अंतर्गत सत्तास्पर्धा सुरू झाली होती त्या भांडणाचा फायदा घेऊन टोळीवाल्या पठाणांनी आपला मारामारीचा धंदा करू नये, त्यांना सभ्यतेच्या चार गोष्टी सांगाव्यात म्हणून त्यांना तिकडे जावयाचे होते. त्याचा विपर्यास आणूनबुजून सरकारने केला. इप्पीचे फकीर यांना हाताशी धरून त्यांच्याकडून सीमाप्रांतावर चढाई करण्यास लावावयाची, भारताचे सैन्य जेव्हा पाकिस्तानवर चालून येईल तीच संधी साधून इप्पीच्या फकिरांनी उलट्या बाजूने चढाई करावी, वगैरे कारस्थाने बादशहाखानांनी रचली होती, अशा अफवा पसरल्या गेल्या. त्या जीनांचे कानी गेल्या. अर्थात या वार्तांमध्ये सत्य स्थिती तेव्हा भारत चढाई करणार होता, या वार्तेवरून कळून येईल. या सर्व वार्ता सर्वस्वी निराधार व निंद्य हेतूने उठवलेल्या आहेत असे बादशहाखानांनी परोपरीने सांगितले; पण यांच्या खुलाशाकडे कय्यूमखानांच्या राजवटीने लक्ष दिले नाही. किंबहुना खोट्या बातम्या कय्यूमकडूनच पिकवलेल्या असल्याने त्यांच्या असत्यतेबद्दल त्यांना अधिक माहीत होते. परंतु त्या सत्य म्हणून कशा टिकवाव्या एवढाच प्रश्न त्यांच्यापुढे होता. तोच प्रचार सरकारी पत्रके करीत राहिली.

बादशहाखानांना आपल्या वाटेतून काढून टाकले, त्याचप्रमाणे डॉ. खानसाहेबांनाही अबोटाबाद जेलमध्ये अडकवून टाकले. बादशहाखानांचे चिरंजीव गनीखान, तसेच काझी अताउल्लाखान, अमीर मुहंमद, अब्दुल बलीखान यांच्यासारखे त्यांचे सहकारी यांना झपाट्याने तुरुंगात टाकले; पण खुदाईखिदमतगार संघटना काही मूठभर पोशाखी लोकांची नव्हती; खेड्यापाड्यांत, गिरिमुलखांत या संघटनेची पाळेमुळे गेली होती. ती मुळे

उखडून काढण्याची संधी कय्यूमचे सरकारही पाहात होते. त्यासाठी कय्यूम सरकारने वाढलेल्या जादा अधिकार जुलै १९४८ मध्ये हाती घेतला. खुदाईखिदमतगार संघटना बेकायदेशीर असल्याचा हुकूम काढला गेला; पण जनता असले हुकूम बरखास्त मानण्यास शिकलेली होती. चारसद्दा गावच्या बाबरा भागात जनतेने निषेधार्थ निदर्शने (१२ ऑगस्ट १९४८) आयोजिली. या निदर्शकांवर सर्व प्रकारचे पाशवी अत्याचार प्रथम पोलिसांनी केले. श्री. प्यारेलालनी त्या पाशवी अत्याचाराचे वर्णन करता येईल म्हणूनच केले आहे. अशी शिकार काही दिवस चालू ठेवण्यात आली. अशी दहशत बसवल्याने खुदाईखिदमतगारांचा निःपात होईल व मग आपण निष्कंटक रीतीने राज्यसत्ता चालवू ही कय्यूमखानांची नीती होती. बाबरा येथील या अत्याचारांचे वर्णन फारिग बुखारी यांनी पुढीलप्रमाणे केले आहे : " लोकांना जुन्या इंग्रजी अत्याचारांची विस्मृती व्हावी असे अत्याचार शांततापूर्ण मिरवणुकीवर केले. या गोळीबारात शेकडो लोक घायाळ वा मृत झाले. निर्जीव प्रेतांचा शोध मोठ्या मुश्किलीने व चमत्कारिक रीतीने कालांतराने लागला. जखमी लोकांना सरकारी इस्पितळात घेतले गेले नाही किंवा उपचारही पोचू दिले नाहीत. " पण कय्यूमखानांचे हे तंत्र स्पष्ट होते व पहिल्याच चढाईत शत्रूला चांगले घायाळ करावे हे त्यांचे धोरण होते. बाबरा गोळीबाराने चोहोकडे हाहाःकार उडाला असता त्याच वेळी या मुख्य मंत्र्याने (कय्यूमखानांनी) पेशावरच्या यादगार चौकातील आपल्या व्याख्यानात सांगितले, ' गुरबा कुरतन रोजे अव्वल बिल्ली ' म्हणजे मांजराला (शत्रूला) पहिल्याच तडाख्यात निकालात काढला पाहिजे. सुरुवातीसच आपल्या विरोधकाला आपले भय वाटले पाहिजे. या त्यांच्या जीवनसिद्धांतानुसारमाणे त्यांनी पहिला वज्रप्रहार खुदाईखिदमतगारांवर म्हणजे जुन्या मित्रांवर मारला होता.

कय्यूमखानांनी बादशहाखान व त्यांचे सहकारी यांच्यावर जी मात्रा चालवली तीच त्यांनी त्यांचे विरोधक असलेल्या मुस्लिम लीगच्या नेत्यांनाही लागू केली. ते मुख्यमंत्री होण्याचे वेळीच सीमाप्रांताच्या मुस्लीम लीगमध्ये वादळ सुरू झाले होते. कय्यूमखान हे लीगमध्ये घुसलेले नवे सावज होते. १९४६ च्या दंगली-दडपशाहीच्या काळात जिनांना खरी मदत झाली होती मांकी शरीफच्या पीरसाहेबांची व अरबाब अब्दुर गफूर यांची. अब्दुर गफूर हे तर जुने खुदाईखिदमतगार. परंतु गनीखानांनी पारशी मुलीशी लग्न करणे किंवा डॉ. खानसाहेबांच्या मुलीने शीखाशी शादी करणे हा सारा अधर्माचार आहे अशा खोट्या धर्मबुद्धीने ते धर्मरक्षणार्थ अवतरणारा पाकिस्तानच्या मागे लागले होते. त्यांना स्वतःला जिनासाहेबांच्या विवाहाची माहिती नसल्यास कोण जाणे; पण पीरसाहेब व अब्दुर गफूर यांनी, सीमाप्रांताचे मुख्य मंत्रिपद कोणाकडे जावे हा निर्णय प्रांतिक लीग व प्रांतिक

भारदे मंडळाचे सभासद यांच्याकडे सोपवा अशी मागणी केली होती सर्वं ह्यांने ती मागणी रास्त होती परंतु जिनासाहेबांनी ती मानली नाही व क्यूमखानांची सत्ता प्रांतिक लीगच्या नेत्यांच्या इच्छेविरुद्ध लादली गेली त्यामुळे प्रांतिक मुस्लिम लीग व क्यूमखान यांचाही संघर्ष प्रारंभापासून सुरू झाला होता त्यामुळे मुस्लिम लीग व आमी लीग पक्ष यांच्या नेत्यांनाही क्यूमखानांच्या सत्तापिपासूपणाचे चटके बाधले होते मुरात बादशहाखान, डॉ खानसाहेब व खुदाईखिदमतगार याचे सर्वं जीवन त्यांनी विस्कळीत करून टाकले क्यूमखानाच्या नंतरच्या तीनचार वर्षांच्या कारकीर्दीत ते संपूर्णतया उद्ध्वस्त केले गेले, अशा सत्तापिपासू सहाय्यकांच्या मदतीने उभारला गेलेला पाकिस्तानचा कारभार स्वत जिनासाहेबांचा अकाली नजीक आगमन, लियाकतअलींच्या खुनास किंवा डॉ खानसाहेबांचा बळी घेण्यास कारण झालेले आहे हेही पाकिस्तानकडे अपेक्षेने पाहणाऱ्यांनी लक्षात घेतले पाहिजे क्यूमखान पेरले गेले तर त्यातून पाकिस्तान नव्हे पण आयुबखान उत्पन्न झाला हा अनुभव आलेला आहे

३० जुलै १९४७ ते १६ जून १९४८ हा बादशहाखानांच्या जीवनातील स्वातंत्र्य उपभोगाचा काल होता या कालचेच वर्णन गेल्या प्रकरणात असून त्या प्रकरणाचे नाव 'अग्निप्रवेश' असे आहे ज्या स्वातंत्र्यप्राप्तीसाठी त्यांनी १९१२ पासून म्हणजे वयाच्या बाविसाव्या वर्षापासून कष्ट केले होते ते स्वातंत्र्य ओठापाशी आले, पण तो अमृताचा पेला त्यांच्यासाठी नव्हता मीराबाईच्या पुढे आलेल्या विषाच्या पेल्याप्रमाणे तो होता आणि तिच्यासारख्याच निष्ठेने, श्रद्धेने त्यांनी त्याचा स्वीकार केला स्वतंत्र पाकिस्तानच्या वार भारातील त्यांचे हे एक वर्षांचे जीवन म्हणजे अक्षरश अग्निप्रवेशासारखे झाले आहे आपण पाकिस्तानचे शत्रू किंवा विरोधक नाही फक्त पठाणांच्या स्वातंत्र्यासाठी झगडत आहोत व पठाणांचे स्वातंत्र्य हे पाकिस्तानला खरे सामर्थ्य देईल हे त्यांनी पुन्हापुन्हा कळकळीने सांगितले, पण त्यांच्या सत्यनिष्ठेचा सेवाबुद्धीचा आवाज सधिसाधू सत्तापिपासूंच्या ढोंगी धर्मगर्जनेत मिसळून गेला आणि शेवटी शरीरही विरून वितळून जावे म्हणून जिद्दीपणे तापवलेल्या बंदिशाळेत त्यांना गाडून टाकण्यात आले छळ, केवळ दगडांच्या भिंतींनी अगर लोखंडी शृंखलांनी होत नसतो तो छळ तत्त्वनिष्ठ मनुष्य आनंदाने सहन करू शकतो, पण समाजनेते समजले जाणारे लोक कमालीच्या दुष्टतेने किंवा स्वार्थांध नेते पशुतुल्य वर्तन करतात त्यामुळे होणाऱ्या व्यथा-वेदना असह्य असतात केवळ तत्त्वनिष्ठ व तत्त्वचिंतक माणसेच अशाही वेळी विवेकाने व ईश्वरनिष्ठेमुळे आपला तोल व प्राण यांचे रक्षण करू शकतात, अग्निशय्येवरील हा सहा वर्षांचा काल बादशहाखान यांनी तसाच घालवला

या कालातील त्यांच्या बंदिशाळेतील जीवनाची काही माहिती कधी बाहेर येऊ शकली

फर्चेमध्ये आल्यानतरच जनतेच्या ध्यानापर्यंत ही बाब आली अर्थात त्या पत्नीकडे भारत सरकार काहीच करू शकले नाही काश्मीर संघर्षामुळे भारत-पाकमध्ये जो मत्सर व द्वेष यांची भिंत निर्माण झाली त्यामुळे उभय राष्ट्रांमधील घटना सत्य स्वरूपात एकमेकांना कळणे कठीण झाले पाकिस्तानच्या कारभाराबद्दल येथे चर्चा करण्याचा प्रश्न नाही, तशी योजनाही इच्छा नाही, पण तेथील पठाण पुढारीच नव्हे तर पूर्व बंगालमधील सत्ताविरोधी पक्ष व कार्यकर्ते यांच्यामधील असंतोष इतके तीव्र स्वरूप येत चालले होते की तो आवाज दडपणे शक्य नव्हते बलुचिस्तान व सीमाप्रांत याप्रमाणेच पूर्व पाकिस्तानमधील १८०० कार्यकर्ते तुरुंगात डांबून टाकले होते यामुळे पाकिस्तान पार्लमेंटमध्ये विरोधी पक्ष विशेष सामर्थ्यवान नसताही तेथील देशभक्तांच्या छळाविरुद्ध आवाज वारंवार उठवला जात होता बादशाहखान हे या सर्वच स्वातंत्र्यनिष्ठ देशभक्तांचे प्रधान दैवत होते

बादशाहखानांची प्रकृती सतत ढासळत चालल्याने त्यांना लाहोर हॉस्पिटलमध्ये १९५२ च्या फेब्रुवारीमध्ये आणून ठेवले तेथे काही उपचार झालेही, पण त्यांच्या प्रकृतीची आबाळ दीर्घ काल होत आलेली असल्याकारणाने व उपचारही वरपांगी व वरवरच होत राहिल्याने रोगनिवारण केव्हा झालेच नाही! त्यांना प्रकृतीचे स्वास्थ्य कधी लाभले नाही फक्त ईश्वरचिंतनामुळे लाभेल तेवढेच, आणि त्यांची ईश्वरनिष्ठा अपार स्वरूपाची असल्यामुळेच ते या साऱ्या मानसिक व शारीरिक वेदना विरघळला शांतपणे तोंड देऊ शकले असणार त्यांच्या आजारीपणासबंधीच्या अर्धवट खऱ्याखोट्या बातम्या बाहेर येत राहिल्यामुळे सीमाप्रांतातील जनतेत चिंतेचे वातावरण वाढले मॉन्गियर विधिमंडळाच्या मार्च ( १९५२ ) च्या बैठकीत पीर जादा महमदगुल यांनी बादशाहखानांच्या प्रकृतीविषयी जनतेला वाटणारी चिंता व्यक्त करणारा ठराव दिला होता, पण सदर ठराव अध्यक्षांनी स्वीकारला नाही

अशा शारीरिक व मानसिक अस्वास्थ्याच्या परिस्थितीत त्यांनी १९५३ चे साल काढिले, त्या काळातील निरनिराळ्या जेलमधील अधिकाऱ्यांच्या वर्तनाविषयी—विशेषत वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या कर्तव्यशून्य वृत्तीविषयी जे जे ऐकण्यात आले त्यावरून बादशाहखानांचे जीवन परमेश्वरानेच जतन केले असे वाटल्यावाचून राहात नाही कड्यावरून लोटून दिले किंवा अग्नीत फेकले तरी शेवटी भक्त प्रल्हाद जिवत राहिला, अशी पुराणकथा आहे बादशाहखानांचे जेलजीवन आणि तेही स्वकीयांच्या सत्तेखालील, हे जसे अनंत यातनांनी व्यापलेले तसेच ते त्यांच्या स्वत च्या निष्ठेचे दर्शन घडविणारे आहे, आणि प्रल्हादाचा असामान्य छळ प्रत्यक्ष बापाने ( हिरण्यकश्यपु ) केला नाही ? पण ती वेडी धर्मश्रद्धा होती, ती श्रद्धा अतिरेकी असली तरी प्रामाणिक होती राक्षसपरंपरेत देवादिकांचे नामसंकीर्तन

होगे हे अघोर कर्म होय, असे क्रिप्सकन्याला प्रांजलपणे वाटत होते इस्लामवर तशी निष्ठा असलेले यांही मुसलमान असतील, पण कोणत्या पाकिस्तानी नेत्याची बादशहाखानांपेक्षा इस्लामधर्मावर अधिक श्रद्धा होती ? कोणत्या सत्ताधीशाने कुराण पाहिले होते वा नमाज-रोजे नियमाने पाळले होते ? अबूबकरचे गरिबीच्या जीवनाचे आदर्श कोणी पाळले होते ? पण या सत्ताधीशांच्या हाती बादशहाखानांना छळ करण्याची सत्ता मजबूर होती व ती आपली सत्ता ढिली होऊ नये म्हणूनच त्यांना तुरुंगात डांबून यासगे कय्यूमखानांना भाग होते हे सारे इस्लाम धर्माच्या नावाखाली केले जात होते

बादशहाखानाचा हा वर्दीशालेतील जीवनाचा काळ शब्दश अग्निशय्येवरील निद्रेसारखा झाला असे म्हणल्यास ती अतिशयोक्ति ठरणार नाही

सुमारे सहा वर्षांच्या बदिवासानतर जानेवारी १९५४ मध्ये बादशहाखानांची रावळपिंडी जेलमधून मुक्तता झाली हजारो लोकांनी त्यांचे स्वागत केले पाकिस्तानच्या जन्माच्या मगलक्षणी त्यांचा हा अग्निशयनाचा काळ सुरू झाला होता त्यांना तुरुंगात का टाकले व कोणी टाकले ? आणि सहा वर्षांनतर त्यांना का सोडले व कोणी सोडले ? ही पार्श्वभूमी नीट लक्षात आली तरच पाकिस्तानच्या राजकीय वाटचालीची बेडीवाकडी पडलेली पावले डोळ्यांसमोर उभी राहतील 'कय्यूमखान पेले तर पाकिस्तानचे पीक न वाढता तये फक्त अय्यूबखान निस्तात' असा उल्लेख पूर्वी आलेला आहे त्याप्रमाणे बादशहाखानांच्या बधमुक्ततेच्या सुमारास आयुबखानांसाठी प्रसूतिवेदना सुरू झाल्या होत्या का० जिना किंवा लियाकतअली यांची स्मृती पाकिस्तानची जनता विसरू शकणार नाही, पण त्यांच्यानंतरच्या राज्यकर्त्यांच्या धोरणात जीनांचीही खरी स्मृती शोधून काढावी लागत होती ज्या मुस्लिम लीगच्या नावाने पाकिस्तान निर्माण झाले ती मुस्लिम लीग निदान पूर्व पाकिस्तानमधून नष्टप्राय झाली होती १९५४ च्या मार्चमध्ये झालेल्या निवडणुकीत एकूण २३७ जागांपैकी अवघ्या दहा जागा या जन्मदाया सघटनेला मिळवता आल्या तर फजलूल हक, सुऱ्हावर्दी आदी जुन्या लीग नेत्यांनीच उभारलेल्या विरोधी पक्षाने २२३ जागा मिळविल्या तरीही सत्ता मात्र मुस्लिम लीगच्याच हाती राहिली होती पूर्व बगालपुरती म्हणजे अर्ध्याहून अधिक लोकसंख्येच्या पाकिस्तानमध्ये लीग इतकी विकलांग झाली होती सिंधमध्ये भ्रष्टाचारासाठी पदच्युत केले गेलेले खुर्रो पुन्हा लीगचे नेते बनले होते, सीमाप्रांतातील लीग बादशहाखानांना नष्ट करू पाहणाऱ्या कय्यूमखानांनीच गारद करून टाकली होती, तर पाकिस्तानच्या सत्तेला आपल्या पकडीत खेळवणारे पजाबी नेते अतर्गत कलहात घायाळ होऊन पडले होते १९५३ मध्ये पजाबमध्ये जी अहमदिया पथाविरुद्ध चळवळ अगर दगल माजवली गेली त्यावरून पाकिस्तानचा कारभार जरी लीगच्या नावाने चालला होता, तरी सत्तासूत्रे कोणाच्या हाती

होती हे पळंगे वर्टीग झाले होते अहमदिया पथाविरुद्ध उठवल्या गेलेल्या या वादळाने सार्‍या पाकिस्तानची हाडे खिळखिळी केली. खुद लाहोरमधील राज्यतंत्र मोडकळीस आले होते. तेथील जाळपोळ लष्करी पाचारणानंतरच थांबू शकली, रेल्वे, बसेस वगैरे वाहतुकीची जाळपोळ, पोस्ट-तारायंत्राची नासधूस व अहमदिया वस्तीचा नायनाट या दृश्यांच्या बातम्या नीच दुबळ्या नाझिमुद्दीन मंत्रिमंडळाच्या नाड्या बंद पडल्या होत्या हे सर्व चालले असता पंजाबचे मुख्यमंत्री दौलताना ( यांनाच लियाकतअलींनी १९४९ मध्ये ममदोत मंत्रिमंडळ उडवून राज्यावर चढविले होते ) हे हात जोडून वाट पाहात बसलेले होते. शेवटी इस्कंदर मिर्झा यांनी लष्कराचे मदतीने ती चिरडली लाहोरमधील या दंगलीची चौकशी करणाऱ्या न्या. मु. मुनीर यांनी "लोकशाही म्हणजे राजकीय हेतूसाठी कायदा व शांततेचा बळी दिला जावयाचा असेल तर आमचे भवितव्य अल्लाच जाणे आणि आम्ही आमचा अहवाल येथेच संपवतो" असे उद्गार काढले आहेत या मुनीर-अहवालाने सार्‍या पाकिस्तानी जनतेला हादरा दिला, पण तेथील राज्यकर्त्या गटबाज नेत्यांवर त्याचा फारसा परिणाम झाला नाही पाकिस्तानचे सत्ताधीश म्हणून गुलाममहमद हे त्या वेळी गव्हर्नर जनरल होते, तर पंतप्रधानपदी मोहमदअली बोग्रा हे होते दोघेही पद्धीचे जुने सनदी नोकर तेच विद्रूप बनविल्या गेलेल्या मुस्लिम लीगचे नेते बनले होते अशा या पार्श्वभूमीवर व एकमेकांवर डावपेच करण्याच्या राजकारणाचा एक भाग म्हणून बादशाहखानांची सुटका झाली होती पंतप्रधान लियाकतअली यांनाही बादशाहखानांना तुरुंगात ठेवणे धोक्याचे आहे असे वाटत होते, पण द्विराष्ट्रवाद किंवा धर्माच्या नावाने चालवला जाणारा राज्यकारभारातील गोंधळ यांना बादशाहखानांचा पाठिंबा मिळणे शक्य नव्हते बादशाहखानांच्या पुरोगामी राष्ट्रवादी दृष्टीचा उपयोग करून घ्यावा असाही विचार मुल्ला-मौलवींच्या उपद्रवाला कंटाळलेल्या लियाकतअलींना सुचला होता असे दिसते, पण वेळ निघून गेलेली होती आणि तत्त्वभ्रष्ट होऊन सत्तेत भागीदारी घेण्यास बादशाहखान तयार नव्हतेच. लियाकतअलींच्या नंतर गव्हर्नर जनरल गुलाम महमद यांनीही १९५३ मध्ये एक-दोन वेळा बादशाहखानांशी सरदार बहादुरखानांतर्फे बोलणी करण्याचा प्रयत्न केला होता "आमची भीती तुम्ही बाळगण्याचे काहीच कारण नाही खुदाईखिदमतगार कोणाचा द्वेष करीत नाही, त्याला कोणाचा सूड उगवावयाचा नसतो, सार्‍या पठाणांवरच अन्याय झाला आहे हे तुम्हाला पटले असले तर तुम्ही आमच्या सुटकेचा विचार करा" असे बादशाहखानांनी सर्वांना उत्तर दिले, पण स्वतःच्या सभोवारच्या प्रश्नांच्या ज्वाला राज्यकर्त्यांना असह्य होत चालल्या होत्या त्यांना काही इलाज शोधणे भागच होते मुख्यतः पूर्व पाकिस्तानने उभारलेल्या सनदशीर विरोधाच्या बंडाला तोंड देण्यासाठी पश्चिम पाकिस्तानचा

एगाडा सुरक्षित करणे जरूर होते. परिस्थितीच्या या दडपणामुळे बादशाहखान तुरुंगाबाहेर आले होते.

बादशाहखानांची ही मुक्तता म्हणजे आगीतून फोफाट्यात फेकले जाण्याइतकीच फेरबदलाची होती. कारण त्यांच्यावर स्थलबद्धतेचा हुकूम लगलीच लावलेला होता. "मी राजकारणी मनुष्य नव्हे, सेवक आहे. सर्वत्र अंधार दिसतो" असे उद्गार सुटका होताच पत्रकारांनी विचारलेल्या प्रश्नांवर बोलताना त्यांनी काढले होते. घटनापरिषदेत भाग घेण्यास त्यांना मुभा होती. कार्यकर्ते त्यांना भेटू शकत होते, पण अन्य विशेष प्रचार-फिरती ते करू शकत नव्हते. याच काळात घटनापरिषदेला, धार्मिक नियंत्रणाचा गळफास लावण्याचा मुल्ला-मौलवींचा प्रयत्न चालू होता. त्यांच्या दडपणाचा प्रतिकार करण्याचे सामर्थ्य पंतप्रधान बोग्रा यांच्या नेतृत्वात नव्हते. घटनापरिषदेत बादशाहखानांनी काही वेळ भाग घेतलाही. ते धर्मनिष्ठ असले तरी त्यांची व धर्मवेड्या नेत्यांची युती कशी होऊ शकणार? गव्हर्नर जनरल गुलाम मोहमद व पंतप्रधान मोहमद अली बोग्रा यांच्या सत्तेला सुरुंग लावण्याच्या दृष्टीने बंगालने कंबर कसलेली होती. घटनापरिषदेत बंगालचे बहुमत होते. बादशाहखानांच्या सुटकेने पठाणांचा जसा उत्साह वाढला होता त्याचप्रमाणे सर्वच सरकारविरोधी गटांची शक्तीही वाढली होती घटनापरिषदेत गव्हर्नर जनरलच्या अधिकारावर निर्बंध लादणारे कायदे पास केले गेले. परिणामतः पूर्व बंगालच्या नेत्यांचे अधिराज्य सर्व पाकिस्तानावर होईल या भीतीने पाकचे राज्यकर्ते घरत झाले होते. पूर्व पाकच्या या संख्याबळावर चढाईला तोंड देण्यासाठी म्हणून पश्चिम पाकच्या चार राज्यांचा सिंध-बलुचिस्तान सीमाप्रदेश व पंजाब यांचा एक शासनगट करावा, त्यामुळे या गटाचे एकमुखी नेतृत्व होईल व त्याच बळावर पूर्व बंगालला नामभूत करता येईल. सध्या प्रत्येक राज्यात जो दुहीपणा आहे तो जाईल वगैरे उद्देश या योजनेचे नेते राज्यांच्या नेत्यांपुढे मांडीत होते, पण ज्या नेत्यांनी मध्यसत्तेच्या मानेला गळफास लावणारे कायदे पास करून घेण्यास बंगाली पुढाऱ्यांना मदत केली होती, तो एकगट योजनेस साहाय्य कसे देणार? खुद्द पंजाबमध्येही एकगट-योजनेचे विरोधक होतेच; कारण बड्या जमीनदारी नेत्यांच्या विरुद्ध तेथे अनेक लोकशाहीवादी व पुरोगामी अगर कम्युनिस्ट असे पक्ष वाढीला लागले होते. 'पाकिस्तान-टाइम्स'सारखी पत्रे व इफ्तिखारउद्दीनसारखे जुने कार्यकर्ते यांनी तेथे लोकशाहीवादी पक्ष स्थापन केले होते. खुद्द सीमाप्रांतात कय्यूमखानांना टांग मारणारे रशीदखान हे जरी एकगटयोजना पास करून घेण्यास तयार होते तरी तेथील जनता व लीगचे नेतृत्व करणारे मानकीशरीफचे पीरसाहेब, अब्दुल गफूर या सर्वांनी एकगटकल्पनेचा केव्हाच चोळामोळा करून टाकला होता. त्यामुळे सिंध व सीमाप्रांत येथील लीगची मंत्रिमंडळे व नेते या सर्वांनाच

मध्यमपंथेने सत्ताभ्रष्ट केले होते. त्यांच्या नेत्यांना तुरुंगाची वाट दाखविली होती. एकगट-योजनेला फक्त मोठमोठे जमीनदार अनुकूल होते. फक्त सत्ताधीशांना खूष ठेवून जमीन-सुधारणाविषयक कायदे पास होऊ नयेत हा डाव जमीनदारांना साधावयाचा होता. सर्व राज्यात लोकांच्या शेतजमिनीचे लढे सुरू झाले होते, आणि बहुतेक राज्यात जमीनधारणेवर निर्बंध घालण्यासाठी कायदे करण्याची मागणी जोराने केली जात होती. पूर्व बंगाल सरकारने २५० एकरांवर जमीन कोणाकडे राहू नये हे तत्त्व मंजूर केले होते. अशा रीतीने या एकगट-योजनेचा पुरस्कार फक्त धनिक व सत्ताधीश करीत होते, तर लोकशाहीवादी नेते त्या योजनेला कसून विरोध करीत होते. "राज्यकारभारात कार्यक्षमता, पाणी व विजेच्या मोठमोठ्या योजना, कारखानदारी, यासाठी एक गट करायला पाहिजे? सर्वांना सारखा न्याय मिळत नाही, लोकांचे स्वभावभेद, भावनाभेद लक्षात घेऊन थाटल्यास पश्चिम पाकचे दोन गट करा, पंजाब व पंजाबेतर सर्व विभाग, लोकमत लक्षात घेऊन एकगटाचा विचार सध्या तहकूब ठेवा" असा विचार बादशहाखानांनी राज्यकर्त्यांपुढे अनेकवार मांडला, पण आपल्या सत्तेवर होणाऱ्या लोकक्षोभाच्या आघाताने ते घाबरे होत चालले होते. तशातच बंगालच्या संयुक्त आघाडीवाल्यांनी एकगटऐवजी पश्चिम पाकचे सहा तुकडे करण्याचा ठराव मध्य कायदेमंडळात पास करून घेतला. यामुळे बादशहाखानांचा विचार कायदेमंडळाने मंजूर केल्यासारखा होता, परंतु लोकमताचा होणारा हा विजय सत्ताधारी नेते थोडाच चालू देणार होते? सर्वत्र दडपशाही करून त्यांनी लोकनेत्यांना वाटेतून दूर केले, सिंध-पंजाबमधील विरोधी गटाच्या मंत्रिमंडळांना मध्यसत्तेने उठवून लावले आणि एवढ्यावर न थांबता सर्वच राज्यघटना बदलून टाकण्याचे अघोरी कारस्थान गव्हर्नर जनरल गुलाम मोहमद व पंतप्रधान मोहमदअली यांनी रचलेले. या साऱ्या कारस्थानामध्ये पाकचे साहाय्यक व नेते अमेरिकेचे राज्यकर्ते होते असे उघड दिसते. त्यामुळे पाकिस्तानी जनतेच्या या राजकीय हत्येच्या दोषाचा योग्य तो वाटा अमेरिकेच्या कपाळी चिकटणारच.

पाकिस्तानमध्ये जी दुफळी झालेली होती ती केवळ सत्तास्पर्धेसाठी होती, नेत्यांमधील वैयक्तिक महत्त्वाकांक्षा व स्वार्थ या पलीकडे त्यांच्यापुढे काही उद्दिष्ट होते असे दिसत नाही. राज्यघटनेमध्ये इस्लाम-धर्माच्या तत्त्वांचा समावेश करण्यासाठी झगडणाऱ्या ३३ उलेमा-मौलवींमध्ये कोणी खरे धर्मनिष्ठ नसतील असे नव्हे, त्यांच्यापैकी बरेच नेते आयुष्यभर धर्म-चिंतन व प्रचार केलेले असे होते. जागतिक कीर्तीचे विद्वानही त्यांच्यामध्ये होते, परंतु त्यांच्यामध्येही मौ. मौदूदी अबुल यांच्यासारखे कडवे जातिनिष्ठही पुष्कळ होते, पण त्यांनाही खेळवणारे गुलाम महमदच होते. तसेच गुलाम महमद, चोमा, सिकंदर मिर्झा व अयूबखान यांना टक्कर देण्यासाठी एकत्र आलेले नेते हे मात्र खऱ्या अर्थाने मुस्लिम लीगचे जुनेपुराणे

नेते होते फजलुल हक, सुऱावर्दी, मो माशानी किंवा सीमाप्रांताचे मार्वाचे पैरसाहेब हे राज्यकर्त्यांच्यापेक्षा सहस्र पटींनी पारच्या मुस्लिम समाजाला जवळचे होते त्यांचा राजकीय झगडा शुद्ध घटनात्मक रीतीने चाललेला होता पाकची राज्यघटना १९३५ च्या कायद्या-खालची होती व का जिना व पंतप्रधान लियाकतअली यांनी ती कार्यान्वित केलेली होती त्या घटनेमागे पाकिस्तानची जनता होती असे असताही पाकचे राज्यकर्ते लोकमताला तुडवीत चालले होते हाच आरोप बादशहाखान त्या वेळी करीत होते, पण त्यांना मान अगर सहकार्य देण्याऐवजी बंदिशाळेत पेरून दिले परिणामत लोकमन दडपले जाण्याऐवजी ते प्रखररूप धारण करून सत्ताधाऱ्यांना भेडसावू लागले, ते विश्वरूप पाहून गोंधळून गेलेल्या सरकारने अमेरिकेकडे धाव घेतली, वस्तुत निवडणुकीपूर्वीही (ऑक्टो १९५४) त्यांनी अमेरिकेकडे धाव घेतली होतीच पंतप्रधान बोग्रा हे अमेरिकेस जाऊन तेथून भरीव मदतीचे आश्वासन मे आयसेनहॉवरकडून घेऊन आले होते. याचा अर्थ सरळ आहे, या साहाय्याच्या बळावर पश्चिम पाकमधील निवडणुकीत यश मिळविले होते, पण तेवढ्याने न भागल्यामुळे आता बोग्रा व सेनाप्रमुख जन अय्यूबखान हे दोघे अमेरिकेस गेले चार वर्षांनंतर येणाऱ्या हुकुमशाही राजवटीचा जन्म याच वेळी झालेला आहे याचे धागेदोरे कोठे व कसकसे पोचतात याचा अंदाज करण्यास फारशा सूक्ष्म बुद्धीची जरूरी नाही इस्लामच्या कल्याणासाठी जन्मलेल्या पाकिस्तानचे हे दोन राजदूत अवघ्या दोन आठवड्यांत वॉशिंग्टनहून परत आले आणि त्यांची गुप्त खलबते गव्हर्नर जनरल गुलाम मोहमद यांच्याशी झाली गुलाम मोहमद हे सदाचे रुग्ण असले तरी निर्धाराचे व पक्क स्वरूपाचे असे होते त्यांनी तत्काळ (२४ ऑक्टो ५४) देशात आणीबाणीची परिस्थिती निर्माण झाल्याचे व घटनापरिषद रद्द केल्याचे घोषित केले अमेरिकेची धावती भेट घेऊन दोन पुढारी सुखरूप स्वदेशी पोचतात, ते गव्हर्नर जनरलशी रहस्यपणे विचार विनिमय करू शकतात, खुद्द कराचीत किंवा ढाका अगर लाहोर येथे कोठेच दगेधोपे नाहीत मग आणीबाणीची परिस्थिती कोणती व कसली ? दुसरी आणीबाणी कसलीच नव्हती, तर गेल्याच महिन्यात सनदशीर रीतीने पूर्व बंगाली नेत्यांनी घटनापरिषदेत जे बहुमत व यश मिळविले होते त्या सनदशीर यशाला मूठमाती द्यावयाची होती हेच ते घोरकर्म राज्यकर्त्यांना साधावयाचे होते त्यासाठी आणीबाणी असणे जरूरच होते या धोरणाची प्रेरणा कोठून व कोणाकडून मिळाली ? ती अमेरिकेकडूनच आणली असा तर्क केल्यास त्यात चूक कोणती ?

नुकतेच तुरुंगातून सोडले गेलेले बादशहाखान हे फक्त या साऱ्या घटनांना साक्षीभूत होते त्यांच्या सान्निध्याने कार्यकर्त्यांचा व नेत्यांचा विश्वास व निर्धार वाढण्यास साहाय्य होत राहिले होते त्यांचा मुक्काम एकदोन वेळच कराचीस झाला असेल, पण त्या मुदतीत

बंगाली नेते विशेषतः मौ. भाशानी, तसेच जी. एम्. सय्यद व अब्दुल मजीद सिंधी आदी नेते परस्परांच्या अधिक जवळ आले. सीमाप्रदेशाचे त्या वेळी नेते मानले गेलेले मांकीचे पीरसाहेब हे तर आता बादशाहखानांचे मोठे भक्त झाले होते. त्यांनीच बादशाहखानांसाठी मुस्लिम लीगचा गळफास आठ वर्षांपूर्वी विणलेला होता. बादशाहखानांच्या अव्यंग प्रमाणाचा पुरावा यापेक्षा अधिक काय पाहिजे ?

गव्हर्नर जनरल गुलाम मोहमद यांनी आणीबाणीची परिस्थिती घोषित केली व पुन्हा बोग्रांना नवे मंत्रिमंडळ बनवण्यास विनंती केली. तत्पूर्वी अय्यूबखानांनीच लष्करी सत्ता हात घेऊ प्यारी अशीही विनंती गव्हर्नर जनरलनी केली होती. हे घडून नंतर अय्युबनीच सांगितले आहे. त्या वेळी स्वतः अय्यूबखान घटनाद्रोहेच्या त्या वाटेला लागण्यास तयार नव्हते, त्या वेळच्या धर्मनिष्ठ नेत्यांच्याच हस्ते पाकिस्तानचे किती वाटोळे होऊ शकते ते जनतेच्या अनुभवास पुरे येऊ द्यावे असाही त्यांचा हेतू असेल! शिवाय लष्करी सत्ता टिकवावी अशीही त्यांना त्या वेळी वाटत असेल! त्यांच्यासंबंधी अकारण अनादर अगर अविश्वास ठेवणे न्यायाचे होणार नाही. नव्या बोग्रा मंत्रिमंडळात ते संरक्षणमंत्री झाले. फजलूल हक व डॉ. खानसाहेब हेही या मंत्रिमंडळात मिसळण्यास तयार झाले. पाकचे नेतृत्व गुलाममहमद–बोग्रा या जोडीकडे चालू राहिले. पूर्व पाकचे गव्हर्नर इस्कंदर मिर्झा यानीही लागलीच म्हणजे आणीबाणी निर्माण झाल्याची घोषणा ऐकताच संयुक्त आघाडीचे हक्क मंत्रिमंडळ उडवून लावले. सरकारने जाहीर केलेली आणीबाणीच ती. ती प्रत्यक्षात नसली तरी निर्माण करण्याचे सामर्थ्य असलेल्या नेत्यांमध्ये अंगभूत असतेच. अशा काळात तेच पुढे नेते ठरतात आणि मिर्झा हे एक अशा कमनशिबी जुन्या लष्करी अधिकाऱ्यांच्यापैकी होते. १९४२ च्या 'चलेजाव' लढ्याच्या काळात लालघडीवाल्यांच्या काही तुकड्या फोर्टिंचेच्या ताब्यात घेण्यास निघाल्या असता त्यांच्या वाटेवर त्यांच्या पहापाण्यातून जुलाबाची काही औषधे कार्यकर्त्यांना पाजण्याचे क्षुद्र कारस्थान त्या वेळी पोलिसकमिशनर असलेल्या या इस्कंदर मिर्झांनी केले होते. असल्या पाचकळ व पोरकट कर्तृत्वाने जुन्या गोऱ्या लष्करी अधिकाऱ्यांचे ते लाडके बनले होते. आणीबाणी जाहीर होताच त्यांनी डाक्क्यास ६–७ शे विरोधी पक्षाच्या कार्यकर्त्यांवर झडप घालून आणीबाणी निर्माण केली, बऱ्याच आमदारांना व मंत्र्यांनाही तुरुंग-स्थानबद्धता दाखविली, बंगाली मुस्लिमांचे अनभिषिक्त राजे म्हणून एके काळी समजले गेलेले वृद्ध फजलुल हक यांनाही त्यांचे घरी स्थानबद्ध केले गेले. भालदार-चोपदारांच्या हाती चवऱ्या मोर्चेलांच्याऐवजी तरवारी व तोफा आल्यावर त्यांच्या धन्यांना बंदिवास भोगावा लागला यात आश्चर्य कसले? कय्यूम पेरले गेले त्याचे हे स्वाभाविक पीक होते

ग. ज. गुलाम महमदांना वस्तुत आता घटना रद्द करण्याचा हक्क राहिलेला नव्हता.

त्याप्रमाणे घटनापरिषदेचे अध्यक्ष तमिसुद्दिन यांनी हे प्रकरण कोर्टात हायकोर्टात नेले. हायकोर्टाने गव्हर्नर जनरलचे हुकूम बेकायदा ठरविले यामुळे पाकिस्तानच्या सत्ताधीशांमध्ये किती हाहाकार उडाला असेल याची कल्पना करणे कठीण नाही, पण गुलाम महंमद किंवा मिर्झा व अय्यूबखान हे आता तसे एकाकी, केवळ स्वतःच्या पायावर विसंबणारे तुकडे नव्हते! त्यांनी परदेशी सल्लामसलतीची व सहकार्याची शक्ती संपादिलेली होती त्यामुळे बेकायदा वागण्यासाठी लागणारी कायदेशीर अडाही त्यांच्यात आता उत्पन्न झाली होती या दमदाटणाऱ्या कज्जावर ते सुप्रीम कोर्टाकडे धावत व या सर्वश्रेष्ठ न्यायालयानेही ही आणीबाणी लक्षात घेऊन डॉ कॉर्नेलियस यांचे मत विरुद्ध असता हायकोर्टाचा हा निर्णय बदलून दिला आणि अशा रीतीने बोग्रामंत्रिमंडळ निर्धास्तपणे कायदेशीर म्हणून वागू लागले या मंत्रिमंडळात अमेरिकेप्रमाणे इंग्लंडचे अभिमानी असणारे धर्मनिष्ठ नेतेही घेतले गेले घटनाबद्ध हक्क मंत्रिमंडळात खेळवणारे इस्कंदर मिर्झा हे गृहमंत्री झाले त्याचप्रमाणे इस्पहानीनंतर मुख्यमंत्री झालेले चौधरी महंमदअली, सिंधचे तल्पूर आदी नेते एकत्र आणले गेले आणि हा सारा खटाटोप कशासाठी तर पश्चिम पाकिस्तानचा एक गट घर-घराच्या हक्कासाठी किंवा खरे म्हणजे लोकशाहीवादी लोकजागृती कायमच नष्ट करण्यासाठी होता घटनापरिषद रद्द करण्याचा पंतप्रधान महंमदअली बोग्रा यांनी आपल्या सरकारचा निर्धार जाहीर करताना सांगितले,

"All this was in full accord with the spirit of Islam which transcends all territorial boundaries--we must cease to regard ourselves as Bengalis, Punjabis and Sindhis"

अमेरिकेच्या पैशावर बलवान होत चाललेल्या नवपंजाबी नेत्यांचे नेतृत्व टिकवण्यासाठी व लोकमताच्या पाठिंब्याने यशस्वी झालेल्या पुरोगामी नेतृत्वाचा चोळामोडा करण्यासाठी जनाब बोग्रांनी केवढी कठोर इस्लामनिष्ठा व्यक्त केली! पण त्यांची ही निष्ठा फक्त स्वतःच्या हातची सत्ता टिकवण्यासाठी व टिकेपर्यंतचीच होती

१९५४ नंतरचा डॉ खानसाहेबांचा उदय व अस्त हे दोन्ही बादशहाखानांच्या इतर छक्क्याप्रमाणेच विलक्षण व बोधपर्यवसायी झालेले आहेत बादशहाखानांच्याबरोबरच डॉ खानसाहेबांची तुरुंगातून मुक्तता झाली खानबंधूंचा बंदिवास किंवा त्यांची मुक्तता याची कारणे उघड आहेत साऱ्या पाकिस्तानमध्ये खानबंधू व त्यांचे खुदाईखिदमतगार, तसेच बलुचिस्तानचे लोक हे द्विराष्ट्रवादास व धर्माच्या नावाखाली देशाचे तुकडे पाडण्यास निर्धाराने विरोध करणाऱ्यांपैकी होते, पाकिस्तान झाल्यानंतर त्यांच्याशी आपण एकनिष्ठ आहोत, पण आमच्या प्रांताला स्वायत्तता द्या ही त्यांची मागणी त्यांनी कधी दिली होऊ दिली

खरेच असणार! कारण डॉ खानसाहेब हा बादशाहखानांच्या शक्तीला आश्रय होता डा खान यांच्याच पाठिंब्यामुळे बोग्रांचे जागी चौधरी व त्यांच मागून सुन्हवर्दी हे पतप्रधान बनवता आले स्वत डॉ खानसाहेबांच्या पश्चिम पाकिस्तानात जरा विभक्त मतदार संघ त्यांना स्वीकारावे लागले होते तरी पूर्वपाकसाठी तेथील लोकमतानुसार संयुक्त मतदार संघ देण्याचा धट्ट घोष ने मिर्झा व पजाबी लीगवाले यांना घ्यावा लागला होता डॉ खानसाहेबांचे राजकारण हे अनेक दृष्टींनी यशस्वी झाले व मध्यसत्ता मुस्लिमलीगच्या नामधारी नेत्यांच्या हातून सुन्हावर्दी पतप्रधान होताच ( सप्टें १९५६ ) गळून पडली होती कर्तबगार व प्रामाणिक नेते मिळाल्यास घटनामक मार्गेही बरीच यशस्वी वाटचाल करता येते, हा जनतेचा विश्वास यामुळे वाढला, पण त्याचप्रमाणे डॉ खानसाहेब यांच्यामुळेच एकगट्ट विरू शत्रू असा विश्वास मे मिर्झा व त्यांच्या पाठिराख्या नेत्यांना वाटू लागला त्यामुळे प पाकमधील सिंध, सीमाप्रांत व बलुचिस्तान यामधील विरोधी चळवळ चिरडून टाकण्यास मिर्झा मद्दत झाले अशा रीतीने एका बाजूस डॉ खानसाहेब हे स्वत चे सामर्थ्य वाढवू शकले पण तसे करताना एकगट्ट योजनेच्या विरोधकांना बादशाहखानांच्या धोरणाची सर्व शक्ती खची करण्याची संधी गव्हर्नर जनरल मिर्झा यांना मिळाली या पद्धतीमध्येच बादशाहखान यांच्यावर हात टाकण्याचे कर्म डॉ खानसाहेब यांना करावे लागले या तत्त्व भ्रष्टतेच्या मार्गाने जाऊनच आपण शेवटी देशाचे व बादशाहखानांच्या बधमोचनाचे काम फत्ते करू शकू असे डॉ खानसाहेबांना वाटले असावे पण यामुळे सिंध अवामी महाजचे सय्यद, बलुचिस्तानचे अब्दुससमद, तसेच मुस्लिम लीगचे नेते हाशीम गझदर व पीरझादा, पजाबचा आझाद पाकिस्तान पक्ष या सर्व लोकशाहीनिष्ठ व एकगटाच्या विरोधी पक्षांना दडपशाही व तुरुग यांना तोंड द्यावे लागले पश्चिम पाकिस्तानमध्ये आपले आप्तेष्ट व सहकारी यांच्यावर गळफास टाकण्याचे हे कर्म ( ८ मे १९५६ ) डॉ खानसाहेब यानाच करावे लागले १९४२ च्या कॉंग्रेसच्या लढ्याच्या काळात कॉम्रेड एम् एन् रॉय व इतर काही रायवादी व कम्युनिस्ट नेते हे सरकारी मदत घेऊन स्वातन्त्र्याच्या लढ्याला विरोध करीत होतेच काही विलक्षण तात्त्विक मतभेदाचे प्रसग जीवनात निर्माण होऊ शकतात प जवाहरलालजी यांनी रॉय यांच्या इतक्या मतभेदानतरही त्यांच्याबद्दलचा स्नेहभाव सोडला नाही अधिकारस्थानांच्या स्वीकारासबधी स्वराज्यपक्षात मतभेद झाले तेव्हा के तांबे यांनी (मध्यप्रदेश कायदेमडळ, १९२५–२६ ) अधिकारपद स्वीकारले त्या वेळी प मोतीलालजींनी ' सल्लेले अन्न ' आपलेच असले तरी ते कापून टाकलेच पाहिजेत असा कडक इशारा दिला, पुढे सारेच स्वराज्यपक्षीय हट्टहट्ट सत्तास्थानांचा पुरस्कार करू लागले समुचित दृष्टीचे कोणते, डावपेच कोणते व स्वार्थप्रेरित निर्णय कोणते हे ठरविणे

कित्येक वेळा कठीण असते. त्याप्रमाणे बादशाहखान यांजवर राजद्रोहाच्या अनेक कलमाखाली खटले भरण्यामागील डॉ. खानसाहेब यांचे धोरण व हेतू कोणता हे ठरविणे सोपे नाही. हा अन्याय ते टाळू शकले नाहीत हा राजकीय प्रमाद भयंकरच आहे. पण त्यांच्या हेतूचा निर्णय करणे कठीण आहे; पण आपल्या भावानेच आपल्या पक्षधोरणाची आज्ञा घावी हा एकमार्गी बादशाहखानांना वज्राघात वाटावा हे स्वाभाविक होते. सहोदराकडून हा आघात झाल्याने त्यांना काही काळ तीव्र व्यथा झाली असणे स्वाभाविक आहे. त्यांचे डॉ. खानसाहेब यांच्याशी राजकारणात मतभेद होते; त्यांचे जीवनविषयक दृष्टिकोन सर्वस्वी भिन्न होते. बादशाहखान व सरदार पटेल यांचे फार कमी साधर्म्य होते. पण अध्यक्ष विठ्ठलभाई पटेल व डॉ. खानसाहेब ह्यांच्या मध्ये बरेच साम्य सापडेल. बादशाहखान हे खऱ्या दृष्टीने अध्यात्मवादी असल्याने तशा निष्ठेचा मनुष्य जन्म व मृत्यू या दोन्ही घटनांकडे समदृष्टीने पाहण्याचा प्रयत्न करीत असतो. जन्ममृत्यूप्रमाणेच बंदिवास व बंधमोचन ही दोन्ही त्यांच्या बाबतीत सारखीच सुखदु:खदायक झालेली होती. व किंबहुना नाममात्र किंवा काहीच स्वातंत्र्य नसलेल्या जेलबाहेरील जीवनापेक्षा त्यांना जेल पसंत वाटला असणार ! पण १२३ अ, १२४ अ, १५४ अवक वगैरे कलमाखालील हा खटला सात महिनेपर्यंत रेंगाळत ठेवला गेला. साक्षीपुरावा मिळविण्यात काही अडचणी आल्याने हा खटला लांबलेला असेल यावर कोणी विश्वास ठेवणार नाही. असल्या सत्ताधीशापुढे तसल्या काही अडचणी निर्माण होऊ शकत नाहीत; शक्य तोपर्यंत काही शिक्षा न करता त्यांना गुंतवून ठेवणे एवढाच हेतू या खटल्याचा असणार ! आणि सात महिन्यानंतर तसेच घडले. चौदा हजार रुपये दंडाची व कोर्ट उठेपर्यंतच्या बंदिवासाची शिक्षा त्यांना दिली गेली. कोर्टाला खुर्चीवरून न उठू देण्याचे सामर्थ्य बादशाहखानांमध्ये नव्हते; पण दंडाचा भुर्दंड न भरणे त्यांच्या हाती होते; पण तोही तत्काल वसूल होऊ शकला; बादशाहखानांनी दंड भरण्याचे नाकारले. पण कोणी तरी अज्ञात व्यक्तीने अगर शक्तीने तो भरला असणार ! त्यामुळे ते तत्काळ ( १७ जुलै १९५७ ) मुक्त केले गेले. आगीतून फोफाट्यात व फोफाट्यातून आगीत हा त्यांच्या जीवनाचा मार्ग झालेला होता. " पुनरपि मुक्ती, पुनरपि सक्ती " हाच तो कार्यक्रम होता.

१९३७ मध्ये डॉ. खानसाहेबांचे मंत्रिमंडळ सत्तेवर आल्यावर बादशाहखानांनी पाच वर्षांच्या वनवासानंतर सीमाप्रांतात प्रवेश केला होता. त्या वेळी त्यांची ज्या उत्साहाने व ज्या थाटात मिरवणूक काढली होती त्याच थाटात डॉ. खान-मंत्रिमंडळाची शिक्षा संपल्यानंतर काढली गेली. उत्साहाने त्यांच्या मिरवणुका काढण्यात पठाण कार्यकर्त्यांना मागे टाकू शकतील असे कार्यकर्ते भारतात कोठे सापडतील असे वाटत नाही ! बंधमुक्त त्यांच्या

अशा मिरवणुकी काढण्यात ते मुंबईकरांच्याही फार पुढे होते. मुख्यतः आपले नेते बंधमुक्त होताच आपली जान त्यांच्यावरून ओवाळून टाकण्याच्या उत्साहाने नाचणारी ही जनता व हे कार्यकर्ते आपले नेते बंदिशाळेत फेकले गेल्यानंतर पाच पाच वर्षे काय करतात हे कळत नाही. परक्या ब्रिटिश सत्तेला टक्कर देताना जनता जो निर्धार व संघटितपणा टिकवू शकली तो निर्धार व ती एकजूट स्वातंत्र्यप्राप्तीनंतर फुटली होती; धर्मवेड, सत्तालोभ, अंतर्गत स्पर्धा या दुर्गुणांमुळे शुद्ध समाजसेवेची बुद्धीही मरगळून पडते; पण बादशहाखानांचे स्फूर्तिप्रद दर्शन होताच जनतेच्या श्रद्धाभावनेला व आनंदाला उत्साहाची भरती येत असे हेही उघड आहे. जनतेच्या अलोट प्रेमाचा तो स्वाभाविक आविष्कार असतो असेच मानले पाहिजे. " इस्लाम धोक्यात आहे " या आरोळीचा प्रभाव जनतेवरही थोडाबहुत पडलेला होता. पुढाऱ्यांत फाटाफूट झालेली होती. त्यामुळे जनता संभ्रमात पडलेली होती. पण तिचे बादशहखानांवरील प्रेम व विश्वास ढळलेला नव्हता हे स्पष्ट होते.

१९५४ मधील सुटकेनंतर एकदीड वर्ष तुरुंगाबाहेर पण स्थानबद्धतेमध्येच त्यांना काढावे लागले होते. त्यांच्यावरील या स्थानबद्धतेच्या हुकमाविरुद्ध खुदाई कार्यकर्ते बरेच अस्वस्थ होते. व त्या विरुद्ध सत्याग्रह करण्याची त्यांची इच्छा होती; पण बादशहाखानांच्या आदेशानुसार त्यांना स्वस्थ राहावे लागले. जनतेमधील ही अस्वस्थता लक्षात घेऊनच डॉ. खानसाहेब मंत्रिमंडळाने त्यांना निर्बंधमुक्त करून ( जुलै १९५५ ) सीमाप्रदेशात प्रवेश करू दिला, त्या समयीच्या त्यांच्या स्वागताचे वर्णन वाचून कोणाही देशभक्ताला धन्यता वाटल्यावाचून राहणार नाही.

विशेष म्हणजे १९४७ मध्ये बादशहाखानांना खारीत गाडण्यास कय्यूमखानांना साहाय्य करणारे मांकी शरीफचे पीरसाहेब हे त्यांच्या स्वागतामधील प्रमुख नेते बनलेले होते. बादशहखानांचा यशाचा हा एक नमुना आहे. १७ जुलैच्या त्या मिरवणुकीचे बुखारींनी रसाळपणे वर्णन केलेले आहे. " या मिरवणुकीत असंख्य मोटरगाड्या, जीपगाड्या, बसगाड्या, स्टेशन वॅगन्स सामील झाल्या होत्या. अटक नदीवर ठीक आठ वाजता ते जमले होते. त्यात हजारो, लाखो लोक समाविष्ट झाले होते. बादशहाखानांची गाडी सर्वप्रथम होती. त्या गाडीत मागील बैठकीवर ते उजव्या बाजूस व पीरसाहेब डाव्या बाजूस बसले होते. सीमाप्रांतात प्रविष्ट होताच फक्के आगमान स्वागतसमितीच्या सदस्यांनी व मर्दान व स्वाबी भागातून आलेल्या हजारो लोकांनी 'खान झिंदाबाद, पीरसाहेब झिंदाबाद' अशा जयघोषात त्यांचे स्वागत केले. एकवीस बंदुकीच्या बारांनी त्यांना सलामी देण्यात आली. ' अशा थाटात मिरवणूक खैराबाद, जहांगिरा, अकोडा, खटक, नौशहरा, पब्बी आदी गावांवरून पेशावर येथे ६ वाजता पोचली. ' अटकेपासून पेशावरपर्यंत ( सुमारे ५० मैल ) स्वयंसेवकांनी ठिकठिकाणी शेकडो सुंदर कमानी

दरवाजे उभारले होते. या कमानींवर सुंदर वस्तू, कपडे, व फुले यांचे साज चढवलेले होते. बँड-वाजंत्री यांच्या तालावर लोक नाचत-बागडत रस्त्यांवर व दुतर्फा पसरले होते. गावोगावी मानपत्रे दिली गेली. सागराच्या लाटांप्रमाणे जनतेच्या पसरलेल्या थव्यांच्या लाटा मागेपुढे होत व त्यामुळे मिरवणूक मुंगीच्या गतीने पुढे ढकलली जात होती. ईदच्या सणाप्रमाणे लोक खुशीत रंगलेले होते. पेशावरमध्ये प्रविष्ट होतेसमयी खुदाई खिदमतगारांनी भरलेल्या चारपाच लॉऱ्या किस्साखानीपासून गेल्या. त्यांच्या घोषवाक्यांच्या गर्जनेने सारे वातावरण निनादित करून सोडले होते. त्यांच्या मागे ढोल, सुरनई वगैरे वाद्ये वाजवणाऱ्यांचा ताफा होता. त्यांच्यामागोमाग उंटावरील एकोणीस स्वारांचा काफिला तर त्यामागे मोटारींचा तांडा अशा लांबलचक पंगतीच्या वेशेष झालेल्या नागरिकांची ती जत्रा होती. या सर्वांच्या मध्यभागी बादशाहखानांची रंगीबेरंगी फुलांनी भरलेली पांढऱ्या रंगाची गाडी होती. जनतेच्या प्रेमभरित उद्घोषांना बादशाहखान प्रसन्नतेने प्रतिसाद देत होते. 'पाच वर्षांचा वनवास व दोन वर्षांची स्थानबद्धता याच्या मागेनंतर हा पुष्पांचा मार व प्रेमाचा वर्षाव होत होता.' अनेक ठिकाणी बादशाहखानांनी समयोचित व स्पष्टोक्तीची अशी छोटीशी भाषणेही केली. जहांगिरा येथील भाषणात ते म्हणाले. "मी तुमच्यापासून पुष्कळ दिवस दूर राहिलो असलो किंवा आपण एकमेकांपासून शरीराने पुष्कळ दूर राहिलो हे खरे असले तरी मनाने केव्हाच दूर नव्हतो. लोकांवर अशा प्रकारच्या आपत्ती येतात व त्यात त्यांची परीक्षाही होते. अल्लाची कृपा, आम्ही या परीक्षेतून पार पडले आहोत...

"या आंदोलनांनी जनतेमध्ये राजकीय जागृती व समज निर्माण केला त्यामुळे आपण स्वतंत्रही झालो; परंतु आपल्या स्वार्थी दृष्टीमुळे स्वातंत्र्य टिकाऊ करण्यामध्ये आपण अयशस्वी झालो; देश बेकारी, भूक, आदी आपत्तींमध्ये गाडला गेला......मी ज्या वेळी आपल्या प्रांतात हे आंदोलन [ खुदाईखिदमतगार ] सुरू केले तेव्हा स्वार्थत्याग व प्राणिमात्राची सेवा करण्याची इच्छा ठेवण्याबद्दल उपदेश केला, परंतु लोक ते विसरले. मी सांगितलेल्या गोष्टी आचरणात आणा; तसे वरण्यानेच आपला देश, आपल्या भावी पिढ्या समृद्धशाली होतील."
पेशावरमधेही त्यांनी अशाच भावना व्यक्त केल्या. ते म्हणाले, "गेल्या आठ वर्षांत असा एकही दिवस गेला नसेल की जेव्हा मला तुमची आठवण झाली नाही. आपल्यावर ज्या आपत्ती कोसळल्या त्यांचे कारण काय ? आम्हाला जे यश मिळाले त्या यशाचा वाटा अगर फायदा मिळविण्याची प्रत्येकाला इच्छा झाली. जेव्हा सत्ता हाती आली तेव्हा आम्ही आमच्या प्रतिज्ञा विसरलो आणि याच उणीवांमुळे आमच्यावर आपत्ती आली.........मी जेव्हा जेलमध्ये होतो त्या वेळी तुम्हाला हरतऱ्हेने भेडसावले, धमक्या दिल्या; पण अशाने आमचे आंदोलन कोणी दडपून टाकू शकेल असे कधी वाटले नाही. कारण हा देश आमचा आहे आणि

त्याच्यावर आम्हीच शासन करू असा माझा विश्वास आहे. ....

"लियाकत अलीखान सत्तेवर असता सध्याच्या गव्हर्नर जनरलना मी म्हटले होते की, सरकारने आमच्यावर भले कोणताही अन्याय करावा, पण त्यांनी आम्हाला आमचा अपराध तरी काय तेवढे सांगावे, हिंसेचा परिणाम ठीक होणार नाही. त्यातून विद्वेष फैलावत जातो. माझे म्हणणे कोणी ऐकले नाही त्यांना जे वाटले ते त्यांनी केले, पण तुम्ही आता पाहिले पठाणाची श्रद्धा कोणाला नष्ट करता आलेली नाही आजही मी तेच सांगतो की पाकिस्तान सामर्थ्यवान व्हावा व त्याची प्रगती व्हावी अशी सरकारची जर इच्छा असेल तर त्यांनी जनतेचा विश्वास संपादन केला पाहिजे. प्रत्येक कार्य जनतेच्या विचाराने करावयास पाहिजे सरकार जर अशा रीतीने चालले नाही, तर आम्ही एकमेकापासून दूरच राहू

"हा देश आमचा आहे व आजही मी त्याची सेवा करण्यास तयार आहे, पण लोकतंत्री-मार्गाने सत्ता चालली पाहिजे ही माझी शर्त आहे सगळ्या पक्षाना मी हेच सांगू इच्छितो की या देशाचे भले होईल तरच आमचेही कल्याण होईल .सत्ता काय आजही आमच्या हातात येऊ शकेल, पण तिच्या मागे आम्ही जात नाही, कारण ती सांभाळण्याची पात्रता आमच्यामध्ये आलेली नाही. सत्ता चालवण्याची पात्रता आमच्यामधे येईपर्यंत ती हाती घेण्यास मी तयार नाही"

सभेतील उत्साहाचे वर्णन शब्दापलीकडचे होते प्रारंभी स्थानिक लोकप्रिय कवी अजमल खटक यांचे स्वागतपर गीत दणदार रीतीने म्हटले गेले त्या गीताने सर्व श्रोत्यांना सद्गदित बनविले. खटक यांच्या ह्या गीतात पुढील भावार्थ होता.

'हे अफगाण जातिगौरव नरपुंग, तुमच्या आगमनाने आम्हाला जीवन प्राप्त झाले आहे. आम्ही आपले स्वागत करीत आहोत'

पुश्तू कवी फना यांनीही आपली एक कविता बहारदार रीतीने म्हणून दाखविली तिचा चरण : 'पठाणांचे पिता ! आपण कुशल आहात ?' असा होता. सभा विसर्जनाच्या वेळी झालेल्या जयजयकाराने गेल्या सात वर्षांत बादशाहखानांच्या झालेल्या छळाची स्मृती क्षणभर पार पुसून टाकली असेच कोणासही वाटले असते. बादशाहखानांच्या लोकप्रियतेच्या जयजयकारांनी सारे वातावरण दुमदुमले होते, तेच त्यांना बाधणारे होते नाभीतील कस्तुरीचा सुगंध हाच त्या मृगाच्या मारेकऱ्यांना वाट दाखवीत असतो, त्याचप्रमाणे बादशाहखान यांच्या लोकप्रीतीचा हा परिमल हाच त्यांच्या शत्रूंना इशारा देणार ठरला असणार.

जुलै १९५५ मधील सुटकेनंतरच्या ५० मैल लांबीच्या मिरवणुकीतील जयजयकार वाचणाऱ्याही डोळ्यांपुढे अजून असणार, त्या सुटकेनंतर बादशाहखानांनी सीमाप्रदेशात एकात्मयोजनेविरुद्ध जोराने प्रचार-आरंभ केला पूर्वीच्या स्थानबद्धतेच्या काळात हा.

खानसाहेब हे मध्य मंत्रिमंडळात (पुनर्घटित मेमन-मंत्रिमंडळ) सदस्य होते, तर आता पश्चिम पाकच्या एकत्रीकरणाचे ते मुख्य मंत्री झालेले होते आणि त्यांच्या एकत्रीकरणाविरुद्ध बादशहाखानांनी त्यांच्या विरोधी गटांची जोरदार फळी उभारली होती पूर्व पाकचे नेते मा. भाशानी, तसेच सिंध अवामीमहाज, पंजाबची आझाद पाकिस्तान पार्टी या सर्वांना पूर्व व पश्चिम पाकिस्तानमध्ये, ढाका व लाहोर येथे मोठमोठ्या परिषदा भरविण्या पूर्व बंगालमधील दुष्काळी परिस्थितीमुळे (मार्च-एप्रिल १९५६) लोक विशेष हैराण झाले होते तांदूळ स्वस्त विकला जावा म्हणून भाशानींनी सरकारकडे पन्नास कोटी रुपयांची मागणी केली त्यासाठी त्यांनी प्राणांतिक उपोषण केले त्यामुळे सारा पूर्व बंगाल जागृत झाला होता मध्य सत्तेची अस्थिरता शिगेला पोचली होती अशा वेळी पश्चिम पाकमध्ये बादशहाखानांचा प्रचाराही सुरू झाला लाहोर येथे सर्वपक्षीय नेत्यांची बैठक त्यांनी मे महिन्यात बोलाविली (मे १९५६) त्या बैठकीच्या दोन दिवस आधी बादशहाखान व इतर अनेकपक्षीय नेते यांना पकडण्यात आले तोच खटला सात महिने रेंगाळत ठेवला गेला व पूर्वी उल्लेखिल्याप्रमाणे कोर्ट उठेपर्यंतची शिक्षा दिली गेली वडील बंधूच्या सत्तेखालील सात महिन्यांच्या कच्च्या कैदेचा हा प्रकार होता तरीही ती शिक्षाच होती व त्या शिक्षेतून सुटका होताच कार्यकर्त्यांनी मिरवणुका व जयजयकार हे सर्व केलेच पाहिजे वर्षानुवर्षे दप्तरशाही चालली म्हणजे सामान्य दर्जाचे कार्यकर्ते व नेतेही धरून-सरपटून पडत असतात डॉ खानसाहेब त्याचमुळे सत्तास्थानाकडे वळले असणार, तर त्यांचे अनुयायी मिरवणुका काढण्यात समाधान मानून घेत असणार! पण बादशहाखानांसारख्या तत्त्वनिष्ठांना काही फळाचा स्वाद घ्यायचाही नसतो त्यांना अशा दिखाऊ कार्यक्रमांचा कटाक्षच नव्हे तर तिरस्कार असतो त्यामुळे लाहोर हायकोर्टाचे जस्टिस शबीर मुहमद शिक्षेचा निर्णय देऊन निघून जाताच (ता २४ जानेवारी १९५७) बादशहाखानांनी प्रकृति अस्वास्थ्यामुळे सर्वांनाच भेटण्यास नकार दिला, पण वृत्तपत्रकारांनी त्यांना स्वास्थ्य राहू दिले नाही त्यांनी त्यांना सांगितले, " माझी प्रकृती ठीक नाही मला गुपचूप रीतीने माझ्या गावाकडे जाता आले तर बरे होईल मिरवणुकी-तमाशामध्ये भाग घेण्यासाठी मला शक्ती नाही किंवा आपल्या नावाचा डंका वाजण्यावर किंवा असले देखावे करण्यावर माझा विश्वास नाही मी असाच जाऊ शकलो तर तर कोणालाही कष्ट पडणार नाहीत व मीही आरामात घरी जाऊ शकेन " आपले चिरंजीव वलीखान यास त्यांनी सांगितले, "वली, या लोकांना परत जाण्यास सांग माझी प्रकृती ठीक झाल्यावर मी होऊन त्यांच्याकडे जाईन त्यांच्याबरोबर बातचीत करीन " तरीही दि २३ ला दुपारी पाकिस्तान नॅशनल पार्टीतर्फे लाहोर येथे त्यांना सत्कार झाला तो त्यांना नाखुषीने भाग होते

बादशाहखानांनी लोकांना जरी पत्र पाठवले तरी त्यांनीही जे व्हायचे ते दुर्गे दिसरी फेलीच. अग नदीच्या पुलावर ने पोलीसांनी तेथल्या लोकांचे धरणे धरे असा मार्गे गेले आणि नेहरूंच्या शिष्टमंडळात भाग ते पेशावर रस्त्यावरील गावोगावी लोकांसाठी थांबत थांबत त्यांना जावे लागले. त्यांनी सिक्कापूर पाहू दिले नाही, पण नेत्यांच्या मोकळ्या, मेहर व अनुयायी यांनी गर्दी यामुळे ती मिरवणूकच झाली होती. रात्र बादशाह-खान यांच्यासाठी सर अब्दुलकयूम यांनी बंदिस्त मोटार दिमतीस ठेवण्यात आली होती. त्यांच्या गाडीच्या मागे इतर नेत्यांच्या मोटारींची रांग लागली होती. पेशावर येथे उतरून नेहरूंनी शेवटी सिक्कापूर पाहिलेच, परंतु भाषण त्यांनी छोटेसे भाषण केले.

"आमचे सरकार लोकशाहीवादी नाही व हुकूमशाही नाही" ते म्हणाले, "पुष्कळ लोक जोपर्यंत आपापल्या मागण्या व दृष्टिकोन मांडीत नाहीत तोपर्यंत त्यांना सुखाचे दिवस येणार नाहीत. आता पूर्वीचे परकीय लोकांचे सत्तेचे दिवस राहिलेले नाहीत. आता हे आपलेच राज्य आहे. हे एक स्वतंत्र लोकशाही शासन आहे, आपले राज्यकर्तेच असे सांगत असतात की, लोकशाहीमध्ये अंतिम सत्ता जनतेच्या हाती असते. जनतेला पसंत पडतील अशा लोकांना ती गादीवर बसवू शकते किंवा खाली ओढून काढू शकते. हे सिद्धांत लक्षात घेतले असे म्हणता येईल की, आपले हे सरकार लोकशाहीचे नाही किंवा हुकूमशाहीही नाही. सरकारने तरी मुक्त वातावरणात निवडणुकी घडवून आणण्यात यासाठी लोकांनी चळवळ करावी."

या रोगाचा बादशाहखानांचा सात महिन्यांचा मुक्काम लाहोर जेलमध्ये झाला. त्यांचा खटला लाहोर कोर्टामध्ये गाजून गाजून चालत असे. ते पक्के बंदी नसून वरच्या दर्जाची त्यांची ही कैद (अंडर ट्रायल) होती, पण त्यांचे स्वास्थ्य संपूर्णपणे ढासळलेले होते. ज्या कोठड्या त्यांच्यासाठी देण्यात आल्या होत्या त्या कोठड्या १९३० सालापासून वापरात नसलेल्या अशा होत्या. तसेच कबरस्थानच्या एका भागात त्या इमारती असल्यामुळे तेथे भुताखेतांचा मुक्त संचार चालू असतो असेही बोलले जात असे. तेथे बादशाहखानांना एकट्यास ठेवण्यात आले होते. भुता-खेतांची भरपूर सोबत असल्याच्या समजुतीमुळे अधिकाऱ्यांनी कदाचित त्यांना इतर सोबत दिली नसेल. सोबत दिली नाही त्याप्रमाणे अन्नही खराब दिले जात होते, त्यामुळे त्यांचे आरोग्य ढासळले. ते सुटले त्या वेळी आजारीच होते. त्यांना होमेन्द्रुशीचा आजार कायमचा जडला होता. पचनशक्ती अत्यंत क्षीण झालेली होती. झोपेच्या तक्रारीमुळे सर्वच आरोग्य बिघडलेले होते. त्यांच्या आजारीपणाबद्दल वृत्तपत्रांतून आरडाओरड झाल्यानंतर त्यांना लाहोर हॉस्पिटलात ठेवण्यात आले होते. सुटून आल्यानंतरही त्यांची प्रकृती तशीच नादुरुस्त राहिली होती.

आणि हा सारा आंधळा कारभार त्यांचे ज्येष्ठ बंधू मुख्य मंत्री असलेल्या एक-धमक

राज्यानील होता! याचा नीट उपयोग डॉ. खानसाहेबांच्या पुरस्कर्त्यांनाही करता आला नाही. २४ जानेवारी १९५७ ला बादशाहखान मुक्त झाले व त्याच दिवशी त्यांनी पाकिस्तान नॅशनॅलिस्ट पक्षाचे समापदत्व व नेतृत्व स्वीकारले. देशात सर्वत्र क्षोभाचे व चिंतेचे वातावरण होते. सत्तेवर असलेले नेते हे मुस्लिम लीग पक्षाचे असले तरी त्यांच्यामागे जनता न होती. त्यामुळे जनता मुस्लिम लीगला म्हणजे या स्वयंभू नेत्यांना पराभूत करण्यासाठी उत्सुक होती. त्याचमुळे विरोधी पक्षांना एकत्र करणे हाच महत्त्वाचा कार्यक्रम सत्ताधार्‍यांपुढे होता. याच झगड्यात १९५७ मध्ये तीन सरकारे आली होती.

बादशाहखानांच्या स्वागताच्या सभेत पंजाब मुस्लिम लीगचे जुने नेते राजा गझनफरअली यांचेही भाषण झाले. राजकीय पक्षात वाढत असलेल्या निराशेच्या वातावरणाचा उल्लेख त्यांनी केला. सरकार अशीच निवडणुकी लांबणीवर टाकीत राहिले तर त्याविरुद्ध लढा दिला पाहिजे असेही त्यांनी सुचविले. त्या सूचनेस बादशाहखानांनी आपल्या उत्तराच्या भाषणात पाठिंबा दिला. " लोकशासनाचे नाव घेऊन राज्यकर्ते स्वतःच्या लहरीप्रमाणे वागत राहिले आहेत त्यांनी लोकमतानुसार चालले पाहिजे. त्यासाठी निवडणुकी वेळच्या वेळी घेतल्या पाहिजेत. तसे न केल्यास राज्यकर्त्यांच्या या दडपेगिरीच्या धोरणाविरुद्ध आपण लोकमताचे दडपण आणले पाहिजे. या कामी आपण राजा गझनफरअली यांच्याबरोबर काम करण्यास तयार आहोत. थोडे स्वास्थ्य ठीक होताच पंजाबात येऊन मी प्रचारकार्यांत भाग घेईन. गावोगाव हिंडून प्रचार करू." अशा आशयाचे आश्वासन व धोरण त्यांनी सुटकेच्या दिवशीच जाहीर केले. त्यांचे आरोग्य या खेपेस संपूर्ण खलास झालेले होते, त्यामुळे ते काही दिवस विश्रांतीसाठी उतमनझाई येथे राहिले. तथापि ते ज्या नॅशनल अवामी पक्षाचे नेते बनले होते त्या पक्षाचा पूर्व-पश्चिम पाकिस्तानमध्ये राज्यकर्त्यांना ताब्यावर आणण्याचा झगडा चालू होता व त्याकडे लक्ष देणे त्यांना भाग होते.

पंतप्रधान लियाकत अलीखानांच्या खुनापासून ( ऑक्टो १९५१ ) तो डॉ. खानसाहेबांच्या खुनापर्यंत ( १९५८ मे ) चा सात वर्षांचा काल हा पाकिस्तानच्या राज्यकारभारातील मुस्लिम लीगच्या वाढत्या अप्रियतेचा काल आहे. किंबहुना लियाकतअलींच्या खुनाबरोबरच मुस्लिम लीगही कायमची जखमी केली गेली असे मानणे चुकीचे नव्हे. जिनासाहेबांच्यानंतरचे गव्हर्नर जनरल म्हणून आलेले गुलाम मोहमद किंवा मिर्झा इस्कंदर हे दोघेही जुने कारभार वरिष्ठ सरकारी अधिकारी, यांचे लीगशी नाते सिवा लीगविषयक धोरण सरकारी नोकरांचे जे असते तेच होते. फक्त लीगच्या नावावरच राज्य चालवणे त्यांना भाग व सोयीचे होते म्हणूनच लीगला ते जिवंत ठेवीत होते. परंतु ते गैरसोयीचे होताच स्वतः मिर्झा यांनी चौधरी मुहंमदअली यांना पंतप्रधानपदावरून उडवून त्यांचे

जागी अवामी लीगचे जमदाने व सयुक्त आघाडीचे नेते सुरहवर्दी यांना पतप्रधान बनवले आणि डॉ खानसाहेबांच्या ज्या रिपब्लिक पक्षाच्या साहाय्याने सुरहवर्दी पतप्रधान झाले तो रिपब्लिक पक्ष एकगटयोजनेविरुद्ध जोर धरू लागताच गुलाम मोहमद याचीही अप्रियता वाढली १९५६-५७ या सालात पूर्व बंगालमध्ये नॅशनल अवामी पक्षाने जोर धेतला तेथील अहमद सरकार याचे सरकार ( मंत्रिमंडळ ) दुष्काळ व सग्याजी यांच्या प्रक्षोभात पत्याच्या बगल्यासारखे उडाले डॉ खानमंत्रिमंडळही १९५६ मधे पोखरून निघत होते मुख्यत १९५६-५७ मध्ये पूर्व व पश्चिम पाकिस्तान राज्ये सिवा मध्यसत्ता यापैकी कोठेच मुस्लिम लीग पक्षाची सत्ता शिल्लक नव्हती, आणि हा सारा लोकमताचा चढउतार खरोखर बादशाहखानांसारख्यांच्या तपश्चर्येमुळेच व विरोधी पक्षाच्या उच्चाटनातून होत होता लोकजागृती ही लोकनेत्यांच्या तपश्चर्येमुळे व त्यागामुळे होत असते हाच सिद्धान्त येथेही प्रचीतीला आला

बादशाहखानांची मागणी " एकगटयोजना ही अयोग्य व अन्यायाची आहे, त्यामुळे पठाणांसारख्या मागासलेल्या प्रांतावर पुढारलेल्या पजाबी भांडवलदारांचे राज्य नेहमी नांदेल यामुळे पठाण नेहमी असतुष्ट व कष्टी राहतील, त्याऐवजी त्यांना अतर्गत स्वातत्र्य द्या, त्यामुळे पठाण हा स्वत सामर्थ्यसपन्न होईलच, पण त्याबरोबर पाकिस्तानचा तो सामर्थ्यशाली भुजदड ठरेल" अशी होती, पण बादशाहखानांचे कोणी ऐकले नाही, इतकेच नव्हे तर डॉ खानसाहेबही सत्तेवर राहण्यासाठी हळूहळू सर्व तत्त्वांना बगल देत गेले, प्रारभी ते किती यशस्वी झाले होते हेही दिसून आले होते १९५६-५७ सालामध्ये मुस्लिमलीगचे कार्यकर्तेच नव्हे तर मत्रीसुद्धा धडाधड लीग सोडून डा खानसाहेबांच्या रिपब्लिकन पक्षामध्ये मिळत गेले

लीग पक्षाचे गव्हर्नर जनरल मिर्झा हेही डॉ खानसाहेब यांची शक्ती वाढवण्यास मदत करीत होते मग मत्रिमडळातील सरदार रशिद सिवा कयानी यांनी " Muslim League has become a cesspool of intrigue and political blackmail "

(मुस्लिम लीग ही 'राजकीय कारस्थान व गुंडगिरी यांच्या घाणेरड्या पाण्याच्या डबक्यासारखी झालेली आहे ') अशी शिवी हासडून रिपब्लिक पक्षाचा रस्ता धरला होता, पण रिपब्लिक पक्षाचा धडाही भरत आला होता निधर्मी तत्त्वनिष्ठा व राष्ट्रवाद या बाबतीसाठी पश्चिम पाकची जनता डॉ खानसाहेब यांचेमागे जाण्यास तयार होती सीमा प्रांत, सिंध बलुचिस्तान व पजाबमधील मध्यम वर्ग हे सर्व भांडवलवादी नेतृत्वाविरुद्ध म्हणून डॉ खानसाहेबांच्या मागे जाण्यास तयार होते डॉ खानसाहेबांनाही आपला पक्ष जिवत ठेवण्यासाठी भांडवलदारांना उघडा ठेवणे भाग होते पक्षीय राजकारण सुरू झाले म्हणजे भांडवलदारी नष्ट करू पाहणाऱ्या पक्षांनाही आपले काम साधण्यासाठी भांडवलदारांच्या

मदतीने त्याना पायबंद घालता येतो या विसंगतीतर विश्वास ठेवावा असे पट लागते, भाण्डवलदारी ससृतीची च ही किमया आहे डॉ खानसाहेबांचा पक्ष भांडवलदार अगर जमीनदार याच्यामुळे सामर्थ्यवान झालेला नव्हता ते सामर्थ्य डॉ खानसाहेबांच्या पूर्वपुण्याईचे व राष्ट्रवादाचे होते हे त्यांना नीट उमगले नव्हते स्वत ची शक्ती नसलेले लीगवाले जमीनदार डॉ खानसाहेबाना वापरण्याचा प्रयत्न करीत व डॉ खानसाहेब त्याना वापरून आपली उंची वाढवीत असा हा खेळ फार वेळ टिकत नसतो, आणि पूर्व बगालमधील नॅशनल अवामी लीगचा जोरदार वारा बादशहखानाच्या सुटकेनतर पश्चिम पाकमध्ये आला मोठमोठ्या सभा परिषदा झाल्या पक्ष सीमाप्रदेशात या पक्षाला दोन लाख सभासद एक वर्षात मिळाले व पक्षाच्या कायदेमडळाच्या तीस सदस्यानी राजीनामा दिला सत्तेवर राहण्यासाठी स्वत डॉ खानसाहेबनी सेवटी एकगठ्ठयोजनेला तिलांजली देण्यास तयार झाले पण अवामी पक्षाचे लोक डॉ खानसाहेबांशी तडजोड करण्यास तयार नव्हते १९५८ च्या मार्च महिन्यातील डॉ खान-मंत्रिमडळावरील गडांतर मे मिर्झांनी असेंब्ली बरखास्त करून टाळले, पण एकगठ्ठयोजनेखाली सुप्त लागल्याने विशेषत राज्यकर्त्याविरुद्ध वाढणारा असतोष शोषून धरण्यास डॉ खानसाहेब यांच्या पक्षाचे जीर्ण ठरलेले उपरणे उपयोगी पडत नाही हे पाहून मे मिर्झा यांनी जुलै महिन्यात डा खानमंत्रिमडळ रद्द करून टाकले पाकिस्तानमध्ये लोकशाहीच होती असे म्हटले जात असे पण मंत्रिमडळ घडवणे अगर उडवणे हे अधिकार या लोकशाहीत एका गव्हर्नर जनरलच्या हाती दिलेले होते हे उघड आहे डोके ठेचलेल्या सापाचे शरीर काही काळ वळवळत राहते त्याप्रमाणे रिपब्लिकन पक्ष डा खान-मंत्रिमडळ उडवल्यानतरही काही काळ वळवळ करीत राहिला पण मुस्लिम लीगची नामोनिशाणी म्हणजे मध्याचे सत्ताधीश निकालात काढण्याच्या निर्धाराने नॅशनल अवामी पक्ष उद्योगाला लागला होता उलट मुस्लिम लीगची नामशय होत आहे हे पाहून या धोक्याच्या लोकशाही वृत्तीला पायबंद बसावा म्हणून उलेमा मालवी पुन्हा उठाव करू लागले त्यांचा इस्लाम महाज्यप्य हा जोरदार हालचाल करू लागला होता यामळ खन ा मिर्झा थोडे भयभीत झालेले होते, त्यांनी आपल्या समोवार शियापक्षीय सहकाऱ्याचे कडे निर्माण करण्यास आरंभ केला होता ते स्वत शिया पथाचे या साऱ्या झगपगाच्या वातावरणात आपल्या पक्षाला रंग देण्याच्या यामात गतलेल्या डॉ खानसाहेबाचाच खून झाला ( ९ मे १९५८ ) हा खून त्यांनी नोकरीतून काढलेल्या एका इसमाने केला असे सांगितले गेले, पण लियाकत अलींच्या खुनाप्रमाणे डॉ खानसाहब याच्या खुनावर स्पष्ट प्रकाश कधीच पडला नाही लियाकतअलींच्या खुनामागे जे धर्मांध व सत्तांध लोक होते त्यांच्या मागे ब्रिटन-अमेरिकेच्या गुप्त खात्याचे हात होते ( History of Pakistan, P 77, USSR) या आरोपात

सप्याश असेल तर तीच अगर तत्सम कारस्थाने डॉ. खानसाहेब यांच्या खुनामागे नसतील असा विश्वास वाटणे कठीण आहे. यानतरच्या उलाढालीत खुद्द मुस्लिम लीगच्या प्रचारावर स्वयसेवक सघनानार बधने नियमणे घातली गेली (सप्टें. १९५८). त्या वेळी फिरोजखान नून हे पतप्रधान होते व तेही रिपब्लिकन पक्षाचेच होते.

डॉ. खानसाहेबांचा खून हा बादशाहखानाना कौटुबिक जिव्हाळ्याच्या दृष्टीने आघात करणारा होता. त्यांना डॉ. खानसाहेब यांनीच तुरुगात टाकले त्या वेळीही त्यांना इतके दु:ख झालेले नसणार. आपले वडील बधू या नात्याने बादशाहखान त्यांना मान देत असत. त्यांचे त्यांच्यावर प्रेमही खूप होते. ज्येष्ठ बधूच्या राजकीय खुनाचे दु:खही त्यांच्यासाठी वाढून ठेवलेले होते. डॉ. खानसाहेबांचा खून मे १९५८ मध्ये झाला, पण त्याचे धागेदोरे बाहेर कोठे दिसले नाहीत, तरी त्यावरून देशात अराजकाचे किंवा दडलीचे वातावरण निर्माण होत चालले होते, हे स्पष्ट झाले. पाकिस्तानमधील वातावरण, वाढता दुष्काळ व दडपशाही यामुळे प्रक्षुब्ध झालेले होते. जुन जुलैमध्ये पूर्व बगाल मत्रिमडळ बरतर्फ केले गेले. दोन महिने प्रेसिडेंटचा कारभार तेथे लादला गेला होता. त्याच सुमारास इराक, लेबॅनान, जॉर्डन या देशात झालेले उत्पात व अमेरिकेचे प्रतिगामी धोरण यामुळे पाकिस्तानी सेनादलातही अस्वस्थता वाढत होती अशा वार्ता होत्या. विशेषत पाक-सवर्धाच्या अमेरिकेच्या धोरणाबद्दल केवळ सरकारविरोधी गटात म्हणजे नॅशनल अवामी लीगच्या नेत्यांत असतोष होता असे नव्हे तर निद्रुच पतप्रधान इस्माइल चुद्रीगर यांनीही पाकिस्तानने आपले परराष्ट्र धोरण त्वरेने बदलावे अशी सूचना नॅशनल असेम्ब्लीमधील भाषणात (४ सप्टेंबर १९५८) केली होती. सरकारचा पक्षपाती असणारा पश्चिम पाकिस्तानचा जमीनदारवर्गही सरकारचा टीकाकार बनत चालला होता. कारण सरकारविरोधी पक्षाच्या प्रचाराचा प्रभाव जनमतावर होऊन सारे वातावरण स्फोटक बनत चालले होते, यामुळे कराचीतील अमेरिकन वकिलास सप्टेंबरमध्ये तातडीने वॉशिंग्टनला बोलावले गेले होते. बलुचिस्तानमध्ये अमेरिकेला दिल्या गेलेल्या विमानिक तळांच्या व तेलमार्गांच्या कराराविरुद्ध तेथील जनतेने जोरदार विरोधी चळवळ केली होती, तर कालातच्या खानांनी त्या कराराविरुद्ध सशस्त्र प्रतिकार आरभला होता. सुमारे एक वर्षापूर्वीच गिलगिटमधील अमेरिकन विमानिक तळाविरुद्ध पश्चिम पाकिस्तानात व आझाद काश्मीरच्या अनेक भागात लोकांनी निदर्शने केलेली होती. जनतेचा हा जागा असा, वाग व लोकशाही यांच्यामागे होता. त्याचप्रमाणे तो स्वत:च्या देशाच राजकारण स्वत:च्या तत्त्वाने चालणारे असाव, त्यांच्यावर परकीय देशांचे नियत्रण चालू नये या मूलभूत तत्त्वासाठीही होता, पण या वार्ता बाहेर विशेषशा कळत नव्हत्या. नॅशनल अवामी लीगने तेथे

बादशाहखान, माशानी, सय्यद, मिया इफ्तिखारउद्दिन यांनी पूर्व-पश्चिम दोन्ही भागांत शांततेने चळवळ चालवली होती म्हणून लोकांची हलाखीच लोकांना राज्यकर्त्यांविरुद्ध उभी करीत होती, तर स्वयंशासित कारस्थाने व असंतोष वाढत होता नॅशनल अवामी लीगच्या नेत्यांनी सरकारच्या राष्ट्रीय व परराष्ट्रीय धोरण आमूलाग्र बदलावे अशी मागणी केली होती त्यांच्या पक्षाच्या कार्यक्रमात शेतीची आमूलाग्र सुधारणा, एकत्र योजना रद्द करणे, कोणत्याही परकीय सत्तेचे अगर साम्राज्यवादी हेतूने आपल्या राज्यकारभारावर दडपण चालू न देणे व तत्काल निवडणुकी घेणे अशा बाबींचा समावेश होता अशा प्रकारने मोडकळीस आलेली जे मिर्झा इस्कंदर व पंतप्रधान नून यांची सत्ता धोक्यात पडत असल्याचे होत होते

अशा वाढत्या असंतोषावर बेजबाबदार राज्यकर्त्यांजवळ एकच उपाय असतो, तो म्हणजे दडपशाही मिर्झा यांनी आपले दात व हात खुले केले होते, शेकडो कार्यकर्त्यांना खटले न भरता तुरुंगात टाकले आणि यामुळेच राज्यकर्त्यांमधील अंतर्गत भेद वाढत गेले पश्चिम पाकमधील जमीनदारवर्गाला अमला लोकशाहीचा खेळ नकोसा झाला होता ते उघड उघड एकतंत्री राज्यकारभाराचा पुरस्कार करू लागले होते नॅशनल असेंब्ली किंवा पार्लमेंटच्या सदस्यांमध्ये पश्चिम पाकचे बहुसंख्य सदस्य बडे जमीनदारच होते त्यांना या चळवळीच्या वळवळ्या नेत्यांचा उपद्रव नकोसा झाला होता कोणतेही शेतीनियंत्रणाचे कायदे ते होऊ देत नव्हते त्यांच्या दडपणाला तोंड देण्याची शक्ती जे मिर्झांमध्येही राहिली नव्हती नून हे तर पंजाबच्या एका सान्या जिल्ह्याचे ( शाहपूर ) जमीनदार या सर्वांकडून पार्लमेंटरी पद्धतीची ही लोकशाही रद्द करण्याची उघड मागणी सुरू झाली होती स्वत मिर्झांनीच काही दिवसांपूर्वी अमेरिकन पद्धतीची व अध्यक्षाकडे सर्व सत्ता देणारी शासनपद्धती चांगली असा प्रचार सुरू केलेला होता अमेरिकन पद्धतही मूलत सार्वत्रिक निवडणुकीवर आधार रहली आहे व येथे तर निवडणूक घेण्याचे धैर्य सरकारला होत नव्हते, एवढाच काय तो फरक, पण जळत्या घरातून जिवानिशी बाहेर कसे पडावयाचे या चिंतेत पडलेल्या घरमालकांप्रमाणे मिर्झा यांची स्थिती झालेली होती उलट काही बडे अधिकारी व राजकीय क्षेत्रातील सहकारी यांचा नागड्या स्वरूपाच्या हुकूमशाहीला विरोध होता पण बेफाम उधळलेल्या वृद्ध घोडेस्वाराप्रमाणे मिर्झांची स्थिती झालेली होती घोड्यावर जास्त वेळ राहण्याची त्यांची तयारी नव्हती, खाली उतरण्याविषयीची चर्चा करण्यास तर त्यांचे मन धजत नव्हते पश्चिम पाकमधील मंत्रिमंडळात रोज उलथापालथी चालू होत्या जाणाऱ्या मंत्र्यास घाई झाली होती तर नवीन येण्यास कोणी उत्सुक नव्हता, असे हे घबाड उलटले होते घड्याळाचे काटे झपाट्याने फिरत असल्याचा भास पाकच्या पहिल्या राष्ट्राध्यक्षांना ( जे मिर्झा ) होऊ

लागला होता त्या मन स्थितीत दि ७ ऑक्टोबर १८५८ च्या रात्री मिर्झांनी अयूब सत्तेची घोषणा नव्हे पण कुजबूज प्रथम काही परराष्ट्रीय वकिलाशी केली 'सेटो किंवा इतर आतर राष्ट्रीय जबाबदाऱ्या पाकचे नवे सरकार पार पाडतील' असे आश्वासन त्यानी अमेरिका आदींच्या परराष्ट्र वकिलाना बोलावून दिले त्याचप्रमाणे सेनाप्रमुख अयूबखान यांना पाचारण करून त्याच्याकडे शासनाचे सर्वाधिकार सुपूर्द केले अयूबखानांच्या स्वागतासाठी पाकिस्तानच्या लोकशाही नावाच्या वृक्षाच्या पायघड्या अशा रीतीने पसरल्या गेल्या पाकिस्तानच्या जनतेच्या आशाआकांक्षाचे व अभिमानाचे स्थान बनलेल्या या महावृक्षाचा उपयोग हुकूमशाहांच्या पाय पुसण्यासाठी म्हणून केला गेला आणि या साऱ्या घटनांची जबाबदारी नव्हे गुन्हेगारी, धर्माचे नाव घेऊन सत्तेचे राजकारण खेळणाऱ्या मूठभर पुढाऱ्यांच्या कपाळाला चिकटल्यावाचून इतिहास राहणार नाही १९५६ ची राज्यघटना मोडण्याचा दोष केवळ अध्यक्ष अयूबखान किंवा ज मिर्झा यांचेकडे जात नाही, प्रातिनिधिक सत्ता, व जनतेचे सामर्थ्य यांची धूळधाण करणा या सत्ताबाज नेत्यानीच हा लोकद्रोह केला आहे ज्यांच्या हाती सत्ता होती त्यानीच जनतेची ही फसवणूक व बेइज्जत केली होती धर्माच्या नावाने स्वार्थ साधणाऱ्या अशा नेत्यापासून सावध राहण्याबद्दल बादशहाखान अहोरात्र आक्रोश करून सागत राहिले होते त्यासाठी त्यांना आपले आयुष्य कोंडवाड्यात घालवाव लागले

जानेवारी १९५७ पासून तो ८ ऑक्टोबर १९५८ च्या या राज्यक्रांतीच्या म्हटल्या जाणाऱ्या काळात त्यांनी आपला कर्मयोग चालू ठेवला होता "राज्यकारभार हा लोकांच्या भाकरीचा प्रश्न आहे तेथे धर्माचा गोंधळ घालू नका अडाणी जनतेला फसवू नका" हा सल्ला ते सारखे देत राहिले होते त्यांचे सहोदर डॉक्टर खानसाहेब यांनीही तो ऐकला नाही आपल्या बुद्धिमत्तेच्या बळावर आपण स्वार्थी सत्ताधाऱ्यांना मागे टाकू असा डॉ खानसाहेब याना विश्वास असावा त्यानी पुष्कळ यशही मिळवले होते. म्हणूनच कदाचित त्यांचा बळी पडला असेल, राष्ट्रवाद व लोकशाही या तत्त्वाची थोडी चाड असलेला सुद्धा वर्दीसारखा पतप्रधान बघता बघता उडवला गेला, कारण काय तर ब्रिगेडिअर मिर्झांना ते डोईजड होतील अशी भीती वाटू लागली, इस्माइल चुंद्रीगर दोन महिने पतप्रधान म्हणून नांदले तर फिरोजखान नून सारख्या जिनांनाही कधी स्पष्ट शब्द सुनावणाऱ्या धीम नि स्पृह पत प्रधान ११ व्या महिन्यात आपल्या राजगृहात स्थानबद्ध बनला पाकिस्थानचे जगभर हस वणारा हा सारा खेळ इस्लामच्या रक्षणासाठी, प्रतिष्ठेसाठी या जनतेच्या कल्याणासाठी झाला ? पाकिस्तानच्या नव्या घटनेने १९५६ मध्ये घातलेले 'इस्लामिक रिपब्लिक ऑफ पाकिस्थान' हे नावही अयूबखान यांच्या पहिल्या हुकमाने रद्द करले गेले पण 'पाकिस्तान' असे राज्याचे नव नाव मुक्रर झाले, मे मिर्झांनी घटना रद्द केली व सेनाप्रमुख अयूबनी लष्करी

कायदा घोषित केला. त्याच रात्री बादशाहखान, अबदुल समदखान, भाशानी, जी. एम्. सय्यद, मिर्झा इब्राहिम, फैज अहमद फैझ, मन्सूर आदि नेत्यांना तुरुंगात नेऊन ठेवले. अनेक संस्थांना स्थानबद्ध केले. लोकशाही सत्ता गडगडल्याबद्दल कोठेही दुःखाचा सुस्कारा किंवा निषेधाचा आवाज निघाला नाही असा निर्वाळा कीथ कलार्ड व इतर बऱ्याच पर्कीय घटना शास्त्रज्ञांनी दिलेला आहे. घराघराणिक उभ्या केलेल्या लष्करी पोलिसांच्या बंदुकींची नजर चुकवून आवाज उठविण्याचे सामर्थ्य खुद्द इंग्लंड–अमेरिकेच्या नेत्यामध्ये असेल असे मानण्यास फारसी जागा नाही. पाकिस्तानचा राज्यकारभार जनतेला नको होता; जनता हैराण झाली होती हे पूर्णतया खरे होते; पण लोकशासनाचे जनतेला अप्रेम नव्हते. आपल्या सवान्ध नेत्यांना मंत्री व शहाणे करण्याची प्रक्रिया पूर्व पाकिस्तानमध्ये चालूही केली होती; मौ. भाशानी त्यात यशस्वी होत होते आणि पश्चिमी देशांच्या मदतीवर धुंद बनलेल्या पश्चिम पाकिस्तान-मधील जमीनदारांना डॉ. खानसाहेबांनी खेळवीत चाळवीत ठेवले होते; पण मिर्झा–अयूबखान किंवा गुलाम–चौधरी यासारख्यांची सत्ता कोण निर्मीत होते व पोशीत होते? इंग्लंड-अमेरिकेचा सल्ला, पैसा व पाठिंबा; पाक लोकशाहीच्या या हत्येतील परदेशी नेतृत्वाचा वाय प्रांजळपणे तपासण्याचे कर्तव्य पश्चिमी घटनाशास्त्रज्ञ करीत असल्याचे दिसत नाही. स्वतंत्र वृत्तीच्या अभ्यासकांनी याचा विचार केला पाहिजे.

बादशाहखान ८ ऑक्टोबरच्या रात्री हैद्राबादच्या तुरुंगाकडे रवाना झाले. नंतरचा राज्य-कारभार हा लोखंडी पडद्याआड झाला. तेथील घटनांची वार्ता बाहेर कधी फारशी आली नाही. जे काही कळले ते बादशाहखानांच्या लंडनभेटीनंतर. तत्पूर्वी ते कोठे तरी कारागृहात जिवंत आहेत एवढे कळत असे, ते खरोखर जिवंत आहेत किंवा नाही हेही कळण्यास मार्ग नव्हता. अयूबखानांच्या हुकुमशाहीने पाकिस्तानचे किती व कोणते भले केले आहे हे विचारण्याचा अधिकार तेथील जनतेचा; पण बादशाहखानांसारख्या संत देशभक्ताला इतका दीर्घकाळ तुरुंगात डांबून ठेवावे लागले या घटनेचा काही अर्थ जगाला करावा लागेलच! त्यांच्यासारख्यांच्या स्वास्थ्याबद्दल वर्षानुवर्षे चिंता करण्यापलीकडे सबंध जगाला काही करता येऊ नये ही त्या शासनपद्धतीवरील व जगातील तत्त्वनिष्ठांच्या असहाय्यतेवरील निदारुण अशी टीका आहे.

७ ऑक्टोबरच्या सायंकाळी सर्व पाकिस्तानवर धुके पसरले होते तो मध्यान्हकाळचा अंधार होता. तो अंधार केव्हा व किती कमी-अधिक झाला हा स्वतंत्र अभ्यासाचा विषय आहे. पाकिस्तानच्या राज्यघटनेचा खेळखंडोबा पाकच्या नेत्यांनीच केलेला होता; गरीब जनतेचे जिणे दैन्यवाणे झालेले होते हे सत्य आहे; पण ही परिस्थिती निर्माण करणारे नेते हे परक्या देशांच्या पाठबळावर स्वदेशात सत्ता गाजवीत होते व जनतेच्या विश्वासाच्या

नेत्यांना तुरंगाची वाट दाखविली जात होती या घटनेची नोंद न घेता घटना पडित पाकच्या जनतेच्या अपात्रतेची व नेत्यांच्या गुणावगुणांची चिकित्सा करीत आले आहेत स्वार्थी चलाख लोकाना हाताशी धरून व त्यांना सर्व प्रकारची मदत देऊन सचोटीच्या देशभक्त-नेत्याना खच्ची करावयाचे, आपल्या हस्तकाना सत्ताधीश बनून त्यांनी स्वदेशाचा सत्यानाश केल्यानतर सर्वच लोकांवर अपात्रतेचा शिक्का मारावयाचा हा उद्योग साम्राज्यपुष्ट ब्रिटिशांनी शभर वर्षे केला न्या. तय्यबजी, हकीम अजमलखान, डॉ अनसारी, मौ महमदअली, मौ आझाद किंवा खादशाहखान याना ब्रिटिश राज्यकर्त्यांनी केव्हाच नेते मानले नाही, स्वत जिनाही जेव्हा सत्ताधीशाना टोले लगावीत होते तेव्हा तेही मुसलमानांचे पुढारी होऊ शकले नाहीत त्या काळात सरकारमान्य पुढारी कोण होते त्याचा उल्लेख येथे करणे जरूर नाही. पण त्या ब्रिटिश धोरणातूनच पाकिस्तान निर्माण झाले आहे पाकिस्ताननिर्मितीनतरही तेथील स्वार्थी पुढाऱ्याना हाताशी खेळवण्याचे जुने तत्रच साम्राज्यवादी राष्ट्रानी चालवल्यामुळे तेथेही खरे देशसेवक बदिशाळेत घुसळले गेले व सधिसाधू नेत्यांच्या डावपेचातून अयुबखान जन्माला आले लोकशाही हत्येच्या या पापातील पश्चिमी राष्ट्रांचा वाटा न ठरवता केवळ पाकिस्तानी नेत्यांना बदनाम करणे प्रामाणिक सशोधकांना व लेखकांना शोभणारे नाही

गव्हर्नर जनरल इस्कदर मिर्झा यांनी घटनाहत्येसबधी काढलेल्या आज्ञापत्रात राज्य-क्रांतीच्या व लष्करी सत्ता स्थापन करण्याच्या कारणांचा उल्लेख आहे पाकिस्तानवर यामुळे ओढवणाऱ्या आपत्तीबद्दल मिर्झाही दु खी होते असे दिसते, पण ही विषारी रोपटी कशी व कोणी वाढवली ? ते म्हणतात

" I have been watching with the deepest anxiety the ruthless struggle for power, corruption, the shameful exploitation of *our simple honest patriotic masses, . . . The prostitution* of Islam for political ends, . These despicable activities had led to dictatorship of the lowest order Adventurers and exploiters have flourished to the detriment of the masses "

यातील कोणती विशेषणे मिर्झा-अयूब यांना लागू नव्हती ? जनरल अयुबखान यांनी हुकूमशाहीची कारणे पुढीलप्रमाणे दिली आहेत

" The chaotic conditions have been brought about by self-seekers, who in the garb of political leaders have ravaged the country or tried to barter it away for personal gains Some have done it as a matter of right because they professed to

have created Pakistan and others who were against the very idea of Pakistan openly worked for its dissolution

धर्मभावनेचा दुरुपयोग स्वार्थी नेत्यांनी स्वतःच्या तुंबड्या भरण्यासाठी केला व त्यामुळे लष्करी सत्ता आली हे मिर्झा–अयुबखान यांचे म्हणणे खरे आहे व दोघेही त्या वेळी दुःखी कष्टी अवस्थेत असावेत असे काही लेखकांचे सांगणे आहे. ते खरेही असू शकेल. पण दोघां पुरुषांनी अशी धुमार चालवली असता हे दोघे नेते निरनिराळ्या अधिकारपदावर राहून त्यांच्या धुमाकुळीत सहकारी होतेच. देशहित विकोला काढल्याचा मिर्झांचा आरोप बऱ्याच कम्युनिस्टांविरुद्ध असेल किंवा बादशहाखानांचा भाळणा विरोध त्यांना भला नसेल परंतु मौ. भाशानी यांनी पूर्व पाकिस्तानमधील दुष्काळाच्या वेळी स्वतःचे प्राण पणाला लावले होते. स्वस्त तांदूळ जनतेला मिळावा म्हणून त्यांनी प्रायोपवेशन केले होते. सिंधचे सय्यद हे एक जुने समाजनिष्ठ असे नेते आहेत. यांच्याऐवजी उपरल्या कारवायांबद्दल स्वतः नेत्यांनी ज्यांना लोकबाहेर हाकलले होते त्या खुर्गोंना पुन्हा पुन्हा सत्तापदावर कोण आणीत होते? आणि बादशहाखानांविरुद्ध राग कशाबद्दल? त्यांचा एक गरम विरोध जमीनदार पंजाबी नेत्यांची गुण्डगिरी साम्राज्याच्या पायावर येऊ नये म्हणून होता ना? त्यासाठी त्यांना जन्मभर कैद? आयुष्यभर अपमान व छळ? त्यांना अनादरपणे वागवावे? अयूबखानांच्या शब्दावर विश्वास बसणे कठीण जाते! आणि अयूबखानांनी आपल्या हाती सत्ता येताच दोन आठवड्यात मि. मिर्झा यांनाही सुखाची पिले दाखवली व विमानात बसवून परस्परचे इंग्लंडला रवाना केले असे म्हणतात. आयूबखान व मिर्झा यांना त्यांच्या पूर्वीचे सारे सत्ताधीश गुलाममहंमद, महंमद अली बोग्रा, नाझीमुद्दीन, चौधरी महंमद अली किंवा पंजाबचे दौलताना व नून, सिंधचे खुर्गो किंवा पूर्व पाकिस्तानचे फजलूल हक व अब्रूहसन सरकार हे सारेच पोंगभरू होते असे वाटले की काय? आणि तसे असते तर त्यांची संगत सोडून या दोघांनी विरोधी पक्षाशी हातमिळवणी का केली नाही? तसे करण्याऐवजी परकीय लोकांकडून चोरट्या मार्गाने पैसा व दारूगोळा यांची मदत मिळवून आपल्या देशाची घटना उध्वस्त करणे हा कोठला पुरुषार्थ? आणि असली फितुरी जुन्या सहकाऱ्यांना स्वार्थी चोर म्हणून शिव्या हासडण्याने कशी पुसून निघेल? त्यामुळे तुमचे पावित्र्य प्रस्थापित होणार नाही. त्याचप्रमाणे कमीअधिक सामाजिक स्वास्थ्य अगर आर्थिक स्थैर्य निर्माण करण्यानेही तुमची राज्यक्रांती न्यायाची ठरणार नाही. ती अपरिहार्य व जनहिताची होती का नाही याचे उत्तर तेथील जनताच देऊ शकेल.

बादशहाखान, अब्दुस समदखान, मौ. भाशानी, गुलाममुहंमद सय्यद आदि सर्वच सच्चा देशभक्तांना तुरुंगाची वाट या राज्यक्रांतीने दाखवली असल्याने या राज्यक्रान्ती

संबंधी स्वातंत्र्यनिष्ठ लोक साशंकच राहणार !

बादशाहखानांचा जन्मच तुरुंग साफ करण्यासाठी आहे. त्यांना स्वतंत्रपणे वावरण्यास किती दिवस मिळाले तेच मोजणे अधिक सोपे आहे. सारी हयात तुरुंगातच.

अयूबखान क्रांतीनंतर १९५८ च्या ऑक्टोबरात ते जे तुरुंगात गडप झाले ते १९६४ अखेर लंडनमध्ये उजेडात, खऱ्या उजेडात, लोकशाहीच्या जन्मस्थानात येऊन पडले. ते तेथे कसे फेकले गेले हा इतिहास थोडा लक्षात घेण्याजोगा आहे. त्यामुळे श्रे. अयूबखानाच्या हेतूवर व कार्यपद्धतीवर प्रकाश पडतो. १९५८ ते ६४ हा सर्व काळ बादशाहखान यांनी सलग तुरुंगातच काढला असे नाही. १९६१ मध्ये ते काही काळ मोकळे होते. या सहा वर्षांच्या बंदिवासात त्यांचे पोलादी शरीर दुर्बळ व रोगजर्जर बनले. प्रथम ते हैदराबाद येथे एक-दोन वर्ष राहिले असावेत. तेथील सर्व काळ एकांतात काढावा लागला. तेथील हवा कमालीची गरम. प्रकृती बिघडली तरी तेथील पंजाबी जेलरने त्या रोगाची दखल घेण्याचे नाकारले. रोग्याबद्दल तो बेफिकीर राहू शकतो. पण रोगाची दखल त्याला नियमानुसार घ्यावी लागते. इस्पितळात पाठवण्यासही जेलरने इन्कार केला. इस्लामधर्मीयांच्या भ्रातृभावाचा डंका पाकमध्ये वाजवला जातो, पण तो भ्रातृभाव बादशाहखानांना या अनुभवाला आणून देणारे कोणी अधिकारी भेटले नाहीत असे दिसते. येथे त्यांना मूत्राशयाचा विकार जडला. हैद्राबादेहून लाहोर व लाहोरहून रावळपिंडी किंवा मुल्तान येथे त्यांना या काळात हिंडवले. पण या अठ्ठावन्न सालीच्या जेलच्या काळातील अनुभव ब्रिटिशांच्या काळातील जेलसारखाच किंबहुना अधिक वाईट आला. जेव्हा जेथे प्रतिकूल हवामान असेल तेव्हा तेथे हवा पालटण्यासाठी पाठविण्याची ब्रिटिश परंपराच पाकिस्तानी अधिकारी इमानेइतबारे चालवीत होते. त्यांना लाहोर जेलमध्ये उपचारासाठी नेले, पण तेथेही काही वैद्यकीय तपासणी केली गेली नाही. शेवटी बादशाहखानांना रोगपीडा असह्य झाल्याने त्यांनी मुख्य अधिकाऱ्यास आपण निषेधार्थ अन्नग्रहण बंद करू असे कळवले. हे कळविल्यानंतर व चार दिवस उपोषण केल्यानंतर त्यांना मुल्तान येथे इस्पितळात उपचारार्थ पाठवले गेले. मुल्तानचे उष्णतामान त्या वेळी ११७° पर्यंत जायचे असे. तेथील उपचारांचा थोडा उपयोग होत होता, परंतु तेथील उष्णता त्यांना सहन होईना म्हणून त्यांनी दुसरीकडे पाठवण्यास विनंती केली. त्यावरून त्यांना परत लाहोरला धाडण्यात आले. बदली होईपर्यंत त्यांची प्रकृती अधिक बिघडली होती. या काळातील जेलमधील हकीकतीचे वृत्त हे स्वतः बादशाहखानांच्या तोंडूनच आलेले असल्यामुळे त्यातील सत्यतेसंबंधी शंकेस जागा राहत नाही. श्री. प्यारेलाल यांनीही सर्व हकीकत आपल्या लेखात दिलेली आहे. श्री. कमलनयन बजाज व प्रस्तुत लेखकाशी झालेल्या मुलाखतीनंतरही या बहुतेक घटनांचा उल्लेख आलेला होता. लाहोर येथे पण आल्यावरोबर त्यांची

उन्हाळ्या रूप होताच, पण त्याहापेक्षा त्याना दिलेल्या औषधांनी त्यांना होरपळून काढले त्यान हगवणीचा विकार ( डिसेंट्री ) झाला व त्यावर घुकीने मल्लोच काही औषध दिले गले असे दिसते, पण ही चूक नव्हती तर तो दुष्ट प्रकार होता असे म्हणणे प्राप्त होते त्याना होणाऱ्या यातनांबद्दल त्यानी अधिकाऱ्यांना कळविले तरी डाक्टरने काही इलाज केला नाही उलट त्या वॉर्डीत ते एकटे टाकले गले होते त्या सर्व भागाला व त्यामधील त्याच्या खोलीला कुलुपे ठोकली गली अधिक म्हणजे त्या भागातील रात्रीचे दिवेही बद केले अशा अवस्थेत त्याची काही चौकशी न करता ३६ तास टाकून दिले होते त्या काळात त्यांना प्राणांतिक वेदना झाल्या त्या काळात त्यांचा शेवट होईल असे जेलअधिकाऱ्यांना वाटले असावे असे दिसत तसे दुष्ट हेतू नसतील असे मानण्यास काही आधार सापडत नाही बादशाहखानांसारखा सत्पुरुष तरी स्पष्ट म्हणत नाही । अधिकाऱ्यांचा तसा दुष्ट हेतू असण्याचे कारण काय ? त्याना तुरुगात का टाकले ? तुरुगात टाकल्यानतरही छळ का चालवला गेला ? त्यांना न ओळखणाऱ्या अधिकाऱ्यांकडून हे घडले असेल का ? डॉक्टरने दुर्लक्ष का करावे ? या सर्व शका निरर्थक नाहीत अशी परमावधीची दुष्टता थोर पुरुषांच्या बाबतीतही करण्याची बुद्धी नोकरशाहीत कित्येक वेळा जागृत राहू शकते असे अनुभव १९४२ च्या लढ्यात कार्ही ठिकाणी आले आहेत पण ही केवळ दुष्टता नव्हे तर मूडबुद्धी होती, ती वरिष्ठ नेत्यांच्यामधील का स्वार्थप्रेरित नोकरशाहीची ? या सर्व प्रश्नांची उत्तरे मिळणे कठीण आहे पण लाहोर जेलमध्ये शौचाच्या विकारावर म्हणून केलेल्या या उपचारामुळे मृत्यू येण्याऐवजी त्यांची मुक्तता झाली यामुळे हा प्रयत्न त्यांना मारण्यासाठी म्हणून झाला असला तरी तो खऱ्या अर्थाने त्यांना तारण्यास म्हणजे बाहेर काढण्यास साहाय्यक झाला म्हणून या कारस्थानाला अगर विषारी औषध देणाऱ्या घटनेला जो कोणी जबाबदार असेल त्याचे आभारच मानले पाहिजेत

त्याचा मूळ विकार एकच म्हणजे शौचाचा होता त्या जागी आता अनेक रोग बळावले ! हे त्या औषध देणाऱ्याचे उपकारच नव्हेत का ? कारण इतक्या रोगग्रस्त स्थितीत त्याना तेथे ठेवणे सत्ताधीशांना धोक्याचे वाटले । बादशाहखानांना पूर्वी लो ब्लडप्रेशर होते त्या जागी आता हाय ब्लडप्रेशर आले त्यांना काळजाचा विकारही थोडा जडला किडनी, लिव्हर सर्वच मद अगर बद होण्याच्या मार्गाला लागली मग औषधाचा उपयोग झाला नाही असे कसे म्हणता येईल ? पायावर व सर्वांगावर सूज येऊ लागली अशा स्थितीत त्यांना आता अधिक उपचार करण्याची जरूरी पडणार नाही असे जेलअधिकाऱ्यांना वाटले असावे म्हणून त्यानी त्यांना जेलमधून नव्हे तर लाहोरमधून दूर पळविले लाहोरहून हरिपुर येथे त्यांच्यासाठी स्वतंत्र घर घेऊन दिले व तेथे स्थानबद्धतेत ठेवण्यात आले आणि हरिपुरा काय किंवा लाहोर काय कोठेही त्या प्रभावी उपचारांचा उपयोग व भला होण्याचा धोका

होताच, आता तर सहा वर्षांच्या हुकुमशाही शिस्तीत तयार झालेला अधिकारीवर्ग तयार झालेला होता! प्रेसिडेंट अयूबखान हे त्यांच्या नोकरशाहीला रोज लोकशाहीचे धडे देत होते व त्याचीत मुद्दाम ठेवून राहिलेले पश्चिमी पत्रकार पाकिस्तानच्या या सुधारलेल्या राज्य कारभाराची नित्य जाहिरात करीत असत, मग हा जेलचा अधिकारीवर्ग शिस्तीने व तत्परतेने न वागता कसा राहील? त्यांनी बादशाहखानांना तातडीने हरिपुराला पाठवले, तातडीने घर मिळवले व तेथे आणून मोकळे सोडले आणि हरिपुराची निश्चित थंड हवा त्यांना थंड करण्यास पुरी पडणार नाही असे वाटल्यानेच की काय न कळे, त्यांना नेहमीच हिमगर्भात राहता यावे म्हणून १९६४ च्या हिवाळ्यात लंडनला रवाना केले. हे अयूबखानांच्या सत्ता शिस्तीच्या सुधारलेल्या राज्यकारभारातील ४।५ वर्षांच्या जेलजीवनाचा हा अधुरसा चित्रपट आहे. बादशाहखानांचा हा सारा जीवनप्रवास आगीतून फोफाट्यात, फोफाट्यातून धुक्यात व धुक्यातून बर्फाकडे चाललेला आहे. तेथून ते मूलस्थानकडे पोचावयाचे आहेत.

१९६४ च्या हिवाळ्यात बादशाहखान लंडनला पोचले. त्यांची प्रकृती आता दुरुस्त होणे शक्य नाही आणि त्यांचा पाकिस्तानमध्येच मृत्यू झाल्यास तो सर्व बाजूनी सत्ताधीशांना बाधक ठरेल या भीतीने त्यांना परदेशामध्ये धाडण्यात आले. असा वहीम बादशाहखानांसकट बहुतेकांना वाटतो. त्यांचा पाकिस्तानमध्ये झालेला अमानुष छळ हाच या संशयाला आधार, पण हे डावपेच खेळणाऱ्याचा काही हेतू असला तरी आपल्या भक्तांचे संरक्षण करणाऱ्या परमेश्वरानेच त्यांना सुखरूप राखले आहे हेच खरे. तेव्हा या सुपरिणामाचे थोडेबहुत श्रेय पाकच्या नेत्यांना मिळत असले तर त्यांना ते मिळू द्यावे, पण पाकनेत्यांचे डावपेच येथेच संपले नव्हते. लंडनमधील उपचारांचा चारपाच महिन्यांत सुपरिणाम झाला. तेथेही त्यांना उत्तर इंग्लंडमध्ये थोडे तरी दूरवर ठेवले होते. काही दिवसांनी ते लंडनमध्ये आले. तेथील थंडी त्यांना मानवेना. तेव्हा अमेरिकेमारख्या थोड्या मध्यम हवामानाच्या विभागात राहण्याचा सल्ला डॉक्टरनीच त्यांना दिला. त्यावरून बादशाहखानांनी अमेरिकेस जाण्याचा प्रयत्न केला, परंतु अमेरिकेलाही त्यांना आपल्या देशात उपचारार्थ येऊ देण्यास परवानगी देणे योग्य वाटले नाही. लोकशाही व मानवी स्वातंत्र्य यांचा पुकारा करणाऱ्या या विशाल व वैभवी देशाने हा अनुदार निर्णय का घेतला हे समजणे कठीण नाही, केवळ पाकिस्तानच्या राज्यकर्त्यांच्या सोहबतीसाठी अमेरिकेसारख्या महान देशाने ही क्षुद्रता दाखवली! इंग्लंड विरुद्ध शेकडो वर्षे सशस्त्र युद्ध चालवणारे आयरिश नेते अमेरिकेच्या स्वातंत्र्य निष्ठेच्या विशाल उदरात निर्धास्तपणे वावरत असत, नव्हे तेथे राहून मातृभूमीच्या स्वातंत्र्याचे लढे ते चालवीत, हिंदुस्थानातील क्रांतिकारकांनाही अमेरिकेने आपल्या पोटात अनेक वेळा आश्रय दिलेला होता. मग बादशाहखानांच्या बाबतीत इतका [illegible] का दाखवला गेला?

गे अफगाणांच्या कारभाराशी अमेरिका इतकी एकरूप झालेली आहे याचा हा पुरावा ठरत नाही का ? त्याला अन्य पुराव्याची जरुरी नाही दोन महायुद्धांनंतर भांडवलशाहीचा जो प्रचंड विस्तार अमेरिकेने केला त्याने तिची स्वातंत्र्यनिष्ठा निकृष्ट होत चालली आहे असाच याचा अर्थ आहे

१९५१ मध्ये प. जवाहरलालजींना बादशाहखानांच्या प्रकृतीच्या चिंतेने पुष्कळ व्यथा दिली होती ते भारताकडे येऊ शकतील तर फार बरे होईल असे त्यांना वाटत होते त्या दृष्टीने प्रयत्न का झाले नाहीत या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर मिळू शकत नाही व त्यामुळेही विषाद वाटत राहतो अर्थात तशा प्रयत्नांना यश येणे सक्यही नव्हते बादशाहखानांच्या लंडनमधील वास्तव्यकालात भारतातील काही नेते व कार्यकर्ते त्यांना भेटले होते त्यानंतर भारतात त्यांना आणण्याचा प्रयत्न का झाला नाही ही शंका बाढल्यावाचून राहत नाही तिबेटच्या लामाना आश्रय देण्यासाठी आम्ही अनेक संकटे ओढवून घेतली होतीच मग हे तर आमचे सहोदर–साथी, आमच्या राजकीय लढ्यातील किनीचे सरदार, युद्धभूमीवर घायाळ होऊन पडलेले आमचे नेते त्यांना स्नेहभावाचा संदेश पोचवणे आमचे काम नव्हते ? आमच्या राजकीय धोरणावरील व मित्रप्रेमावरील हा एक काळा डाग आहे असे वाटणे स्वाभाविक आहे बादशाहखानांच्या लंडन येथील मुक्कामात त्यांना भेटलेल्या एका जबाबदार नेत्याजवळ बादशाहखानांनी गांधीजींची व इतर नेत्यांची आठवण काढली, "पठाणांच्यावर पाकिस्तानने अन्याय केला तर भारत आपले कर्तव्य करील," अशा आशयाचे गांधीजी बोलले होते त्याचीही आठवण त्यांनी दिली होती कारणे काहीही असोत भारताला त्या वेळी त्यांच्यासाठी काही करता आले नाही हे खरे, पण चिमुकल्या अफगाण सरकारने आपल्या प्रेमाचे पंख त्यांच्याकडे पाठवले व त्या बळावर हा घायाळ गरुड तिकडे उडाला अफगाणिस्तानसारख्या चिमुकल्या राष्ट्राचे हे धाडस विशेष कौतुकास्पद होते इंग्लंड-अमेरिकेसारख्या बलाढ्यांची त्यात नाराजी होती शिवाय त्यांच्याशी थोडी सलगी अफगाणांनी अलीकडे सुरू केली होती त्या शेजारी राष्ट्राशी वैमनस्य ओढवून घेण्याचा धोका त्यात होता पण तो धोका अफगाण सरकारने पत्करला त्याला रक्त ओळखते हेच खरे ठरले स्वतः सभोवारच्या बलवान राष्ट्रांच्या वैचीत नेहमी नांदत आलेल्या या शूर राष्ट्राने हाही राजकीय डावपेच केलेला असणार असेच पुष्कळांना वाटणार, परंतु गेल्या दोन-अडीच वर्षांचा अनुभव पाहता मूळस्थानाकडे आलेल्या या वीर योद्ध्याला अफगाण सरकारने व जनतेनेही अत्यंत आदरभावनेने वागवले आहे हे खरे भारत व अफगाणिस्तान हे दोन देश सोडून त्यांनी कोठेही औषधोपचारासाठी राहावे अशी पाकिस्तानची इच्छा होती या दोन देशांत त्यांना जायला येऊ नये असे पाक सरकारचे प्रयत्न चालू

होते त्यांना अमेरिकेतही जाऊ दिले नाही याचा अर्थ उघड आहे, पण अफगाण सरकार पख्तुनिस्तानचा व खानचा प्रश्न पुन्हा उद्‌भवेल म्हणून पावले येथे घोळीन भगण्यापलीकडे काही करता आले नाही असे दिसते पाकिस्तान सरकारने शेवटपर्यंत त्यांच्या इच्छेनुसार राहण्याचे व उपचार करण्याचे ठिकाण निवडण्यास बादशहाखानांना विरोध केला यावरून अफगाण अधिकाऱ्यांच्या व अमेरिकेच्याही धोरणावर प्रकाश पडतो अशा अनेक मरण-प्रसंगांना तोंड देत देत ते आपल्या मूळस्थानाच्या वाग्ला-पानूरा-पोचले बादशहाखानांचे तरुण पणाचे काही राजकीय संस्कार काबूल येथे राजे अमानुल्ला यांच्या द्वारे घडलेले आहेत त्याही दृष्टीने त्यांचे हे मूळ स्थानच आहे अफगाणिस्तानच्या लोकसंख्येमध्ये सुमारे चाळीस टक्के लोकसंख्या पठाणांची आहे बादशहाखानांचे जीवन पठाणांच्या सेवेसाठी समर्पित आहे पठाणांच्या द्वारा ते मानवाचीच सेवा करतात पठाणांच्या वरील त्यांचे प्रेम अनन्यसाधारण स्वरूपाचे आहे यामुळे उपचार व वास्तव्य यासाठी त्यांनी अफगाणिस्तान शोधले असल्यास ते स्वाभाविक आहे त्यांचा राहता पठाण प्रदेश अफगाणिस्तानच्या सीमेपासून हाकेवर आहे पाकिस्तानच्या जन्मानंतर लादल्या गेलेल्या लढ्यामध्ये घायाळ-जखमी झालेल्या आपल्या साथींची सुखदु खे काबूल येथून सहज कानी येतील, पुष्कळांच्या गाठीभेटीही होऊ शकतील, या सर्व दृष्टींनी त्यांचा अफगाणिस्थानात जाण्याचा हा निर्णय असणार, तो समर्पक व स्वागतार्ह असाच ठरला त्यांचे आरोग्य तेथे आल्यानंतर झपाट्याने सुधारू लागले लोक-संपर्क व लोकसेवेचा पुन्हा आरंभ हेच त्यांच्या रोगावरील खरे औषध होते

आणि अशा रीतीने बादशहाखान ' दारुल अमन ' च्या परिसरातील प्रशस्त व प्रशांत अशा अतिथिगृहात प्रविष्ट झाले कोणाचे दैव त्याला कोठे कसे फिरवील याचा काही नेम नसतो असे म्हणतात त्याचा हा एक अजब नमुना होय

बादशहाखानांना काबूल परिचित होते, पण ' दारुल अमन ' त्यांना नवे होते स्वतंत्र अफगाणिस्तानचा दरारा ब्रिटिशांना जाणवू देणाऱ्या व युरोपीय राष्ट्रांचा दौरा करून थकल्याभागल्या वेळी नेपोलियनच्या पलंगावर विश्रांती घेणाऱ्या अमानुल्लाखानांनी स्वत साठी तयार करविलेला तो प्रासाद आहे त्या प्रासादाच्या परिसरातील एक अतिथिगृह अफगाण सरकारने बादशहाखानांसाठी तयार ठेवले होते

त्या अतिथिगृहात प्रवेश करताना बादशहाखानांच्या मनात जुन्या स्मृतींचे केवढे वादळ उठले असेल? पंचेचाळीस वर्षांच्या स्वत च्या राजकीय जीवनाचा, त्यातील विलक्षण स्थित्यंतरांचा व घडामोडींचा चित्रपट त्यांच्या डोळ्यांपुढून गेला असेल यामुळे त्यांच्या साठी उघडल्या गेलेल्या लोखंडी फाटकावरील प्रश्नचिन्हांकित कलाकुसरीकडे त्यांचे लक्ष गेले नसणार! पण तेथे प्रवेश करताना त्यांच्या मनात अनेक प्रश्नांचे वादळ रास

उठले असणार !

१९२० मध्ये खिलाफतच्या चळवळीमध्ये ते मोहाजरीन बनून काबूल येथे आले होते त्यापूर्वीची पाच वर्षे पहिल्या महायुद्धाच्या काळात ते सशस्त्र प्रतिकाराच्या कार्यक्रमात होते त्या काळात ते काबूलला पोचले नसावेत, पण तेथे ज्या क्रांतिकारक नेत्यांसाठी युद्धमग्न करीत होते, त्या नेत्यांचे हंगामी भारत सरकार काबूलच्या बाग–ए–बाबर या अतिथिगृहातच होते महेंद्रप्रताप, बरकतुल्ला, ओबेदुल्ला यांच्या राघटनेशी बादशाहखान त्या वेळी (१९१४-१९) अप्रत्यक्ष रीतीने जोडलेले होते शेख उल्हिंद महमद हसन यांच्या सूचनेवरूनच सशस्त्र प्रतिकाराच्या लढ्यात ते सामील झाले होते पुढे खिलाफतच्या वेळी स्वत अमानुल्लाखानाशी त्यांची बोलणी झाली होती, त्यांच्या सल्ल्यानंतरच बादशाहखान काबूलहून परत सरहद्दीवर परतले इतकेच नव्हे तर हातातील बंदूक फेकून देऊन लोकशिक्षणाच्या आपल्या आवडत्या कार्याला ते पुन्हा लागले 'कोणत्याही कारणासाठी स्वजनांपासून दूर निघून गेल्याने आपले प्रश्न कसे सुटणार ! आपल्या अज्ञ समाजबांधवांचे स्वातंत्र्य जवळ कसे येणार ? त्यांच्यामध्येच राहणे व त्यांना शहाणे करून सर्वांनी स्वतंत्र होणे हे वीर पुरुषाचे कर्तव्य आहे ' राजे अमानुल्लाखान यांच्या भेटीनंतर हे धोरण बादशाहखान यांनी ठरविले होते आपल्या अडाणी व मागासलेल्या पठाणांना शहाणे व स्वतंत्र करण्याच्या ध्यासात त्यांनी नंतरची चाळीस वर्षे घालविली १९३० नंतर ते गांधीजींच्या सहवासात व अहिंसेच्या निष्ठेत वाढले व लढले, आणि देश स्वतंत्र झाल्यावर पधरा वर्षांच्या बंदिवासानंतर अमानुल्लाच्या स्मृतीने पुनीत झालेल्या परिसराच्या छायेत ते पुन्हा पोचले ओबेदुल्ला अमानुल्ला-गांधी यांचे बोट धरून व नतर जिना-अयूबखान यांच्या तुरुंगातून अमानुल्लाचे अतिथिगृह असा हा पंचेचाळीस वर्षांचा त्यांचा प्रवास होता अतिथिगृहाच्या प्रवेशद्वारावर जी प्रश्नचिन्हांची खूण होती तिने त्याना अधिक अस्वस्थ केले असणार !

समोरच्या निळ्या भुरक्या रंगाच्या टेकड्या, त्यावरून येणारे थडवारे, राजप्रासादाकडे जाणाऱ्या निर्मळ्या स्वच्छ रस्त्याच्या दोन्ही बाजूस उभ्या असलेल्या व शस्त्रधारी सनिका प्रमाणे भासणाऱ्या पोपलर वृक्षांच्या रांगा, सैनिकांच्या काठीवर फडफडणाऱ्या निशाणाप्रमाणे पोपलर वृक्षांच्या पानांवर फडफडणारी बारीकशी पिंपळपान असा या स्वतंत्र व रम्य वातावरणात बादशाहखान येऊन पोचले होते रस्त्यावरून जाणाऱ्या मोटारगाड्यांच्या चाकां- खालून उडणाऱ्या बारीक दगडांचा आवाज व वृक्षराजीमधील पक्ष्यांचा किलबिलाट याशिवाय तेथे कसला आवाज किंवा गलका कानी येऊ शकत नव्हता किंवा हिमाच्छादित टेकड्यांवरून येणारा वारा कमलाच शरीरदाह होऊ देत नव्हता ! असे असतानाही लाहोर जेलमधील औषधाने झालेल्या दाहापेक्षा त्यांच्या अतरात अधिक क्षोभ येथे पोचल्यावर

जागृत झाला असेल पुढे काय ? या एका प्रश्नाने त्यांच्या मनात किती प्रचंड वादळ निर्माण केले असेल ? अतिथी होण्यासाठी किंवा तेथील स्वास्थ्याचा लाभ घेण्यासाठी ते तेथे आलेले नव्हते, म्हणून राजवाड्यातून येणाऱ्या पक्वान्नांची भोजने नोकरचाकरांचे किंवा मोठमोठ्या शाही मोगरगाड्यांचे ताफे या सर्वांना त्यांनी तत्काळ रजा दिली. पठाणांचा प्रश्न कसा सोडविता येईल या प्रश्नात ते तत्काळ मग्न झाले काबूलला आल्यानतर काही दिवस त्यांना आरोग्याकडे लक्ष द्यावे लागले स्वत राजेसाहेब, राजपुत्र व राजघराण्यातील थोरथोर मडळी, पतप्रधान व इतर मत्री, तसेच नागरिक व लहानथोर सामाजिक कार्यकर्ते या सर्वांच्या मुक्तपणे गाठीभेटी होऊ लागल्या मुख्यत कार्यकर्त्यांच्या भेटी व गोरगरीबांचे प्रेम हा त्यांचा खरा खुराक, यामुळे त्यांचे आरोग्य झपाट्याने दुरुस्त झाले ते अनुभवज्ञानांच्या तुरुगातून 'आता हे फार वरळ टिकणार नाही' म्हणून बाहेर फेकले गेलेले शरीर पुन्हा ताजेतवाने होऊ लागले, आपल्या कर्मयोगी जीवनास त्यांनी तेथे पुन्हा प्रारंभ केला राजे झहीरशहा व त्यांचे सरकार यांनी मृत्यूच्या दाढेतून त्यांना परत मिळविले असे म्हटल्यास त्यात अतिशयोक्ती नाही त्यांचे हे ऋण जगातील स्वातत्र्य-निष्ठ लोक कसे विसरतील ?

बादशाहखान लडनला पोचले त्याच वेळी अनेक भारतीयांच्या आशेला पख फुटले व त्यांना आता भेटणे व पाहणे शक्य होईल या कल्पनेने त्यांना अत्यानद झाला, ते काबूलला पोचल्यानतर तो अनतपटीने वाढला त्यांच्यासबधीच्या बातम्या कधी कधी वृत्तपत्रात येऊ लागल्या, काही मडळींनी त्यांच्याशी पत्रव्यवहारही सुरू केला १९६६ मध्ये डॉ लोहिया, प्यारेलाल, कमलनयन बजाज आदी मडळी त्यांना भेटून आली एकोणीस वर्षांनतर त्यांना जुने भारतीय मित्र, कार्यकर्ते भेटत होते या भेटीने त्यांना झालेल्या आनद-दु खाचे वर्णन करणे सोपे नाही, खुदाईखिदमतगारांनी सारी हयात भारताच्या स्वातत्र्यासाठी वेचली व स्वातत्र्यप्राप्तीबरोबर त्यांच्या स्वत च्या पायांत नव्या शृखला ठोकल्या गेल्या या दैवदुर्विलासाची विस्मृती त्यांना किंवा त्यांना पाहणाऱ्या मित्रांना होणे कसे शक्य होते ?

फाळणीनतर त्यांना सर्वप्रथम भेटणारे बहुधा श्री मोरारजी देसाई असावेत १९६१ मध्ये श्री मोरारजीभाई हे भारत पाक अर्थमत्र्यांच्या सयुक्त बैठकीसाठी रावळपिंडीस गेले असता बादशाहखानांना भेटण्याची आपली इच्छा त्यांनी पाकसरकारला कळविली, त्या वेळी बादशाहखान हे उत्तमझाई येथे स्थानबद्ध असावेत श्री मोरारजीभाई यांनी खानसाहेब असतील तेथे भेटीची व्यवस्था करण्यास सुचविले असता बादशाहखानांना श्री मोरारजी भाईंचा निरोप म्हणून कळवून त्यांनाच पिंडीस आणविले त्याबद्दल श्री मोरारजीभाईंनी खेदही प्रदर्शित केला, परत पोचवण्याच्या वेळी मात्र मोरारजीभाई त्यांच्याबरोबर उत्तमझाईपर्यंत

गेले होते. ही सगोत्तर स्मृत अशी भेट झाली होती, पण ती सर्वस्वी अज्ञान अशी राहिली. त्या भेटीत बादशाहखानांनी गांधीजींच्या आश्वासनाचे स्वरूप व त्यासंबंधी भारतसरकारच्या-बद्दलच्या त्यांच्या अपेक्षा यावद्दल स्वत च्या भावना व्यक्त केल्या होत्या. पठाणांच्या रक्ताच्या कल्याने भारत त्यांच्या पाठीशी राहील ही अपेक्षा व्यर्थ ठरली असल्याचा खेदही त्यांनी व्यक्त केला होता. महात्माजींच्या त्या आश्वासनाचा नव्या परिस्थितीत भारत सरकार कसा पाठपुरावा करू शकले असते यावद्दल श्री. मोरारजीभाई यांनाही काही मार्ग दिसत नव्हता, व आजही त्यांना तो दिसत नसावा बादशाहखानांचे व भारताच्या स्वातन्त्र्यासाठी लढलेल्या पठाणांचे भारतावर काही ऋण आहे हे श्री. मोरारजीभाई व बादशाहखानांना भेटलेले इतर नेते यांना मान्यच आहे, काही मार्ग काढला जावा अशीही त्यांची इच्छा आहे, पण भारताच्या आंतरराष्ट्रीय जबाबदाऱ्यांशी सुसंगत राहून कसा मार्ग काढता येईल हे कोणी शोधू शकलेले नाहीत ही ती शोकांतिका होय! काबीस गेले असता श्री. जयप्रकाशजींनीही त्यांना भेटण्याचा प्रयत्न केला होता, पण त्यात त्यांना यश आलेले नव्हते त्यावेळचे संरक्षण मंत्री श्री यशवंतराव चव्हाण, त्यावेळच्या माहितीखात्याच्या मंत्री इंदिरा गांधी व हायकमिशनर डॉ जीवराज मेथा हे लंडनमध्ये त्याना भेटले होते. या सर्वांच्या जवळ बादशाहखानांनी, गांधीजींच्या आश्वासनाचे स्मरण दिले होते व त्यावद्दल त्या त्या पुढाऱ्यांच्याकडून काही उत्तराची अपेक्षा केली होती. पंडित नेहरूंच्या मनी हे सर्वच गेलेलेच असणार! परंतु या विषयाकडे कोणी लक्ष देऊ शकले नाहीत, आपण काही करू शकू असे कोणासच वाटलेले नाही ही या प्रश्नाची, आमच्या परराष्ट्रीय धोरणाची किंवा राजकीय विचारांची दुर्दैवी अशी गुंतागुंत आहे खरी! ती गुंतागुंत ताश्कंद कराराउनतर तशीच राहिली किंवा वाढली आहे असे बहुतेक नेत्यांना वाटते

अशा मन स्थितीत भारतीय नेत्या-कार्यकर्त्यांच्या गाठीभेटी १९६५ मध्ये सुरू झाल्या या भेटीमुळेही बादशाहखानांना काही आनंद, काही क्षोभ झाला असणार

"आम्हाला भारत विसरला आहे स्वातंत्र्यासाठी पठाणांनी त्यांच्याजवळ जे काही होते ते सर्व दिले आणि ते सक्टानच! पठाणांना न्याय मिळाला नाही, त्यांच्यावर संकट आले तर भारत त्यांच्या रक्षणासाठी धावून येईल, भारताचे ते कर्तव्य आहे, असा भरवसा गांधीजींनी दिला होता. आम्ही संकटात आहोत, भारताने निदान गांधीजींचे शब्द लक्षात घ्यावेत" कोठून तरी आकाशातून शब्द घुमावेत किंवा खोल दरीतून एखादी हाक ऐकू यावी तसे त्यांचे शब्द भारताच्या कानावर येऊन आदळू लागले अत करणाला पीळ पाडणारे त्यांचे हे शब्द प्यारेलालनी आपल्या लेखातून भारताच्या कानाकोपऱ्यातून पोचवले! केवळ पठाणांना वाचवण्यासाठी बादशाहखानांच्या हृदयातून कष्टाने दिलेली ती हाक नव्हती!

गतवर्षात गुजरातेच्या सुरत येथील-मद्रासच्यांच्या वर्तमानपत्रात दिले ते आवाहन होते भारतातल्यांच्या या हाकेने लक्षावधी हृदयभावना जागृत केल्या अनेक लोकांनी त्यांना अंतःकरणपूर्वक ओथंबलेली पत्रे पाठविली त्यांना भारताला भेट देण्यास भारत सरकारने तिसरी खेपेस अशी आमंत्रण सुरू झाली भारत-पाकिस्तानच्या वाटाघाटीने व नंतर पंडितजींच्या स्वर्गारोहणामुळे तो विषय तसाच लोंबकळत राहिला लालबहादूर शास्त्री यांनी पाकिस्तानात जाऊन बादशहाखानांची भेट घेण्याचे व त्यांच्याशी बोलणी करण्याचे ठरविले, पण तो विचार तसाच ताश्कंदच्या धोरणामागे वाहून गेला, पण पाकिस्तानातून भारताकडे येणारे वारे कोणी थांबवू शकत नव्हते त्यामुळे हजारो तरुणांच्या कर्तव्यभावना जागृत झाल्या "आम्ही खुदाई खिदमतगारांचे ऋण कधीही विसरू शकत नाही तुमच्या पायांशी आमचा देह कामी येऊ शकला तर ते अहोभाग्य ठरेल" अशा आशयाच्या भावना त्यांना देशातील लोकांनी कळविल्या आहेत

पंजाबच्या एका तरुण संपादकाने "तुम्ही इकडे आल्यानंतरच मी लग्न करीन तुम्ही माझ्या शादीला हजर राहाल" असे त्यांना लिहिले त्याच्या उत्तरात बादशहाखानांनी त्यास कळविले, "तुमच्या लग्नास हजर राहून मी निकाह कबूल केले आहे' सदर संपादक मात्र जमानापर्शी आहेत

इतर कोणाची किती पत्रे गेली असतील न कळे! तशी ती गेली असणे हे स्वाभाविक आहे भारताच्या कृतज्ञतेचा तो एक भाग आहे पण पू० विनोबाजींच्या एका ओळीत भारताच्या कृतज्ञतेचे सर्व रामायण ओथंबलेले आहे आणि त्या पत्रामुळे बादशहाखानांना थोडे समाधानही लाभलेले आहे विनोबाजींनी बादशहाखानांच्या तक्रारभावनेलाही साथ दिली आहे त्यांच्या पत्राचा आशय 'आमच्या स्वातंत्र्याच्या लढ्यातील तुम्ही एक थोर नेते आहात आणि तुमच्या बाबतीत मोठा अन्याय झालेला आहे आमच्या मित्रांनी तुम्हाला जवळजवळ तोंडघशी पाडलेले आहे हे व्यक्त करताना मला होणारा खेद शब्दांतून व्यक्त करता येणे शक्य नाही पदयात्रेत असताना मला तुमचे स्मरण नेहमी होत असते तुम्ही ईश्वरभक्त आहात आम्हा व अहिंसा यांवरील तुमची श्रद्धा अचल आहे तुमची अशी कसोटी पाहून नंतर तुमच्याकडूनच जगाचे प्रश्न सोडवून घेण्याची परमेश्वराची इच्छा असेल बाशिरिस साबिरीन' जे सहनशीलपणे वागतात ते धन्य होत-- विनोबाजींच्या या आदरपूर्ण व स्नेहशील शब्दांमुळे त्यांच्या दुखावलेल्या अंतःकरणाला किती तरी दिलासा वाटला असेल!

कमलनयन बजाज, त्यांच्या भगिनी मदालसा बहेन व मेहुणे व सध्याचे नेपाळातील राजदूत श्री श्रीमन्नारायण यांच्या भेटी या कुटुंबियांच्याच भेटी होत्या भारत सरकारच्या परराष्ट्र खात्यातर्फेही त्यांना भारतभेटीबद्दल निमंत्रण दिले गेले त्यामुळे भारत त्यांना विसरला

असे ही त्यांची समज किंचित दूर झाली असेल

भारत सरकारच्या धोरणाबद्दल बादशहाखानांना विषाद वाटत असला तरी भारतीय जनतेबद्दल व येथील कार्यकर्त्यांबद्दल त्यांना पूर्वीप्रमाणेच खूप जिव्हाळा वाटतो त्यांचे प्रेम पूर्वीप्रमाणे ताजे आहे त्यांच्याकडे भारतातील मित्रमंडळींकडूनही असंख्य पत्रे जात होती त्यांनी त्यांच्या एका जुन्या पेशावरी कार्यकर्त्याची पुढील शब्दात हजेरी घेतलेली आहे

“ मला तिकडे येण्याची विनंती करणारी आणि लोकांची पत्रे येत असतात, पण मी तिकडे कशाला येऊ ? या पुराण भूमीला (ancient land) पठाणप्रदेशाला, मला पाकिस्तानच्या दास्यातून सोडवायचे आहे त्या कामाला लोक तयार असतील तर मी त्यांच्या-साठी येईन, पण तुम्ही मातृदेशाला विसरला आहात व पैसे कमावण्याच्या कामात फसलेले आहात जे लोक पैशाच्या मागे लागतात ते लोक व त्यांचा देश हे बरबाद होत असतात ”
( ता ३-११-६५ )

दिल्लीतील त्यांचे विश्वासू कार्यकर्ते, पेशावरचे प्रसिद्ध साहित्यिक श्री रामशरण नगीना यांना लिहिलेल्या एका पत्रात ते म्हणतात ( ता १८ ऑगस्ट १९६५ )

“ मी येथे खुदाईखिदमतगार आंदोलन ( movement ) आरंभलेले आहे तसेच नारगने हिंदुस्थानात सुरू करावे असे त्यास लिहिले आहे मी तुम्हांला आशीर्वाद देतो, तुम्ही मला द्या खुदा आपल्याला हिंमत व ताकद देवो खुदाला संतुष्ट करण्यासाठी साऱ्या सृष्टीची सेवा हातून घडो ’

त्यांचे दुसरे विश्वासू कार्यकर्ते सीमाप्रदेश विधिमंडळाचे जुने सदस्य व खु० खि० चे जिल्हाप्रमुख श्री कमरमान नारग याना लिहिलेल्या ता २४ डिसेंबर १९६५ च्या पत्रात ते म्हणतात, ‘ आमचा मुख्य प्रश्न आहे तो आझादीचा खुदाईखिदमतगाराच्या द्वारे होणाऱ्या सेवेवर आपण आपली शक्ती केंद्रित केली पाहिजे त्याला खरे कार्यकर्ते पाहिजेत सध्या काम करणारे बहुतेक पुलाव व पैसे यांच्यामागे असतात धनिकशाहीच्या व हुकूमशाहीच्या पकडीतून ( पठाणांची ) सुटका व्हावी म्हणून अगदी चिंता करीत असतो तुम्ही तोच विचार केला पाहिजे ”

दारुल अमनच्या थंड परिसरात आल्यानंतर व थोडे आरोग्य ठीक होताच कोणत्या गतीने व कोणत्या दिशेने त्यांचे चित्त चाललेले होते हे १९६५ सालच्या त्यांच्या वैयक्तिक पत्रातील वरील उताऱ्यांवरून दिसून येते

# २४

## अग्निशयन—त्यांच्या सान्निध्यातील आठ दिवस

ते काबूलला आल्याचे कळल्यानंतर हजारो कार्यकर्त्यांनी त्यांना पत्रे पाठविली असणार! हजारो निर्वासितांची पत्रे भारतातून येत असल्याचा उल्लेख त्यांच्या एक पत्रात आहेच, असा पत्रसंपर्क जोडणाऱ्यांपैकीच प्रस्तुत लेखकही एक होता

'भारत तुम्हाला व पठाणांना विसरलेला नाही व विसरणे शक्य नाही ' असे नम्र निवेदन व त्यांच्या ७५ व्या वाढदिवसाबद्दल अभिवादन व अभीष्टचिंतन या पत्रद्वारे केले होते (२ जुलै १९६५)

भारतातून भेटीस गेलेल्या मित्रमंडळींना ते एकच प्रश्न विचारतात, "गांधीजींनी दिलेला शब्द तुम्हाला पवित्र वाटत असेल तर तो पाळा आणि केवळ पठाणांच्या कल्याणासाठी म्हणून नव्हे तर भारताच्या भल्यासाठी तुम्ही पठाणांना वाचवा, तुम्ही भगवान कृष्णालाही विसरला आहात हिंदुस्थान व अफगाण या दोन राष्ट्रांनी हात दिला तर पठाण पक्के होतील हे करावयाचे असेल तर मला बोलवा, मी आनंदाने येईन " या त्यांच्या उद्गारांमागील भावना कळल्यात अशी इच्छा होती.

त्यांच्या चरित्रातील काही शक्यस्थानेहि समजून घेणे जरूर होते हा सर्व विचार करून लेखकाने १९६६ च्या ऑगस्टअखेर दारुल-अमनचा परिसर गाठला बादशहाखानांच्या सहवासात त्यांच्याच अतिथिगृहात वास्तव्य करण्याची संधी लेखकाला लाभली त्या वेळी त्यांच्याकडे अन्य कोणी पाहुणा नसल्याने हे आठ दिवस निर्वेधपणे चर्चा करण्यास व मनमोकळेपणाने प्रश्नोत्तरे करण्यास मिळाले त्यांच्या साहचर्यातील हा काळ संस्मरणीय व स्फूर्तिप्रद असा झाला बादशहाखानांचे हेशमय व कर्मयोगी जीवन हीच मनावर विलक्षण पकड घेणारी अशी मोहिनी आहे इतक्या क्लेशमय जीवनानंतरही लोकसेवेसाठी अखंड सतत-खडत राहण्याची त्यांची उत्कट निष्ठा पाहून मन स्तिमित

होते त्यांच्या निष्ठुरे मनात नम्र होते

२९ ऑगस्ट १९६६ रोजी दुपारी दोन वाजता मी काबूल विमानतळावर पोहोचले. भारतीय वकिलातीकडे निरोप पोचताच त्यांचे प्रथम चिटणीस श्री. जोशी हे विमानतळावर आले व त्यांनी माझा सर्व व्यवस्था केली. वकिलातीत पोचताच भारतीय राजदूत न. थापर यांच्याशी थोडा वेळ वार्तालाप झाल्यानंतर बादशहाखानांचेकडे चाकरी करण्यात आले. माझा प्रवासदिवस आधी नक्की न झाल्याने कोणालाच आधी कल्पना आली नसल्याने कोठे तरी हॉटेलमध्ये उतरण्याचा माझा विचार होता. पण बादशहाखानांचा निरोप असा तो त्यांच्याकडेच मुक्काम करण्याबद्दलचा होता. माझ्या आनंदाला मर्यादा नव्हती. बादशहा खानांच्या भेटीस गेल्यापैकी त्यांच्याकडेच राहण्याचा मान किंवा सधी मिळालेला मी दुसरा किंवा तिसरा पाहुणा होतो असे नंतर मला कळले. याचे सर्व श्रेय श्री. कमलनयन बजाज यांना होते. त्यांनीच माझा परिचय बादशहाखान यांना करून दिला होता. माझ्या भेटीचा हकीगत कळविली होती. भारतीय दूतावासातून दुपारी त्यांचेकडे गेले. वेळ चार वाजण्याची होती. तरी सूर्यास्ताचा समय वाटत होता. अतिथिगृहासमोरच्या वर्तुळाकारी बागेत बादशहा खान एका लहान घडाच्या खुर्चीवर बसलेले होते. त्यांच्या समीप तशाच ( फोल्डिंग कॅम्प चेअर्स ) पाच दहा खुर्च्या पसरलेल्या होत्या. चारसहा मंडळी भेटीस आली होती. त्यांच्याशी चर्चा करण्यात बादशहाखान गर्क होते. तोच आमची गाडी त्या वर्तुळाजवळ पोचली. बादशहाखानांनी आमचे अगत्याने स्वागत केले. हाताला धरून नेऊन आपल्या शेजारच्या खुर्चीवर बसवले. इतर पाहुण्यांचा परिचय करून दिला. बादशहाखानाशी बोलावयाचे कोणत्या भाषेत, त्यांचे बोलणे-उच्चार नीट न कळल्यास काय करावयाचे, आपले हिंदी किंवा इंग्रजी नीट व्यक्त न झाल्यास काय, अशा अनेक विचारांनी मला बेजार केले होते. पण हे सर्व मानसिक आंदोलन मोटारीतून खाली उतरून त्यांच्या शेजारी बसल्यानंतर सपशेल होते नव्हते विसरले होते. प्रारंभी मी काय बोलले किंवा त्यांनी काय चौकशी केली हे मला नंतर कधी आठवले नाही. ते इतक्या घरगुती किंवा अनौपचारिक पद्धतीने वागतात की त्यांच्याबद्दल परकेपणाचा मागच मनात शिल्लक रहात नाही.

' किती दिवस मी तुमची वाट पाहावयाची ? शेवटी मी आता जलालाबादला जाण्याचे ठरवले होते. आलात बरे झाले '' त्यांच्या या म्हणण्याचा अर्थ मला कळण्यास वेळ लागला. त्यांच्या भेटीस लवकर येण्याबद्दल श्री० कमलनयन यांच्याकडे त्यांना पाठविलेला निरोप आम्हाला पोचला नव्हता. ' ते कोण नाशी येणार त्यांची वाट पाहात मी राहिले आहे आणि एक-दोन दिवसांत जलालाबादला जाण्याचा कार्यक्रमही ठरविला आहे, ' असा त्यांचा शब्दचा निरोप श्रीमती मदालसाबाई यांचेकडून कळला व मी लगेचच दिल्लीहून

निघाले त्यांची प्रसन्न मेंग हास्याने सर्व चिंता दूर झाली होती तेथे त्यांच्या भेटीसाठी आलेल्या मंडळींतील एक दोन बरी मंडळी अगात्रीत ते पाहुणे यांच्याशी विशेष मर्यादेने बोलत होते असे मारले त्यांच्या समाषणातील एकही शब्द मला समजत नव्हता त्यामुळ सभो वारची गर्द झाडी बगीच्यातील लहान लहान झाडांवर डोलणारी रंगीबेरंगी फुले, दूरवर असलेल्या पाऱ्यावरील शस्त्रधारी बुरके पठाणेकरी ही चित्रे माझ्या डोळ्यांपुढून जात होती पठाण म्हणजे भव्य ही कल्पना बदलणे जरूर झाले होते, तथे असलेल्या पाच सहा सेवकां पैकी बहुतेक सगळे लहान बांध्याचे होते, शस्त्र पठाणेकरी तर त्यांच्या बंदुकापेक्षा थोडा अधिक उंचीचे होते बादशाहखानांच्या भेटीसाठी येणाऱ्या लोकांमध्येही भव्य लांबीरुंदीचे व निपुल कल्ले-दाढी असणारे असे थोडेच असत ते बहुधा यागिस्तानच्या टोळीवाल्या प्रदेशातील असणार

आम्ही त्या हिरवळीवर दोनतीन तास बसलो असू दुपारपासून थोडा उष्मा वाटला होता त्यामुळे थंडीच्या भीतीने अगावर लादलेले गरम कपडे श्री० जोहरींच्या निवासात पोचेपर्यंतच बाधाव लागले होते काबूलची उंची ७ हजार फुटांवर आहे सध्याकाळी पांच नतर हळूहळू गारठा जाणवू लागला व सहाच्या सुमारास चांगली हुडहुडी भरली त्यांची बोलणी चालू होती बादशाहखानाचे स्वभावविशेष त्यांच्या न समजणाऱ्या संभाषणातून समजून घेण्याचा माझ्या मनाचा प्रयत्न चालू होता पुश्तू ही एक प्रसन्न व समृद्ध अशी भाषा असल्याचे मी वाचले व ऐकले होते मुंबईतील एका पठाण सम्मेलनास मुद्दाम हजर राहून त्यांची भाषणे-समाषणे ऐकली होती पण बोध फार थोडा होत होता डोंगरकपारीतून, उच-सखल भागातून जाणाऱ्या रेल्गाडीच्या आवाजाप्रमाणे मधेच मोठा गमाडा तर मधून मधून अगदी मद मजल असे नादसाम्य त्यांच्या सभाषणातून ऐकण्यात येई बादशाह खानांच्या समाषणात विनोद बोध—वाक्ये बरीच येत असावीत! श्रोते वारवार हसत असत जोराजोराने प्रत्युत्तरे देण्याचा प्रयत्न करीत, उत्तरे देऊन बादशाहखान पुष्कळ वेळा स्तब्ध व व्यथित अशा मन स्थितीत इतस्तत पाहात राहतात! आपल्या विधानावरील श्रोत्यांच्या प्रति क्रिया पारखण्याचा त्यांचा तो प्रकार असावा असे वाटले मधून मधून ते माझ्याकडे पाहात ' क्यों जोशीजी, थंड तो नहीं लगती ? रात को जादा थंड होगी,'' वगैरे काही वाक्ये बोलत दिसण्यात व बोलण्यात ते फारसे साम्य नाहीत मला त्यांच्या जुन्या आठवणी विशेष नव्हत्या फैजपूर काँग्रेसनतर ते महाराष्ट्रात थोडे फिरले होते थोडे जवळून पाहिलेही होते तिकडे जाण्यापूर्वी कमलनयन, प्यारेलाल आदि मित्रांकडून थोडी माहिती ऐकली होती '' आईसी मुले ज्या सलगीने वागतात तसे त्यांच्याशी वागा '' असे कमलनयन यानी सांगितले होते सिंहिणीची पिलेच तिच्या अगावर खेळू शकतात, तितके ममत्व व

निरुद्यमिता असेल तरच जोशींशी तशा समरस होऊ शकतो, पण इतरांच्या मनाचे आपण कैदीच असतो

बादशाहखान जेव्हा बोलता थोडे गुणगुणल्यासारखे बोलत असायाचे पाहिले, ते प्रमाणानुरूप घडत असेल त्यानंतर–दमदार फारशी वाक्ये बोलून नंतर केव्हा केव्हा ते 'बेशक' म्हणून हसून इतस्तत पाहायाचे। त्यांच्या आवाजाला रिमार आहे त्यावर त्यांच्या धर्माची धारणा। त्यांत घोरेपणाही बराच आहे एकदम उच्च–सरळ आवाज करण्याची धारणी सर्वत्र पुरुष माणसांमध्ये दिसते, पण स्त्रियांचे बोलणे संथ व मधुर शब्दोच्चारांचे असते, तर बादशाहखानांच्या आवाजात चढउतार खूप मोठ्या अंतराचे असतात हे सर्व ऐकण्यात व आपल्या मोडक्या तोडक्या हिंदीतून पुढील प्रवास कसा पार पाडायाचा या विवंचनेत माझा वेळ चालला होता

'तो कहो जोशीजी, अभी क्या खाओगे? आपको क्या पसंद होता है, कह दो,' त्यांच्या बोलण्यात खोटा औपचारिकपणा नव्हता किंवा मोठेपणाचे अवडंबरही नव्हते उलट अगदी घरगुती मोकळेपणा एकदम अनुभवास आला सहा वाजताच ते थोडे अस्वस्थ असल्याचे दिसले इतक्यात नोकराने ट्रान्झिस्टर त्यांच्या पुढील स्टुलावर आणून ठेवला माझ्याशी मधून मधून काही वाक्ये ते बोलत, पण रेडिओवरील बातम्या ऐकण्यात ते इतके गढले होते की माझी उत्तरे त्यांच्या कानापर्यंत पोचली तरी मनापर्यंत पोचत नसावीत मला ते सोयीचे होते चर्चा करायला मी अद्याप तयार झालेलो नव्हतो

'थोडी चाहून वाढेल?' ते थोडे मोकळे दिसताच विचारले

"क्यों? डरते हो! जरूर बढेगी चलो अंदर बैठेंगे, पहलेही क्यों नहीं कहा?" थोड्याशा वाकल्या शरीराने ते खुर्चीवरून उठले

"हा तुमचा कमरा जरूर लागल ते मला सांगा संकोच करू नका आपण थोड्या वेळात भोजन घेऊ तुम्हाला हातपाय धुणे असेल करून घ्या" माझ्या खोलीत मला त्यांनी सोडले शेजारचे स्नानगृह वगैरे दाखवले हे सर्व त्यांनी स्वत केले आणि ते आपल्या कमऱ्याकडे गेले जे थोडे बोलणे झाले ते उर्दू–हिंदीमध्ये, पण समजणे सोपे होते

आणि सुमारे ९ च्या सुमारास आम्ही भोजनासाठी त्यांच्या बसण्याच्या खोलीतच जमलो अतिथिगृहाचा भोजनाचा वेगळा व थोडा सुसज्ज असा मोठा कमरा आहे, पण ते तिकडे भोजनास जात नसावेत एका कोपऱ्यात मोठा रेडिओ समोर भिंतीवर टांगलेले शिकारीचे चित्र काळजाचा ठाव घेणारे असे होते बेगमबटरांची ही खोली मध्यम आकाराची आहे तीत एक सोफा-सेट व मधे ठेवलेले त्यासारखी चहाचे टेबल व समोवार चार-सहा खुर्च्या उजव्या बाजूच्या एका खुर्चीवर ते बसले होते व मधलीवर मला बसविले टेबलावर दोन तीन

मोकळ्या चिनी मातीच्या मोठ्या थाळ्या, चमचे, नॅपकिन वगैरे अगदी मोजके व साधे सामान होते गनीने ( नोकर ) गरम पाण्याची एक मोठी झारी व तस्त आणून ठेवले, त्यांनी त्य तस्तामधे ( बेसिन-भांडे ) पाच सात वेळा स्वच्छपणे हात व तोंड धुतले पाठीलगतच्या खिडकीत असलेल्या डबीतील दात काढून ते साफ धुउन नीट बसविले हलके हलके ते प्रत्येक गोष्ट करीत होते त्या सावकाशीत त्यांचा प्राकृतिक अशक्तपणा नव्हता, ती त्यांची सवय असावी किंवा व्यग्रतेचाही परिणाम असेल ते खूप कृश झालेले होते पूर्वीच्या दिवसांत मी त्यांना दहा-पाच वेळा अगदी जवळून पाहिले होते त्याच्या निम्मेही ते राहिलेले नव्हते सर्वांग कृश झालेले, सारखेसारखे वाळलेले, तशाच सुरकुतलेल्या चेहऱ्यावर व हाता-पायांवर पडलेल्या होत्या डोळे लहानच पण सारखे कोठे तरी शोधीत फिरणारे तेजस्वी, आतरिक आनंदाने व शांतीने प्रफुल्ल असलेल्या खिस्ताच्या चेहऱ्याशी त्यांची वर्णने केलेली आहेत बानेस व महादेवभाई यांनी तशी तुलना केलेली आहे चेहऱ्याची ठेवण ( प्रोफाईल ) तशी दिसतेही तसे स्मितहास्य-शांती त्यांच्या चेहऱ्यावर कधी कधी दिसतेही, त्या वेळी ते अगदी लहान मुलासारखे हसतात व दिसतातही, पण तो त्यांचा स्थिरभाव नसावा त्यांच्या अंतरात अखंड क्षोभ आहे, तो अलीकडील काळातीलही असेल त्यांच्या दृष्टीच्या प्रत्येक हालचालीतून व्यथा चिंता प्रतीतीला येत असते, सामाजिक अन्यायाविरुद्ध चाललेल्या अंतरातील विचारयुद्धाचे ते प्रतिबिंब असणार

तोंडावरून पाण्याचा हात फिरवताना, दात साफ करताना किंवा दोन्ही हात निपटून पुसताना स्वत च्या प्रत्येक क्रियेकडे पाहताना त्यांची दृष्टी तीव्र भेदक अशी वाटली. त्यांच्या प्रत्येक हालचालीत अखंड व्यग्रता, व्याकुळता व क्षोभ प्रतीत होत होता कर्मयोग्याची कठोर कर्मनिष्ठा त्यात व्यक्त होती ते खिस्तापेक्षा महमदाचेच प्रतीक आहेत, बुद्धापेक्षा कृष्णाचे किंवा गांधीजींपेक्षा टिळकांचे प्रतिनिधी असावेत असा विचार माझ्या मनाला चाटून गेला परिस्थितीनुसार हा फेरबदल त्यांच्या दिसण्यातही झालेला असणे समजनीय आहे कर्म हा त्यांच्या जीवनाचा श्वास आहे ! त्या कर्मलेपाच्या परिहारार्थ ईश्वरचिंतन, सपूर्ण जीवन ईश्वरभक्तीने व्यापलेले, समर्पित, सृष्टीची सेवा करण्याची व अन्यायाचा प्रतिकार करण्याची अखंड जागृती हाच त्यांचा स्वभावविशेष, ही कर्मनिष्ठा त्यांच्या शब्दाशब्दातून व दृष्टीतूनही अनुभवाला येत होती

कोचेच्या त्या छोट्याशा टेबलावर आमचे ' शाही डिनर ' येऊन पोचले चिनी मातीच्या दोन तीन थाळ्या व तीनचार वाटेरे हे साहित्य कसे तरी त्या टेबलावर सामावू शकले होते

बादशाहखान टोमॅटो व काकडी यांची साले अगदी सफाईने काढण्यात गुतलेले होते संभाषणाचे काही विषय निघतील किंवा स्वत काढावेत असा माझा प्रयत्न होता, पण माझा

सर्व वेळ व विचारांनी त्यांना समजून घेण्यात व्यग्र होती. मी बोलत नव्हती हे माझ्या न्यूप उशीरा लक्षात येई. विमानातून उतरल्यापासून माझे स्वास्थ्य थोडे बिघडले होते हेही कारण असेल. मी त्यांना लिहिलेल्या एका पत्रात त्यांच्या काही विचारांच्या उलट बाजू मांडलेली होती. काही पुढाऱ्यांना स्वत:च्या विधानावर आक्षेप घेतलेले तितकेसे आवडत नाहीत; पण हे सर्व माझ्या मनाचेच विचार होते. ते आपल्या काकडीची साले काढण्यात इतके व्यग्र होते की जणू एखादा चित्रकार चित्र रंगवण्यात गुग झालेला आहे. गांधीजीही स्वत:च्या हाताने सर्व गोष्टी करताना त्यात पूर्ण रमत असत, पण विशेषत्त्वा व्याप वाटवीत नसत. खाण्यापिण्याच्या सर्व वस्तू तयार करून त्यांच्यापुढे येत; विनोबाजी किंवा इतर काही आश्रमी नेते यांच्या व्यवहारात पुष्कळ वेळ व्यग्रता अगर दीर्घसूत्रीपणाही दिसून येतो. अधिक शरीरश्रम करणारे बुद्धिमंत स्वत:च्या मनाला विरंगुळा देण्यासाठी ही कर्मलीला करीत असतील काकडी व टोमॅटो सोलण्यात बादशहाखानांची ५।१० मिनिटे गेली असतील आणि त्या काळात क्वचितच प्रश्नोत्तरे झाली असतील. उलट काकडीची साले व टोमॅटोची छिलटे पाडण्यात, शोधण्यात ते व्यग्र दिसले. मी काही बोलेन अशी त्यांची अपेक्षा असणारच.

मोठ्या आंब्याएवढा सुमारे २०० ग्रॅम वजनाचा टोमॅटो असेल, काकडी तेवढीच म्हणजे दोन-तीनशे ग्रॅम, दोन येस्ट व सुमारे अर्धा शेराचे दही; हा त्यांचा रात्रीचा आहार होता काकडी व टोमॅटो बारीक चिरून दह्यात टाकले. त्यामध्ये पुन्हा ५।१० मिनिटे गेली असतील. मी त्यांच्यापुढे आहे याची त्यांना आठवण होती की नाही अशीही शंका मला आली. इतके ते लहानमहान कामातही व्यग्र होतात आपल्या वाटी मनाला विरंगुळा देणारा तो छंदही असू शकेल. माझी शंका व्यर्थ असावी. माझ्यासाठीही त्यांनीच काकडी टोमॅटो सोलले होते आणि ते त्यांनी माझ्या पुढे केले. तेव्हा माझी थोडी त्रेधा उडाली.

"कच्ची वस्तू मी पचवू शकत नाही." आपल्या दुर्बलपणाच्या गोष्टीपासून चर्चा आरंभण्याचा अप्रस्तुतपणा करावा लागला होता, पण शेवटी केव्हा तरी माझे अस्वास्थ्य बाहेर पडणारच होते

"तो तुम क्या खाओगे?" असे थोड्या विस्मयाने त्यांनी विचारले

"टोस्ट और दूध!"

"दूध नहीं तो?"

सरकारी पाहुणचारात येवढी चणचण असेल याची मला कल्पना नव्हती. "उद्यापासून सर्व रात्री मी स्वत: करून घेईन." असे काही तरी घाईने मी सांगितले, पण तेवढ्यात यांनी आपल्या कटोऱ्यातील दही माझ्या कटोऱ्यात ओतले.

" तेही मला चालणार नाही " असे काही मी पुटपुटलो

" अच्छा तो फल लेवो "

असे म्हणत म्हणत आमचे शाही–डिनर सुरू झाले आणि पुरा अर्धा तास दोघांनी पावाचे ते दोन तुकडे व दह्याची तयार केलेली ती खीर, मिश्रण ते संपविण्यास घेतला माझ्या-साठी गनीने डब्याचे दूध तयार करून आणले आणि थोडी त्याना साथ देण्यासाठी पावाचे ते दोन तुकडे अर्धा तास पुरवले द्राक्षाच्या दोन वाट्या शेजारी होत्या. कोणी आजही पाठवले होते, पण बादशाहखानांचा आदर ठळकपणे दिसला पहिल्या घोटे दही काकडीचा संपल्यावर तोंड व दात धुण्याच्या कार्यक्रमाला पूर्वीप्रमाणे बराच वेळ लागला त्यानंतर अफगाण ज्याला अमृत फळ मानतात ते खुशबूदार खरबूज आले त्यांच्यासाठी टेबलावर आलेली फोड अर्धा किलोच्यावर असेल !

" ये तो थोडा लेओगे न ? "

मला वाटले माझ्या आग्रहास्तव ते थोडे चाखले असतील

' हां जरूर, यह तो यहांकी मशहूर चीज है खरबूजा '

त्याच्या शुद्ध पुश्तू उच्चारांचा थोडा नमुना ऐकण्यास मिळाला

गनीहा शरीराने विशेष धिप्पाड नसणारा, पण पीळदार बांध्याचा पठाण, त्याने माझ्यासाठी आणखी काही फळे आणली, पण त्याने ती फक्त न्याहरीत म्हणून मी हट्टच धुणावले. त्यावर तोही बराच अस्वस्थ झाला असावा मेहमान काहीच खात नाही, याबद्दल तो हातवारे करून आपला अफसोस व्यक्त करीत होता हे मी ओळखले हातात फळांची प्लेट घेऊन तो जोरजोराने बादशाहखानांशी बोलत होता त्याच्या प्रत्येक शब्दाला प्रथम स् चा जोर लावत होता असा भास होई त्याची शब्दोच्चाराची गती मेलगाडीची होती, बादशाहखान पुश्तू बोलू लागले म्हणजे त्यांच्या उच्चारात विलक्षण गतिमानता येई. पुश्तूचे हे वैशिष्ट्य दिसले खरबुजाच्या काही फोडी साल काढून त्यांनी माझ्यापुढे ठेवल्या फोडींची लांबी एक फुटाहून अधिक असावी त्यांची गोडी मधात साखळलेल्या वस्तूसारखी होती, तर त्यांचा स्वाद अवर्णनीय होता दही-खाटी येंगे पावाचे दोन तोस आणि शेवटी ते अमृतफळ खरबूज याचा मी आस्वाद घेतला मला ते आवडत होते

मदत करू शकणार ? सरकार तरी काय करू शकेल ? '

" ज्याना राज्ये करावयाची आहेत त्यानी त्यांच्या पद्धतीने विचार केला पाहिजे. बेशक तुम्ही मदत करू शकता ! शास्त्रीजींनी सारा विचार केला होता असे वाटते, पण दुर्दैवाने ते निघून गेले, केवळ पठाणांना मदत करण्यासाठी म्हणून नव्हे तर तुम्ही तुमच्या स्वत च्या हितासाठी म्हणून याचा विचार केला पाहिजे " "बेशक तुम जरूर मदत कर सकते हे " हे शेवटचे वाक्य त्यांनी अगदी सावपणे पण थांबून उच्चारले

पिंजऱ्यात कोंडलेल्या सिंह प्रेक्षकांच्या करमणुकीला कवळला म्हणजे स्वत भोवती गिरक्या घेऊन गुरगुरत बुडपून बसतो व नख्त दृष्टीने इतस्तत न्याहाळीत राहतो थोडेसे तशा रीतीने ते माझ्याकडे पाहात होते की काय असे वाटले पठाणांच्या विषयात लक्ष घालण्याच्या स्वाभाविक असमर्थतेबद्दलच्या माझ्या विधानाबद्दल त्यांना विषाद वाटला होता गांधीजींच्या आश्वासनाची आठवण त्यांनी दिलीच, पण भारताला स्वत च्या हितासाठीही या प्रश्नाचा नीट विचार करण्याची बुद्धी होत नाही याचा त्याना अचंबा वाटत होता काही वेळाने त्यांनी मंद आवाजात नरम-गरम अशी दीकाही सुनावली

माझ्या कमनशिबाने माझा पाठलाग केला होता पाकूत्ला पाय लागल्यापासून माझ्या पोटदुखीच्या व्यथेने जोरदार उचल केली होती या स्थितीत बादशहाखानाशी बोलणे चालणे कठीण झाले होते दुसरे दिवशी ते त्यानी ओळखले गनीला गुपचूप काही सांगणे अशक्य होते माझा हेतू त्याला शब्दातून सांगण्याऐवजी अंगविक्षेपादि मुकांच्या सर्व माध्यमाचा वापर करण्याचा प्रयत्न मी करीत होतो, पण त्याला काही न समजल्याने तो हैराण व्हावयाचा

मी अद्याप झोपलेला असल्यास माझी झोपमोड होऊ नये म्हणून पावलांचा आवाज न होऊ देता ते माझ्या खोलीच्या दाराशी आले होते दाराच्या फटीतून ते पाहात असल्याचे दिसताच मी उठू लागलो, "तुम बीमार हो, उठो मत्, सोते रही " वगैरे बोलत ते पलगाच्या लगत खुर्चीवर बसले "आज डाक्टरके पास चलेंगे, या डॉक्टरको यहाँ बुलायेंगे "

" ना, मेरे पास मेरी दवा है ! मेरी बीमारी पुरानी है उसमें फिकीर की कोई बात नहीं है, आप फिक्र करना नहीं ! "

" तुमची हालत दोन दिवस बघतो, तुम्हाला त्रासात ठेवून मी कसा स्वस्थ राहू शकेन ? " त्यांची आतिथ्याचीच नव्हे तर सेवावृत्तीची तळमळ त्यांच्या शब्दांतून दिसत होती ते स्वत-साठीही डॉक्टरला आपल्याकडे बोलावीत नसत सामान्यप्रमाणे इस्पितळाकडे स्वत जात माझ्या शेजारी बसून त्यांनी खूप अगत्याने आजारासबधी, आहारासबधी वगैरे चौकशी केली वागण्याबोलण्यात कसलाच औपचारिकपणा नव्हता उलट माझ्या व्यवस्थे

बदलची सचिंतता त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट होती स्वत च्या व्यथा आनंदाने सहन करणारे किंवा इतराना त्या कळूही न देणारे कित्येक लोक इतरांच्या व्यथेने मात्र तत्काळ कष्टी होतात त्यांना इतरांची दु खे सहन करवत नाहीत गांधीजींचेही असेच होते असे म्हणतात.

दि ३० ला पख्तून स्वातंत्र्यदिन शहरात साजरा व्हावयाचा होता. सबधी नेते व कार्यकर्ते यांची अतिथिगृहाकडील येजा वाढली होती बादशाहखान माझ्या खोलीत येऊन बसले होते "

" तुम्हाला श्रम झेपणार नाहीत, तुम्ही घरीच रहा "

" माझी प्रकृती आता उत्तम आहे मला आपल्याबरोबर येऊ द्या मी आता ठीक आहे "

" तुम्ही या पण वेळ खूप मोडेल, भीड पुष्कळ असेल. परंतु जनतेने आपले स्वातंत्र्य जाहीर केले त्या वेळेपासून हा स्वातंत्र्यदिन केला जातो, सभेत बोलावे, बोलू नये, मी काही ठरवलेले नाही "

" न बोलण्याने लोकांची निराशा होणार नाही ? " मी विचारले

" येथील सरकारचे धोरण स्पष्ट नाही त्यांना पाकिस्तान सरकारला दुखवायचे नसते मला येथे बसून काही काम करता आले तर उपयोग नुसती व्याख्याने देऊन काय होणार ? मी भाषण करणार नाही असे पतप्रधानांना काल सांगितले आहे ते काल रात्री येथे आले होते त्यावेळी तुमच्या कमऱ्याकडे मी आलो होतो तुमची झोप मी मोडली नाही "

"समारंभात बोलणार नाही असे आपण का सांगितले ? "

" असे पाहा, मी येथे त्यांचा पाहुणा, काही टीका माझ्या भाषणात आली तर तेही बरे नाही, बरे, नुसते वरवरचे बोलणे कशाला बोलावे ? प्राईम मिनिस्टरांनी खूप आग्रह केला आहे, तुम्ही बरोबर येणार तर निघण्याची तयारी करा " असे सांगून ते आपल्या कमऱ्याकडे गेले

तेथील राजकीय परिस्थितीचा किंवा राजकारणाचा मला अद्याप काही परिचय झालेला नव्हता रात्री पतप्रधान येऊन गेले, त्यांना भेटण्याचा अगर पाहण्याचा आलेला मोका वाया गेला ही गोष्ट माझ्या मनाला थोडी लागून राहिली होती, समारंभात हे का बोलू इच्छित नाहीत ? पतप्रधान बोला म्हणून आग्रह का करीत होते वगैरे बाबी मनात घोळत होत्या.

" चलो जोशीजी " असा पुकार त्यांनी केला मी माझ्या खोलीतून बाहेर पडतो तो ते समोर येऊन उभे होते आम्ही एका लष्करी जीपमध्ये बसलो त्यांच्या दिमतीस ठेवलेल्या सर्व मोठमोठ्या मोटरगाड्या त्यांनी परत केल्या होत्या

" मी भाषण करणार नाही असा निरोप धाडला होता, पण मुख्य प्रधानांनी मला

बोलण्यावद्दल आग्रह केला आहे मी बोलतो नाही तर सरकारी दडपणामुळे बोलत नाही असा जनतेत गैरसमज होईल, हीच त्यांची खरी अडचण आहे हे सरकार पठाणांना नाराज करण्यास तयार नाही अफगाण लोकवस्तीमध्ये पखतून अर्धे तरी आहेत त्यांना नाराज करण्याची सरकारची इच्छा नाही" वगैरे गोष्टी ते हळूहळू सांगत होते

"हा तुमचा दर्या" रस्त्याच्या डाव्या बाजूने वाहणा-या कोरड्या काबूल नदीकडे बोट करून त्यांनी सांगितले दर्या-म्हणजे नदी जलप्रवाह पुण्याच्या मुठा नदीसारखी ही नदी शहरामधून जाते ठिकठिकाणी पाण्याची डबकी, धोबी नगरच्या कामापुरते पाणी असेल रस्ते विस्तृत व सुंदर, बाजूच्या नव्या भव्य इमारती पाहिल्या म्हणजे काबूलचा चाललेला कायापालट थोडा लक्षात येतो काबूल-दर्यामधील डबक्यामधे कामे करणारी गरीब जनता व त्यांची वस्त्रे त्यांच्या दारिद्र्याचे दर्शन घडवीत होते, तर नव्या तीन मजली उंचीच्या इमारती व थाटाच्या शो रूम्स तेथील पश्चिमी प्रभावाची जाहिरात करीत होत्या रस्त्यावर दोन्ही बाजूस छोट्या छोट्या कळपाने चाललेले लोक पखतून चौकाकडे चालले होते हे त्यांनी केलेले 'बाच्चाखान जिंदाबाद' हे घोष ऐकताच ध्यानी आले तीन दिवसांनी मी प्रथमच लोक व शहर यांचे दर्शन घेत होतो

पखतून चौक (वाट ?) हा एक भव्य वस्तीचा चार-पाच वाटा एकत्र मिळणारा सुंदर असा चौक आहे मध्यवर्ती छोट्या बागेत वर्तुळाकृती लोखंडी कठड्यावर अनेक राष्ट्रांचे ध्वज लावलेले होते त्यामध्ये अफगाण राष्ट्रध्वज होता व त्याच्या दोन्ही बाजूस पखतूनझेंडा थाटात डोलत होता त्यामध्ये भारताचा ध्वजही डोलत होता आमची जीप दिसताच 'स्वतंत्र पखतून व बाच्चाखान' यांच्या जयजयकाराने सारे वातावरण दुमदुमून गेले साडेआठचा सुमार असावा, सुमारे पाच हजारावर तेथील जनसमुदाय होता राष्ट्रध्वजाच्या वर्तुळाकृती छोट्या बगीच्यासभोवार निरनिराळ्या रंगीबेरंगी वेषांतील पुरुष नर्तकांची नृत्ये वाद्यासह चालू होती त्या वाद्यांच्या नादघोषांनी सारे वातावरण धुंद बनले होते आपल्या कडील लेझिम-ढोल वगैरेसारखी ती वाद्ये होती मुख्यत नर्तकांचा उत्साह अपूर्व होता दोन-तीनशेवर नर्तकांचे निरनिराळे ताफे आपल्या गाण्यांच्या अगर घोषांच्या तालावर नाचत घेर घेत होते सभोवार हजारो प्रेक्षक शिस्तीने वर्तुळात रांगने उभे होते समोरील एरीयाना होटेलच्या प्रशस्त सुंदर इमारतीवरील किरणे अद्यापही कोवळी वाटत होती जीप थांबताच निच्छिमोवती प्रेक्षकांचा गराडा पडला मी थोडे गहाळ झालो तर काय होईल याची चिंता मला अद्याप शिवली नव्हती, पण ती काळजी बादशहाखानांना होती मी त्यांच्यापासून थोड्या अंतरावर मागे होतो भेटणाऱ्यांना ते आलिंगन देत व हस्तस्पर्श करीत 'जोशीजी, तुम मेरे साथही रहना, यहाँ आओ" असे म्हणून त्यांनी मला आपल्याजवळ बोलावून

घेतल्ने त्यांच्या सभोवारच्या वर्तुळात प्रविष्ट झाल्यानतर मी थोडा निर्धास्त झालो गर्दी पुष्कळ असली तरी लोक शिस्तीने व अदबीने हस्तस्पर्श करीत होते हॉटेलसमोर मध्यवर्ती जागेवर ते जाऊन उभे राहिले, मी त्यांच्या पाठीशी उभा होतो त्यांच्याकडे येणाऱ्या मोठमोठ्या नेत्यांचे अभिवादन अभिनंदन स्वीकारण्यात व शुक्रिया अदा करण्यात ते गुतले होते शहरातील मोठमोठे नेते व्यापारी, राजकीय कार्यकर्ते, कवी-लेखक अशा निवडक समाज श्रेष्ठींचा व तसाच सामान्य जनतेचा तो जमाव होता नर्तकांची गाणी व नाच पूर्ण जोशात होते

"देखो तुम थक जावोगे। तुम बैठे रहो उपर कुर्सीपर बैठो" त्यांना पुकारले

*या साऱ्या गर्दीत मागे थोडे दूरवर उभ्या असलेल्या मला त्यांच्या शोधक डोळ्यांनी* शोधून काढले त्यांच्या पाठीशी असलेल्या हॉटेलच्या प्रशस्त प्रांगणात रंगीबेरंगी छोट्या छत्र्या खाली खुर्च्यांची वर्तुळे होती एका खुदाईखिदमतगाराने मला तेथे नेऊन बसविले त्याचा पोशाख खादीचा होता साधारण पांढरट गुलाबी खादीच्या त्या कपड्यांनी माझ्यापुढे अनेक प्रश्नचिन्हे रेखाटली, पण वीरभावना जागृत करणाऱ्या त्या नृत्यांनी मला आकर्षिले होते एका सुंदर छत्रीखाली मी बसलो होतो माझ्या शेजारच्या छत्रीखाली बसलेले लोक परदेशी प्रवासी असावेत लोक बादशाहखानांना त्यांच्या पद्धतीने भेटून त्या वर्तुळाकृती रांगेत जाऊन उभे राहात, त्यामध्ये पाश्चिमात्य पद्धतीची केशभूषा (बॉब) व वेष असलेल्या एकदोन स्त्रियाही होत्या नर्तकाचे नाच सुरू होते बादशाहखानांच्या समोरच्या बाजूस व राष्ट्रध्वजाच्या वर्तुळाजवळ सुमारे शभर फूट अतरावर दूरध्वनिक्षेपक खडा होता, त्यातून एक प्रवक्ता मधूनमधून काही वक्तव्ये करीत होता काही नेते येऊन बादशाहखानांना भेटले तेव्हा टाळ्यांचे गजर झाले अशा थोर नेत्यांमध्ये स्वत युवराज व पतप्रधान मेमदवाल हे होत उभयतांनी बादशाहखानांना अत्यादराने अभिवादन केले व तेही त्या वर्तुळाकृती रेषेत उभे राहिले हा तेथील कार्यक्रम सुमारे एक-दीड तास चालला होता प्रतिष्ठितांचे आगमन व बादशाहखानांना अभिवादन, नर्तकाचे घेऱ्यामध्ये नाच, विशेषत ते आपली डोकी जोराने हिसके देऊन वळवीत तेव्हा त्यांचे लांब केस सरळ डोक्यावर उभे राहून पुन्हा खाली माने पर्यंत जाऊन पूर्ववत लोंबत, तो देखावा मजेचा व आकर्षक होता त्यांचे ढोलवाद्य हे वीर घोष करणारे असे वाटले, आपल्याकडेही काही ठिकाणी अशी ढोलवाद्याची साथ ऐकण्यास मिळते सुमारे दहाच्या सुमारास काबूलच्या मेयरनी छोटेसे भाषण केले त्यामध्ये बादशाह खानांच्या उपस्थितीचा उल्लेख होता समारभ सपला तेव्हा मी परत मुक्कामी जाण्याचे ठरवले होते झालेले श्रम मला थकवा आणण्यास पुरे पडले, पण जीप कशी शोधावयाची या चिंतेत मी होतो लोक परत फिरले तेव्हा नेत्यांच्या सख्येची व स्वरूपाची अधिक नीट कल्पना

शास्त्री समाज सात-आठ हजारांवर आला असावा हॉटेलच्या उजव्या बाजूच्या गल्लीतील रस्त्यावर घोड्यावर बसलेले स्वार होते ते सरकारी स्वार नसून खेड्यापाड्यांतून आलेले प्रेक्षकजन होते त्यात पुष्कळ शिपाही होता जिप्सी बायांसारख्या अनेक वेण्या व कवचांच्या मण्यांच्या माळा अशा प्रकारचा त्यांचा पेहेराव होता त्यांची तट्टेही अगदी बुटकीच व लहान बांध्याची होती सैन्यातील अगर पोलिसमधील काही स्वारही व्यवस्थेसाठी इतस्तत उभे होते, त्यांची घोडी लहान बांध्याची व स्वारही बुटकेच होते

मी चोहीकडे पाहत होतो तो बादशहाखान माझ्यासाठी पुढारीत असल्याचे लक्षात आले. त्यांनी जीपकडे मला पोचवण्यासाठी एका गृहस्थास सांगितले ते नागरिकांच्या गर्दीमधेयेत गुंतलेले असावेत असे दिसले समारंभ संपलेला आहे असे समजून मी परत जाण्यास निघालो तेवढ्यात भारतीय दूतावासातील एकदोन लोकांनी मला हाकले मी परत जात असल्याचे पाहून Are you not attending the function sir ? असे त्यांच्यातील एकाने विचारले व आपला परिचय करून दिला

' मग पाहिले हे काय ? ' असा सवाल मी केला ' हा ट्रेलर झाला, मुख्य कार्यक्रम आता गाझी स्टेडियमवर आहे तिकडे बाद्शाखान भाषण करतील म्हणून हजारो लोक जमले असणार ! '

' तुम्हाला माहीत असणार, बाद्शाखान आज बोलणार आहेत का ? ' दुसऱ्या एकाने अत्यंत उत्सुकतेने प्रश्न विचारला

' आपण जाऊ तर चला तोच मुख्य कार्यक्रम आहे ' आम्ही दोन-पाच वाक्ये बोलत होतो तो माझ्यासाठी बाद्शाखानांनी दिलेला वाटाड्या मला जीपकडे पोचवण्यासाठी उतावळा झाला होता तिकडे बाद्शाखानांची पदयात्रेची मिरवणूक सुरू झाली होती नर्तकांचे अनेक ताफे नाचत होते, वाद्यांचे आवाज व जयघोष गर्जत होते त्या मिरवणुकीत सामील होण्यासाठी माझा वाटाड्या उतावीळ झाला होता त्यांना ती एक मानापर्वणी होती

माझी दुर्बलता क्षणभर विसरून दूतावासातील त्या मित्रांसह मी त्यांच्या गाडीत बसलो

' बाद्शाखान आज भाषण करणार आहेत का तेवढे सांगाल का ? ' अगदी उत्सुकतेने एकाने पुन्हा विचारले

' मला काही कल्पना नाही त्यांनी भाषण करावे म्हणून काही अधिकारी त्यांना आग्रह करण्यासाठी आले होते असे ऐकिले ' That's it, the biggest news '

कोण आले होते, काय बोलणे झाले वगैरे इतके प्रश्न त्या मित्रांनी मला विचारले की, त्यामुळेच मी थोडे तरी वृत्तपत्रप्रतिनिधींच्या घोळक्यात होतो हे माझ्या ध्यानी आले

'येथे जवळ एखादे चांगले हॉटेल सापडेल का ?' त्याच्या प्रश्नाला बगल देऊन मी मार्ग काढण्याचा प्रयत्न केला, कारण मला दूध पाहिजेच होते

'चला आपण चहा पिऊ, जवळच आर्मीचा स्टॉल आहे' त्याने उत्तर दिले गांधी थांबल्यावर एवढे सांगितले

'मला दूध पाहिजे आहे ते मिळेल का ?' 'Milk ? What for ?' तो आश्चर्याने पाहत राहिला.

'येथे जवळपास दूध मिळणार नाही स्टेडियम आलाच तेथे आपण पाहू' एवढे सांगितले.

'पण बादशहाखान खरोखर बोलणार आहेत का ?' दुसऱ्या एकाने मला थोडे बाजूस घेऊन विचारले 'We all will know it very soon' असे म्हणत आम्ही त्या शाही स्टेडियमच्या परराष्ट्रप्रतिनिधींच्या कक्षाकडे वळलो मोठे रुंद जिने, त्यावर तऱ्हेतऱ्हेनी सुंदर गालिचे पसरलेले, लहान मोठ्या सपुष्प कुंड्या दोन्ही बाजूस ठेवलेल्या

द्वाररक्षकांना प्रतिनिधींनी आपल्या प्रवेशपत्रिका दाखविल्या भारतीय प्रतिनिधीने माझ्याविषयी काही माहिती त्याच्या कानात सांगितली द्वारपालाने सलाम करून मला मार्ग दाखवला इतर मित्र आपापल्या जागाकडे गेले भारतीय संपर्काधिकारी मला घेऊन आपल्या स्थानाकडे निघाले मध्ये भेटलेल्या एका प्रतिनिधीस त्यांनी माझी घाईघाईने ओळख करून दिली

'Happy to meet you again You will be here for a few days more to see the historical places ?'

Probably not'

समोरचे गृहस्थ कोण हे समजण्यापूर्वी मी उत्तर दिले होते सदर गृहस्थ पाकिस्तान दूतावासातील अधिकारी होते माझे मित्र सिगारेट ओढण्याच्या निमित्ताने तेथून थोडे दूर अंतरावर गेले

सुमारे दोनशे प्रतिनिधींचा समावेश करणाऱ्या त्या कक्षात ३०।४० परराष्ट्रप्रतिनिधी उपस्थित होते स्टेडियम रंगीबेरंगी कागदी व कापडी पताकांनी भूषविलेले होता आमच्यासमोरील अर्धवर्तुळाकृती भागात सुमारे अर्ध्या फर्लांग अंतरावर अफगाण व पख्तुन ध्वज व इतर राष्ट्रध्वज फडफडत होते तेथे सुंदर व्यासपीठ उभारलेले होते सुमारे तीस हजारांवर समाज चारी बाजूस खेचाखेच भरीत असल्याचे दुर्बिणीतून पाहिले परराष्ट्र खात्याच्या दालनात काही पश्चिमी राष्ट्रांचेही प्रतिनिधी सपत्नीक होते आमच्या उजव्या बाजूस थोड्या उंचीच्या मचावर राजघराण्यातील मंडळींची आसने होती, त्याच्या उजवी

कडील दालन मंत्रिमंडळाचे होते. आम्ही डाव्या बाजूच्या दालनात होतो. आम्ही चोहोकडची पाहणी करीत होतो. इतक्यात आझाद 'पख्तूनिस्तान झिंदाबाद,' 'बादशहाखान झिंदाबाद' हे घोष दुरून कानी येऊ लागले. बाराचा सुमार असावा. सुमारे एक तास ही मिरवणूक उन्हात चालली होती. लोकांचा उत्साह अपूर्व होता. खेड्यापाड्यातून उंट-घोडी यावरून आलेल्या स्त्रीपुरुषांची रांग आम्हांला येताना दिसत होती. गाझी मैदानावर मिरवणूक प्रविष्ट झाली तेव्हा हे जयघोष आम्हांला साधारण ऐकू येऊ लागले. आमची गॅलरी सुमारे वीस फूट उंचीवर असेल. बादशहाखान व त्यांच्याबरोबरचे काही लोक यांनी त्या मैदानातील प्रदक्षिणा पुरी करून ते समोरच्या व्यासपीठावर जाऊन बसले. तुमच्या डोळ्यांनी त्यांच्या आकृती नीट ओळखणेही कठीण होते. लोक त्यांचा हस्तस्पर्श लाभावा म्हणून सारखे धड-पडत होते. येथेही मेयरच्या छोट्या भाषणाने कार्यक्रमास सुरुवात झाली. नंतर निरनिराळ्या खेळांचे सामने सुरू झाले. माझे शरीर दुर्बल झालेले असल्याने मला विशेष दम धरणे कठीण होते, शिवाय बादशहाखान भाषण करतील की नाही याची मलाही नक्की कल्पना नव्हतीच! त्यामुळे मी परत निघण्याची चुळबूळ करीत होतो. एका कोपऱ्यातील श्रोत्यांनीही त्यांच्या व्याख्यानाचा घोष केला असे दिसले. लोकांचा उत्साह अपार वाढत होता असे दूर अंतरावरून मधूनमधून कानी येणाऱ्या घोष-गर्जनांवरून वाटले, आणि शेवटी टाळ्या व जय-घोषांच्या रणधुमाळीत बादशहाखान बोलण्यास उभे राहिले, आणि त्यामुळे परत जाण्यासाठी उभा झालेला मीही खाली बसलो. क्षणार्धात सर्वत्र पूर्ण शांतता झाली. त्यांचे हे भाषण सुमारे पन्नास मिनिटे झाले असेल. त्या मुदतीत कॅमेरे सारखे चालू होते. दूरध्वनिक्षेपकामुळे त्यांचे संपूर्ण भाषण सर्वांना ऐकू जात होते. टाळ्यांचे व जयघोषांचे निनाद मधूनमधून ऐकू येत होते. त्यावरून लोकांच्या आनंदाला भरती आली होती एवढेच मी समजू शकत होतो. त्यापलीकडे व्याख्यानाचा काहीही बोध मला होत नव्हता. पण भारताच्या नावाचा उच्चार झाला तेव्हा माझ्या मित्राने घाईघाईने काही सारांश सांगितला, पण तो भिन्न म्हणून ते व्याख्यान ऐकण्यात गर्क होता. हा सारांश स्वतः बादशहाखानांनीच रात्री घरी परतल्यावर मला सांगितला. सर्व दिवसभर म्हणजे सुमारे १० - १२ तास ते भर उन्हात मिरवणुकीत व्याख्याने देण्यात अगर ऐकण्यात असे सारखे पायावर उभे होते. रात्री ९ वाजता ते घरी भोजनाच्या वेळी भेटले. ते खूपच थकलेले होते. तरीही ताजेतवाने व उत्साही दिसले. लोकप्रेमाच्या अमृतवर्षावामुळे ते दहा वर्षांनी तरुण झाल्यासारखे दिसले.

गाझी मैदानावरील या संस्मरणीय व्याख्यानात ते म्हणाले, "पठाण आता जागृत झाले आहेत. त्यांच्यातील जातीजमातीतील ऐक्य वाढते आहे. इतके दिवस अंतर्गत कलहांनी आमच्यात फाटाफूट होती. आता आमचा मोठा टोळ पाकिस्तान सत्र आहे. तो वर येऊन

आमची तृषा दूर होणार हे खास.

" आज जो धर्म म्हणून सांगितला जातो तो धर्म नव्हे; तो देवाचा नाही; प्रॉफेटने सांगितलेला नाही; तो मोडवलवाल्याचा आहे. महंमदसाहेब आले ते नवा धर्म घेऊन आले. त्यांनी आम्हांला नवे जीवन दिले. ज्याच्या हाताने व जिव्हेने दुसऱ्यास कधी त्रास होत नाही, इजा पोचत नाही तो मुसलमान होय, जो दुसऱ्याला स्वास्थ्य-आराम देतो तो मुसलमान...देशावर प्रेम करणे हा खरा धर्म आहे. ' हुबुल वतन मिन्नुल इमान ' ' भाइओ, मी जो हिंदु बनतो ( हिंदुस्थानबद्दल प्रेम करतो ) तो याच देशप्रेमामुळे. देश व जाती याच्या प्रेमामुळे. त्याचप्रमाणे, ईश्वराच्या सृष्टीची सेवा करण्यासाठी ' पाकचा धर्म पाहा. तेथे काय चालले आहे ? इस्लामच्या नावाने डांगोरा पिटला जातो पण प्रत्यक्ष कृती काय ? पाकिस्तान भाईनी, बाजौरच्या पठाणांवर पैक वेळा बॉम्बवर्षाव केला होता तो कशासाठी ? त्यांनी काय पाप केले होते ? स्त्रिया, मुले, वृद्ध यांच्यावर गोळे टाकणे ही काय इस्लामची सेवा आहे ? तसेच बलोचिस्तानवर गोळे फेकले जातात ते कशासाठी ? त्यांनी कोणते पाप केले आहे ?

" भारत-पाक युद्धाचे वेळी पाक एम्बसीचे लोक मला भेटले होते. ' तुम्ही भारताला जात आहात असे ऐकतो ' असे ते म्हणाले त्यांना मी सांगितले, मी इथे आहे. ते तुम्ही पाहात नाही ? तुम्ही माझे भाई. मी तुमच्यासाठी येथे आहे, पण तुम्ही मला भाई मानीत नाही व पठाणाचे हक्क त्यांना देत नाही. तर मी येथे किती वेळ राहीन ? मी हिंदुस्थानला जात नाही तर तुम्ही मला तिकडे लोटीत आहात, आज इस्लामचे नाव फक्त गरिबांना फसविण्यासाठी वापरले जात आहे. आम्ही पठाण, प्रवाहात तरगत वाहात राहिलो आहोत ! लोकहो, तुम्हीच सांगा ! आम्ही बुडत बुडत वाहत चाललो आहोत. इस्लामी भाई मदत देत नाहीत हिंदूनी मदतीचा हात पुढे केला तर ती मदत मी घेऊ का नको ? "

आणि चारी बाजूनी टाळ्यांचा कडकडाट झाला. "ले लो-ले लो" अशा काही घोषाचा गजर झाला. क्षणभर त्यांचे व्याख्यान बद पडले होते. भारताने मदत केल्यास ती जरूर घ्यावी हा जनतेचा शिक्का-मोर्तब त्यांनी इतक्या जाहीर रीतीने व इतक्या खुबीने मिळवला होता. आमच्या पाठीशी दोन तीन रांगा टाकून असलेले एक पश्चिमी कुटुंब हातातील सिगरेट दूर करून जोराने टाळ्या वाजवीत व मोठमोठ्याने हसत होते.

" मला पख्तूनांना वाचवायचे आहे. मी कोणाचीही मदत घेऊ इच्छितो, अमेरिका मदत देत नाही, रशिया चौकशी करीत नाही. अफगाणही मदत देत नाहीत. मग मी येथे किती दिवस थांबून राहणार ? १८ वर्षे वाट पाहिली, येथेही दोन वर्षे होत आली, आता अधिक वेळ थांबणे शक्य नाही. माझा मार्ग अहिंसा हाच आहे. पाकिस्तानी भाईना मी

सांगू इच्छितो की, हा झगडा मैत्रीच्या मार्गानेच मी सोडवू इच्छितो. जगात जर शांतता नांदायला पाहिजे असली तर अमेरिका, रशिया यांनीही याचा विचार केला पाहिजे. आणि पठाण भाईंसाठीही मी हेच सांगतो की, त्यांनीही आपसातील तंटे-भांडणे सपवली पाहिजेत, आम्ही देशप्रेमाने व ऐक्याने वागलो तर आमचा लढा झगड्यावाचून संपू शकेल.

"*आम्ही एकी करू; पण तरीही पाकने आमचे हक्क दिले नाहीत तर काय करावयाचे?*" असा प्रश्न एका श्रोत्याकडून आला होता. "मग तुम्ही तुम्हांला योग्य वाटेल ते करा. तोपर्यंत तुम्ही शांतीने व शिस्तीनेच चालले पाहिजे."

व्याख्यान संपल्यावेळचा जनतेचा उत्साह अमाप होता. टाळ्यांचे गजर व जयघोष दीर्घकाळ चालले होते. व्यासपीठाकडील हालचाली पाहण्यात आमच्या कक्षातील लोक गुंतले होते. सुमारे दीडच्या सुमारास मोठ्या अनिच्छेने मी तेथून परतलो. गर्दीच्या रांगेतून आमची जीप बाहेर काढण्यातच बराच वेळ गेला. दुपारी दीडचा वेळ असताही हवेतील गारवा आल्हाददायक होता. स्टेडियमकडे येणाऱ्या लोकांचे थवे अजून दोन्ही बाजूस दिसत होते. ईदचे नवे पोशाख स्त्रियांच्या अंगावर होते. फळबाजाराकडे विक्रीसाठी चाललेल्या अंगूरांच्या पेट्या वाहणाऱ्या गाढवांच्या रांगाच्या रांगा मधून मधून दिसत. द्राक्षे व खरबूज यांचा मोसम नुकताच सुरू होत होता त्यांचे विपुल ढीग रस्त्यावर विक्रीसाठी बसलेले होते. गाढवे व त्यांना हाकून नेणारे त्यांचे मालक शेतकरी यांच्यामध्ये गाढवांची शरीरे अधिक सुदृढ होती असे वाटले. त्यांच्या दारिद्र्याची ओळख करून देणारी वस्त्रे त्यांच्या (गाढवांच्या) अंगावर नव्हती हे त्यांचे भाग्यच मानले पाहिजे. त्यामुळे ती सुखी असावीत असे मानण्यास जागा होती, पण गाढवांच्या मालकांच्या अंगावरील वस्त्रे म्हणजे अठराविश्वे दारिद्र्याच्या त्या निशाण्या होत्या स्त्रियांच्या बुरख्याचा कपडाही अनेक ठिकाणी फाटल्याने बुरखापद्धतीचा नायनाट करण्यास त्यांची मदत होत होती. आमच्या ड्रायव्हरने कमालीच्या वेगाने गाडी चालवून मला अतिथिगृहात पोचवले गाडी मैदानाकडे परत पोचण्यास तो उतावळा असला पाहिजे

रात्री ९ च्या सुमारास ते परत आले. मी बगीच्यामध्ये फिरत होतो, त्याचीच वाट पाहत होतो. "तुम अभीतक बाहर?..थड है"

"इतजार कर रहा था, सुबहसे आप घूमते फिरतेहि है।"

"चलो. खाना नहीं लिया?" नेहमीपेक्षा वेगाने पावले टाकीत ते पायऱ्या चढले खोलीत येताच घाईघाईने त्यांनी रेडिओ सुरू केला. त्यांचेच दुपारचे भाषण ऐकू येत होते, रोजच्याप्रमाणे हात-दात धुणे, तोंडावर अनेक वेळा पाणी मारून ते पुसून कपडे वगैरे कार्यक्रम सपाट्याने चालू होता. भाषणातील टाळ्यांचे गजर, लोकांचे घोष. वगैरे सर्व

लक्ष देऊन ऐकत होते. ते चालू असताना आमचा खानाही चालू होता. येमेंटे-कटली-टोस्ट व दही हीच ती पक्वान्ने. तीच श्रमगिरी, तीच साधेपणा! तेथे सबंध भारता विषुवृत्तीने उपलब्ध असतानाही त्यांचा वापर ते घरीत नसावेत असे दिसले. खरं त्या खाण्यासाठी काही गांधूल करून घेणे हे त्यांच्या वृत्तीत नसावे. गनीला गांधून मी म्हटलेर, वगैरे काही भाजी कधीतरीच होती. ती आज नवीन होती. ती त्यांना विशेष आवडल्याचे दिसले. मागाहून रोज काही भाजी करण्यास त्यांनी गनीस सांगितले असावे. कदाचित केवळ माझ्यासाठीही असेल! पण मात्र भरपूर घेतल्या पाहिजेत असे तेच गनीला बोलले. बोलताना पुष्कळ वेळा ते डोळे मिटून व रागाने बोलल्यासारखे भासते. पण तो रागाचा प्रकार नसतो. कठोरता व राग ही दोन्ही त्यांच्या जीवनात नसावीत. ऐकणाऱ्यास आपण आधार करून न समजल्याबद्दलची उतावीळ त्या दृष्टीत असते. ते मधून मधून बोलत असत, पण त्यांचे सर्व लक्ष रेडिओवर चालू असलेल्या आपल्या भाषणाकडे होते. " ढोल म्हणजे..." मी विचारले

" खेती के लिये पानी खींचनेका मश्क होता है। पवनचक्की पर भी उन्हे रखते हैं " वगैरे समजून सांगताना ते खूप आनंदात दिसत होते

" हमारा ढोल अभी मर गया इसका अर्थ " ? मी पुन्हा विचारले.

" जरूर भरला आहे. आम्ही इतके दिवस दडपले-डावललेले होतो, पण आता पठाण सचेत होत आहे. ते चिरडले गेले असले तरी त्यांचे सामर्थ्य खूप वाढलेले आहे. आता त्यांची कामयाबी होण्याचा समय आलेला आहे. जे इमानाने ( गैब ) चालतात, जे ईश्वराची प्रार्थना ( निमाज ) करतात, आपल्या कमाईचा ठराविक हिस्सा सृष्टीची ( खुदाके मखलूखरी ) सेवा करण्यासाठी बाजूला ठेवतात अशा लोकांना विजय मिळालाच पाहिजे महमद, ख्राइस्ट, कृष्ण भगवानजी यांच्या अवतारावर विश्वास असणाऱ्यांची फत्ते झालीच पाहिजे.

" उनकी कामयाबी होतीही रहेगी " हे वाक्य ते पूर्ण विश्वासाने व श्रद्धेने बोलत होते गांधीजींच्यामधील ईश्वरावरील श्रद्धेच्या अनेक छटा जशाच्या तशा त्यांच्या निष्ठेत दिसत होत्या

अलिफ्लाम मीम । जालिकल किताबो ।
लारै बा फी हे । हुउदल्लिल मुत्तकीन लजीन ।
यू मिनू नाबिर गैब । वइयू किमून सरगता ।
वमिम्मा रजक्न नाहुम । युने फिकून ॥

हे चरण त्यांनी सफाईने म्हणून दाखविले आम्ही हात धुतल्यावर ते खरबूज सोलण्याच्या

कामाला लागण्यापूर्वी मी स्वतः जवळ सूत कातले, ठेवलेल्या सुताच्या गुंड्या उलगडून त्यांच्या गळ्यात घातल्या

" असल्या गोष्टी तुम्हाला कशा लागतात ? या गुंड्यांचे काय करू ? मी आता सूत कातीत नाही की कपडा विणत नाही "

' माझ्याबरोबर एक थोर कार्यकर्त्याने आपली गुंडी तुमच्यासाठी पाठवली आहे ते वयाने तुमच्यापेक्षा वडील आहेत आता ९४ वर्षांचे आहेत परवापर्यंत ते रोज सूत कातीत होते '

" क्या नाम ? "

' हरिभाऊ फाटक, त्यांच्या सुताची ही गुंडी त्यांच्या आरोग्याप्रमाणे ती गुंडा जाडजूड मोठी आहे. मी केव्हा तरी क्वचित काततो ' त्यांनी त्या गुंड्या गळ्यात राहू दिल्या

" गांधीजींची आठवण ठेवणारे किती लोक आहेत ? राजकारणासाठी त्यांच्या नावाचा उपयोग सगळेच करतात त्यांचे काम म्हणजे गरिबांची सेवा ! ती कोण करतो ? विनोबा तेवढे करीत आहेत खरे ! त्यांचे वर्तमानपत्र तेवढे मी बहुधा पाहतो येथे वर्तमानपत्रेच नाहीत आहेत ती फक्त सरकारी मी कोणतेच वर्तमानपत्र वाचीत नाही विनोबा एकदा बोलले होते की लोकमताप्रमाणे पख्तूनचा प्रश्न सोडवला जावा आम्ही लोकमताप्रमाणेच करा म्हणतो पाकिस्तानचे मत म्हणजे फक्त पुढाऱ्यांचे व अधिकाऱ्यांचे मत की काय ? सरहद्द प्रांत, बलोचिस्तान, सिंध हे सगळे सरकारविरोधी आहेत, पंजाबची जनताही विरोधी आहे मग लोकमत कोणते ? हे सारे ' पख्तून ' ला पाठिंबा देणारे आहेत हे लोकमत धुडकावून लावून पाकिस्तानचे सत्ताधीश जबरदस्तीने वागत आहेत मग आम्ही काय करावे ? लोकमताप्रमाणेच आम्ही वागत आहोत व सरकारने तसेच वागावे अशी आमची मागणी आहे ! भारताने आपले कर्तव्य म्हणून पठाणाची बाजू घ्यायला हवी होती तुमच्या कल्याणाचा मार्गही तोच आहे हेही तुम्हाला ओळखता यायला पाहिजे होते "

' पण फाळणीनंतर हा प्रश्न आंतरराष्ट्रीय बनलेला आहे अमेरिकेचे धोरण उघड आहे

" बरोबर आहे ताकद असली म्हणजे आंतरराष्ट्रीय अडचणी सुचत नाहीत, आणि भारतही जर धैर्यपूर्वक न्यायाच्या बाजूला खडा राहिला तर अमेरिकेतही भारताच्याच शब्दाला अधिक किंमत देईल चीन दुबळा असतानाच कोरियाच्या बाजूला धैर्याने खडा राहिला तुमच्या निर्धाराची जरूरी असते तुमचा कोणताच निर्धार नसल्यास जगातील तुमचे सामर्थ्यवान मित्रही हळूहळू दूर जातील "

त्या दिवशी ते खूप श्रमलेले होते म्हणून मी लवकर उठलो उलट मलाच लवकर निजण्याची त्यांनी सूचना दिली ते तेथे किती वेळ बसले होते न कळे रेडिओ हेच त्यांचे

जगाशी संबंध ठेवण्याचे मुख्य साधन व त्यांच्या एकांतवासी जीवनात अखंड साथ देणारा त्यांचा मित्र असल्याचे दिसले

दोनतीन दिवस त्यांच्याशी बरेच बोलू शकलो होतो मुख्यत चरित्रविषयक थोडी माहिती मिळवण्यात थोडा यशस्वी झालो होतो परंतु माझ्या प्रकृतीची चिंता त्यांना वाटू नये म्हणून मी लवकर प्रयाण करण्याचे ठरविले, ते त्यांना सांगण्यास मन तयार होत नव्हते. त्यांचे प्रेमळ आतिथ्य व अखंड चर्चा करण्याची त्यांची तयारी यामुळे तो सहवास संपवावा असे कसे वाटेल ? पण मी तो निर्धार केला व त्यांच्या माडीवरील कमऱ्यात गेलो ते रात्री निजण्यासाठी वरच्या मजल्यावर जात व सकाळी फिरण्यासाठी जे खाली उतरत ते सर्व दिवस बहुधा खालीच असत

"आवो, चाय लिया ?"

त्यांचे कॉफीपान सुरू होते सकाळच्या न्याहारीसाठी दोन कच्ची अंडी, पावाचा एक तुकडा व कॉफीची छोटीशी किटली या वस्तू टेबलावर होत्या त्यांच्याबरोबर मलाही थोडी कॉफी प्यावी लागली ते स्वत च्या आहाराकडे विशेष लक्ष देत नाहीत असे दिसले आवडी-नावडीचे काहीच प्रस्थ नव्हते माझ्यासाठी म्हणून रोज भाजी सुरू झाली ती मात्र ते नित्य घेत होते

'मी जाण्याचे ठरवीत आहे '

"क्या ? तुम तो जलालाबाद भी आनेवाले थे ? वहा तबीयत ठीक रहेगी, उधर चलो, कभीभि चले जायेंग !"

जलालाबाद खूप गरम प्रदेश तो त्यांनाही मानवतो त्या भागात कार्यकर्त्यांसाठी केंद्र सुरू करण्याची त्यांची इच्छाही आहे

"आमच्या कामाला सहकार्य देण्याचे तुम्ही बोलला होता तिकडे जाऊन तर या"

'माझी इच्छा तर खूप आहे पण शक्य झाले तर येईन तेथे काम कोणते सुरू करणार ?'

"ते सर्व सरकारवर अवलंबून आहे त्यांनी रोगीची जागा दिल्यास लोकांच्या सेवेचे काम आरंभता येईल 'खुदाईखिदमतगार' संघटनेचा आमचा नमुना जुनाच आहे इच्छा असेल तर काम वाटेल तेथे करता येईल "

'पण यातून पख्तून प्रश्न कसा सुटेल ?'

'आपल्या सेवेतून शांती वाढते व शक्ती वाढली की सारे प्रश्न सुलभ होऊ शकतात

'पाकिस्तानच्या शक्तीशी सामना द्यावयाचा आहे आणि त्यांच्यामागे ?'

"आम्ही दीर्घकाळ झगडतो आहोत शक्तीनी सर्व प्रश्न थोडेच सुटतात ?"

थोडे मंत्र मौन मा बोलत होतो.

“तुम्ही मिळून वागलात किंवा नमून राहिलात म्हणून तुमचे राज्य कधी होऊ शकत नाही. उलट ते वाढतच राहते. घराशेजारी पाप, पाप वाढते ठेवून तुम्ही शांतपणे संसार करू शकाल असे मानणे भ्रामक असते, तुम्ही लोक भगवान कृष्णांचा उपदेश विसरलेले आहात. पापाचा नाश केलाच पाहिजे, तेच तुमचे कर्तव्य असते. ते टाळता येत नाही, कर्तव्य केलेच पाहिजे.”

पुराणातील उल्लेख ज्या सफाईने ते मधून मधून करीत त्याच श्रद्धेने त्यांनी गीतेचाही उल्लेख केला होता.

पूर्वेकडील सूर्यकिरणे त्यांच्या पाठीवर पडली होती. स्वच्छ प्रकाशामुळे त्यांच्या चेहऱ्यावरील साऱ्या सुरकुत्या सोनेऱ्यासारख्या स्पष्ट दिसत होत्या. भुरक्या ( मम्मी ) रंगाच्या कपड्यांचा पठाणी पजामा व तशाच रंगाचा हाताला दोन गुंड्या असणारा शर्ट, एवढाच त्यांचा पोशाख. कधी कधी अंगावर एक उपरणे असते व ते अगदी वैदिकांसारखे ते गळ्याभोवती गुंडाळतात. कधी कधी पांढरी छोटीशी वाटोळी टोपी, पारशी लोकांसारखी ते घालतात. ती फक्त अर्ध्या टोकावर बसते. त्यांच्या शर्टाच्या डाव्या दंडावर थोडासा असा चिंचोक्या-एवढा एक डाग दोन दिवसांपूर्वी पाहिला होता. आज तोच शर्ट पुन्हा होता. कपड्यांना इस्त्री करीन असं करवीत नाहीत. स्वतंत्र धोब्याची तेथे व्यवस्था होती. पण त्यांचे धोब्याचे काम ते स्वतःच स्नानाबरोबर थोडेबहुत करीत असावेत असे दिसले.

‘सीमाप्रांताच्या लोकांत पुन्हा जागृती येईल? येथून तेथील पठाणांवर कसा प्रभाव पडू शकेल?’ मी विचारले.

“तेथील लोकांवर खूप अत्याचार झालेले आहेत. पंधरा वर्षे त्यांचा छळ झालेला आहे, पण ते चिरडले जाणार नाहीत. त्यांना कोणीच नष्ट करू शकणार नाहीत. अलीकडेच उत्तमझईस काही सभा झाल्याचे मला कळले. हजारो लोक सभेस हजर होते. त्याचा अर्थ त्यांना कोणी भयभीत करू शकलेले नाहीत. शस्त्रबळापुढे ते सतत टिकाव धरू शकणार नाहीत हे खरे, पण सरकार शस्त्राच्या बळावर किती दिवस राज्य करू शकते? आणि पठाणाच्या पाठीशी नीतीचे व धर्माचे बळ आहे. जगाला त्याची दखल घ्यावीच लागेल. हे भारताचे काम होते. पण भारताने ते केले नाही. भारताने पठाणाचा विश्वास सांभाळला नाही. पण पठाण भारताकडे आजही मित्रभावाने पाहात आहेत. पठाणांवर सर्व प्रकारचे पाशवी अत्याचार होऊ लागले तर त्या वेळी त्यांच्या पाठीशी नैतिक शक्ती उभी करणे भारताला शक्य आहे. भारताने वेळेवर निर्धार केला असता तर रशिया व इतर काही राष्ट्रे आमच्यापासून थोडी दूर गेली ती गेली नसती, आणि भारताने खंबीर धोरण ठेवले तर

असेंब्लीशी आपल्या पाठून अविरत प्रयत्नाने दिसून येईल तुमच्या स्वतःच्या सर्वस्वाकडे दुनियेचे लक्ष असो ”

अगदी गधपणे पण भावपूर्ण रीतीने ते बोलत होते त्यांचा नास्ता पुरा होण्यास त्यामुळे बराच वेळ लागला

“ तुम आज बाहर जानेवाले है ना ? गाडी चाहिये तो ले जाना ! ”

*

थोड्या वेळाने भारतीय दूतावासातून एक अधिकारी व गाडी आली मला पोस्ट ऑफिसाकडे जावयाचे होते जवळपासची काही ठिकाणे पहावीत, “ निदान बाजारहाट थोडा पाहा ” असा आग्रह सदर मित्राने केला भारतीय दूतावासामधील सर्वत्र ऐकू येणाऱ्या तक्रारींच्या उलट येथे अनुभव आला स्वतः ज० थापर आत्मीयतेने व कार्यदक्ष दिसले मी आजारी असल्याचे कळताच, भारतीय डॉक्टर पाठवू का अशी चौकशी त्यांनी दोन वेळा केली होती त्यांना मी साभार नकार दिला होता बादशहाखानांच्या स्थानामुळेच ते महत्त्व असणार ! मला दूतावासातील मित्राचे वेळेवर व भरपूर साहाय्य झाले होते हे नमूद करणे जरूर आहे

पोस्ट ऑफिसमध्ये गेलो पण तेथे तिकिट–कार्डे शिल्लक नसल्याचे सांगण्यात आले रस्त्यात उघडीनागडी पण सुंदर चेहऱ्यांची सुदृढ मुले दिसली मोटारजवळ उभे राहून गाडी सांभाळल्याबद्दल ‘ बक्षीस ’ मागणारे काही लोक भेटले, पण भिकारी कोठे दिसले नाहीत बाबर दर्ग्याजवळ भिकारी होते असे वाटते, पण एकंदरीत मुंबईत किंवा दिल्लीतही दिसणारे भिकारी व रोगी यांचे शोचनीय प्रदर्शन तेथे दिसले नाही

माहितीखात्याच्या दफ्तरातील प्रकाशने पाहावीत म्हणून तिकडे गेलो तेथील एका अधिकाऱ्याशी परिचय करून देऊन माझे मित्र थोडा वेळ दुसरीकडे काही कामासाठी गेले सदर अधिकाऱ्याच्या अंगावरही खादीचे नीटनेटके कपडे पाहून मला थोडा विस्मय व धन्यता वाटली बादशहाखानांच्या सेवेची ती पुसटशी चिन्हे होती

‘ आपण आल्याचे ऐकले होते थोडे दिवस राहणार ना ? ’ त्यांनी विचारले ‘ इच्छा खूप होती, पण इलाज नाही उद्या परत जाणार आहे ’ मी म्हटले

“ तुम्ही राहिल्यास बादशहाखानही येथे थोडे अधिक राहतील, नाही तर ते लागलीच जलालाबादला जातील तुम्ही भेटल्याने त्यांना बरे वाटले, त्यांनी भारतासाठीही किती कष्ट उठवले आहेत, पण ! ’ सदर अधिकारी अगदी सद्गदित रीतीने बोलत होते, ते पक्षाशीच्या जवळचे असावेत

‘ पण काय ? भारताला त्यांच्या सेवेची पूर्ण जाणीव व कदरही आहे, आम्ही त्यांना

गांधीजींच्या प्रमाणे मानतो '

'आम्हा पठाणांना आता तुमचा कमी भरवसा वाटू लागला आहे माफ करा, फारसा विशेष परिचय नसता मी बोलत आहे पण आपण मोकळेपणे बोलले पाहिजे माझा हा मातृदेश सोडून स्वतंत्र भारताच्या अभिमानाने गांधी-नेहरूंच्याबद्दलच्या आदराने वडा घेऊन भारतात आयुष्य घालवण्यासाठी तिकडे नोकरीसाठी गेलो होतो तेथे आठ वर्षे नोकरी करून शेवटी निराशने परत आलो आम्ही आजही भारताकडे आशेने-आपलेपणाने पाहतो पण भारत आम्हाला विसरलेला आहे '

त्या अपरिचित मित्राचा प्रत्येक शब्द माझ्या काळजाचा ठाव घेत होता त्यांची यात ही टीका नव्हती, ते आत्मसंशोधनासाठी आवाहन होते तो अपरिचित असला तरी त्याच्या पेशावाने आमच्याशी असलेल्या मार्दवाची निशाणी पटविलेली होती त्यामुळे त्याच्या टीकेचा राग येणे शक्य नव्हते

'तुमचा विषाद मी समजू शकतो, पण भारत पठाणांसाठी काय करू शकेल? त्याने युद्ध केले पाहिजे '

'आणि तुमच्या अंगावर आले म्हणजे तेही करताच! माझ्यासारख्याचाही भारतीयांच्या धोरणाबद्दलचा भरवसा कमी होऊ लागला आहे '

त्यांचा रोख पाकयुद्धावर व गोवान्चढाईवर होता असे वाटले, पण त्यांचा खेद जितका तीव्र होता तितकेच भारताबद्दलचे त्यांचे प्रेम गाढ होते ते भारतप्रेम स्वातंत्र्यनिष्ठेचे व आध्यात्मिक एकतेचे होते नेहरूंच्या नेतृत्वाबद्दलही त्यांना फार श्रद्धा व अपेक्षा होती आम्ही चहा घेत असता तेथे दुसऱ्या एका परराष्ट्र कचेरीतील एक अधिकारी आले त्यांच्याशी माझा परिचय करून दिला

'काल्चे भाषण आपण एकिले?' नवागताने मला विचारले

'जरूर!' थोडे थांबून मी उत्तर दिले 'न समजताही पुष्कळ एकता येते '

'आम्हालाही पुश्तू थोडेच नीट कळते? थोडे समजतो ' खान स्पष्ट बोलले। 'पण ते थोडे नाराज दिसतात! ते नाराज आहेत का?' त्याने पुन्हा प्रश्न केला आंतरराष्ट्रीय वकिलातीतील लोकांशी बोलणे कठीण असते, सदा कृत्रिम वातावरणात वागावे व बोलावे लागते हे माझ्या थोडे लक्षात येऊ लागले होते

'माझ्याशी त्यांच्या नाराजीचा संबंध कसा येणार? मी त्यांचा पाहुणा आहे ' मी उत्तर दिले

'तुमच्याशी नव्हे! येथील सर्व परिस्थितीबद्दल ते नाराज आहेत असे त्यांच्या परवाच्या भाषणावरून वाटले नाही?'

'मला त्यांचे भाषण कळल्यानंतर हा दुसरा भाग कळणार.' माझ्या उत्तराने सदर गृहस्थ मात्र थोडा नाराज झाला वाटला.

'समजा ते नाराज झाले तरी काय करू शकणार आहेत? ते आता विझलेल्या निखाऱ्यासारखे आहेत, त्यांच्या नाराजीची चिंता कोणाला व कशाला?' मी विचारले.

'No, no, he is neither a spent up force nor a sleeping volcano, Nations concerned know that any moment he can create problems for them, if he wished'

त्याने थोड्या घाईने आमची रजा घेतली. माझे मित्रही आले व मी त्या खादीधारी पठाणाचे अगदी स्नेहभावाने धन्यवाद दिले. अनेक गाठीभेटीत मला जे मिळाले नसते ते त्याने दहा मिनिटांच्या चर्चेतून दिले होते. इतर परराष्ट्र कचेरीतील लोकही बादशहाखानांच्या शब्दाकडे किती लक्ष ठेवून आहेत हेही थोडे पाहण्यास मिळाले. अर्थात त्यातील नक्की खरे कोणते व खोटे कोणते हे ठरवणे सोपे नसते. ती एक मायानगरी असते. तीन-चार दिवसांपूर्वी बादशहाखानाशी बोलावे कसे, त्यांच्याकडून माहिती मिळवता येईल का वगैरे चिंता मला सतावीत होती पण पाच सहा दिवसांच्या सहवासानंतर परकेपणाच्या व औपचारिकपणाच्या भिंती अलग होऊन गेल्या होत्या. खूप आदर असूनही काही फार मोठ्या नेत्यांशीही अगदी मोकळेपणे बोलता वागता येते, बादशहाखान हे त्यापैकीच होत. अननसासारखे बाहेरून खडबडीत असल्याचे प्रथम जाणवते, पण थोड्या सहवासानंतरच वरचे पापुद्रे गळून पडतात. एका प्रेमळ खुदाईखिदमतगाराचे त्यांचे हृदय प्रचीतीला येत जाते. राजकारणातील लोकांशी ते तितक्या झटपट मोकळेपणे वागत नसतील, निरनिराळ्या प्रकारच्या लोकांशी त्यांना संपर्क ठेवावा लागतो. जरूर ती दक्षता ठेवणे अपरिहार्यही असते. पण सर्वसामान्य जनता किंवा कार्यकर्ते यांच्याबरोबर ते अगदी मोकळ्या मनाने बोलतात. दु:खी कष्टी कार्यकर्ते पाहून तर त्यांच्या स्नेहाचे पाझर वाहू लागतात. ज्या बाजोरच्या खानांचा मृत्यू पाकिस्तानच्या गोळीबारात झाला होता असे ऐकिले होते त्यांची दोन मुले काकांच्या बरोबर घेऊन भेटीसाठी आली होती. त्या दोघांना आपल्या कुशीत सामावून घेताना त्यांच्या मनाची झालेली व्याकुळता त्यांच्या चेहऱ्यावर वादळ उठवीत होती. त्यांनी त्यांना आईच्या हाताने कुरवाळले, आपल्याजवळ बसवून घेऊन खूप वेळ त्यांच्याशी गुजगोष्टी केल्या! जुन्या कार्यकर्त्यांच्या आयाबहिणी त्यांच्याकडे येतात त्यांच्या समाधानार्थ ते किती तरी वेळ त्यांच्या सुखदु:खांत एकरूप होऊन जातात, बोलत राहातात, आणि दुसऱ्या भेटीसाठी येणारे अपरिचित लोकही तासन्‌तास बोलत बसतात, काही वेळी निरुपयोगी गोष्टी करणारेही लोक येतात, तेव्हा ते काही न बोलता त्यांच्यापुढे स्वस्थ बसून राहतात, पण त्यांना त्वरित

निरोप देऊन ते कधी मोकळे होत नाहीत

"तसे केल्यास फार आपला अपमान मानतात त्यांच्या समजुतीसाठी असा वेळ घालवतो" असा एकदा खुलासा त्यांनी माझ्या प्रश्नावरून केला होता दोन दिवसाच्या परिचयानंतर त्यांच्याशी मी खूप मोकळेपणे वागू लागलो होतो ते कोणाकडून काही भेट वगैरे स्वीकारीत नाहीत मी जाताना बरोबर काही उपयुक्त वस्तू नेल्या होत्या त्यात एक स्वेटर तयार करून नेला होता त्यांचे आजार लक्षात घेऊन वैद्याच्या सल्ल्याने उत्तम मोरावळा, च्यवनप्राश वगैरे काही वस्तू नेल्या होत्या स्वेटर त्यांच्या जेवणाच्या वेळी त्यांच्या पाटाशी ठेवला होता "हे घेऊन मी काय करू?" थोडे थट्टेनेच त्यांनी विचारले

'थंडीतही काही गरम कपडा वापरावा लागत नाही? आता तसे तुमचे आरोग्य राहिलेले नाही'

"मला जरूरच पडत नाही, आणि जेवढे लागते तेवढे माझजवळ आहे जादा ठेवून काय करू?" असे ते सांगणार व काही घेणार नाहीत याची मला माहिती होती प्यारेलाल यांच्याशी झालेल्या संभाषणात खलीफा उमरच्या डग्याची त्यांनी सांगितलेली गोष्ट मी वाचलेली होती"

'तुम्ही जादा कपडा ठेवणार नाहीच, पण प्रेमाने दिलेल्या वस्तूचा इन्कार तरी कसा करता येईल? माझ्या पत्नीने आपल्या अनेक भगिनींच्याबद्दल चार दिवसांत हा विणून घेतला भारतातील भगिनींच्या प्रेमाची ही भेट आहे कपडा म्हणून नव्हे'

"अच्छा! बहनोंने यह चीज मेरे लिये बनाई है? बडी मोहब्बत है। मेरा शुक्रिया उन्हें पहोंचाना" आपल्याबद्दल इतरांना वाटणाऱ्या आदराच्या स्मरणाने ते तत्काळ व्यथित होतात त्यांच्या दृष्टीत कृतज्ञताभाव तरळू लागतो

'आणि ही औषधे आहेत औषध व शक्तिवर्धक म्हणून उपयोगी होईल ते काही दिवस घेऊन पाहा झाल्यास चांगला उपयोग होईल'

"हां ठीक है। देखेंगे" मोठ्या कष्टाने त्यांनी त्या वस्तू तेथे राहू दिल्या त्यांचा उपयोग त्यांनी केला न केला अल्ला जाने!

'आता पुन्हा स्वस्थपणे बोलण्यास सवड होणार नाही ही शेवटचीच भेट.' थोड्या व्यथित भावनेने मी बोललो

'क्यों? तुमने तो फिर आनेका वायदा भी किया है। भूल गये?'

त्यांनी थोडे थट्टेने सांगितले, पण त्यामध्ये तीन दिवसांपूर्वी मी सहजगत्या बोललेल्या गोष्टीला आश्वासन बनवले होते त्यात त्यांचा प्रेमळपणा व कार्यकर्त्यांबद्दलचे आगत्य होते गांधीजींच्यानिमित्त पण थोड्या वेळामध्ये कार्यकर्त्यांबद्दलची इतकी आत्मीयता पाहिली

असेल बादशाहखानांना कार्यकर्त्यांचे तसे वेड होते म्हणूनच त्याच्या सभोवार कार्यकर्त्यांचे कडे ते खडे करून ठेवू शकले होते

' मी आलो तरी काय काम करू शकणार ? '

' आवो । तबियत तो ठीक करो । जलालाबादमें जरूर आवो । आनेके पहले मुझे मेसेज दे दो । तुम्हे वहाँ ले जानेकी तजवीज करेंगे, खादी कमिशन भी कुछ लोक भेजना चाहता हं ऐसा कमलनयनने कहा था । सबकी मदतसे जरूर कामयाबी होगी, पठाण काम के लिये तैयार हैं । उनको भरोसा देना चाहिये, उन्होने बहोत कष्ट उठाये हैं "

' तुम्ही भारतात येऊन जनतेला हा संदेश द्या '

" ते तुमचे काम आहे तुमच्या सरकारच्या मर्जीवर ते अवलंबून आहे मी भारतात येऊन काय मिरवणुकी आणि मेजवान्या घेऊ ? " येथे पठाणांना सोडून मी तिकडे कशाला येऊ ? हा, तुम्ही मला कळवा, लिहा, पठाणांच्या कामात भारत साहाय्यक होणार असेल तर त्यासाठी मी तिकडे जरूर येईन चिठी धाडा ! मी येईन, पण फक्त या कामासाठीच हे विसरू नका मला हिंदुस्थानच्या मैत्रीचे प्रेम नाही का ? पण येथील काम हे पहिले आहे हे ध्यानात ठेवा "

आणि त्यांची ती दर्दभरी वाक्ये ऐकत असताना अफगाण सरकारचे पाहुणे शिक्षणतज्ज्ञ श्री जी के आठल्ये पति पत्नी–उभयता तेथे आले त्या दिवशी दुपारीच ते हिंदुस्थानातून काबूलला परत आले होते त्यांच्याबरोबर त्यांच्या घरी मला मुक्कामास जावयाचे होते अत्यंत जड अंत करणाने बादशाहखानांची मी रजा घेतली त्या प्रश्नचिन्हांकित कुसरीच्या लाकडी दरवाजामागे त्यांना सोडून मी परत चालला होतो तेथील पहिल्या मैत्रीच्या वेळच्या अनिवार आनंदापेक्षा किती तरी पट विषादाचे वादळ माझ्या डोक्यात घेऊन मी बाहेर पडलो होतो आमची गाडी जोराने वाट काढीत होती ! साऱ्या काबूल शहरावर सूर्याची फिकट पिवळी किरणे पसरली होती ती शोभा, ते पोपलर वृक्ष, ते बागेचे सर्व काही आज म्लान, मरगळलेले असे वाटत होते बाजारात विक्रीसाठी मांडलेले द्राक्षांचे व खरबुजांचे प्रचंड ढीग हे सारे जणू माझ्या अचेतन डोळ्यापुढून चालले होते माझ्या रुग्णावस्थेमुळे मी अबोल बनलो असेन असे आठल्ये पति पत्नीस वाटून तेही थोडे सचिंत झाले होते, परंतु माझा आजार माझ्या स्मरणातही नव्हता दार-उल अमनच्या अतिथिगृहाच्या लाकडी फाटकावरील ते प्रश्न चिन्ह मला भेडसावीत होते परत निघण्यापूर्वी त्यांनी स्मरणपूर्वक सुताच्या दोन्ही गुंड्या परत दिल्या त्याचप्रमाणे ज्या ज्या वस्तूचा स्वीकार केला होता त्या पाठवणाऱ्यांसाठी ऌख मोलाची त्यांची स्वाक्षरी मी मागितली होती तीही त्यांनी माझ्या हाती दिली ही स्वाक्षरी मिळवणाऱ्या भाग्यवंतांमध्ये या चरित्राचे प्रकाशक श्री दामुअण्णा गनडे हेही एक आहेत आणी

— भावदर्शन —



सार्‍या सृष्टीत प्रेम आणि माणूसच आहे पेरलेले उगवण्यास काही वेळ लागतोच खुदावर भरवसा ठेवून आपण वाट पाहिली पाहिजे

▶



बाजौरच्या पठाणावर कैकवेळा बाँबवर्षाव केला त्यांनी काय पाप केले होते? स्त्रिया मुले यांच्यावर गोळे टाकणे ही काय इस्लामची सेवा?

◀



भारतात मी कशासाठी येऊ? मिरवणुका मुशाफिरीसाठी? तुम्ही आम्हाला विसरला आहात तुम्ही पठाणासाठी काही करणार आहात?

▶



▲

अफगाणिस्थानमध्ये १९६५-६६
ठिकठिकाणच्या
लोकसमुदायामध्ये
– बादशाहखान –

▼ ▶





बादशाहखान व
कमलनयन बजाज

बादशाहखानांसमवेत त्यांचे भारतातील खुदाईखिदमतगार सर्वश्री नारंग व नगीना
( डावीकडून १ ले व ३ रे )



खुदाई-खिदमतगार ( १९३० सालच्या सत्याग्रहापूर्वीची एक छावणी )

विदा झाले तेव्हा खांद्यावर हात ठेवून म्हणाले, "खुश रहो फिर आओ, यहाँ मिलकर काम जरूर कर सकते हैं" त्यांच्या हास्यातही खेद विषाद दाटलेला होता त्यांची ती वाक्ये चोहून तर्ही खोल दडून माझ्या कानांवर पुन्हा पुन्हा आदळत होती असे वाटते

"भारतावर पठाणांचे प्रेम आहे भारत आमच्यासाठी—पठाणांच्यासाठी—खूप खूप करू शकेल त्याचे ते कर्तव्य आहे स्वत च्या कल्याणासाठी भारताने पठाणांना साथ दिली पाहिजे तुम्ही नजर या पठाणांच्याप्रमाणे सर्व दलित मानवांच्या सेवेचे काम हे आपले काम आहे'

आठ दिवसांच्या तथील वास्तव्यात यांच्या तोंडून ऐकिलेली ही वाक्ये माझ्या कानांत घुमत होती 'एकमेका साह्य करू' हाच संदेश तर त्यांना भारताला द्यावयाचा नव्हता ना? 'सहनाववतु' 'तो आम्हा दोघांचे रक्षण करो' ही वदिकप्रार्थना त्यांच्या लाडक्या सुवास्तु नदीच्या काठावर रचिली गेली हा असेल तीच ज्यांची भावना त्यांच्या अंतरंगी जागत होती दि ५ सप्टेंबरला दुपारी पालम विमानतळावर उतरले तेव्हाही माझ्या कानांत तीच वाक्ये घुमत असल्याचा भास झाला 'तुम्ही पठाणांना साथ दिली पाहिजे! पठाणांनी तुम्हांला साहाय्य दिलेले आहे'

गप्पापुढे मी बोलणे म्हणजे समाजच्या बोगीतल धर्मयुद्ध ( जिहाद ) होय. प्रेमापोटी अनुयायी आणि सेवक या नात्याने मी वरील आदेश नेहमीच आपले डोळ्यांसमोर ठेवीत आलो आहे. आपणासमोर या आदिम धर्मसूत्रांचा उल्लेख करण्याचा उद्देश एव ढाच की आपले निवेदनपत्र तयार करताना ती आपणापुढेही असावीत. फिर्यादी पक्षाने केलेल्या आरोपांना उत्तर देण्यापूर्वी माझे जीवन व कार्य याबद्दल या कोर्टापुढे अल्पस निवेदन करण्यास मला परवानगी मिळावी."

प्रास्ताविक भागात आपल्या शिक्षणाचा व परदेशगमन आईच्या इच्छेमुळे रहित केल्याचा वृत्तान्त दिल्यानतर शिक्षणप्रसाराच्या कामाविषयी ते म्हणतात

"तेव्हा शिक्षणाच्या प्रसारासाठी मी आपल्या काही सहकाऱ्यांच्या मदतीने मुस्लिम शाळा स्थापण्याचा मोहीम हाती घेतली. परिणामी आम्ही बऱ्याच शाळा सुरू केल्या. दर म्यान खिलाफत चळवळ सुरू झाली आणि इस्लामचा एक नम्र पाईक या नात्याने मी या चळवळीत सामील झालो. या चळवळीत मला तीन वर्ष सक्तमजुरीची शिक्षा झाली. त्या वेळी मला अशीही जाणीव झाली की, आमच्या शिक्षणप्रसाराच्या कार्याची योग्य दिशा प्रगती होत असली तरी आमची सामाजिक स्थिती पूर्वीप्रमाणेच अतिशय खराब आहे. या नतर काही काळाने मी 'खिदमतगार' चळवळ सुरू केली. ही केवळ सुधारणावादी व सामाजिक स्वरूपाची चळवळ होती. आमच्या समाजातील अनेक रूढी व वडगळ समजुती दूर करणे हा या चळवळीचा मुख्य उद्देश होता. पण आमच्या या चळवळीस वाढ मिळत गेल्याने, तीच सरकारने आम्हास अटक केली. त्याचा मला अतिशय मनस्ताप झाला. आमची चळवळ दडपून टाकण्यासाठी सरकारने अशी काही अमानुष उपाययोजना केली की, तिचा मला उच्चारही करवत नाही. दरम्यान बराच काळ लोटला.

मला १९३० मध्ये गुजरात स्पेशल जेलमध्ये स्थानबद्ध करून ठेवण्यात आले होते. त्या वेळी हा जेल पजाबमधील राजबंद्यांसाठी राखून ठेवलेला असे. या ठिकाणी माझ्या एक-दोघा सहकाऱ्यांनी ब्रिटिश सरकार आमच्या लोकांवर कशी दडपशाही करीत आहे, याबद्दलच्या हकिगती माझ्या कानांवर घातल्या, त्यामुळे आम्हाला धक्काच बसला. नतर आपसात विचारविनिमय करून आम्ही असे ठरविले की आमच्या काही मित्रमडळींना दिल्ली, लाहोर व सिमल्यास जाउन मुस्लिम लीग व इतर मुस्लिमसघटनांशी सपर्क साधावा. आम्ही त्याना भावाप्रमाणे मानीत होतो व म्हणूनच या आणीबाणीच्या काळात ते आमच्या साहा य्याला धावून येतील, अशी आम्हाला आशा होती. काही दिवसानतर माझे मित्र परत येऊन सांगू लागले की, आम्हास मदत करण्याची मुस्लिम लीगच्या नेत्यांची बिलकुल तयारी नाही. कारण आमचा झगडा ब्रिटिश सरकारविरुद्ध आहे आणि ब्रिटिश राजवटीविरुद्ध

मोर्च्याही मर्सो ल्दा देण्याम त्यांची तयारी नव्हती

यानंतर आमची मित्रमंडळी काँग्रेसकडे वळली. काँग्रेसच्या नेत्यांनी आम्हाला सांगितले की आम्ही काँग्रेसला मदत केली, तर ते आम्हाला मदत करण्यास तयार होतील. आमची आणि काँग्रेसची मैत्री जुळली ती अशा परिस्थितीत आणि मग ब्रिटिशांबद्दलच्या वाढत्या अविश्वासामुळे आमच्या संघटनेचे 'सामाजिक' हे स्वरूप बदलून ती राजकीय चळवळ बनली. तरीही खुदाईखिदमतगार आणि तत्कालीन इतर राजकीय संघटना यात फरक होता. आमच्या संघटनेला राजकीय स्वरूप असले तरी तिची धार्मिक आणि आध्यात्मिक वैशिष्ट्येही कायम होती, तसेच तिचा पिंड सामाजिक आणि आर्थिक सुधारणा घडवून आणण्याचाच होता.

आम्ही कोणत्या परिस्थितीत काँग्रेसमध्ये गेलो हे मी मुद्दाम स्पष्ट केले. कारण (पाक) पंजाबमधील काही वृत्तपत्रे आजही आमची बदनामी करण्यात मश्गुल झालेली असून, आम्हाला 'काँग्रेसवाले' म्हणून हिणवून निष्कारण गैरसमज पसरवीत आहेत. आता या स्थितीत दोष आमचा होता की मुस्लिम लीगचा हे वस्तुस्थितीचा पूर्ण विचार करूनच कोणीही ठरवावे. सरहद्द प्रांतातील ब्रिटिश दडपशाहीला आम्ही एकटे तोंड देऊ शकत नव्हतो व इतर मुस्लिम नेत्यांनी आम्हांला मदत करण्यास नकार दिला. तेव्हा काँग्रेसशी मैत्री जोडण्यावाचून आम्हाला गत्यंतरच नव्हते.

गांधी–आयर्विन करार १९३१ मध्ये झाल्यानंतर माझी व माझ्या सहकाऱ्यांची मुक्तता झाली. त्यानंतर वर्षाचे शेवटी बैठक सिमल्याला झाली. मीही या बैठकीस हजर होतो. सिमल्यात एका कॉलेज विद्यार्थ्याने आम्हास सेसिल हॉटेलमध्ये जेवायला बोलावले होते. त्या वेळच्या पंजाब मंत्रिमंडळातील एक मंत्री सर फेरोजखान नून हेही जेवायला आले होते. ते मला म्हणाले, "काँग्रेसमध्ये जाऊन तुम्ही आमचा विश्वासघात केला आहे." मी त्यांना सांगितले की, सरहद्द प्रांतातील आम्हा लोकांना चिरडून टाकण्याचा ब्रिटिश सरकारचा इरादा आहे आणि आम्ही एकटे त्यांना तोंड देऊ शकत नाही. तेव्हा काँग्रेसमध्ये जाण्यावाचून आमच्या पुढे दुसरा मार्गच नव्हता. मी त्यांना हेही सांगितले की, आपले मुस्लिम बांधव म्हणून आम्ही प्रथम मुस्लिम लीगकडे साहाय्यासाठी धाव घेतली होती व ते आम्हास साहाय्य देतील अशी आशा बाळगून होतो, पण त्यांनी जेव्हा नकार दिला, तेव्हा आम्ही काँग्रेसशी हातमिळवणी केली. मी सर फेरोजना असेही सांगितले की, आम्हा मुसलमान बांधवांचे शिरकाण होऊ नये अशी जर त्यांची आणि इतर मुस्लिम नेत्यांची इच्छा असेल, तर फारसे बिघडलेले नव्हते. पंजाबच्या मुसलमानांनी आणि नेत्यांनी आम्हास सहकार्य द्यावे म्हणजे झाले. आम्हाला गुलामगिरीचा वीट आला होता. आम्ही स्वातंत्र्यासाठी आसुसलेले होतो. मुस्लिम लीगचे नेते या स्वातंत्र्यलढ्यात सामील झाले असते, तर आम्ही काँग्रेसमधून राजीनामा

देऊन बाहेर पडलो असतो. मी सर फेरोजखान यांना स्पष्टपणे सांगितले की त्यासाठी त्यांना आपले अधिकारपद सोडावे लागेल. मलिकसाहेब एवढेच म्हणाले की आपल्या मंत्र्यांशी विचारविनिमय केल्यानंतर या सूचनेबद्दल मी उत्तर देईन. अद्याप त्यांचे उत्तर यावयाचे आहे.

१९४६ च्या हिंदु-मुस्लिम दंग्याचे वेळी योगायोगानेच माझी मलिकसाहेबांशी पाटण्यास गाठ पडली. तेव्हा ते श्री यूनुस यांच्या हॉस्टेलात उतरले होते (बिहारच्या दंग्यानंतर) आता तुम्हाला काय वाटते असे त्यांनी मला विचारले. मी एवढेच सांगितले की मी पूर्वी जे उत्तर दिलेले होते तेच कायम आहे

पाकिस्तानच्या कल्पनेला माझा कधीच विरोध नव्हता, पण पाकिस्तानबद्दलच्या माझ्या कल्पना अगदी स्वतंत्र व वेगळ्या होत्या. माझ्या कल्पनेतल्या 'मुस्लिम मातृभूमीत' पंजाब-बंगालची फाळणी अभिप्रेत नव्हती. शिवाय मुस्लिम लीगच्या कित्येक पुढाऱ्यांच्या पाकिस्तानच्या मागणीमागे आपल्या देश-बांधवांबद्दल कळकळ आहे, यावर माझा कधीच विश्वास बसला नाही. कारण माझी खात्री होती की त्यांच्यापैकी बहुतेकजण ब्रिटिशांच्या ताटाखालची मांजरे आहेत. त्यांच्या सबंध आयुष्यात त्यांनी चुकून सुद्धा मुस्लिम जनतेची कळकळीने सेवा केलेली नव्हती की इस्लामच्या कार्याला मदत केली नव्हती. अशा कार्यासाठी पदराला थोडा सुद्धा खार लावून घ्यायला त्यांची तयारी नव्हती, पण पाकिस्तान आणि इस्लामच्या नावाखाली लोकांची दिशाभूल करण्याचा त्यांचा डाव होता हे मला ठाऊक होते. या लोकांना केवळ स्वार्थासाठी पाकिस्तान हवे होते आणि त्यांचा हा व्यूह यशस्वीही झाला. माझ्या मते हिंदू आणि मुसलमानांतील भांडण धर्मभेदामुळे निर्माण झालेले नव्हते. त्यामागे आर्थिक कारणे होती. ब्रिटिशांनी या भांडणाचा फायदा घेतला आणि ते वितुष्ट अधिकच विकोपाला जावे म्हणून प्रयत्न केले. माझी अशी खात्री होती, की ब्रिटिश सत्ता नाहीशी झाली, देश स्वतंत्र झाला व राष्ट्रीय सरकार स्थापन झाले, म्हणजे वातावरण बदलून जाईल आणि हळूहळू आमचे संबंध सुधारतील, पण त्यानंतरही हे संबंध सुधारले नाहीत आणि नव्या परिस्थितीतही आमचे समाधान झाले नाही, तर आम्हाला हिंदूंपासून वेगळे होता येईल. त्याआड कोणी येऊ शकणार नाही. काँग्रेसने प्रांतांच्या स्वायत्ततेला मान्यता दिली होती आणि एखाद्या प्रांतातील बहुसंख्य लोकांनी केंद्र सरकारपासून अलग व्हावयाचे ठरविले तर तसे करण्याचा व एक स्वायत्त राज्य म्हणून राहण्याचा त्याला एक हक्क होता

वायव्य सरहद्द प्रांतात लोकवस्ती मुख्यतः मुसलमानांचीच आहे. तेथे आमचे हिंदूंशी कधीच भांडण नव्हते. आमच्या कोणत्याही म्हणण्यास काँग्रेस मान्यता देत असे. त्यांनी आम्हाला कधीच विरोध केला नाही. देशाच्या स्वातंत्र्यासाठी आम्ही शक्यतो सर्व स्वार्थ-

त्यांचा ऐक्य होता. याची काँग्रेसच्या नेत्यांना जाणीव होती. सिमला परिषदेत जेव्हा यांची मूलभूत मुद्द्यावर मतभेद निर्णय झाले, तेव्हा मी सरदार अब्दुल रब निश्तार यांची भेट घेऊन त्यांना सांगितले की काँग्रेसची अडवणूक करण्याचे धोरण सोडून थाबयाला जिना तयार असतील, तर मुसलमानांना त्यांच्या न्याय्य हक्कांपेक्षाही अधिक थाही द्यायला महात्मा गांधी तयार आहेत. मुसलमानांच्या मागण्या मान्य होतील आणि त्यांच्या हक्कांचे संरक्षण होईल, याबद्दल हमी घेण्यास मी स्वत: तयार होतो. त्यानंतर सरदार निश्तार यां. जिना यांना भेटून त्यांचे मन वळविणार होते, पण ते त्यांना जमले नाही व परिषद अयशस्वी झाली.

अखंड भारतात दहा कोटी मुसलमान होते. एवढ्या मोठ्या समाजाला दडपून टाकणे कोणालाही शक्य नाही, असे माझे मत होते आणि याउपरही कोणी आमच्यावर गुलामगिरीचे पाश टाकू पाहात आहे असे समजले, तर आम्ही वेगळे व्हायला मोकळे होतो. याच विचाराने हिंदुस्थानात फेडरेशन स्थापन करण्याच्या कल्पनेस माझा पाठिंबा होता. माझे असे मत होते की काँग्रेसने आपल्या अटी मान्य केल्या आणि असे आश्वासन दिले की भावी हिंदुस्थान समाजवादी प्रजासत्ताक होईल, तर फेडरेशनमध्ये जाण्यात मुसलमानांचे हित होते. समाजवादी प्रजासत्ताक स्वरूपाच्या सरकारबद्दल मुसलमानांना अधिक आकर्षण वाटावे असे जे माझे मत होते त्याला कारण म्हणजे हिंदुस्थानात बहुसंख्य मुसलमान गरीबच आहेत. हिंदूंचे तसे मत नाही. या अटी काँग्रेसने मान्य केल्या नसत्या तर मुसलमान बहुसंख्य असलेले प्रांत फेडरेशनमधून बाहेर पडू शकले असते. आजही माझे असे मत आहे की त्यामुळे मुसलमानांना फायदाच झाला असता, कारण पंजाब आणि बंगालची फाळणी झाली नसती, पण मुस्लीम लीगचे पुढारी माझ्या योजनेचा विचारसुद्धा करायला तयार नव्हते कारण ते मलाच हिंदू म्हणत असत !

भारत आणि पाकिस्तानच्या स्थापनेचे वेळी भयंकर हाहा:कार झाला. लक्षावधी लोक एका देशातून दुसरीकडे गेले आणि हजारो लोक प्राणाला मुकले. एवढ्या मोठ्या संख्येने आलेल्या निर्वासितांची सोय लावणे कोणत्याही सरकारला सहज जमणे शक्य नव्हते. स्त्रियांना निवाऱ्याची जागा नव्हती व निर्वासित छावण्यांची व्यवस्था पाहणाऱ्या सरकारी कचेऱ्यांत ताळमेळ नसल्याने अनेक लोकांचे हाल झाले. निर्वासित छावण्यात अनंत अडचणी आणि निराशा यांचेच साम्राज्य होते. औषधोपचारांची मुळीच सोय नव्हती आणि जखमी व आजारी निर्वासितांची देखभाल करण्यासाठी फारच थोडे लोक स्वयंसेवक म्हणून पुढे आले होते. तेव्हा महमद हुसेन आगा नावाचे गृहस्थ सरदारगाव येथील आमच्या रायझनच्या कचेरीत मला भेटायला आले. ते १९४२ मध्ये माझ्याबरोबरच तुरुंगात होते. ते मला म्हणू लागले की तुम्ही स्वत:ला खुदाईखिदमतगार म्हणवता, तर लाहोर-

सरहद्द प्रांतात जाऊन निर्वासितांच्या अडीअडचणी काय आहेत, त्यांना कसला त्रास होतो आहे, हे प्रत्यक्ष जाऊन का पाहत नाही?' मी त्यांना सांगितले की ' मी निर्वासितांना मदत करण्यास तयार आहे, पण तेथील अधिकाऱ्यांच्या मार्गे काम करू देत नाहीत. त्यांनी आमच्यावर ही जबाबदारी सोपविली आणि मग जर आम्ही आमच्या कामात कसूर केली तर त्यांनी खुशाल आमच्यावर राग काढावा.' ही आग यांना मात्र म्हणणे पटले आणि ते लाहोरला गेले. पण एका महिन्यातच आपणास तक्रार करण्यात यश येत नाही असे सांगत ते परत आले. मी त्यांना जे जे सांगितले तीच वस्तुस्थिती होती. हे आता त्यांनाही पटले होते. मुसलमान समाजात आमची बदनामी करण्याची एवढेच मुस्लिम लीगच्या लोकांचे उद्दिष्ट होते हे त्यांनी मान्य केले.

पाकिस्तान अस्तित्वात आल्यावर सर जॉर्ज कनिंगहॅम हे माझ्या प्रांताचे पहिले गव्हर्नर होते. ते मोठे उत्साही आणि जुने ब्रिटिश अधिकारी होते. ते मुस्लिम लीगवाल्यांचे अगदी जवळचे मित्र होते आणि लीगला त्यांचा सदैव पाठिंबा असे. ते गेली आठ वर्षे माझ्या प्रांताचे गव्हर्नर होते. त्यांनी वाढत असलेल्या परिस्थितीची काळजीपूर्वक पाहणी केली आणि नंतर माझा भाऊ अब्दुल गनी यांच्यामार्फत निरोप पाठविला की, मुस्लिम लीग आणि खुदाई खिदमतगार यांचे संमिश्र सरकार स्थापन करण्यास मी संमति द्यावी. मी त्यांना सांगितले की मुस्लिम लीग याला मान्यता देण्यास कधीच तयार होणार नाही. कारण आम्ही समाजसेवा आणि पुनर्रचना यांना वाहून घेतलेले तर लीगवाल्यांना समाजावर सत्ता गाजविण्याची आकांक्षा. तेव्हा सर जॉर्ज यांचा हा प्रयत्न फसला. मी गव्हर्नरना आश्वासन दिले की मुस्लिम लीगच्या मंत्रिमंडळाने देशाच्या आणि समाजाच्या कल्याणासाठी काय सुरू केले तर आम्ही सरकारात नसलो तरी त्यांना पाठिंबा देऊ. पण समाजसेवेची हीही संधि आम्हाला देण्यात आली नाही.

मी प्रथम १९४८ मध्ये पाकिस्तानच्या घटनासमितीच्या बैठकीस हजर राहिलो तेव्हाच मी सांगितले की (हिंदुस्थानच्या फाळणीच्या रूपाने) जे व्हायचे ते होऊन गेले. आता पाकिस्तान हीच आपणा सर्वांची मातृभूमी आहे. सत्तारूढ पक्षाची देशसेवेची इच्छा असेल तर त्यांना हव्या त्या पद्धतीने आम्ही त्यांच्याशी सहकार्य करण्यास तयार आहोत. मी हेही स्पष्ट केले की सरकारला कोणत्याही प्रकारची आर्थिक तोशीस लागू देण्याची आमची इच्छा नाही. आम्ही आपला खर्च करू, कारण समाजसेवेखेरीज आमची कोणतीच आकांक्षा नाही. त्या वेळी नवाबजादा लियाकत अलीखान यांनी मला विचारले की, पठाणिस्तान म्हणजे काय? मी उत्तर दिले की आमची मागणी पठाणिस्तानची नाही, पख्तूनिस्तानची आहे. तेव्हा या नावाचे काय महत्त्व आहे असे त्यांनी विचारले. मी सांगितले की पंजाब, बंगाल, सिंध व

बलुचिस्तान हे जसे पाकिस्तानचे प्रांत आहेत तसेच पख्तूनिस्तान हेही पाकिस्तानच्या अधिकारक्षेत्रातील एका प्रांताचेच नाव आहे. मी असेही स्पष्ट केले की ब्रिटिशांनी आपल्या अमदानीत आमची शक्ती खची करण्यासाठी आमच्या प्रांताची फाळणी केली आणि आमच्या या विभागाची नामनिशाणी देखील राहू दिली नाही. आता आमची आपल्या पाकिस्तानी भाईबंदांना विनंती आहे की, ब्रिटिशांनी केलेल्या या अन्यायाचे त्यांनी निराकरण करावे, पठाणांचे ऐक्य घडवून आणावे व पंजाबप्रमाणेच आमच्या प्रांतास वेगळे नाव द्यावे. पंजाबचे नाव घेताच तेथे पंजाबी लोक राहतात असे चटकन समजते बंगाल, सिंध व बलुचिस्तानचेहि तसेच आहे. त्याचप्रमाणे पाकिस्तानच्या ज्या विभागात पख्तून भाषा बोलली जाते त्याला पख्तूनिस्तान म्हणावे एवढीच आमची इच्छा आहे. "

माझ्या वरील भाषणानंतर काही दिवसांनी कायदेआझम महंमदअली जिना यांनी मला जेवायला बोलावले. भोजनोत्तर आमची बराच वेळ चर्चा झाली. मी त्यांना सांगितले की आपल्याला ठाऊक आहेच की खुदाईखिदमतगार संघटनेचे कार्य सामाजिक स्वरूपाचे होते व ब्रिटिशांनी दडपशाही केल्यामुळेच या संघटनेला राजकीय स्वरूप आले. आता देश स्वतंत्र झाल्यावर माझे असे मत झाले आहे की आमची जनता सामाजिक दृष्ट्या मागासलेली राहिली तर तिला योग्य ती राजकीय दृष्टी येणार नाही कारण मागासलेल्या समाजात लोकशाहीची वाढ कधीच होत नसते.

माझ्या या विचारांनी कायदेआझमना विशेष समाधान वाटले त्यांनी माझ्याशी हात-मिळवणी केली आणि सांगितले की मी आपणास सर्व मदत देण्यास तयार आहे आता आपला समझोता झाला आहे.

मी कराचीहून निघताना कायदेआझमनी मला आश्वासन दिले होते की सरहद्द प्रांतातील दौऱ्याचे वेळी मी लाल डगलेवाल्यांचे नेत्यांना भेटेन त्यांनी माझ्यासाठी काही चरखे तयार करण्यास सांगितले आणि हे चरखे शक्य तितक्या लवकर पाठवावे अशी आशा व्यक्त केली जनतेची सामाजिक व आर्थिक पुनर्रचना करण्याच्या प्रश्नावर आमचा समझोता झाला होता मी आपल्या प्रांतात परत गेल्यावर आपल्या सहकाऱ्यांना कायदेआझमशी झालेल्या माझ्या बोलण्याची माहिती दिली व त्यांनी आमच्या तडजोडीस मान्यता दिली. आमच्या संघटनेच्या मुख्य कचेरीत कायदेआझम यांचे भव्य स्वागत करण्याच्या योजना आम्ही आखल्या. पण सत्तालोभी लोक आणि ब्रिटिश अधिकाऱ्यांना जेव्हा कायदेआझम आणि खुदाईखिदमतगार यांच्यात तडजोड झाल्याचे समजले तेव्हा ते फारच अस्वस्थ झाले. आमच्याशी झालेल्या तडजोडीनुसार कायदेआझमनी धोरण आखले, तर आपले भवितव्य धोक्यात येईल अशी त्यांना जाणीव झाली. या ठिकाणी हे स्पष्ट केले पाहिजे की, त्या

वेळी भामे प्रांतातील बहुतेक सर्व महत्त्वाच्या जागा अद्याप ब्रिटिश अधिकाऱ्यांकडेच होत्या. पार्लमेंटमध्ये मी मागणी केली होती की प्रांताचे गव्हर्नरपद आणि इतर महत्त्वाच्या पदांवर आज जेथे ब्रिटिश अधिकारी आहेत तेथे पाकिस्तानी नागरिकांची नेमणूक व्हावयास हवी. माझ्या या मागणीने मरहूम लियाकत अलीखान आणि ब्रिटिश अधिकारी अतिशय अस्वस्थ झाले होते. तेव्हा कायदेआझम आणि खुदाईखिदमतगार यांच्यात झालेली तडजोड हाणून पाडण्यासाठी मुस्लीम लीगचे पुढारी आणि ब्रिटिश अधिकारी यांची हातमिळवणी झाली.

दरम्यान सर ए. डी. एफ. डडाम यांनी सर जॉर्ज कनिंगहॅम यांच्याकडून गव्हर्नर-पदाची सूत्रे हाती घेतली होती. त्यांना जेव्हा माझ्या आणि कायदेआझम यांच्या समझोत्याची बातमी समजली तेव्हा त्यांनी आपल्या एका खास दूताला विमानाने कराचीस पाठविले आणि कायदेआझम यांना गळ घातली की खुदाई खिदमतगारांतर्फे आलेल्या निमंत्रणाचा त्यांनी कोणत्याही परिस्थितीत स्वीकार करू नये, कारण त्यामुळे खुदाईखिद-मतगारांचे वजन वाढेल.

कायदेआझम सरहद्द प्रांताच्या दौऱ्यावर आले, तेव्हा त्यांना भेटण्याची आम्हास संधीच देण्यात आली नाही. आमच्या विरुद्ध जो कट करण्यात आला होता, त्याची कडी म्हणजे मुस्लीम लीगवाल्यांनी कायदेआझम यांच्या मनात भरवून दिले की आमच्या मुख्य कचेरीत बोलावून त्यांचा खून करण्याचा आमचा इरादा आहे. या कटात खुद्द गव्हर्नरचाही हात होता.

त्यांचा मनसुबा यशस्वी झाला आणि कायदेआझमनी आमचे निमंत्रण स्वीकारले नाही. कायदे आझमनी इतर अनेक बिनसरकारी समारंभांची आमंत्रणे स्वीकारलेली होती आणि त्यांना ते प्रत्यक्ष हजरही राहिले. पण आम्हाला मात्र त्यांचेकडून पत्र आले की कोणत्याही बिनसरकारी समारंभात भाग घ्यावयाचा नाही असे कायदेआझमनी ठरविले आहे.

आमच्या निमंत्रणाचा अव्हेर केल्यानंतरही आम्ही खुदाईखिदमतगारांनी पेशावरला गव्हर्मेंट हाउसवर भेटावे, अशी त्यांची इच्छा होती. त्यावर आम्ही विचारविनिमय केला आणि असे ठरले की खुदाईखिदमतगारांच्या वतीने मी कायदेआझमना भेटावे. तेव्हा मी त्यांची भेट घेतली. आमची मुलाखत दोन तासपर्यंत चालली होती. त्या वेळीच मला दिसून आले की त्यांच्या सहकाऱ्यांनी आमच्याविषयी त्यांचे मन कलुषित केलेले होते. मी त्यांना स्पष्टपणे सांगितले की एक मुस्लिम या नात्याने माझी सर्व शक्ती म्हणजे त्यांचीच शक्ती असून, उलट तेही एक मुसलमान असल्याने त्यांची शक्ती हे माझ्याही शक्तीचे उगमस्थान आहे. तेव्हा त्यांनी मुस्लिम लीगमध्ये येण्याची विनंती केली. मी विचारले, " असे आप-

भेटले एक घटक योजनाच कशी फायदेशीर आहे हे मला पटवून देण्याचा त्यांचा प्रयत्न होता पण सिंध, बलुचिस्तान आणि सरहद्द प्रांतातील कार्यकर्त्यांशी चर्चा केल्यावर माझी अशी खात्री झाली होती की लोकांना ही सूचना मान्य नाही आणि केवळ बळाचे आधारावर एकघटक राज्य स्थापन करणे पाकिस्तानच्या हिताचे नाही मी या नेत्याना सांगितले त्या कठीण काळात एकघटक योजना अमलात आणून काहीही फायदा होण्यासारखा नाही मी त्याना सांगितले की एकघटक योजना अमलात यावी, असा तुमचा आग्रहच असेल, तर निमान पश्चिम पाकिस्तानात दोन घटक करा एक पंजाब व दुसरा छोट्या प्रांतांचा त्यावर सध्याचे पंतप्रधान चौधरी महमदअली यांनी सांगितले की एक तर एकघटक योजना राबविली जाईल, नाही तर आहे तीच स्थिती कायम राहील अशा रीतीने आमच्या वाटाघाटी स्थगित झाल्या एका बाजूला राजकीय प्रश्नाबद्दल वाटाघाटी चालू असतानाच गव्हर्नर जनरलच्या मध्यस्थीने डॉ खानसाहेब यांच्याबरोबर तडजोडीच्या वाटाघाटी चालू होत्या गुलाम महमद यांनी मान्य केले होते की सरकारने खुदाईखिदमतगारांवर पुष्कळच अन्याय केला आहे आणि तो विसरणे त्याना कठीण जाईल त्यांनी मला सुचविले की मी ही मंत्रिपद स्वीकारून नवा पक्ष स्थापन करावा आम्ही त्यांना सांगितले की, हा काही योग्य तोडगा नव्हे त्यामुळे केवळ खुदाईखिदमतगारांवरच नव्हे, तर सबंध पख्तून जमातीवर अन्याय होत आहे याउपरही सरकारबद्दल आम्ही कोणतेही किल्मिष मनात ठेवणार नाही किंबहुना आम्ही यापूर्वीच तसे वागत आहो तेव्हा आता जनतेचे प्रेम संपादन करणे आणि प्रजाजनांवर विश्वास टाकणे हे सरकारचे कर्तव्य आहे

पाकिस्तानची घटना संमत होऊन ते प्रजासत्ताक झाल्यावर श्री गुलाम महमद अध्यक्ष व्हावे की नाही, याबद्दल पंजाबी आणि बंगाली नेत्यांत मतभेद झाले बंगाली लोकांचे म्हणणे या प्रश्नावर पार्लमेंटचेच मते घेऊन निर्णय करावा या प्रश्नावरील दोन गटांतील हे मतभेद उघडकीला आले तेव्हा बंगाली सभासदांनी एकघटक राज्याला असलेला आपला पाठिंबा काढून घेण्याची धमकी दिली

गोष्टी अशा थराला आल्यावर एकघटक राज्याची योजना पार्लमेंटकडून मंजूर होणे अशक्य म्हणून सोडून द्यावी लागली आणि पर्याय म्हणून प्रादेशिक फेडरेशनची कल्पना पुढे मांडण्यात आली सरदार बहादूरखान यांच्या घरी एक बैठक भरविण्यात आली या बैठकीस सरदार आसदजान, सरदार अब्दुर रबनिश्तार, सरदार बहादूरखान आणि मी हजर होतो

बराच वेळ चर्चा झाल्यानंतर मी एका अटीवर प्रादेशिक फेडरेशनच्या योजनेस मान्यता दिली मी अट म्हणजे ब्रिटिशांनी ज्या पख्तून विभागाचे विभाजन केले होते ते सर्व भाग एकत्र आणून या घटकाला योग्य नाव देण्यात यावे अटक मार्गातील सगळा आणि पठाण

या दोन धोरेबाज लष्करी जमाती आहेत, असे ब्रिटिशांनी ठरविले होते तेव्हा त्यांची शक्ती कमी करावी, म्हणूनच ब्रिटिश लोकांनी त्यांना वगवगळ्या प्रांतात विखरून टाकले होते आता भारतात सर्व पठाणे एका प्रांतात आले आहेत, मग पाकिस्तान स्वतःला मुस्लिम लोकशाही म्हणविते तर सर्व पठाण एका प्रांतात आणण्यास प्रत्यवाय असण्याचे कारण नाही सर्व पठाणांना एकत्र आणा, एवढीच आमची मागणी आहे आम्ही मनोमन असे आश्वासन देतो की आम्ही सच्चे पाकिस्तानी असून, इतर पाकिस्तानी आमचे भाईबंद आहेत, असे मानतो एवढे आश्वासन देऊनदेखील काही पुढारी आणि वृत्तपत्रे आम्हाला देशद्रोही म्हणून दूषणे लावीतच असतात आम्हा पठाणांना वगवगळ्या विभागात विखरून टाकले असून, आमच्यावर अमुक एका विभागाबाहेर जावयाचे नाही, असे निर्बंध घालण्यात येतात या वगवगळ्या विभागांत ठरलेल्या आमच्या बांधवांच्या गाठीभेटी घेणेही आम्हांला मुष्कील करून टाकण्यात आले आहे ही प्रवृत्ती आम्ही सर्वस्वी निंद्य मानतो आमचा असा इशारा आहे की, जोपर्यंत पख्तून लोकांना विभक्त ठेवण्यात येत आहे तोपर्यंत पाकिस्तान बलवान होणार नाही पख्तूनांना न्याय्य वागणूक मिळाली तरच पाकिस्तानची एकात्मता साध्य होईल आणि या देशाचा मोठेपणा प्रस्थापित होईल

प्रादेशिक फेडरेशनची योजना पार्लमेंटात संमत होऊ शकली नाही, कारण आमच्या बंगाली बांधवांनी या योजनेस पाठिंबा दिला नाही तेव्हा पार्लमेंटातील पंजाबी मंडळींना दुसऱ्या एका योजनेवर विचार करणे भाग पाडले त्यावेळपर्यंत घटनेच्या स्वरूपाबद्दल एकमत झालेले होते केवळ पश्चिम पाकिस्तानच्या प्रांतांची रचना कशी असावी, एवढेच ठरवायाचे होते त्या वेळचे पंतप्रधान बोग्राचे महंमदअली यांना तेव्हा अचानक अमेरिकेस जावे लागले, पण आपल्या प्रयाणापूर्वीच त्यांनी जाहीर केले की, मी परत आल्यावर घटना बनविण्याचे काम पूर्ण होईल आणि पाकिस्तान प्रजासत्ताक होईल, पण पंतप्रधान परत येताच पार्लमेंट विसर्जित करण्यात आले आणि सारा देश मोठ्या काळजीत पडला

नवे मंत्रिमंडळ बनविण्यात आले तेव्हा डॉ खानसाहेब यानी मंत्रिमंडळात यावे, असे आवाहन करण्यात आले डॉ खानसाहेबांनी मंत्रिमंडळात जाणे मला मान्य नव्हते मंत्रिमंडळात गेल्याने ते देशाचे कोणतेही काम करू शकणार नाहीत, असे माझे मत होते उलट त्यांना स्वतःला असे वाटे की मंत्रिमंडळात जाण्याने ते इतरांना पाकिस्तानच्या निःस्वार्थ सेवेसाठी प्रवृत्त करू शकतील व हे जमलेच नाही तर, राजीनाम्याचा मार्ग मोकळा होताच नंतर पुन्हा एक घटक योजनेबद्दल विचार सुरू झाला सरदार बहादूरखान यांच्या घरी एक बैठक बोलावण्यात आली होती मलाही निमंत्रण होते माझ्याखेरीज डॉ खानसाहेब, मे जे इस्कंदर मिर्झा आणि सरदार अब्दुल रशीदखान (त्या वेळचे सरहद्द प्रांताचे मुख्य मंत्री) या बैठकीस

हजर होते. मी सांगितले की, ही योजना सत्तीने काही अमलात आणू नये. जनतेचे त्याबद्दलचे मत अजमावाव. माझ्या आठवणीप्रमाणे ही योजना अमलात आणण्यापूर्वी जनतेचा कौल घ्यावयाचा असा बैठकीत निर्णय झाला.

कराचीहून मी पंजाबात परत आलो. कारण मला या प्रांताबाहेर संचार करण्यास मनाई होती. कॅम्बेलपूर जिल्ह्यातील घोर कासी स्टेशनात मी राहू लागलो. सरहद्द प्रांतातील लोक मला भेटण्यासाठी तेथे येत. सरकारने आमच्या संघटनेवर, वृत्तपत्रावर आणि स्वुद्द माझ्यावर जे निर्बंध घातले होते, त्याबद्दल जनतेत तीव्र नापसंती होती. सर्वसाधारण मार्गांनी न्याय मिळण्याची जेव्हा आशा दिसेना तेव्हा कायदेभंगाचा चळवळ सुरू करावी असे काही लोकांचे मत पडले, पण मी त्यांना सांगितले, की आपण खुदाईखिदमतगार आहो. आपण हे सारे सहन केले पाहिजे आणि आणखी काही दिवस धीर धरला पाहिजे. दरम्यान नवे पार्लमेंट स्थापन झाले आणि त्याची पहिली बैठक मरी येथे बोलावण्यात आली.

१९५५ च्या उन्हाळ्यात नव्या पार्लमेंटच्या मरी अधिवेशनात पंजाब आणि बंगालच्या मधामधात एकघटक योजनेबद्दल पुन्हा मतभेद झाले. सरहद्द प्रांतात प्रवेश करण्याबाबत मजवर जी बंदी घालण्यात आली होती ती अजूनही कायम होती आणि श्री. दौलताना यांनी प्रसृत केलेल्या गस पत्रिकेत म्हटले होते की माझ्याशी कोणतीही तडजोड केली तर एकघटक योजना अमलात आणणे कठीण होईल, पण पार्लमेंटचे येथे अधिवेशन सुरू असतानाच अगदी आकस्मिकपणे मला सरहद्द प्रांतात प्रवेश करण्यास परवानगी देण्यात आली.

मी सरहद्द प्रांताकडे जाण्यास निघण्यापूर्वी मरीच्या गव्हर्मेन्ट हाउसवर माझी आणि मंत्र्यांची एकत्र बैठक झाली. श्री गुरमाणी यांनी एकघटक योजना त्यासमोर मजपुढे ठेवली. पण मीही त्यांना सांगितले की ही योजना अमलात आणण्याचे काहीही कारण नाही. तेव्हा श्री गुरमाणी म्हणाले, पाणी आणि वीजपुरवठा, खाणी, वाहतूक आणि मोठ्या कारखान्यांसाठी समान कार्यसंयोजना या अगदी आवश्यक गोष्टी आहेत. मी म्हटले की पश्चिम पाकिस्तानचे प्रादेशिक स्वराज्य करण्याने ही सर्व उद्दिष्टे साध्य होतील असा माझा अंदाज होता की, एकघटक योजना पाकिस्तानच्या दृष्टीने धोक्याची आहे. प्रांतीय निष्ठांची कदर केली पाहिजे आणि सर्व सरहद्दींच्या विकासाला संधी दिली पाहिजे. राजकीय दृष्ट्या पंजाब, सिंध आणि बलुचिस्तानचे लोक सरहद्द प्रांताच्या मानाने कमी प्रगत झालेले आहेत, असेही मत मी मांडले. माझे असेही मत होते की, पुढच्या काळात निवडणुका झाल्या तर, सरहद्द प्रांताव्यतिरिक्त पश्चिम पाकिस्तानात इतरत्र जहागीरदार वगैरे लोकच निवडून

येथील उत्तर सरहद्द प्रांतात जहागीरदारांची सत्ता संपुष्टात आली असल्याने मुस्लिम भागातील विभागांचेच लोक निवडून येतील. समग्र पश्चिम पाकिस्तानचे एकच विधिमंडळ असले तर बाकीच्या सरहद्द प्रांताच्या विधिमंडळाच्या मानाने ते अगदीच प्रतिगामी विचारांचे राहील. म्हणजेच एकघटक योजनेमुळे पठाण विभागावर प्रतिगामी विचारांच्या लोकांची सत्ता लादली जाईल. म्हणूनच पंजाबात राजकीय जागृतीचे कार्य मोठ्या प्रमाणात केले पाहिजे, अशी माझी सूचना होती.

एकघटक योजनेला मी मान्यता दिली तरी आणि देशात मोठ्या प्रमाणात राजकीय जागृतीचे काम केले पाहिजे, असे मत मांडले, तेव्हा त्या वेळचे अर्थमंत्री चौधरी महंमदअली यांनी आपली ग्रामविकास योजना मजपुढे मांडली आणि मी या योजनेचे संचालन करावे असे त्यांनी सुचविले. एकघटक योजना योग्य मार्गानेच अमलात आणली पाहिजे, या एका अटीवर मी ही सूचना मान्य केली. श्री. सुहरावर्दी यांनीदेखील ग्रामविकास योजनेला मदत दिली. पण सरकारच्या मदतीशिवाय आणि आर्थिक साहाय्याशिवाय काहीही करता येणार नाही, असे ते म्हणाले. तेव्हा एकघटक योजनेबद्दल कोणतीही तडजोड न होता हा करार निश्चित झाला.

मी सरहद्द प्रांतात येऊन पोचेपर्यंत ( एकघटक योजनेवर अजून विचार चालूच होता ) तेव्हा जनरल इस्कंदर मिर्झा आणि डॉ. खानसाहेब या प्रांताच्या दौऱ्यावर आले होते. आम्ही गव्हर्नर खान कुर्बान अलीखान यांचे पाहुणे होतो. मग येथे चौधरी महंमदअली यांनी जी ग्रामविकास योजना मजपुढे मांडली होती, तिच्याबद्दल अधिक माहिती जनरल मिर्झा यांनी मला दिली. ही योजना अमलात आणण्याची जबाबदारी मी स्वीकारावी अशी त्यांनी विनंती केली, पण एकघटक योजनेबद्दल आमचे समाधान होईपर्यंत ग्रामविकासाच्या या सरकारी योजनेचा प्रमुख म्हणून काम करणे मला शक्य होणार नाही असे मी त्यांना सांगितले. तेव्हा जनरल मिर्झा म्हणाले, एकघटक योजना ही पाकिस्तानच्या दृष्टीने आता आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठेचा मुद्दा झाला आहे. आताच्या घटकेला ही योजना रद्द केली तर, पाकिस्तानचे वजन कमी होईल आणि अफगाणिस्तानचे वजन वाढेल. मी हा मुद्दा खोडून काढला व त्यांना सांगितले की, एकघटक राज्य स्थापन करणे की न करणे हा पाकिस्तानच्या अंतर्गत राज्यव्यवस्थेचा प्रश्न आहे आणि याबाबत अफगाणांना काय वाटते याला महत्त्व असण्याचे कारण नाही. मी असे प्रतिपादन केले की, पठाण जर सुखी असतील, तर पाकिस्तानही बलवान आणि सुखी होईल. शिवाय पख्तूनांच्या विभागातील परिस्थिती सुधारून तेथील लोकांचे समाधान केले तर याबाबत पाकिस्तानविरुद्ध करण्यात येणारा सारा प्रचार फुसका ठरेल.

पंजाबी लोकांना आम्ही आपले मुसलमान व पाक बांधव मानतो. बंगाली, सिंधी आणि बलुची लोकांबद्दल आमची हीच भावना आहे. भूतकाळीच्या राजकीय निर्णयामुळे पश्चिम पाकिस्तानातील छोट्या प्रांतावर कोणी अन्याय केला आहे म्हणून पंजाबी लोकांविरुद्ध द्वेष-भावना पसरविण्याचे मला काय कारण ? सरहद्द प्रांतातील स्वायत्तता नष्ट करणारांबद्दल देखील माझ्या मनात वैरभाव नाही. पंजाबी लोकांशी वैर करण्याचे तर मला काहीच कारण नाही, कारण त्यांनी काही आमचे नुकसान केलेले नाही. एकघटक योजना लादताना पंजाबी जनतेला कोणी विचारले होते ? तेव्हा ही योजना लादण्याची जबाबदारी तेथील जनतेवर मुळीच नाही.

मी सदैव सच्चा मुसलमान आणि सच्चा पाकिस्तानी म्हणून वागत आलो आहे. पाकिस्तान स्थापन झाल्यापासून मी नेहमीच पाकिस्तानची सेवा करण्याचा प्रयत्न करीत आलो आहे. माझा असा दावा आहे, की पख्तून लोकांना जर एकत्र आणले तर पाकिस्तान अधिक बलशाली होईल आणि पंजाब, बंगाल, सिंध व बलुचिस्तानप्रमाणेच पख्तूनिस्तानच्या नावाला वेगळेच महत्त्व प्राप्त होईल. ब्रिटिशांनी पख्तूनांवर केलेल्या अन्यायाचे परिमार्जन करण्यात पाकिस्तानचा मोठेपणा आहे, हा अन्याय चालू ठेवण्यात नाही.

माझी भूमिका मी स्पष्ट केली आहे. आता सारा मामला मी आपणावर सोपवितो. एक-घटक योजनेविरुद्ध मी भाषणे केली. तेव्हा स्वतःला इस्लामी प्रजासत्ताक म्हणविणाऱ्या देशाचा एक स्वतंत्र नागरिक या नात्याने माझी जी कर्तव्ये आणि हक्क आहेत त्यांना स्मरूनच मी आपले विचार व्यक्त केले होते. ब्रिटिशांनी पख्तूनांवर केलेले अन्याय आता तरी दूर करा. ही मागणी पुन्हापुन्हा करताना मला कोणीही अडवू शकणार नाही. सरकारच्या हुकमाविरुद्ध वागून मी आपल्या देशबांधवांचे नुकसान केले आहे, असे आपणास वाटत असेल तर न्यायाचे तत्त्वानुसार मला जी शिक्षा देण्यात येईल, ती मी मोठ्या आनंदाने व कोणाबद्दलही मनात किंतू न बाळगता भोगण्यास तयार आहे.

# संबंधित स्फुटे

## (१) पख्तुनिस्तान हे वेदांचे जन्मस्थान आहे

बादशाहखान स्वत अहिंसेकडे कसे वळले याबद्दल महादेवभाई देसाई यांनी विस्मय व्यक्त केला आहे गांधीजी वैष्णव धर्मनिष्ठेत वाढले असल्याने अहिंसा विचाराचा विस्तार करणे त्यांना अधिक सुलभ झाले असेल हे स्वाभाविक आहे, जन्म-परंपरा वगैरेवरून काही निश्चित सिद्धान्त काढणे व्यवहार्य नाही आणि वैदिक आर्य हेही अहिंसा वादी नव्हते स्वत बादशाहखान हे कधी कधी 'आम्ही पूर्वी बुद्ध होतो' असे सांगतात, बुद्धांच्याकडून आपल्याकडे अहिंसा-जीवनाचा धागा आलेला असेल असा त्यांच्या म्हणण्याचा रोख असेलही "इस्लामला अहिंसा नवीन अगर अपरिचित नाही एक हजार वर्षांपूर्वी स्वत महंमदसाहेबांनी अहिंसेचा आचार केलेला आहे त्यांनीच ते धडे दिलेले आहेत" असेही बादशाहखान सांगतात परंपरा, आनुवंशिकता यांना काही मर्यादित अर्थाने महत्त्वही आहे व ते शास्त्रज्ञांनाही मान्य आहे याच दृष्टीने वेदांचे जन्मस्थान व पठाण प्रदेश यांच्या पारंपरिक संबंधावर प्रकाश टाकणारी ही माहिती येथे दिलेली आहे

बादशाहखान हे कट्टे 'पख्तून' वादी आहेत त्यांची जमात (टोळी) मोहमद व त्यांच्या जन्मस्थानाची नदी स्वात (स्वाती) या तीनही शब्दांचा उल्लेख ऋग्वेदात आलेला आहे

आपक्थसो, भलानसो भनन्तालीनासो विषाणिन शिवास । (ऋ ७-१८-७)

[दहा राजांच्या युद्धासाठी जमलेल्या जमातींची ही नावे या ऋचेत दिलेली आहेत त्यामध्ये पख्त हे आहेत सध्याच्या टोळ्यांच्या नावांपैकी बरीच नावे वैदिक नावांपासून आलेली आहेत ]

बादशाहखान ज्या मोहमंद जमातीतील आहेत तो 'मोहमद' शब्द हा मधुमन या वैदिक शब्दाचा अपभ्रंश होय. केवळ मधाच्या व्यापारावर योगक्षेम चालवणारे आजही काही पख्त-पठाण आहेत. या मधुमन शब्दावर प्रो. वासुदेवशरण अग्रवाल यांनी पुढील टिपण दिलेले आहे :

Panini mensions Madhumant as the name of a country in the region of Gandhar ( IV–133 ). The Mahabharat mensions the Madhumant as a people. (भीष्म–पर्व–IX–53.) The Madhumant are clearly the Mahamuds who occupy the territory to the north of the Kabul river, their home-land Dir–Bajour, covering an area of 1200 Sq miles. (India as Known to Panini, P. 455)

पाणिनीच्या काळी ( इ. स. पूर्व चौथे शतक ) मोहमद हा शब्द देशवाचक म्हणून दिलेला आहे तर महाभारतात त्याचा उल्लेख लोकवाचक स्वरूपाचा आहे. आजही हा शब्द लोकवाचक मोहमद जमात, व मोहमद-विभाग प्रदेशवाचक, असा दोन्ही अर्थी तो वापरला जात आहे.

बादशाहखानाचे गाव उतमझाई हे स्वात नदीच्या काठी आहे. 'स्वात'–स्वाती–या नदीचे नाव ऋग्वेद काळी व पाणिनीकाळीही 'सुवास्तु' असे होते.

उतमे–प्रयियोर्नयियोः सुवास्त्वा अधितुग्वनि । मडल ८, सूक्त १९, ऋचा ३७

( या ऋचेत सुवास्तु नदीतून वाट कशी काढली वगैरे वर्णन आहे. )

नदीसूक्तांत ( ऋ. १०–७५ ) वर्णिलेल्या एकूण ३१ नद्यांपैकी बऱ्याच वायव्य सीमा प्रदेशातील आहेत. सिंधू नदीला मिळणाऱ्या ( पश्चिमेकडून व पूर्वेकडूनही ) नद्यांची ही वर्णने आहेत. यामध्ये सीमाप्रांताची कुभा–( काबूल नदी ) हिलाच सुवास्तु ( स्वात ) व गौरी ( पञ्जकोर ) या मिळाल्या आहेत सीमा प्रदेशातील काबूल नदीच्या दक्षिणेकडील क्रुमु ( कुर्रम ) व गोमति ( गोमल ) यांचाही उल्लेख आहे. ऋग्वेदाच्या रचनाकालाचा बराच भाग अफगाणिस्तान व सीमाप्रदेशातील आहे हे बहुतेक पंडितांना मान्य आहे.

पक्थ, भलानस, विशानिन् अलिन, शिव या जमाति सीमा प्रदेशातीलच आहेत, पक्त–हे यमुनदीच्या उगमाजवळ राहणारे असे श्री. पुसाळकरांचे मत आहे ( The Vedic Age, Vol I–A D Pusalkar, P. 245.47 )

पाणिनीने अष्टाध्यायीत उल्लेखिलेली पुढील नावे या दृष्टीने नोंद करण्याजोगी आहेत.

| अफगाणिस्तान | नद्या |
|---|---|
| पाणिनीकालीन नांव | अर्वाचीन नाव |
| वाक्षु | आक्सस |
| सेतुमती | हेल्मंद |
| कुभा | काबूल |

**सीमा प्रदेश**

| | |
|---|---|
| पञ्जिर | कापिसी |
| त्रिगर्तिका | कुनार |
| गारी | पज कोरा |
| सुवास्तु | स्वात |
| क्रमु | कुर्रम |
| गोमति | गोमल |
| तोची | टोची |

**शहरे, ( अफगाणिस्तान )**

| | |
|---|---|
| द्वारका | दरवाझ |
| बाह्लिक | बाल्ख |
| द्व्यस्यायन | बदक्शान |
| कापिसायन | काफिरिस्तान |
| मुजायन ( गिरी ) | मुजान |
| बामियान | बामियान |

**शहरे प्रदेश व जमाती ( सीमाप्रांत )**

| | |
|---|---|
| अश्वायन | युसफझाई |
| मधुमत | मोम्मद |
| न्यस्यायन | तारखान खेर |
| पुष्कलावति | चारसदा |
| मशकावति | मस्सागा |
| उरशा ( शा ) | हजारा |

## शहरे, प्रदेश व जमाती ( सीमाप्रांत )

| | |
|---|---|
| हस्तिनायन | पुरुषपूर, पेशावर |
| सलातुर | सलातुर ( पाणिनीचे जन्मग्राम ) |
| निरावतिका | तिहा |
| वानव्य | वाना |
| वर्णू | बन्नू |
| अपरिता | अफ्रीडी |
| पर्विदास | पोविंदास |
| सैंधव | सॉल्टरेंज |
| तक्षशीला | टॅक्सिला |
| चकवाळ | चकवाळ |
| अटक | अटक |
| शकद्रा | चकदरा |

### पर्वतराजी

| | |
|---|---|
| त्रिककूट ( अथर्ववेद-अंजनगिरी पाणिनी ) | सुलेमान |
| लोहित गिरी ( लष्करी महत्त्वाच्या लोकांची राज्ये असलेला भाग ) | हिंदुकुश |
| मुजवगिरी | को ह ई मुंजा |
| कंबोज | पामीर |

संत पाणिनी हा नंतरच्या या पटांगप्रदेशात जन्मलेला आहे त्याचे जन्मस्थान सलातुर हे कुभा- ( काबूल ) व सिंधू यांच्या संगमाजवळ व ओहिंदपासून ४ मैलावर आहे ओहिंद हे प्रत्यक्ष संगमाचे स्थान असून त्याचे पूर्वनाम उद्भांड असे आहे तेथून गलन्नानून मोठ्या व्यापारी उन्नाठली होत उदभांडपासून ६० मैलांवर गांधाराची राजधानी तक्षशीला नगरी आहे

### स्तूप व विहारांचे निकट सान्निध्य

चार हजार वर्षांपूर्वीचे हे शब्दावशेष संस्कृत भाषेमुळे राहिलेले आहेत तर बुद्ध प्राचीन संस्कृतीचे अवशेष अभंग व भंगलेल्या बोधिसत्त्व मूर्ती, स्तूप व विहार यांच्या रूपाने सीमाप्रदेशभर विखुरलेले आहेत खुद्द पेशावर शहराच्या सभोवार अनेक विहारांचे अवशेष आहेत अशोकाचा राज्यविस्तार कंदाहारपर्यंत होता याचे पुरावे अलिकडेच त्या

भागात सापडलेल्या लेखांवरून अफगाण संशोधकांनी ही स्वीकारलेले आहे पेशावर-हजारा येथील अवशेष हे मोय कुशान काळातील म्हणजे इ पूर्व १०० ते इ स च्या पाचव्या-सहाव्या शतकातील आहेत इस्लामचे संस्कार या सीमाप्रदेशाला ७ व्या ८ व्या शतकांत झाले ' आम्ही पूर्वी बुद्ध होतो ' हा बादशाहखानांचा उल्लेख या ऐतिहासिक व सांस्कृतिक परंपरेसंबंधीचा होय विचारांचे संस्कार हे दगडातील संस्कारांपेक्षा अधिक चिवट व टिकाऊ असतात चन्द्रगुप्त-अशोकाच्या काळात त्या भूमीवर झालेले संस्कार पठाणांच्या अहिंसा स्वीकाराच्या वैचारिक क्रांतीस साहाय्यक झाले नसतील असे मानण्याचे कारण नाही केवळ ऐतिहासिक दृष्टीनेच या विचारास महत्त्व आहे स्वत बादशाहखान यांनीच अनेक ठिकाणी हे व्यक्त केले आहे की ' शस्त्रबळाच्या खोट्या मगरुरीमुळे पठाणांनी फक्त आत्मनाश साधला अंतर्गत कलह मिटविण्यास व वाढविण्यास पुरण्याइतकीच ती शस्त्रे उपयुक्त होती ' उलट नि शस्त्र झालेला पठाण हा सशस्त्र ब्रिटिशांना एक समस्या होऊन बसला होता बळ शस्त्राचे नव्हते तर जागृत मनाचे होते ही स्मृती स्फूर्ति जागृती इतर अनेक माध्यमाप्रमाणे ऐतिहासिक स्मारकांतूनही मिळत असते सीमाप्रदेशातील लोकांच्या अहिंसेच्या श्रद्धेची विपुल स्मारके त्या प्रदेशात हजारो वर्षे उभी आहेत बादशाहखानांच्या बालमनावरच त्यांचा खोल संस्कार झालेला असणे समजनीय आहे

# ( २ ) विनोबा भावे – बादशाहखान – पत्रे

[ पू विनोबा भावे यांनी बादशाहखान यांना पाठवलेले पत्र व त्यावर बादशाहखान यांनी पाठवलेले उत्तर ही मूळ व संपूर्णत पुढीलप्रमाणे आहेत ती जशीच्या तशी कोठे प्रसिद्ध झालेली नाहीत ]

Brahma Vidya Mandir
Paunar (Wardha)
Maharashtra India
5th April, 1965

My dear Badshahakhan,

I am distressed beyond words to have to admit that in our freedom fight a great injustice had been done to you and you have been practically let down by our friends But you have borne it all with great patience and fortitude Your example has been a source of inspiration to all of us

In my walking tour through the length and breadth of India and also a part of East Pakistan you have been always in my mind, I was hoping that circumstances might allow you to start a similar movement in Pakistan But it was not to be It seems God s will was otherwise

These days a conviction has been growing within me that in this age of nuclear weapons politics so called are quite outdated and problems national and international can only be solved by resort to spirituality — 'Ruhaniat' as we call it in Urdu and I know that you are essentially a man of God, with deep spiritual convictions rather than a man

of politics You have always been a staunch believer in non-violence and self sufferings May be that after putting you to so much trial, God intends to use you as an instrument in solving world problems 'Bashshiris Sabireen'

With affectionate regards

Your younger brother,
Sd/ Vinoba

Kabul
5 5 65

My dear Vinobaji,

I was deeply touched to receive your affectionate letter of 5th April 1965 It is extremely fortifying to receive a note of encouragement from a source so worthy as yours to a person who is fighting a loosing battle not only with his adversaries but his own rank and file who have become so desperately disgusted with the tyranical government of Pakistan They are loosing confidence in the creed of non-violence which I had taken so much pains to inculcate in their hearts Their argument is that with the Britishers who were a civilized nation brought out in the democratic traditions of their home land, the non violence could have its efficacy, but not with Pakistanis, who do not attach much importance to the moral values

In the last 18 years, since Pakistan came into being I have been, as you know, behind bars for 15 years—mostly in solitary confinements—with taunts and insults from those who were my wardens This was not only my fate All those who were Khudai Khidmatgars—and you know, they formed an absolute majority in our land—have undergone similar treatment, rather worse than mine Their property is confiscated and their children and families are now destitutes because their bread-earners are in prison If you add to the list the savage bombardment of Baluchistan and Tribal Area the picture becomes very grim indeed Balu

chistan and Bajur are even now the operational ground for the Pakistan Army where they have encircled vast areas and where the military operations are still in progress. I will not mention the casual shootings now and then of the peaceful citizens of my country. There is none to report these brutalities to the outside world. Our newspapers have been banned, our organisation is declared unlawful, our centre has been demolished and we have been deprived of all human rights even of those given to us by the alien British Government. The Government and people of Pakistan label us as Hindus whenever we open our mouth or move in the public. I tried to serve the people of Pakistan but they do not allow me to do so Because of my past association with Congress they do not trust me for anything We are heading towards a catastrophe.

Vinobaji! this is being done to me when I have not moved a finger against Pakistan nor done anything to start a movement, campaign or action against any government in that country, though much they may deserve it. I do not know what to do now. Kindly think over it and give me your advice which I value most in the whole world. Should I leave my people in that condition? It is not possible. But to do anything has become impossible.

My comrades in India, who are now in Government, cannot realise my difficulties, because we have become a different class now. They do not see anything bad in it. I am now a man of a different world to them though it is for the faithful and honest association of these friends that my nation and myself has been reduced to this miserable plight. I do not know what their conscience says but if I would have been in their place, I would have acted otherwise to secure justice for them for the sake of humanity if nothing else. Sorry to have bothered you for all this tale of woe.

With best wishes and affection,

Your brother,
Sd/- Abdul Ghaffar

# ( ३ ) डॉ. कम्बोज-पत्र

## ‘ ती दडपशाही नव्हती - ते प्रत्यक्ष युद्ध होते ’

[ वायव्य सीमा प्रदेशातील सत्याग्रहीलढ्यांमध्ये विलक्षण संयमाच्या व शांततेच्या प्रतिकाराच्या अशा ज्या घटना घडल्या त्यामध्ये डॉ गंगासिंग कम्बोज या सरकारी अधिकाऱ्याच्या कुटुंबीयांवरील गोळीबारानतरची घटना उल्लेखनीय आहे गढवाली पलटणीतील सैनिकांच्या शस्त्रत्यागाच्या घटनेप्रमाणेच या पाशवी अत्याचाराच्या घटनेला त्या वेळी काही ब्रिटिश व अमेरिकन पत्रकारांनी व ग्रथकारांनी प्रसिद्धी दिली होती डा पट्टाभि सितारामय्या यांच्या काँग्रेस इतिहासामध्येही या घटनेचा उल्लेख आहे दि ३१ मे १९३० रोजी सकाळी गंगासिंग, त्यांची पत्नी श्रीमति तेजकौर, मुलगा काका बख्तरसिंग ( वय दीड वर्ष ) व मुलगी बेबी हरपाल ( वय ५ वर्षे ) व मेहुणी असे टांग्यातून गुरुद्वाराकडे दर्शनार्थ जात असता एका ब्रिटिश कार्पोरलने ( K D Y L I ) गाडीवरून टांग्यावर गोळ्या झाडल्या त्याबरोबर ‘झाडावरून पक्षी मरून पडावत तशी’ आईला बिलगून बसलेली ही दोन मुले जागच्या जागीच मरून पडली व तेजकौरचा स्तन उडून त्या जखमी झाल्या त्यासंबधीचे स्वत डॉ गंगासिंग यांचे पत्र पेशावर ( पंजाब ) चौकशीसमितीच्या अहवालात आहे त्या भीषण घटनेनंतर कमिशनरच्या परवानगीने स्मशानयात्रा निघाली असता त्या लोकांवरही पूर्वइशारा न देता गोऱ्या सैनिकांनी दोन ठिकाणी गोळीबार केले त्या भीषण व प्रक्षोभक घटनांचे सविस्तर वृत्त त्या वेळच्या प्रकाशनात आलेले आहे त्याची चित्रेही उपलब्ध आहेत त्यांचे स्मरणही विलक्षण क्लेशदायक आहे डॉ गंगासिंगांच्या टांग्यावर झालेला हा गोळीबार चुकून झाला होता व ती एक दुर्दैवी घटना झाली अशा प्रकारचा खुलासा अधिकाऱ्यांकडून प्रदर्शित करण्यात आला होता पण असे प्रकार क्वचित घडलेले नव्हते टांग्यातून स्त्रिया व मुले चालली असता जेलच्या गेटजवळ, गोऱ्या

